भाषांतरमाला क्र. ३९

# मी – इझाडोरा !

*Isadora Duncan* यांच्या *My Life* या पुस्तकाचा अनुवाद

अनुवादिका
श्रीमती रोहिणी भाटे

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई



Isadora Duncan

. . . . What is the truth of a human life, and who can find it ? God himself would be puzzled. In the midst of all this anguish and delight; this filth and this luminous purity; this fleshly body filled with hell fire, and this same body alight with heroism and beauty where is the truth ? God knows, or the devil knows— but suspect they are both puzzled ! . . . .

भाषांतरमाला क्र. ३९

# मी – इझाडोरा !

*Isadora Duncan* यांच्या *My Life* या पुस्तकाचा अनुवाद

अनुवादिका
श्रीमती रोहिणी भाटे




महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ
मुंबई

/

**प्रा. गणेश सदाशिव भाटे**

## प्रिय दादा,

"स्त्रिया म्हणजे पुरुष नातेवाइकांनी चालविलेली कळसूत्री बाहुली नसून, त्या समाजाची कीर्ती वाढविणाऱ्या सन्मान्य घटक आहेत, हे तुम्ही जगाला पटवून द्यावे, अशी माझी इच्छा आहे..."

... असं तुम्ही वारंवार म्हणत असा – तुमच्या पंचकन्यांनी तरी तुमची ही विचारधारणा आपापल्या जीवनात आचरणात उतरवून दाखवावी, असा तुमचा आग्रह असे ...

... पण मी अडीच वर्षांची होते न होते, तोच तुम्ही स्वर्गवासी झालात – तुम्हाला मी न कधी जाणतेपणी पाहिलं, ना तुमचा शब्द समजतेपणी ऐकला. तुमचे विचार मात्र माझ्या-पर्यंत आतून - बाहेरून कसे न् कसे येऊन पोहोचले, अन्तर्यामी रुजले ! ... त्याचमुळे,

... स्त्रीचं व्यक्तिमत्त्व जीवनाच्या कोणत्याही टप्प्यावर, अवस्थेत किंवा परिस्थितीत स्वतंत्रपणे फुलत राहिलं पाहिजे, विकसित झालं पाहिजे ... स्त्रीचं जीवन एकसुरी, एकपदरी होता कामा नये, आणि तिची अस्मिता अबाधित राहिली पाहिजे ... तसंच, ते व्यक्तिमत्त्व नि ते जीवन नीट फुलणं, वाढणं, ही सर्वस्वी प्रत्येक स्त्रीची स्वतःची जबाबदारी आहे — असं मी मानत आले; आम्ही 'पंचकन्या' मानीत आलो. प्रिय आईनं तुमच्या मागे, अशी ही तेजस्वी धारणा जीवनात टिकवून धरायला लागतं ते मनोधैर्य, ते बळ, ती चिकाटी आमच्या ठायी रुजवली...

... पण ही प्रेरणा मात्र प्रथम तुमचीच ... आणि म्हणून दादा,

'मी – इझाडोरा !' हा एका विलक्षण मनस्वी व्यक्तिमत्त्वाच्या नर्तकीच्या आत्मवृत्ताचा मी सहानुभावानं केलेला अनुवाद तुम्हालाच सप्रेम अर्पण

तुमची

**रोहिणी**

# निवेदन

आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञाने, तंत्र आणि अभियांत्रिकी इत्यादी क्षेत्रांत त्याचप्रमाणे भारतीय प्राचीन संस्कृती, इतिहास, कला इत्यादी विषयांत मराठी भाषेला विद्यापीठाच्या स्तरावर ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य यावे हा उद्देश लक्षात घेऊन साहित्य-संस्कृति मंडळाने वाङ्मय-निर्मितीचा विविध कार्यक्रम हाती घेतला आहे. मराठी विश्वकोश, मराठी भाषेचा महाकोश, मराठी वाङ्मयकोश, विज्ञानमाला, भाषांतरमाला, आंतरभारती-विश्वभारती, महाराष्ट्रेतिहास इत्यादी योजना या कार्यक्रमात अंतर्भूत केल्या आहेत.

२. मराठी भाषेला विद्यापीठीय भाषेचे प्रगत स्वरूप व दर्जा देण्याकरिता मराठीत विज्ञान, तत्त्वज्ञान, सामाजिक शास्त्रे आणि तंत्रविज्ञान या विषयांवरील संशोधनात्मक व अद्ययावत माहितीने युक्त अशा ग्रंथांची रचना मोठ्या प्रमाणावर होण्याची आवश्यकता आहे. शिक्षणाच्या प्रसाराने मराठी भाषेचा विकास होईल, ही गोष्ट तर निर्विवादच आहे. पण मराठी भाषेचा विकास होण्यास आणखीही एक साधन आहे आणि ते साधन म्हणजे मराठी भाषेत निर्माण होणारे उत्कृष्ट वाङ्मय हे होय. जीवनाच्या भाषेतच ज्ञान व संस्कृती यांचे अधिष्ठान तयार व्हावे लागते. जोपर्यंत माणसे परकीय भाषेच्याच आश्रयाने शिक्षण घेतात, कामे करतात व विचार व्यक्त करतात, तोपर्यंत शिक्षण सकस बनत नाही, संशोधनाला परावलंबित्व राहते व विचाराला अस्सलपणा येत नाही, एवढेच नव्हे तर वेगाने वाढणाऱ्या ज्ञानविज्ञानापासून सर्वसामान्य माणसे वंचित राहतात.

३. संस्कृत व अन्य भारतीय भाषांतील आणि त्याचप्रमाणे इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, इटालियन, रशियन, ग्रीक, लॅटीन इत्यादी पश्चिमी भाषांतील अभिजात ग्रंथांचे व उच्च साहित्यामधील विशेष निवडक पुस्तकांचे भाषांतर किंवा सारांश-

अनुवाद अथवा विशिष्ट विस्तृत ग्रंथांचा आवश्यक तेवढा परिचय करून देणे हा भाषांतरमालेचा उद्देश आहे.

४. भाषांतर योजनेतील पहिला कार्यक्रम मंडळाने आखून, ज्यांना अग्रक्रम दिला पाहिजे अशी पाश्चात्त्य व भारतीय भाषांतील सुमारे ३०० पुस्तके निवडली आहेत. होमर, व्हर्जिल, एस्किलस, ॲरिस्टोफेनीस, युरिपिडिस, प्लेटो, ॲरिस्टॉटल, थॉमस ॲक्वाइनस, न्यूटन, डार्विन, रूसो, कॉंट, हेगल, जॉन स्टुअर्ट मिल, गटे, शेक्सपीअर, टॉलस्टॉय, दोस्तएव्स्की, कॅसिरेर, गार्डन व्ही. चाइल्ड इत्यादिकांचा या भाषांतरमालेत समावेश केला आहे. संस्कृतमधील वेद, उपनिषदे, महाभारत, रामायण, भरताचे नाट्यशास्त्र, संगीतरत्नाकर, ध्वन्यालोक, प्राकृतातील गाथासप्तशती, त्रिपिटकातील निवडक भाग इत्यादिकांचाही भाषांतरमालेत समावेश केला आहे.

५. भाषांतर योजनेखाली मंडळाने आतापर्यंत ४५ अभिजात ग्रंथांची भाषांतरे प्रकाशित केली आहेत. जॉन स्टुअर्ट मिलचे 'On Liberty', रूसोचे 'Social Contract', एम. एन. रॉयचे 'Reason, Romanticism and Revolution' व 'Letters from Jail', स्तानिस्लावस्कीचे 'An Actor Prepares', तुर्गेनेवचे 'Fathers and Sons', रायशेन्बाखचे 'Rise of Scientific Philosophy', गन्नर मिरदालचे 'Economic Theory and Underdeveloped Regions', कै. पां. वा. काणे यांचे 'History of Dharmashastra', कोपलँडचे 'Music and Imagination', बर्ट्रान्ड रसेलचे 'Religion and Science', तेरझागीचे 'Theoretical Soil Mechanics', विशाखादत्तचे 'मुद्राराक्षसम्', भरतमुनीचे 'भरतनाट्यशास्त्र' (अध्याय ६ व ७ आणि अध्याय १८ व १९), निकोलाय मनुचीचे 'Sotria Do Mogor', एस. सी. पिगू लिखित 'Socialism Vs. Capitalism' इत्यादी पुस्तकांची भाषांतरे व सारानुवाद प्रकाशित झाले आहेत.

६. इझाडोरा डंकन लिखित 'My Life' या अभिजात ग्रंथाचा प्रस्तुत सुरस मराठी अनुवाद श्रीमती रोहिणी भाटे, पुणे यांनी केला असून "मी - इझाडोरा" या शीर्षकाने सदर अनुवाद मंडळाच्या भाषांतरमालेत प्रसिद्ध करण्यास मंडळास आनंद होत आहे.

वाई
मार्गशीर्ष १, १८९७
३ डिसेंबर, १९७५

**लक्ष्मणशास्त्री जोशी**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ

## अनुवादासंबंधी थोडेसे

इझाडोरा डंकन हिच्या ' My Life ' या आत्मवृत्ताचा मी केलेला ' मी – इझाडोरा ! ' हा अनुवाद म्हणजे भाषान्तराच्या क्षेत्रातलं माझं पहिलं पाऊल आहे. महाराष्ट्रराज्य साहित्य-संस्कृति-मंडळातर्फे हे काम मी स्वीकारलं, तेव्हा इझाडोराशी असलेलं माझं मूळ साम्यच ( – आम्ही दोघी नर्तकी एवढंच ! – ) केवळ मी ध्यानात घेतलं होतं. प्रत्यक्ष कामाला आरंभ झाला तेव्हा मात्र ' घी देखा लेकिन बडगा नहीं देखा ' याचाच प्रत्यय आला ! त्यातून माझी सर्वांत मोठी अडचण म्हणजे तीन दिवसांच्या वर एके ठिकाणी राहू न शकण्याची; – आणि म्हणून सलग असा वेळच मला न मिळण्याची; त्यामुळे अनुवादाचा पहिला संपूर्ण आराखडा, नि संस्करणं सुद्धा ' पुणे–मुंबई 'च्या साप्ताहिक प्रवासात आगगाडीतच हातावेगळीं केली; फक्त जिथे संदर्भग्रंथांच्या साहाय्यानंच अनुवाद करण्याची आवश्यकता होती, तेवढं काम सुट्टीच्या दुर्मिळ दिवसात किंवा नृत्यवर्गातून, रियाजातून आणि नृत्य कार्यक्रमांच्या धांदलीतून वेळ काढून एके ठिकाणी राहून केलं.

आदर्श अनुवाद कसा असावा, याचे साहित्यिक निकष सर्वसामान्यतः माझ्या वाचनात आले असले, तरी माझ्या अल्पमतीनुसार मी माझ्या दृष्टीसमोर दोन तत्त्वं मुख्यतः ठेवली होती. एकतर इझाडोराच्या असाधारण अनुभवांनी विणल्या गेलेल्या शबल नि सुरंगी जीवनपटाचा एकही धागादोरा My Life चं भाषांतर करताना माझ्या हातून निसटून जाता कामा नये. इकडले धागे तिकडे विणले जाऊन पटाची रंगसंगती बदलता कामा नये; तसेच त्यातले रचना आकृतिबंधही विस्कटता कामा नयेत; दुसरं म्हणजे ज्या भाषेत हे विलक्षण समृद्ध अनुभव परावर्तित होणार, त्या माझ्या मराठी भाषेची प्रत, ज्या vein मध्ये मूळ आत्मचरित्राचं लेखन झालं आहे, त्या vein ला आणि त्या लेखनातल्या

उत्कृष्ट साहित्यमूल्यांना जुळेशी, साजेशी असायला हवी.

...वरील तत्त्वांची यथाशक्ति जाण ठेवीत अनुवाद करीत असताना एक अडचण उद्भवली, ती इझाडोराच्या मूळ लेखनातल्या तुटकपणाची. My Life मध्ये एका परिच्छेदापुढला परिच्छेद कित्येक वेळा सांधा न जुळताच आलेला आढळतो—मुद्दाही अकल्पितपणे बदललेला असू शकतो; त्याला कारण इझाडोरानं हे लेखन जसं 'एकटाकी' केलं, तसंच ते प्रसिद्धही झालं, हे असावं. तिच्या अचानक, अपघाती मृत्यूनं तयार झालेल्या लिखाणाचं संस्करण करण्याला तिला अवधीच दिला नाही; परंतु मला असं वाटलं की ज्यांना मुळातून My Life वाचणं शक्य नसेल, त्यांना हा तुटकपणा मराठीत खास खटकणार आहे – तेव्हा परिच्छेदांची जुळणी करण्याचं आणि अगदी क्वचित् त्यांची लांबी कमीअधिक करण्याचं स्वातंत्र्य मी घेतलं आहे.

इझाडोराच्या समाजोन्मुख नि बहुश्रुत व्यक्तिमत्त्वामुळे इतक्या वेगवेगळ्या देशोदेशींच्या कलावन्तांच्या नि पंडितांच्या नावांचे उल्लेख My Life मध्ये आले आहेत, की त्यांचे योग्य उच्चार ठरवून घेण्याची पराकाष्ठा करूनही मनात संदेह उरलाच आहे! कित्येकदा एकाच व्यक्तीच्या नावांचा उल्लेख दोन वेगळ्या उच्चारसंकेतांनुसार वेगवेगळ्या तऱ्हांनी केला गेला आहे, याबद्दल मी 'क्षमस्व!' एवढंच म्हणते. परिशिष्टात विस्तृत (क्वचित जास्तच) टीपा दिल्या आहेत. त्या इझाडोराच्या अनुभवविश्वाच्या कक्षांच्या विस्तृतपणाची, तिच्या बहुश्रुततेची आणि जे वातावरण इझाडोराच्या समग्र जीवनाला लपेटून राहिलं होतं, त्या वातावरणाची संपूर्ण कल्पना वाचकांना यावी म्हणूनच...

इझाडोराच्या आयुष्यातला एक मोठा कालखंड ग्रीसच्या पुरातन संस्कृतीला पुनरावाहन करण्याच्या कल्पनेनं भारलेला होता...तिचा नृत्यवेष तर सतत ग्रीक पद्धतीचाच असे; तेव्हा त्या 'ग्रीक' कालखंडाचं प्रतीक म्हणून 'मी – इझाडोरा!' या अनुवादाच्या मुखपृष्ठावरचं चित्र, पार्थेनॉनच्या स्तंभांच्या मधोमध उभं राहून नृत्याविष्कारांतून 'उषेचं स्वागत' करणाऱ्या इझाडोराचं असावं, ही कल्पना सर्व संबंधितांना साजेशी–जुळेशी वाटली. तसंच ग्रीसमधल्या खुल्या रंगमंचाची ठेवण आणि ग्रीक कोरसची रंगमंचावरील रचना दाखविणारं मुखपृष्ठाच्या आतल्या बाजूचं चित्र हेही वरच्याच कारणासाठी योजलं गेलं.

मॉस्को, पीटर्सबर्गसारख्या 'बॅले'च्या माहेरघरांना देखील इझाडोरानं आपल्या विलक्षण मुक्त नृत्यानं वेड लावलं होतं. स्टॅनिस्लाव्हस्कीसारखे नाट्य-शास्त्रज्ञ आणि फोकाईनसारखे बॅलेतज्ज्ञ, यांनीही इझाडोरापासून नव्या वाटा शोधण्याची स्फूर्ती घेतली होती. प्रस्तुत आत्मवृत्ताची अखेरही इझाडोरानं रशियाला जाण्यासाठी ठेवलेल्या प्रस्थानानं झाली आहे, – या संदर्भात मलपृष्ठा-

वरचं चित्र पहावं ... ते मॉस्कोतील प्रसिद्ध बोलशोयू थिएटरचं 'हाऊसफुल्' स्वरूप आहे ...

गेली काही वर्षं तरी My Life खेरीज माझ्या ध्यानीमनी दुसरा विषयच नव्हता; पण ज्या वेळी या आत्मवृत्ताचा पहिला परिणाम विरायला लागला, आणि इझाडोराच्या अनेक मतांशी आणि विधानांशी सहमत होणं स्वानुभवाच्या बळावर अशक्य होऊ लागलं, त्या वेळी मी माझ्या विचारांची टिपणं ठेवू लागले; यातूनच जन्म झाला ग्रंथाच्या अखेरीस जोडलेल्या 'इझाडोरा आणि मी !' या उपसंहाराचा...मात्र एका सरस ग्रंथाच्या अखेरीस निरस तांत्रिक वाद माजवून ग्रंथाच्या परिणामाच्या उतरत्या भांजणीचं पाप अंगावर ओढवून घेऊ नये, असं भान ठेवण्याच्या प्रयत्नात म्हणायचं होतं ते सर्व म्हणता आलं नाही, एवढंच नव्हे तर म्हटलं तेवढंही नीट म्हणायला जमलं नाही, अशी रुखरुख लागून राहिली आहे.

सर्वसामान्य, तसंच जाणत्या विचक्षण वाचकांना हा अनुवाद चांगला वाटावा अशीच माझी स्वाभाविक अपेक्षा असणार — किमानपक्षी 'अनुवाद कसा नसावा' — याचं तो उदाहरण ठरू नये, अशी आशा मी बाळगून आहे...एरवी हे लेखन करताना जागोजागी माझं मन सहानुभावानं उचंबळून आलेलं आहे...कित्येकदा पुनःप्रत्ययाचाच आनंद मला लाभला आहे... कळला नाही, भावला नाही असा आशय, किंवा अनुभवही कुठे आड न आल्यानं सारे उलगडे रम्यपणे झाले; तेव्हा तसं पाहिलं तर माझं मला केव्हाच भरून पावलं आहे...!

अखेर कृतज्ञतापूर्वक आभार मानावेसे वाटतात ते : प्रथम महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळाचे-हे काम माझ्यावर सोपवून मला एका अनुभवसमृद्ध व्यक्तित्वाच्या मर्माचा वेध घ्यायला उद्युक्त केल्याबद्दल. भाषांतर विभागाचे मान्यवर संपादक महाशय श्री. बा. रं. सुंठणकर यांचे – स्मरणपत्रांच्या वर्षावानं माझ्या लेखनाला सतत गती देत राहून मला कार्यव्यग्र ठेवण्याबद्दल ! कल्पना मुद्रणालयाच्या श्री. लाटकरांचे – शक्य तेवढ्या व्यवस्थित स्वरूपात ग्रंथ मुद्रित करण्याबद्दल; मुंबईचे आर्टिस्ट श्री. दादा कामत यांचे–ग्रंथाच्या अंतरंगाला साजेशी मुखपृष्ठ नि मलपृष्ठ याबाबतची श्री. प्रभाकर जठार यांची अर्थवाही कल्पना सुंदररीत्या प्रत्यक्षात आणण्याबद्दल ! ... आणि त्या कर्त्या करवित्याचे ...

ज्याच्या प्रेरणेशिवाय आणि दिग्दर्शनाशिवाय कुणाला काहीच शक्य नसते ...

**रोहिणी भाटे**

## अनुक्रमणिका

# अथ –

माझी ही जीवन कहाणी मी स्वतःच लिहून काढावी, असं जेव्हा सुचवण्यात आलं, तेव्हा खरं तर मी घाबरलेच. तसं म्हणाल, तर या कहाणीचं पान न् पान एखाद्या कादंबरीहून अधिक चित्तवेधक, अन् एखाद्या चित्रपटापेक्षासुद्धा जास्त सनसनाटी घटनांनी भरलेलं आहे. लिहिण्याची बैठक छान जमली, तर ही कहाणी युगप्रवर्तक ठरेल, यातही काही शंका नाही... पण ... हा 'पण' म्हणजेच तर खरी अडचण आहे ... हे सारं लिहिणं जमावं कसं ?

नृत्यातला एखादा सहज आविर्भाव, साधीशी उपज सुचायला सुद्धा आयुष्यातली कितीतरी वर्षं मला धडपडत, कष्टांत घालवावी लागलेली आहेत... किती खोज, किती मनन, किती चिंतन करावं लागलं आहे ... हे लक्षात घेतलं म्हणजे वाटतं, एखादं साधसंच, पण सुंदर वाक्य लिहायलाही मला आणखी कितीतरी वर्षं एकाग्र प्रयत्न करावा लागेल ... लेखन कलेची इतपत जाण मला नक्कीच आहे !... मला तर वाटतं, एखाद्या व्यक्तीनं जिद्दीनं विषुववृत्तापर्यंत प्रवास करून, अगदी वाघसिंहाशी भयंकर धाडसी झटापटी करण्याचा विक्रम केला... अन् मग त्याबद्दलचा 'चक्षुर्वैसत्यम्' वृत्तांतच लिहून काढला, तरी तो सगळा खटाटोप अंगभूत प्रतिभेशिवाय व्यर्थ होऊ शकतो; अन् याच्या उलट दुसरा कुणी बेटा आपल्या ओसरीबाहेरही पाऊल न टाकता जंगलातल्या वाघाच्या शिकारीबद्दल मोठ्या अधिकारानं लिहितो, — अगदी अशा थाटांत, की वाचणाऱ्यालाही वाटावं, आपण जंगलात दबा धरून बसलेले आहोत – वाऱ्यासोबत येणारा सिंहाच्या अंगाचा उग्र दर्प आपल्यालाही जाणवतो आहे...ते भयंकर वाट पहाणं ... ती शंकाकुलता आपल्यालाही हळूहळू ग्रासते आहे...मणक्या

सापाची ती भीषण चाहूल आपल्याही कानावर येते आहे ...

याचाच अर्थ असा, की खऱ्याखुऱ्या वास्तवाला नेहमीच साहित्यिक अस्तित्व असेल असं सांगता येत नाही ... वास्तवाला अस्तित्व असतं, आणि ते — साहित्यातही पटतं, पण ते केवळ प्रतिभावंतानं निर्माण केलेल्या कल्पनासृष्टीत ... तेव्हा माझ्या आयुष्यात घडलेल्या सुरस अन् चमत्कारिक घटनांचा स्वादच मुळीं जायची भीती मला जास्त ... माझ्या हातात थोडीच एखाद्या 'सरव्हान्टेस'ची किंवा 'कॅसानोव्हा'ची लेखणी आहे ?

शिवाय दुसरी गोष्ट म्हणजे, आपल्या आयुष्यातलं 'सत्य' आपण कसं शब्दात पकडणार ? आपलं आपल्याला तरी ते गवसलेलं असतं का ? आपली स्वतःची स्वतःशी खरोखरीची ओळख असतेच कुठे ? असते का ?... मित्र-मैत्रिणींना ठाऊक असलेले आपण — आपल्याला माहिती झालेले आपण — प्रियकराला दिसलेले आपण — आणि याशिवाय हितशत्रूंना भासणारे आपण ! ... साऱ्या प्रतिमा, वेगवेगळ्या ... सारेच मुखवटे निराळे ... मी उगाच नाही असं म्हणत, स्वानुभवाचे बोल आहेत हे ... !

... सकाळीं सकाळींच कॉफीचा आस्वाद घेत मी वृत्तपत्रं चाळायची ... एकात माझ्या प्रतिभेला नि दिव्य सौंदर्याला सर्वमान्य प्रशस्तिपत्र मिळालेलं पाहून मी गालातल्या गालात हसावं, आनंद मानावा, तर दुसऱ्या वृत्तपत्रानं माझे अगदी वाभाडेकाढलेले असायचे ... 'उपजत कलागुण नाही, सुबक बांधा नाही ... एकूण म्हणजे साक्षात हिडिंबाच आहे ही' ... वगैरे वगैरे.

शेवटी मग माझ्या कार्याबद्दलची टीकाटिप्पणी वाचायचं मी सोडूनच दिलं. माझ्याबद्दल सर्वांनी चांगलं तेवढच लिहावं, असं मी म्हणू शकत नव्हते खरं ... पण वाईट अभिप्रायामुळे मात्र आत्महत्येच्या विचारापर्यंत माझी बुद्धि धावायची ! ... बर्लिनमधल्या एका कलासमीक्षकाची गंमत सांगते ... त्या बिचाऱ्यानं अपमानास्पद अभिप्राय दे-देऊन माझा पाठपुरावा केला होता ... त्याच्या अनेक विधानांच्या पैकी एक म्हणजे, मला संगीताचा कानच कसा तो नाही ! एकदा मग मी त्याला पत्रच पाठवलं ... घरी यायची विनंती केली ... म्हटलं, 'प्रत्यक्ष भेटीत आपण मला आपला गैरसमज दूर करण्याची संधी द्यावी.' तो आला, तसं चहाच्या टेबलाच्या तिथे समोरासमोर आम्ही बसलो ... आणि मग ... संगीतातून स्फुरणाऱ्या नृत्यात्मक दृक्प्रतिमांबद्दलच्या माझ्या सिद्धांताचा चांगला तास दीडतास मी त्याच्यावर भडिमार केला !

तो तसा अगदी अरसिक आणि मख्खच दिसत होता खरं म्हणजे ... पण जेव्हा का त्यानं आपल्या खिशातून थंडपणे बहिऱ्यांना ऐकू येण्याचं यंत्र काढलं, तेव्हा मात्र माझा कमालीचा विरस झाला ... काय सांगायचं ! नन्तर त्यानं ह्याही

सर्वांवर कडी केली... म्हणाला, "मी पूर्ण बहिरा आहे... रंगमंदिरात मी अगदी पुढे बसतो, आणि हे यंत्र सारखं माझ्या कानाला लावलेलंच असतं, तरी वाद्यसंगीत मला जेमतेमच ऐकू येतं!" आहे की नाही!... अन् असल्या या कलासमीक्षकानं केलेल्या टीकेपायी मी रात्रीच्या रात्री जागून काढल्या होत्या...

...तेव्हा आपल्याला न्याहाळणाऱ्यांना, प्रत्येक नव्या कक्षेतून पाहताना आपण जर वेगवेगळेच दिसत असू, तर ज्याविषयी इथे लिहायचं, तें, या सगळ्यांविना आगळं व्यक्तित्व आणायचं तरी कुठून? ते व्यक्तित्व पावित्र्यमूर्ती 'मॅडोना' म्हणून चितारायचं, की 'मेसालिना'? 'मॅग्डेलन' की 'ब्ल्यू स्टॉकिंग?' या सर्वांच्या जीवनातल्या संघर्षाचा एकत्र, एकसमय अनुभव घेतलेली एक नायिका मला कशी सापडेल?... मला तर वाटतं, मी एक अशी कधी नव्हतेंच; दोनचार, नव्हे अगणित 'मी' माझ्याठायी एकत्र नांदत होते — अन् तरी त्यांच्या झपूर्झात कधीच न गुरफटलेला माझा मुक्त आत्मा नित्य अनिर्बंध भरारी मारत होता...

...कुणीतरी म्हटलेलं आहे, की एखाद्या विषयावर काही लिहायचं असेल, तर पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे लेखकाला त्या विषयात काहीही अनुभव असता कामा नये... अगदीं खरं आहे! शंका असेल तर, आपण आपल्या अनुभवांना शब्दात पकडायचा प्रयत्न करून पहावा — शब्द मुळीं पसारच होतात! स्वप्नं हातात सापडतील एखादेवेळीं... पण स्मृती भलत्याच पळपुट्या!... कितीदा-तरी असं होतं, की माझ्या आयुष्यातल्या प्रत्यक्ष घटनांच्या स्मृतींपेक्षा मी पाहिलेली स्वप्नंच मला जास्त स्पष्टपणे आठवतात, अन् जास्त खरी सुद्धा वाटतात!... शिवाय आयुष्य म्हणजे तरी काय? एक स्वप्नच! ते तसं आहे, म्हणूनच बरं आहे; एरवी आयुष्यात वाट्याला येणाऱ्या काही प्रसंगांना तोंड देऊन, त्या अनुभवातून तरून जाणं कसं शक्य होतं?... 'लुसिटानिया' बोट बुडाली, तो प्रसंग — कुणाला वाटेल की त्यात सापडलेल्या दुर्दैवी स्त्री-पुरुषांच्या चेहेऱ्यावर मृत्यूच्या त्या उग्र छायेचा ठसा कायमचाच उटला असेल—पण नाही! तीही माणसं तर पुन्हा सर्वांसारखी स्वस्थ नि सुखी दिसू शकतात!... असं होत नाही, ते फक्त कथाकादंबऱ्यांतून!— तिथे मात्र एखाद्या व्यक्तीचा प्रसंगाविशेषी अंतर्बाह्य मात्र कायाकल्प होऊन जातो! वास्तव जीवनात असे अनेक भयंकर अनुभव घेऊनही मनुष्याच्या व्यक्तित्वाचा मूळ गाभा जसाच्या तसा सहज सुरक्षित असू शकतो, हा नेहमीचा अनुभव आहे... क्रांतीच्या वेळीं सर्वस्व गमावून बसलेल्या रशियन राजपुत्रांचीच उदाहरणं घ्या — पूर्वी दिसायचे तसे आजही ते मोंमार्त्रच्या तिथे दिसतात—प्रत्येक रात्री! — आसपासच्या बावनखणींतल्या अदयातल्या मुलींबरोबर मजेत जेवणखाणं करत बसलेले असतात ते पूर्वीच्याच थाटात!

...एखाद्या बाईनं किंवा पुरुषानं खरोखर यथातथ्य स्वरूपात आपली जीवन-कहाणी लिहायची म्हटलं, तर ते खरं म्हणजे मोठं मोलाचंच कार्य ठरेल; पण असे सत्याचे प्रयोग करण्याचं धैर्य विशेष कुणी दाखवलेलंच नाही; एक ज्यां – ज्याक् रूसो तेवढा खरा! त्यानं मात्र आपल्या जीवनरहस्यावरचा प्रत्येक पापुद्रा उकलून आपल्या अंतर्मनातले विचार, विकार अन् कृतीसुद्धा लोकांपुढे स्वच्छ मांडल्या ...अन् सत्याला तो सहज सामोरा गेल्यानं तो एक महान् ग्रंथच झाला... मानवतेसाठी असा हा पराकोटीचा त्याग करणं एक त्याचा तोच जाणे! नंतर वॉल्ट व्हिटमननंही स्वतःला प्रतीत झालेल्या सत्याचा साक्षात्कार अमेरिकेला घडवला... आता ते सारं हास्यास्पद वाटतं, पण एका काळी अनीतीच्या नावाखाली या पुस्तकावर बंदी घातली गेली होती!...असो......

...एकाही कुणा स्त्रीनं आपल्या अगदी खऱ्याखुऱ्या 'मी' चा पत्ता संपूर्णपणे कुणाला आजवर लागू दिला असेल, असं मला वाटत नाही! बहुतेक सर्व प्रसिद्ध विदुषींची आत्मचरित्रं म्हणजे साधारणपणे त्यांच्या बाह्य जीवनातले अनुभव, किरकोळ प्रसंगातला तपशील, आणि दंतकथा यांची एक स्मरणिकाच असते...या स्मरणिकेवरून त्यांच्या खऱ्याखुऱ्या आयुष्याची कल्पनाही आपण करू शकत नाही; कारण आयुष्यातल्या असीम आनंदाच्या नि तीव्र दुःखाच्या, बहुमोल, नि बेभान क्षणकणांना त्यांनी आत्मचरित्रात स्पर्शच केलेला नसतो....आश्चर्य आहे नाही?

माझ्यापुरतं सांगायचं झालं, तर माझी कला म्हणजे दुसरं तिसरं काही नाही...मला प्रतीत झालेलं जीवनसत्य नृत्याविर्भावांतून अन् नृत्यगतींतून व्यक्त करण्याची ऊर्मी आहे ती...एक धडपड, प्रयत्न आहे...साहजिकच एखादाच 'सार्थ', 'केवल' नृत्यक्षेप, किंवा करण शोधून काढण्याच्या पायी माझी अनेक वर्षं खर्ची पडली आहेत...शब्दांची सार्थकता त्या मानानं वेगळीच... माझ्या नृत्यप्रदर्शनाला गर्दी करणाऱ्या प्रेक्षकांसमोर मी कधीच 'नाही', 'होय' केलं नाही...लाजले नाही, बुजले नाही...माझ्या मनोमनातल्या साऱ्या प्रच्छन्न ऊर्मींना मी प्रेक्षकांसमोर मोकळी वाट दिली आहे....आठवतं तेव्हापासून मी आयुष्य जगले नाहीच...नाचले!...केवळ नाचले...! लहानपणी निसर्गातल्या आनंदमयी ऊर्जेचं उत्स्फूर्त नृत्य नाचले...वयात यायला लागले, तशी माझ्या नृत्यानंदाला, जीवनातल्या दुःखाच्या चाहुलीमुळे वाटणाऱ्या पहिल्या वहिल्या अबोध हुरहुरीची लय लागली...हुरहुर... जीवनप्रवाहाच्या निष्ठुर गतीच्या त्या प्रलयंकर सामर्थ्याच्या चाहुलीनं लागलेली हुरहूर!

सोळा वर्षांची असताना प्रेक्षकांच्यासमोर मी एकदा संगीताशिवाय नाचले होते. नृत्य संपता संपता कुणीसं ओरडलं – 'मृत्यू आणि मुग्धा!' – आणि त्यानंतर त्या नृत्याचं तेच नाव पडून गेलं होतं...'मृत्यू आणि मुग्धा!'...

खरं म्हणजे मला नृत्यातून असं काही म्हणायचं नव्हतं... सृष्टीतल्या वरवरच्या सौन्दर्याच्या आणि आनंदाच्या आवरणाखाली लपलेली विपरूता नि दुःख, याबद्दलचा माझ्या मनाला पडायला लागलेला उमज नृत्यातून व्यक्त करायचा तिथे मी प्रयत्न करीत होते... माझ्या कल्पनेप्रमाणे त्या नृत्याचं नाव 'जीवन आणि मुग्धा' असं असायला हवं होतं...!

ज्या माझ्या जीवनविषयक कल्पनेला प्रेक्षकांनी 'मृत्यू' म्हटलं होतं, त्याच जीवनाशी झगडून त्याच्याकडून कितीतरी तरल आनंदक्षण जिंकून घेण्याचं 'विजिगिषा' नृत्यही मी पुढे नाचले...

व्यवहारात आढळणाऱ्या मानवी व्यक्तित्वाचं खरं स्वरूप लक्षात घेतलं तर असंच दिसून येईल, की खऱ्या, वास्तव सृष्टीशी कमीत कमी संबंध असतो तो सर्वसाधारणपणे कादंबऱ्यातल्या किंवा चित्रपटातल्या नायकनायिकांचा ...! बहुतेक सगळेच चांगले गुण त्यांच्या ठायी नांदत असल्यानं त्यांच्या हातून वाईट काही घडणं मुळी शक्यच नसतं... कारण नायक : धीरोदात्त, धैर्यशील,... वगैरे वगैरे... आणि नायिका : सत्वशील, गोड स्वभावाची... इत्यादी; अन् एकजात सगळे दुर्गुण, आणि त्यामुळे ओघानंच घडणारी पापं बिचारी त्या कथेतल्या खलनायक-नायिकांच्या माथी मारलेली! तरी बरं आहे, की प्रत्यक्ष जीवनात कुणीही खरं म्हणजे संपूर्णपणे चांगलं किंवा अगदी सर्व बाजूंनी वाईट असं आढळतच नाही, हे आपण सगळेच अनुभवानं जाणून असतो! प्रभूचे दहाच्या दहा दंडक एकजात कुणी मोडले नसतील, पण वेळ आल्यावर आपल्यातले कुणीही ते मोडू शकणार नाहीत, असं छातीठोकपणे नक्कीच म्हणता यायचं नाही.... तशी खरीखुरी संधी मिळाल्याक्षणी वर डोकं काढणारा आणि सदसद्विवेकबुद्धीचे सगळे विधिनिषेध धुळीला मिळवू शकणारा एक बंडखोर 'मी' आपल्या अंतरात सतत लपलेला असतो! मी तर असंसुद्धा म्हणेन की 'सज्जन' 'सज्जन' म्हणून मिरवणारी माणसं मुळी कषायमधुर पापाची चव चाखण्याच्या मोहात कधी सापडलेलीच नसतात! मोह होणारच कसा? आयुष्याच्या विकासहीन आखणीत किंवा एक-मार्गी चाकोरीत कसंबसं जगत असताना, इकडेतिकडे बघायला फुरसत तर मिळाली पाहिजे ना?

'द रेल' (= आगगाडी) नावाचा एक सुंदर चित्रपट मी एकदा पाहिला होता... मनुष्यमात्राचं जीवन म्हणजे रूळावरून, आखून दिलेल्या मार्गावर ठरल्याप्रमाणे धावणारं एक इंजिनच आहे, असा त्या चित्रपटाचा विषय होता. इंजिन रुळावरून घसरलं, किंवा लोहमार्गावर एकादा दुर्लंघ्य अडथळा आला, की सर्वनाशच पुढे ठेवलेला!... समोर घरंगळता उतार दिसत असतानासुद्धा गाडीचे ब्रेक्स् काढून घेऊन मृत्यूलाच धडक देण्याची विनाशकारी ऊर्मी ज्यांच्या

मनात एकाएकी उसळून येत नाही, असे ड्रायव्हर सुखीच म्हणायचे !

...कधी कधी मला असाही प्रश्न विचारला गेला आहे, की माझ्या लेखीं काय श्रेष्ठ आहे, 'कला' की 'प्रीति'?...मी म्हणते की 'कला' नि 'प्रीति' यांना मला एकमेकांपासून वेगळं लेखताच येत नाही; कारण कलावंत हाच खरा प्रेमिक असतो. सौंदर्याची खरी प्रतीति कलावंतालाच येते; अन् तसं म्हटलं तर शाश्वत सौंदर्याचं दृष्टिपान केलेल्या आत्म्याची यथातथ्य जाण, दर्शन, हेच तर प्रेमाचं लक्षण !

...आमच्या समकालीनांपैकी गाब्रियेल दान्यूंझिओ याचं व्यक्तिमत्त्व असं अद्‌भुत होतं...खरं तर चणीनं तो लहानखुरा;...अन् त्याचा चेहरा स्मितानं उजळलेला नसेल, तर त्याला 'देखणा' वगैरे काही म्हणणंच शक्य नाही... मात्र जिच्यावर त्याचं प्रेम असेल, तिच्याशी बोलताना त्याचं रूपांतर प्रति 'फीबस अपोलो'तच मुळी होऊन जायचं ! सध्याच्या अत्यंत सुंदर अन् गाजलेल्या महान् स्त्रियांपैकी काहींची मनं त्यानं जिंकून घेतली, ते काही उगाच नाही ! दान्यूंझिओची एखाद्या स्त्रीवर प्रीति जडली, म्हणजे तो तिच्या आत्म्याला पृथ्वीवरून अलगद उचलून तेजानं तळपणाऱ्या 'त्रिआत्रीस'च्या दिव्यलोकांत नेऊन सोडतो अगदी ! त्या त्या प्रत्येक स्त्रीला तो असा बदलून टाकतो, की जणू काही त्या सर्वसाक्षी दिव्य अस्तित्वाचे आपण विलासे, पण कणच आहोत, असं तिला वाटतं... दान्यूंझिओच्या प्रीतीच्या पंखावर बसून भरारी घेणाऱ्या त्या प्रेममग्न मनाला शेवटी खरंच वाटतं, की आपण बिआत्रिसच्या सान्निध्यातच वावरतो आहोंत ! त्रिआत्रिस ! जिचं सूक्त डान्टेनं आपल्या अमर स्तोत्रांतून गायलं, ती बिआत्रिस ! पॅरिसमध्ये मध्यंतरी एक 'दान्यूंझिओ युगच' होऊन गेलं...त्यावेळी हा 'दान्यूंझिओ पंथ' इतका बोकाळला की त्या युगातल्या एकजात सगळ्या प्रसिद्ध सौंदर्यखनींनी या दान्यूंझिओवर प्रेम केलं ! दान्यूंझिओ प्रत्येक प्रेमिकेला पाळी-पाळीनं एका झळाळत्या अवगुंठनात लपेटून टाकायचा...मग ती 'रमणी' सर्वसामान्य मर्त्य जिवांतून वेगळी उडून तरंगत तरंगत चालायला लागायची, अन् एका विशिष्ट तेजानं तिचा चेहरा सदोदित उजळलेला असायचा...पण या कविराजांची मर्जी फिरली रे फिरली की, ते अवगुंठन विरायचं, त्या तेजाला ग्रहण लागायचं, आणि त्या 'रमणी'ची कुडी पुनरपि साधारण 'माती' होऊन पडायची ! तिला स्वतःला या घडामोडीचा खरा अर्थच लागायचा नाही...फक्त एवढंच जाणवायचं की तिची अंतराळी तरंगणारी पावलं एकाएकी जमिनीवर टेकली आहेत....अन् दान्यूंझिओच्या प्रीतीनं पालटलेल्या त्या तिच्या मध्यंतरीच्या रूपाकडे वळून पाहताना तिला वाटायचं, की अशी प्रीति–प्रतिभा पुनः काही आयुष्यात तिच्या वाट्याला येणार नाही. स्वतःच्या नशिबाला

बोल लावत उतरोत्तर खंतावत जाणाऱ्या या स्त्रीला पाहून लोक आश्चर्य करायचे; म्हणायचे, 'सुजऱ्या लाल डोळ्यांच्या अन् सामान्य रूपाच्या या बाईवर दान्यूंझिओचं प्रेम कसं काय जडलं बुवा?' दान्यूंझिओचं प्रेमच तसं महान् होतं! त्याचा स्पर्श झालेल्या सामान्य जिवाचंसुद्धा काही काळ तरी एका दिव्य व्यक्तिमत्त्वांतच रूपांतर व्हायचं...

या कविराजांच्या जीवनातली एकच स्त्री तावून सुलाखून निघूनही बावनकशी ठरली! दान्यूंझिओला तिच्यावर काही सुद्धा अवगुंठन टाकण्याची आवश्यकता भासली नाही, कारण ती मुळी दैवी बिआत्रिसचा नवा अवतारच होती. डान्टेची बिआत्रिसच प्रत्यक्ष आमच्या युगात पुन्हा एकदा साक्षात अवतरली आहे, असंच मला एलिनॉर ड्यूजला पाहून वाटत आलं आहे नेहमी; तेव्हा दान्यूंझिओनं तिच्यासमोर गुढगे टेकून प्रेमादरानं तिला शरण जाणंच भाग होतं; अन् हा एक प्रकारचा आगळा वेगळा अनुभवच त्याच्या जीवनात अत्यंत सार्थसुंदर ठरला! इतर साऱ्या स्त्रियांच्या बाबतीत त्याच्या हातात माती यायची—तिच्यावर चैतन्याची फुंकर दान्यूंझिओ घालायचा...एलिनॉरचं असं नव्हतं. तिची भरारी त्याच्याहीवर...त्याला दिव्य स्फूर्तीचा साक्षात्कार तिच्याकडूनच झाला...

चतुराईनं केलेल्या स्तुतीचं सामर्थ्य काय असतं, याची लोकांना किती कल्पना नसते म्हणून सांगू! मला तर वाटतं, दान्यूंझिओ सारख्या जादुगाराकडून स्वतःची स्तुती ऐकणं, म्हणजे ईव्हच्या कानावर स्वर्गात सापाचा आवाज पडण्यासारखा अनुभव असावा! 'सबंध विश्वाचा केन्द्रबिंदू मीच आहे, माझ्या भोवतीच सारं विश्व फिरतंय्', असं कुणाही स्त्रीला वाटायला लावण्याची किमया दान्यूंझिओ करू शकतो!

'फोरे' मध्ये त्याच्या बरोबर मी फिरायला गेले होते, ती रम्य सहल मला आठवते. चालता चालता आम्ही थांबलो, अन् एकदम सारं काही शांत झालं. तेवढ्यात मग दान्यूंझिओ उद्गारला, "काय सांगू इझाडोरा, तुझ्याबरोबरच मी फक्त निसर्गाच्या सान्निध्यातला एकांत उपभोगू शकतो...नाहीतर बहुतेक सगळ्या बायका मुळी निसर्गाला खाऊनच टाकतात...तू मात्र निसर्गात विरून जाऊन त्याच्याशी एकरूप होऊन जातेस...(असा स्तुतिपाठ मनावर न घेणं कुणा बाईला शक्य आहे का?) तू झाडावेलीत, आकाशात सामावून जातेस... फार काय, सर्वांवर आपलं प्रभुत्व गाजवणारी साक्षात् निसर्गदेवता आहेस तू!"

दान्यूंझिओच्या प्रतिभेचेच विलास हे सारे. एका नव्याच राज्याची आपण स्वामिनी आहोत, असं प्रत्येक स्त्रीला तो वाटायला लावायचा...

...आता इथे निग्रेस्कोमध्ये माझ्या बिछान्यावर पडल्या पडल्या मी 'स्मृति' म्हणून म्हणतात त्या गोष्टीची विचक्षणा करून पहाते आहे...ऐन मध्यान्हीच्या

उन्हाचा चांगलाच उष्मा होतो आहे...शेजारच्या उद्यानात हुंदडणाऱ्या बाल-गोपाळांची किलबिल माझ्या कानांवर पडते आहे...मला जाणवते आहे, माझ्या स्वतःच्या अंगाची ऊब...माझे अनावृत पाय सरळ ताणून मी न्याहाळते,...अन् सहज नजरेत येतात माझी मृदू वक्षस्थळं...माझे हात...माझे अचपळ हात! या हाताना स्वस्थ रहाणं कसं ते ठाऊकच नव्हतं – नृत्याच्या कुठल्या ना कुठल्या ललित आवर्तात सापडल्यासारखे ते नित्य हेलावत – झुलत असायचे ... पाहता पाहता वाटतं की ही गेली बाराच्या बारा वर्षं मी एका थकव्यानं ग्रासलेली आहे...ह्या वक्षांत एक कधीच न विरणारी कळ आहे...ह्या हातांवर आंतरिक व्यथेची साक्ष जणू गोंदली गेली आहे...अन् एकांतात या डोळ्यांना कोरडेपण कसं ते आठवतच नाही. बारा वर्षं या डोळ्यांनी आसवं ढाळली आहेत...त्या दिवसापासून बारा वर्षं!

...मी अशीच एका कोचावर विसावले होते – कुणाच्याशा भयंकर किंकाळीनं मला एकाएकी जाग आली होती...वळून पाहते तो एल्.! एखाद्या जखमी विद्ध माणसासारखा – "मुलं गेली...कायमची!"

मला आठवतं, माझ्या अस्तित्वावर एक विचित्र निःशब्द स्तब्धता पसरली... फक्त वक्षात मात्र फुललेला निखारा गिळावा, तशी धग होती, पण...पण मला कशाचा उमज कसा तो पडत नव्हता...मी त्याच्याशी अगदी हळुवारपणे बोलले, त्याला शांत करायचा प्रयत्न केला...त्याला सांगितलं, हे मुळी खरं असणं शक्यच नाही...

तेवढ्यात इतर लोकही जमले...नक्की काय झालं होतं, याचा बोधच मला होत नव्हता...इतक्यात एक दाढीवाला मनुष्य आत आला – काळीभोर दाढी! कुणीतरी सांगितलं, तो डॉक्टर आहे..."खरोखरच हे खरं नाही" – तो म्हणाला, "मी वाचवतो की नाही – पहा, त्यांना" ...

मी वेडीनं ते खरं मानलं...त्याच्याबरोबर जायचं होतं मला, पण लोकांनी मागे ओढून धरून ठेवलं...आशेला बिलकूल जागा नाही, हे मला कळायला नको, म्हणून सगळी धडपड ... पण हे सारं अर्थात् मला नंतरच कळलं...त्या धक्क्यानं एखाद वेळीं मला वेडसुद्धा लागायचं, असं सर्वांना वाटत होतं...पण खरं म्हणाल तर एक प्रकारच्या परमोच्च आनंदाच्या तंद्रीतच मी स्वतःला हरवून बसले होते...आजूबाजूला सारे जण ओक्साबोक्शी रडताना दिसत होते, पण मी रडले नाही...उलट सर्वांचं सांत्वन करण्याची एक उत्कट इच्छाच माझ्या मनात उमळली होती ... आता मागे वळून पाहताना, माझ्या त्या वेळच्या त्या विचित्र मनःस्थितीचा अर्थ लावणं सुद्धा माझं मला कठीण वाटतं...एका आध्यात्मिक सजगतेच्या पातळीवर त्या क्षणी मी पोहोचले होते की काय, न

कळे!...कदाचित् त्यामुळेच जणू मला माहीत होतं, की 'मृत्यू' हे सत्य नाही....ही समोर थंडगार पडलेली मेणाची शरीरं, म्हणजे माझी बाळं नव्हेतच...ही केवळ त्यांनी बदलून टाकलेली त्यांची वस्त्रं...आत्म्याच्या रूपात माझी बाळं प्रकाशमय अस्तित्वात होतीच होती... अन् ते अस्तित्व शाश्वत होतं...अनंत काळचं होतं...

...प्रत्येक 'आई'च्या मुखातून दोनच क्षणी असे उत्कट उद्गार बाहेर पडतात, की जे तिच्या स्वतःच्याही जाणिवेपलीकडून उमटलेले असतात... तिच्या अस्तित्वाशी त्या क्षणीच्या उद्गारांचा काडीमात्र संबंध लावता येत नसतो...ते दोन क्षण, म्हणजे 'जन्म' नि 'मृत्यू.'... कारण जेव्हा ते छोटे थंडगार हात मी हातात घेतले, अन् ते हात या पुढे आता कधीच उलट माझा हात उत्तरादाखल दाबू शकणार नाहीत, हे मला जाणवलं, तेव्हा मी माझ्याच तोंडून निघालेला तो भयंकर उद्गार, ती किंकाळी ऐकली!—अगदी तशीच, जशी या बाळांच्या जन्माच्या क्षणी मी ऐकली होती—माझ्याच तोंडून! तशीच तरी कशी म्हणायची? एक क्षण परात्पर आनंदाचा, नि दुसरा दारुण दुःखाचा! काय कुणास ठाऊक, कारण उमजत नाही, समजत नाही, पण खात्री मात्र वाटते, की तीच ही किंकाळी—तोच उद्गार! मग असं तर नसेल ना, की या विश्वात सुख-दुःख, हर्षामर्ष या साऱ्यासाऱ्यांना सामावून बसलेला सर्वंकष असा एकच उद्गार आहे—आणि तो म्हणजे—मातेचा प्रसवक्षणीचा धन्योद्गार?

# १

मुलाचे गुण पाळण्यातच नाही, तर ते त्याच्या आईच्या पोटात असतानाच दिसून येतात खरं म्हणजे. माझ्या जन्माआधी माझी आई मानसिक त्रासानं, आणि एकंदर परिस्थितीनं गांजलेलीच होती. बर्फात थंडगार केलेले झिंगे, आणि तशीच थंडगार शँपेन, याशिवाय दुसरे जिन्नस मुळी तिला पचतच नसत; अन् झिंगे तर ॲफ्रडायटीचं आवडतं खाद्य !... म्हणूनच तर माझ्या नाचाला सुरुवात कधी झाली, असा प्रश्न विचारणाऱ्या लोकांना मी सांगते, की, 'मी माझ्या आईच्या पोटात असतानाच !'

आईची परिस्थिती तेव्हा इतकी वाईट होती, की पुष्कळदा ती म्हणायची, 'ह्या वेळचं मूल काही साधंसुधं निपजणार नाही!'...एखादा राक्षसबिक्षस आपल्या पोटी जन्म घेणार, असं तिला वाटायचं—अन् खरंच म्हणे जन्मल्या क्षणापासून मी अशा जोषात रागानं हातपाय झाडत होते, की आई ओरडलीच, "पाहिलं ! मी उगाच म्हणत नव्हते आधी...हे मूल अर्धवटच दिसतंय्"... पण पुढे मात्र साऱ्या कुटुंबाच्याच करमणुकीचा मी एक विषय होऊन बसले... लहानसं झबलं घालून टेबलाच्या मध्यावर बसलेली मी...संगीताची कुठलीही धुन वाजली की, नाचायला लागायची.

माझी अगदी पहिली आठवण आगीची आहे...घराच्या वरच्या खिडकीतून कुणीतरी मला पोलिसाच्या हातांत फेकलं होतं...मी दोन किंवा तीन वर्षांची असेन तेव्हा फारतर...जिकडे तिकडे आगीच्या ज्वाळा अन् किंकाळ्या.. नुसता गोंधळ...पण त्यातच पोलिसांमुळे मला वाटलेली सुरक्षितता,...अन् त्याच्या गळ्याभोवती पडलेली माझी मिठी, या गोष्टींची मला अगदी स्पष्ट

आठवण आहे ...पोलिस आयरिश असावा बहुतेक ... एवढ्यात अगदी काळीज पिळवटून निघालेल्या आईच्या किंकाळ्या ... ‘ माझी बाळं ... माझी मुलं – ’ अशया. तिला वाटत होतं की माझे दोन्ही भाऊ इमारतीच्या आतच अडकलेत ... त्यामुळे ती आगीत शिरायचा प्रयत्न करीत होती, अन् लोकांनी तिला ओढून धरून ठेवलं होतं ... नंतर मला माझ्या भावांना एका मदिरा-गृहाच्या जमिनीवर बसून आपले बूटमोजे घालताना पाहिल्याचंही आठवतं ... अन् मग एका गाडीची आतली बाजू, ... अन् शेवटी एका दुकानातल्या फळीवर बसून प्यायलेलं गरम गरम चॉकोलेट ...

समुद्राच्या साक्षीनं माझा जन्म झाला—एवढंच नाहीतर माझ्या आयुष्यातल्या बहुतेक सगळ्याच घटना, समुद्राच्या सान्निध्यातच घडलेल्या आहेत, असा माझा अनुभव आहे ... नृत्यातल्या हालचालींचं अगदी पहिलं भान समुद्राच्या हेलावणाऱ्या लाटांच्या लयीतून मला झालं ... मी जन्मले त्या घटिकेवर ॲफ्रडायटीची – शुक्राची – कृपादृष्टि होती – ॲफ्रडायटी – तिचा जन्मसुद्धा तर सागराच्या ठायीच झाला होता – त्यामुळेच असं असणार ... जेव्हा तो तारा बलवान् असतो, तेव्हा माझ्या आयुष्यात सगळं शुभ घडायला लागतं ... अशा शकुनाच्या काळात, माझा जीवनप्रवाह निर्बंध असतो ... माझ्या हातून नव-निर्मिती होऊ लागते ... अन् या ॲफ्रडायटीनं दडी मारली, की माझ्यावर संकटांची धाड आलीच म्हणून समजावं ! इजिप्शियन किंवा खाल्डीयन संस्कृतीच्या पुरातन काळात खगोल शास्त्राला जे महत्त्व होतं, ते आता तितकं राहिलेलं नाही खरं – पण माझी तरी निदान अगदी ठाम समजूत आहे, की आपल्या मानसिक जीवनावर जन्मग्रहांचा नि नक्षत्रांचा खूपच परिणाम होत असतो; अन् ही गोष्ट लक्षात घेतली, तर खरं म्हणजे ग्रहगोलांच्या भ्रमणाचा अभ्यास करून आईवडील नक्की सुंदर संतती निर्माण करू शकतील असं मला वाटतं.

मूल समुद्रकिनारी जन्म पावलं की डोंगरपहाडांच्या सान्निध्यात, हाही प्रश्न मला महत्त्वाचा वाटतो; कारण आजूबाजूच्या परिसराचा नि वातावरणाचा मुलाच्या जीवनावर वेगवेगळा परिणाम होत असतो. मला स्वतःला तर समुद्राचं आकर्षण सतत वाटत आलं आहे ... उलट पर्वताच्या कुशीत मला एक अबोध अस्वस्थता वाटते ... पक्ष्याच्या पंखांनी तिथून उडून जावसं वाटतं ... जमिनीला जखडून ठेवणाऱ्या तुरुंगात आपण बंदिस्त होऊन पडलो आहोत असं वाटतं ... पर्वताच्या शिखराकडे बघताना मुशाफरांना, प्रवाश्यांना साधारणपणे होणारा दिव्यभव्यतेचा साक्षात्कार तर मला होत नाहीच ... उलट मला ती शिखरं ओलांडून निसटून जायचीच घाई होते ... त्याचं कारण एकच ... माझं जीवन अन् माझी कला, दोन्हीही सागराच्या सान्निध्यातच जन्म पावलेली आहेत !

आम्ही लहान असताना माझ्या आईची परिस्थिती गरिबीची होती, याबद्दल मला देवाचे आभार मानावेसे वाटतात. घरात नोकरचाकर किंवा मुलांच्यासाठी गव्हर्नेस ठेवणं तिला शक्यच नव्हतं...त्यामुळेच बालपणी माझ्या अस्मितेचं ताजेपण व्यक्त करायची संधी मला अखंड मिळत गेली ... अन् पुढेही ती कधी हातची निसटली नाही...माझी आई संगीतज्ञ होती...संगीताचं शिक्षण देणं, हाच तिचा जीवनव्यवसाय होता...विद्यार्थ्यांच्या घरीच या शिकवण्या चालायच्या, तेव्हा जवळजवळ सबंध दिवस आणि संध्याकाळी सुद्धा, किती तरी तास ती घराबाहेरच असायची...शाळेच्या बंदीखान्यातून सुटका झाली की मग मी मोकळीच! पाहिजे तर समुद्राच्या काठाकाठानं एकटीनं निवान्त हिंडावं, किंवा आपल्या दिवास्वप्नांतच रमावं...ते सगळं आठवलं की नर्सेस अन् गव्हर्नेसच्या नजरेतच वावरणाऱ्या, भयंकर सुरक्षित वातावरणात काळजीपूर्वक वाढवलेल्या टिपटॉप् पोशाखातल्या मुलांची मला इतकी कीव येते म्हणून सांगू! त्यांना आपलं आपण जगायची संधी मिळतेच कुठे?... इकडे माझ्या बिचाऱ्या आईचं म्हणाल, तर तिच्या कामात ती इतकी व्यग्र होती – तिला तिच्या मुलांच्या अनिर्बंध आयुष्यातल्या संभाव्य धोक्यांचा विचार करायला वेळच नव्हता. आमच्या बेछूट ऊर्मी नेतील तिकडे वाहवत जायला मी अन् माझे भाऊ त्यामुळे मोकळेच होतो! कधीकधी मग आम्ही अशा काही प्रसंगात सापडत असू! आईला ते सारं कळलं असतं तर ती काळजीनं खंगूनच गेली असती ... सुदैवानं तिच्या निश्चिन्त, निर्धास्त स्वभावाचं तिला एक वरदानच होतं...सुदैवानं म्हणजे माझ्या सुदैवानं म्हणते मी – कारण माझ्या नृत्य-निर्मितीच्या पाठीमागच्या प्रेरणेचं मूळ शोधायला गेलं, तर ते माझ्या या बालपणातच सापडतं – माझं बालपण – शैशव, बेछूट-बेभान-अनिर्बन्ध शैशव!... या शैशवातच चाखलेल्या त्या मुक्तीचं – मोकळपणाचंच प्रतिबिंब पुढे माझ्या नृत्यात उमटलं ... लहान मुलांना ज्याचा सतत जाच असतो, त्या 'हे करू नको, ते करू नको' – च्या नकारघंटा माझ्या शैशवानं कधी ऐकल्याच नाहीत, हे माझं भाग्यच म्हणायचं!

जेमतेम पाच वर्षांची असतानाच मी शाळेत जायला लागले. आईनं माझं वय सांगताना काहीतरी मागेपुढे केलं असणार नक्की ... काय करणार...? मला दिवसभर कोणाच्या हवाली करायला एक तरी जागा असणं अवश्य होतं!... मला वाटतं, पुढे कोण काय करणार असतो याचा पडताळा ज्याच्या त्याच्या बालपणातच येत असावा...मी तर एव्हाच नर्तकी झाले होते...युगप्रवर्तक नर्तकी...क्रान्तिकारक विचारांची!...

माझ्या आईचा बाप्तिस्मा झाला होता, अन् ती एका आयरिश कॅथलिक

कुटुंबात लहानाची मोठी झाली होती; माझे बाबा म्हणजे तिला अगदी आदर्श पुरुषोत्तम वाटायचे...अन् ते बिलकूल तसे नव्हते, हे कळेपर्यंत ती अगदी कट्टर, निष्ठावान् कॅथलिक होती...तिनं पुढे त्यांच्यापासून घटस्फोट घेतला, आणि आपल्या चार मुलांना घेऊन जगाला टक्कर द्यायला तिनं घरातून बाहेर पाऊल टाकलं. त्या घटनेनंतर तिचा कॅथलिक धर्मावरच्या निष्ठेचा लंबक तिकडून जो पलटला, तो अगदी कडव्या नास्तिकपणाच्या दुसऱ्या टोकालाच जाऊन पोहोचला...अन ती मुळी बॉब इंगरसॉलचीच अनुयायी झाली...त्याच्या एकत्रित व्याख्यानांचं वाचन ती नेहमी आमच्यापुढे करायची.

इतर अनेक गोष्टींबरोबर तिच्या मनानं पक्कं घेतलं होतं, की भावनाप्रधानता ही एक बाष्कळ गोष्ट आहे; आणि म्हणूनच मी अगदी लहान असतानाच तिनं आम्हा सर्वांना 'सॅन्टा क्लॉस'चं रहस्य सांगून टाकलं. परिणाम असा झाला : शाळेतल्या नाताळच्या उत्सवात आमच्या बाई खाऊ आणि केक्स वाटताना म्हणाल्या, "बाळांनो, पहा 'सॅन्टा क्लॉस'नं तुमच्यासाठी काय काय आणलंय्..." मी लगेच उठून उभी राहिले, अन् अगदी गंभीरपणे सांगितलं "हे बिलकूल खरं नाहीय्...'सॅन्टा क्लॉस' नावाचं कुणी नाहीच मुळी."...बाई चांगल्याच गोंधळून गेल्या... म्हणाल्या, हा खाऊ 'सॅन्टा क्लॉस' आहे असं मानतात, त्यांच्यासाठीच आहे... "तर मग नकोच मला तुमचा खाऊ"—मी उत्तर दिलं. आमच्या बाई ते ऐकून भलत्याच रागावल्या, अन् वर्गाला उदाहरण घालून देण्यासाठी त्यांनी मला पुढे येऊन जमिनीवर बसण्याची आज्ञा केली. खरं म्हणजे त्यांचं वागणं काही शहाणपणाचं नव्हतं; कारण मी सरळ पुढे झाले, अन् माझ्या वर्गाकडं वळून माझ्या अनेक प्रसिद्ध भाषणांपैकी पहिलं भाषण केलं ! "मला खोटेपणाची चीड आहे," मी ओरडले, माझ्या आईनंच मला सांगितलं की तिच्या गरिबीमुळे तिला 'सॅन्टा क्लॉस' बनता आलं नाही. 'सॅन्टा क्लॉस'चं रूप घेऊन खाऊ बक्षिसं वगैरे देणं शक्य असतं ते फक्त श्रीमंत आयांनाच." मग मात्र बाईंनी माझं बकोटं धरलं, अन् मला जमिनीवर बसवायचा निकराचा प्रयत्न केला; पण मी माझे पाय अगदी घट्ट रोवून उलट त्यांनाच धरून ठेवलं... शेवटी माझ्या टाचा वर्गाच्या त्या लाकडी जमिनीवर आपटण्यात त्यांना काय ते यश आलं — या साऱ्या नाचक्कीनंतर मग त्यांनी मला कोपऱ्यात उभं केलं. तिथं उभं राहिल्या राहिल्या सुद्धा डोकं वळवून खांद्यावरून "सॅन्टा क्लॉस, मुळीं कुणी नाहीच...'सॅन्टा क्लॉस' वगैरे सब झूट आहे"...अशा आरोळ्या मी ठोकतच होते. अर्थात शेवटी मला घरी पाठवून देणंच बाईंना भाग पडलं...घरी मी गेले ती अशीच रस्ताभर आरोळ्या ठोकत...खरं बोलण्यामुळेच मला शिक्षा होणं — खाऊ न मिळता अन्यायाची वागणूक मिळणं—

हे सारं माझ्या मनात बोचत टोचत राहिलं होतं...जेव्हा आईला मी सगळं सांगितलं, अन् विचारलं, 'सॅन्टा क्लॉस' नावाचं नाहीच ना ग कुणी आई? मी बरोबर सांगितलं की नाही बाईना?", तेव्हा ती म्हणाली, "सॅन्टा क्लॉस' तर नाहीच, पण या जगात देवही नाही...आहे, तो तुझा आत्मा...तुझी अस्मिता...तुला तारणारी हीच एक गोष्ट आहे." त्या रात्री आईच्या पायाशी बसून मी बॉब इंगरसॉलची व्याख्यानं ऐकली...

शाळांतून जे ज्ञान मुलांच्या पदरी पडतं, ते अगदी निखालस निरुपयोगी असतं, असंच मला वाटतं...माझ्या वर्गात मला एकतर अतिशय हुशार तरी समजायचे किंवा भलती 'ढ' समजून सबंध वर्गाच्या मागे असल्यासारखं वागवायचे...तें सारं काही स्मरणशक्तीच्या खेळावरच अवलंबून असायचं... तेवढा त्रास घेऊन दिलेला ठराविक विषय पाठ करून टाकला म्हणजे झालं.... आणि खरं म्हणजे पाठ झालेलं ते भारूड कशाबद्दल आहे, काय आहे, याची मला बिलकूल कल्पना नसायची...त्यामुळे वर्गाच्या पुढे मागे कुठे का मी असेना, तिथे मोडणारा वेळ माझ्या दृष्टीनं अगदी साक्षात् 'कंटाळा' असे! सारं लक्ष तीन वाजतात केव्हा, अन् मोकळं होतो केव्हा, याच्याकडे लागलेलं असायचं....माझं खरं शिक्षण सुरू व्हायचं संध्याकाळीं...आई बिथोव्हन्, शुमान, शूबर्ट, मोझार्ट, शोपां यांच्या संगीताची ओळख करून द्यायची, तेव्हा! किंवा शेक्सपियर, शेली, कीटस्, बर्नस् यांच्या साहित्याचं वाचन आमच्यासमोर करायची तेव्हा! हा सारा वेळ कसा भारलेला, मंतरलेला वाटायचा! बहुतेकांचं काव्य आईला तर पाठच होतं... पण मीही तिचं अनुकरण करून, एक दिवस शाळेतल्या एका समारंभात वुईल्यम लिटलचं 'अँटनी टू क्लिओपात्रा'—(क्लिओपात्रास अँटनीकडून) हे काव्य तोंडपाठ म्हटलं होतं, अन् त्या सहा वर्षांच्या छोट्या वयात सर्व प्रेक्षकांना थक्क करून सोडलं होतं!

'I am dying, Egypt, dying!
Ebbs the crimson life–tide fast.'
'मृत्यू सामोरा आहे, ईजिप्त, मृत्यूसम्मुख आहे मी...
जीवनाच्या जांभळ्या भरतीचं झपाट्यानं रूपान्तर होतं आहे ओहोटीत!'

दुसऱ्या एका प्रसंगी बाईंनी प्रत्येक विद्यार्थ्याला त्याची जीवनकथा लिहायला सांगितली होती, तेव्हा माझ्या सत्यकथेचं वळण साधारण असं होतं :

"मी जेव्हा पाच वर्षांची होते, तेव्हा आम्ही तेविसाव्या गल्लीत एका छोट्या घरात राहात होतो—भाडे थकल्याने तेथे राहणे अशक्य झाले व आम्ही दहाव्या गल्लीत आलो; थोड्याच दिवसात, पैसे नसल्याने मालकाने तक्रार केली, आणि आम्ही बाविसाव्या गल्लीत येऊन पोहोचलो, तेथेही कुणी शांतपणे राहू देईना,

उलट दहाव्या गल्लीत बिऱ्हाड हलवावे लागले—"

ही सत्यकथा अशाच सुरात चालू राहिली होती—अनेकदा बदललेल्या जागांची यादी नि हकिकत यासहीत शाळेत जेव्हा मी ती वाचून दाखवायला उभी राहिले, तेव्हा बाई खूपच रागावल्या...त्यांना वाटलं मी काहीतरी वाष्कळ चेष्टाविनोद करते आहे...त्यांनी मला मुख्याध्यापकांकडे पाठवलं, अन् मुख्याध्यापकांनी माझ्या आईलाच बोलावून घेतलं शाळेत...आईनं माझं लिखाण वाचलं, अन् तिच्या डोळ्यात खळकन् पाणीच आलं. तिनं मुख्याध्यापकांना शपथेवर सांगितलं की ही सत्यकथा, असू नये एवढी खरी होती!—आमचं मुशाफरी जीवन खरोखर असंच होतं!

माझ्या लहानपणच्यापेक्षा आता शाळांचं स्वरूप बदललं असेल, अशी मला आशा आहे...पण माझ्या आठवणीची साक्ष काढली, तर त्यावेळी शालेय शिक्षणाच्या आखणीत बालमनाचा सुजाण असा विचारच नव्हता...उलट अगदी निष्ठुर अज्ञानच होतं....रिकामं पोट, ओल्या बुटात थंडगार पडलेले पाय... अन् तरीसुद्धा खाली टोचणाऱ्या त्या कडक बाकावर चाळवाचाळव न करता बसायचा प्रयत्न...आजसुद्धा ते दुःख माझ्या मनात ताजं आहे! शिक्षक म्हणजे मुद्दाम आम्हाला छळण्यासाठी नेमण्यात आलेला एक अमानुष राक्षसच, असंच मला वाटायचं. पुनः या सगळ्या कटकटी अन् दुःखांना तोंड फोडायचीसुद्धा चोरी लहानपणी! कोण सांगणार, अन् कोण ऐकणार?

घरच्या गरीब परिस्थितीमुळे कधी दुःख झालं, असं मात्र मला आठवतच नाही...ती परिस्थिती आम्ही गृहीतच धरली होती; शाळेतच सगळा शूळ उपटायचा. बिगर खाजगी शाळातली प्रचलित शिक्षण-पद्धती, मानी अन् भावनाप्रधान स्वभावाच्या मुलांना, अगदी अपराध्याला मिळणाऱ्या कैदेतल्या वागणुकीसारखी अपमानास्पद वाटायची, असं मला आठवतं...मी तर नेहमीच त्याविरुद्ध बंड करायची!

सहाएक वर्षांची असताना, एकदा आई घरी आल्यावर तिनं मी शेजारची अर्धा डझन मुलं गोळा केलेली पाहिली—अजून पाय सुद्धा फुटले नव्हते, इतकी सगळींच्या सगळी छोटी! पण त्या साऱ्यांना माझ्यासमोर जमिनीवर बसवून मी त्यांना त्यांचे हात हलवायला शिकवत होते. "काय चाललंय्?" असं आईनं विचारल्याबरोबर मी तिला सांगितलं, "ही माझी नाचाची शाळा आहे—" तिला गंमत वाटली, अन् पियानोपाशी बसून तिनं माझ्यासाठी पियानो वाजवायला सुरुवात केली...आश्चर्य म्हणजे ही शाळा अशी बरेच दिवस चालली, आणि खूप लोकप्रियसुद्धा झाली. पुढे पुढे आसपासच्या छोट्या छोट्या मुलीही यायला लागल्या आणि त्यांचे पालक थोडी थोडी फीही द्यायला लागले शिकवण्याबद्दल

मला... पुढे यशस्वी ठरलेल्या व्यवसायाचा आरंभ हा असा झाला!

मी दहा वर्षांची होईपर्यंत हा नृत्याचा वर्ग एवढा वाढला, की माझ्या शाळेत जाण्याला आता काही अर्थ नाही, असं मी आईला सांगून टाकलं... इथं घरबसल्या मी थोडे थोडे पैसे मिळवू शकत होते, अन् तेच मला अधिक महत्त्वाचं वाटत होतं. असं असताना, शाळेत जाणारा वेळ फुकटच घालवल्या-सारखं होतं खरं म्हणजे.... मोठं दिसावं, म्हणून मी माझे केस माथ्यावर बांधून दडपून सोळा वर्षांचं वय सांगायला सुरुवात केली. वयाच्या मानानं तशी मी उंचच होते, तेव्हा कुणालाही ते खरंच वाटायचं... आजोळी आजीनं वाढवलेली माझी बहीण एलिझबेथसुद्धा नंतर आमच्याकडे आली, अन् नृत्यवर्गात शिकवायला लागली... अशा तऱ्हेनं आमची लोकप्रियता चांगलीच वाढायला लागून सॅन्फ्रॅन्सिस्कोतल्या कितीतरी घरंदाज घरांतून आम्ही दोघी नृत्य शिकवायला लागलो.

# २

**मी** अगदी तान्ही असतानाच माझ्या आईनं वडिलांच्यापासून घटस्फोट घेतला होता, त्यामुळं मी त्यांना कधीच पाहिलं नव्हतं. जेव्हा एकदा माझ्या एका मावशीला, "मला वडील म्हणून कुणी होते तरी का कधी?" असा प्रश्न मी विचारला होता, तेव्हा ती म्हणाली, "तुझे वडील म्हणजे राक्षस होते राक्षस–त्यांनीच तुझ्या आईचं आयुष्य उध्वस्त करून टाकलं!" हे ऐकून माझ्या मनानं वडलांच्या ठिकाणी चित्राच्या पुस्तकातल्या राक्षसाचीच कल्पना केली होती–त्यांत त्यांना शिंगं होती, तसंच शेपूटसुद्धा!...यामुळं शाळेत इतर मुलंमुली जेव्हा आपल्या वडलांबद्दल बोलत, तेव्हा मी अगदी चिडिचिप् असे!

मी सात वर्षांची असताना एका तिसऱ्या मजल्यावरच्या दोन खोल्यात आम्ही रहात होतो–खोल्या म्हणजे अगदी निव्वळ खोल्या–फर्निचर किंवा इतर सामान, असं काही नाहीच. तिथं एकदा दाराची घंटा वाजलेली मी ऐकली, आणि बाहेर बैठकीच्या खोलीत दार उघडायला गेले, तर दारात एक देखणे गृहस्थ उभे. डोक्यावर हॅटबिट घातलेली. त्यांनी विचारलं,

"श्रीमती डंकन कुठं राहतात, ते सांगू शकशील का बाळ?"

"मी श्रीमती डंकन यांचीच धाकटी मुलगी." मी उत्तरले.

"अरे, तूच का माझी राजकुंवर 'पग?" ('पग' हे त्यांनी मला ठेवलेलं माझं नाव होतं रांगतेपणीचं!)

बोलता बोलता त्यांनी एकाएकी मला उचलून हातांनी कवळून धरलं–आणि आसवांच्या धारांनीं मला भिजवत पटापट माझे पापे घेतले! हा सारा

प्रकार पाहून मी भांबावूनच गेले मुळीं—आणि त्यांना विचारलं, "तुम्ही आहांत तरी कोण?" "मी?" आसवं पुसत ते उद्गारले, "तुझे वडील, तुझे बाबा!"

ह्या नव्या बातमीनं मी अगदी रंगात येऊन घरातल्या सर्वांना ही आनंदात्री बातमी सांगायला धावले. म्हटलं, "बाहेर कुणी गृहस्थ उभे आहेत आणि ते म्हणतात की ते बाबा आहेत माझे—"

एकाएकी पांढरा फटक पडलेला व्याकूळ चेहरा लपवत माझी आई उठली, आणि दुसऱ्या खोलीत जाऊन आपल्या मागं तिनं दार घट्ट बंद करून स्वतःला कोंडून घेतलं; माझा एक भाऊ पलंगाखाली जाऊन लपून बसला; दुसऱ्यानं कपाटाचा आसरा घेतला—आणि माझ्या बहिणीला तर मुळीं फेफरंच आलं जसं काही! "त्यांना जायला सांग. घालवून दे त्यांना—" असं सर्वजण किंचाळत होते.

मी खरं म्हणजे या प्रसंगानं दिङ्मूढच झालेली होते, पण असं असूनसुद्धा शिष्टाचाराला अनुसरून हळूच बैठकीच्या खोलीत गेले आणि म्हणाले,

"तुम्हाला आत बोलावू शकत नाही आम्ही—काय आहे की, घरात मुळीं कुणालाच बरं वाटत नाहीय् आज!" तेवढ्यात त्या अनोळखी गृहस्थानं माझा हात धरून मला स्वतःबरोबर फिरायला येण्याबद्दल विचारलं. आम्ही जिना उतरून रस्त्यावर आलो—त्यांच्या शेजारून टुकुटुकु चालताना माझ्या बावऱ्या मनात खुषीचा दरवळ होता. कारण हे देखणे गृहस्थ माझे वडील होते, आणि माझ्या कल्पनेतल्याप्रमाणे त्यांना शिंगं नव्हती की शेपूट नव्हतं!

त्यांनी मला आईस्क्रीमच्या दुकानात नेलं, आणि पोटभर आईस्क्रीम आणि केक्स् खाऊ घातले. मी घरी आले, ती अगदी कमालीची आनंदात—रंगात—आणि पहाते तर घरची सारीजणं अगदी विषण्ण मनःस्थितीत!

मी त्यांना आपलं सांगून टाकलं, की, "बाबा फारच चांगले गृहस्थ आहेत. उद्यासुद्धा ते मला आणखीन् आईस्क्रीम खायला नेणार आहेत!"

माझ्याशिवाय बाबांची भेट घ्यायला घरचं इतर कुणीच तयार नव्हतं—तेव्हा मग काही दिवसांनी ते लॉस एंजलिसच्या त्यांच्या दुसऱ्या घरी परत गेले.

त्यानंतर कितीतरी वर्षं बाबांचा काही पत्ताच नव्हता—आणि मग एक दिवस ते अचानक समोर येऊन उभे राहिले. या वेळेस त्यांना भेटण्याइतपत आईचं मन द्रवलं होतं, तेव्हा बाबांनी आम्हांला एक सुंदर घर घेऊन दिलं—नृत्यासाठी मोठी दालनं, टेनिसकोर्ट, गोठा आणि पवनचक्कीसुद्धा असलेलं. बाबांनी चौथ्यांदा नशीब काढलं होतं म्हणून हे सारं जमलं होतं पुनः एकदा! त्यांच्या आयुष्यात तीनदा नशिबानं अशी खैर केली होती - आणि तीन्ही वेळचं वैभव

त्यांनी गमावलं होतं. या चौथ्या वेळीही नेहमीप्रमाणे यथाकाल ती सारी श्रीमंती मावळली, आणि अर्थातच आमचं घर त्याच वाटेनं गेलं! जाईना का — आम्ही तिथे राहिलो ती आमची काही वर्षं तरी, दोन वादळांच्या दरम्यान बंदरात आसरा असावा, तशी तितपत स्वास्थ्यात गेली, हे काही खोटं नाही —

हा सर्व डोलारा कोसळून पडण्यापूर्वी माझी नि बाबांची अधूनमधून गाठभेट व्हायची. थोडा सहवासही मिळायचा. तेव्हा माझ्या ध्यानात आलं, की बाबा कवी होते! मला त्याबद्दल त्यांचं कौतुकही वाटायला लागलं. त्यांच्या अनेक कवितांपैकी एका कवितेत माझ्या पुढल्या साऱ्या व्यावसायिक उत्कर्षावर एक प्रकारचं भाष्यच होतं.

मी माझ्या वडलांच्या संदर्भात आमचा थोडासा पूर्ववृत्तांत सांगते आहे, कारण माझ्या त्या कोवळ्या संस्कारक्षम मनावर त्यावेळी झालेल्या आघातप्रत्याघातांचा माझ्या पुढल्या आयुष्यावर विलक्षण पक्का ठसा उमटला आहे! एका बाजूला माझ्या मनाचं पोषण भावनाप्रधान कथाकादंबऱ्यांच्या वाचनानं होत असताना दुसऱ्या बाजूला माझ्या डोळ्यासमोर विवाहाच्या व्यावहारिक सांगतेचं विदारक उदाहरण उभं होतं. ज्यांच्याबद्दल घरात एक अवाक्षर देखील निघायचं नाही, त्या माझ्या बाबांच्या रहस्यमय अस्तित्वाची एक काळी छाया माझ्या सबंध शैशवाला ग्रासूनच बसली होती, आणि 'घटस्फोट' या भयंकर शब्दाचा तर माझ्या मनावर एक खोल चराच उमटला होता! हे असं का? असं कुणालाही विचारायची सोयच नसल्यानं मीच माझ्या मनाशी त्या रहस्याचा उलगडा करू पहात होते. मी वाचलेल्या बहुतेक कादंबऱ्यांची सांगता नायकनायिकांच्या विवाहानंच व्हायची, आणि त्यानंतरच्या त्या निरंतर सौख्याबद्दल आणखी पुढे काही लिहिण्याची मुळी गरजच उरायची नाही. अर्थात काही कादंबऱ्यांतून, विशेषतः जॉर्ज इलियटच्या 'ॲडम बीड' (Adam Bede) सारख्या कादम्बऱ्यांतून वेगळंही चित्रण असे. एक कुमारिका अन् तिला विवाहावाचून, आणि अनिच्छेनं पदरात पडलेलं मूल — आणि या कुमारी मातेच्या वाटेला आलेली बेअब्रू — छीः थूः! —

स्त्रियांच्या बाबतीतल्या या अन्यायकारक परिस्थितीचा माझ्या मनावर फार खोलवर परिणाम झाला; आणि मनातल्या मनात, माझ्या आईवडिलांच्या जीवनातल्या संघर्षाशी या अन्यायाची सांगड घालून मी तिथल्या तिथे एक निश्चय केला की माझं सारं आयुष्य विवाहसंस्थेच्या विरुद्ध उभं राहण्यात आणि स्त्री-स्वातंत्र्यासाठी झगडण्यात मी व्यतीत करीन. प्रत्येक स्त्रीला मातृत्वाचा — तिची इच्छा असेल त्याप्रमाणे एक मूल किंवा अनेक मुलं, होऊ देण्याचा — नैसर्गिक अधिकार असलाच पाहिजे — मग ती विवाह करो अगर न करो — आणि या अशा अनिर्बंध पण निसर्गसिद्ध मातृत्वाचा आदर समाजानं केलाच पाहिजे —

हे विचार समाजाच्या पचनी पाडण्यासाठी मी जीव टाकीन. कुणाला वाटेल, की बारा वर्षांच्या मुलीच्या मनात असले अकल्पनीय विचार उद्भवणं, आणि त्यांची बुद्धिगम्य जाणही दिसून येणं, हे काही खरं नाही! पण माझ्या जन्मजात परिस्थितीमुळे माझी एकंदर समज माझ्या वयाच्या पुढेच धावत होती... मी विवाहाच्या सर्व नियमनिर्बंधाची माहिती सुद्धा करून घेतली — मात्र त्यातून स्त्री-जातीस आलेलं नायकांच्या लिहिलेलं कपाळी ते दास्य पाहून, मला इतकी चीड आली की काय सांगू!

मी माझ्या आईच्या विवाहित मैत्रिणींचे चेहरे, मग जास्त शोधक नजरेनं न्याहाळू लागले आणि त्यातून मला हेच आढळून आलं, की त्या प्रत्येकीच्या चेहऱ्यावर, वैषम्याच्या, मत्सराच्या हिरव्या नजरेच्या राक्षसानं उठवलेले अगोचर व्रण होते, तशीच गुलामगिरीची एक दाट सावटही होती! त्याच वेळी मी एक शपथ घेतली, की असं अपमानास्पद जीवन जगण्याइतकी हीनदीन मी कधीच होणार नाही! या माझ्या विचारांपायी माझ्या आईच्या नि माझ्या नात्यात शिरलेला दुरावा आणि समाजानं गैरसमजाच्या पोटी केलेली माझी अवहेलनाही सहन करून मी ही शपथ निष्ठेनं पाळली!...

...सोव्हिएट शासनानं केलेलं एक चांगलं कार्य, म्हणजे विवाहसंस्थेचं उच्चाटन! या देशात दोन विवाहेच्छू व्यक्ती एका रजिस्टरमध्ये केवळ आपल्या सह्या करतात — त्या सह्यांच्या खालीच अशा वळणाचा काही मजकूर छापलेला असतो — 'ह्या सहीमुळे दोन्हीही पक्षांवर कोणतीही जबाबदारी येत नसून, हा करार उभयपक्षांच्या खुषीने कोणत्याही क्षणी रद्द करिता येईल.' कोणतीही बुद्धिमान स्त्री हाच एक विधी किंवा सहजीवनाचा संकेत मान्य करू शकेल — मीही त्यातल्या त्यात 'लग्न' या अर्थी स्वीकार केला तो याच पद्धतीच्या कराराचा!

माझी ही बंडखोर विचारपरंपरा म्हणजे सध्याच्या काळात सरसहा प्रत्येक स्वातंत्र्यप्रिय स्त्रीची साहजिक धारणाच म्हटली जाईल; परंतु वीस वर्षांपूर्वी मी लग्न करण्याला नकार दिला; 'स्त्रीचं मातृत्व—विवाहबाह्य मातृत्वसुद्धा — तिचा जन्मसिद्ध हक्क आहे,' हे माझं मत स्वतःच्या उदाहरणानं सिद्ध केलं... त्यामुळे समाजात माझ्याबद्दल अनेक गैरसमज पसरले होते. काळ आता बदललेला आहे. आपले विचार, कल्पना यांत मोठीच क्रांती घडून आलेली आहे. त्यामुळे आताची प्रत्येक बुद्धिवादी चाणाक्ष स्त्री माझ्याशी सहमत असेल यांत मला शंका नाही; तसंच विवाहविधीत अंतर्भूत असलेल्या अन्यायाधिष्ठित नीतिनियमांचं पालन करणं स्वतंत्रप्रज्ञेच्या स्त्रीच्या लेखी अगदी अशक्यप्राय बाब आहे, असंच ती म्हणेल, अशी मला खात्री आहे. आता हे सारं समजून उमजूनही बुद्धिमती

स्त्रिया विवाह करण्याचा शिरस्ता चालू ठेवत असतील, तर त्याचं कारण म्हणजे आपल्याला निश्चयानं पटलेले विचार आचारात उतरवावयाचं धैर्य त्यांना नाही, हेच. गेल्या दहा वर्षांतल्या घटस्फोटांच्या नोंदी पाहिल्या, तर माझ्या विधानाचा खरेपणा तुमच्या लक्षात येईल – ज्या स्त्रियांच्या मनावर मी या विचारस्वातंत्र्याचं महत्त्व बिंबवण्याचा प्रयत्न केला, त्यापैकी बहुतेक केविलवाणेपणानं म्हणाल्या, “ सारं खरं – पण मग आमच्या मुलांना आधार कुणाचा ? ”...माझ्या मनात येतं, की पुढे होणाऱ्या मुलाचं पालनपोषण करण्याची पुरुष वर्गावर सक्ती करता यावी, यासाठीच स्त्रियांना विवाहविधीची जरुरी भासते की काय? तसं असेल, तर त्याचा अर्थ असा की तुम्ही ज्याच्याशी विवाह करणार आहात, तो गृहस्थ त्याच्याच मुलांची जबाबदारीही अमान्य करेल, अशी शंका तुमच्या मनात आधीपासूनच आहे! अन् मग हा साराच प्रकार किती घृणास्पद नाही का? कारण ज्या व्यक्तीशी विवाह करणार, तोच तुमचा विश्वासघात करू शकण्याचा संभव तुम्ही गृहीत धरला आहे. बहुतेक सारा पुरुषवर्ग म्हणजे असा मानवतेचा एक हीन नमुना आहे, अशी या स्त्रियांसारखी माझी धारणा बिलकूल नसल्यानं मी पुरुषांना इतक्या कमी प्रतीचं कधीच लेखलं नाही!

* * *

**आमचं** बालपण काव्य आणि संगीत यांनी अगदी ओतप्रोत होतं, या वस्तुस्थितीचं सारं श्रेय माझ्या आईला आहे. संध्याकाळी ती पियानोसमोर बसायची अन् मग तास न् तास तिचं वादन चालायचं! उठण्याच्या झोपण्याच्या वा जेवणाखाणाच्या अशा काहीही ठराविक वेळा नसतच. कोणत्याही प्रकारची शिस्त आमच्या आयुष्याला नव्हती; उलट मला वाटतं, की आई तिच्या संगीतात आणि काव्यनिरुपणात इतकी बुडून जायची, हरवून बसायची स्वतःला की, आजूबाजूचं भान म्हणून तिला उरत नसे – आमचासुद्धा पार विसर पडायचा!

आईची एक बहीण – आमची ऑगस्टामावशी सुद्धा – फार कलागुणी होती. ती आमच्याकडे पुष्कळदा यायची आणि मग नाटकाचे घरगुती कार्यक्रम घडवून आणायची. फारच देखणी होती ती. डोळे काळेभोर आणि केसही कोळशासारखे काळे तुकतुकीत – काळी मखमली पैरण घालून हॅम्लेटचं सोंग सजलेली मावशी मला अजूनही आठवते. तिचा आवाज पण फार सुंदर होता. तिच्या आई-वडलांच्या डोक्यांत, ‘ रंगमंदिराशी संबद्ध असलेल्या प्रत्येक गोष्टीचा सैतानाशीच संबंध असतो ’...असल्यासारखे बुरसट विचार नसते, तर ऑगस्टामावशीनं ‘ गायिका ’ म्हणून नावलौकिक मिळवला असता नक्की. अमेरिकेचा प्युरिटनपणा – कर्मठपणा – अती टोकाला नेलेल्या पावित्र्याच्या कल्पना किंवा असंच काहीतरी... म्हणजे काय चीज आहे, ते स्पष्ट करून सांगणं कठीणच आहे

परंतु ह्या थोतांडापायी माझ्या मावशीचं सारं आयुष्य निष्फळ ठरलं, हे मात्र मी विसरू शकत नाही !

अमेरिकेत वसाहत करायला आलेल्या अगदी पहिल्यापहिल्या लोकांची एक विशिष्ट उपजत मनोधारणा होती – ती आजही पुरती नाहीशी झालेली नाही. त्यांच्या खंबीर व्यक्तित्वाचा ठसा त्यांनी तिथल्या जंगली प्रदेशावर तर उठवलाच, परंतु आदिवासी रेड इंडियनांना आणि जंगली श्वापदांनाही माणसाळवण्याची अतर्क्य जिद्द दाखवली; मात्र या बरोबर त्यांनी स्वतःलाही काबूत ठेवण्याचा, मोडण्याचा, वाकवण्याचा अजागता प्रयत्न केला – आणि तो प्रयत्न कलांच्या सांस्कृतिक संदर्भात विनाशकारीच ठरला !

अगदी बालवयापासूनच माझ्या ऑगस्टामावशीचा या कर्मठपणामुळे अन् नीतीच्या खोट्या अवडंबरामुळे कोंडमारा होत आला. तिचं रूप, तिच्या स्वभावातलं ताजेपण, तिचा धारदार आवाज, हे सारे गुण मातीमोल झाले. ‘ माझी मुलगी तोंडाला रंग फासून रंगभूमीवर उभी राहिलेली पाहण्यापेक्षा मेलेली बेहेत्तर ’ – असे निकाराचे उद्गार त्या काळीं लोकांनी काढावेत, असं काय रंगभूमीनं यांचं घोडं मारलं होतं कुणास ठाऊक. आज प्रथितयश नटनटींना समाजातल्या उच्चभ्रू वर्तुळात देखील जो मानसन्मान मिळतो, तो पाहून पूर्वीच्या त्या साऱ्या गैरसमजुतीचा सुसंगत अर्थ लावणं मुळीं अशक्यच वाटतं !

असल्या या प्युरिटन जुल्माविरूद्ध आम्ही सर्व भावंडं नेहमीचं बंड करत आलो, ते आमच्या धमनींत सळसळणाऱ्या आयरिश रक्तामुळेच असावं बहुधा !

...माझ्या बाबांनी आमच्यासाठी घेतलेल्या घरात राहायला गेल्यागेल्या पहिल्यांदा काय घडलं असेल, तर गोठा + गुदाम असलेल्या जागेत ऑगस्टिन नावाच्या माझ्या भावानं आपल्या रंगमंदिराची स्थापना केली. ‘ रिप् व्हॅन विंकल ’ची दाढी बनवण्याकरता त्यानं पडवीतल्या केसाळ गालिच्याचा एक तुकडा कापून घेतलेला मला अजूनही आठवतो. त्यानं ती ‘ रिप् व्हॅन विंकल ’ची भूमिका इतकी मना पासून वठवली होती, की एका फटाक्याच्या खोक्यावर प्रेक्षकांमध्ये बसलेली मी, त्याच्याकडे पाहता पाहता हेलावून रडायलाच लागले ! आम्ही सगळेच फार भावनाप्रधान होतो, आणि या भावनिक ऊर्मींना आवर घालणं आम्हाला मान्यच नव्हतं !

हे आमचं छोटं ‘ रंगमंदिर ’ही भरभराटीला येऊन तिथल्या तिथे आसपास लोकप्रियही झालं. हळूहळू यातूनच समुद्रकिनाऱ्याजवळच्या शहरातून दौरा काढून आमच्या रंगमंदिराचे प्रयोग करण्याची एक टूम निघाली. मी नृत्य करायची – ऑगस्टिन काव्यवाचन करायचा – आणि मग एलिझबेथ आणि रेमंड यांच्यासहित आम्ही एक प्रहसन सादर करत असू. मी त्यावेळी फक्त

बारा वर्षांची, आणि उरलेली तिघंही जण सतरा अठरा वर्षांच्या आतली! तरी पण सँटा क्लॉस, सँटा रोझा, सँटा बार्बरा यांसारख्या किनाऱ्यावरच्या शहरातून आमचे हे दौरे चांगलेच यशस्वी झाले.

माझ्या बालपणाचा स्थायीभाव 'बंडखोरी' हाच होता! आम्ही ज्या समाजाचे घटक होतो, त्या समाजाच्या संकुचितपणाविरुद्ध बंड, व्यक्तिजीवनाची कुचंबणा करणाऱ्या चाकोरीविरुद्ध, नियमनिर्बंधांविरूद्ध बंड! आणि बंडखोरीच्या आड दडलेली, पूर्वेकडे जाण्याची एक वाढती ओढ!...पूर्वेकडे... तिथे तरी क्षितिजाच्या कक्षा रूंदावलेल्या आढळतील, ही एक आशा मनाशी बाळगून...पूर्वेकडे! माझ्या घरच्यांना आणि नातलगांनाही पाठीस लागलागून मी कितीदा छळलेलं मला अजून आठवतं. माझं घोषवाक्य एकच. 'आपण हे सारं सोडून गेलं पाहिजे–इथे राहून आपण काहीही विशेष कर्तबगारी करून दाखवू शकणार नाही!'

आमच्या कुटुंबात सर्वांत धीट मीच होते, त्यामुळे घरात खायला काहीही शिल्लक नाही, अशी वेळ आली की मी पुढे व्हायचं हे ठरलेलं! मी खाटकाकडे जायचं, आणि काहीतरी शक्कल लढवून युक्तीप्रयुक्तीनं त्याला मटणाचे तुकडे फुकट द्यायला लावायचे. पाववाल्याकडेही मीच जायची आणि आमचं उधार खातं चालू राहील, अशी व्यवस्था करून यायची! या साऱ्या धाडसाच्या कामात मला फारच रस वाटायचा – विशेषतः ही सारी शिष्टाई यशस्वी व्हायची तेव्हा – अन बहुधा व्हायचीच यशस्वी—काही मोठाच पराक्रम केल्यासारखं धन्यधन्य वाटे मला; मग आनंदानं नाचतबागडतच मी घराची वाट संपवायची – मोठ्या कामगिरीवर जाऊन आलेला कुणी दरवडेखोरच शिताफीनं केलेली लूट घेऊन परतती आहे अशा थाटात!...एकंदरीत हे मोठं मोलाचंच अनुभवजन्य शिक्षण माझ्या पदरात पडलं म्हणायचं; कारण लहानपणी ज्या तंत्रानं मी निष्ठुर खाटकांना नरम आणत असे, तेच तंत्र पुढे कार्यक्रमाच्या छळवादी व्यवस्थापकांशी सामना करताना मी वापरू शकले!

बऱ्याच लहानपणीची एक आठवण सांगते; –माझ्या आईनं एका दुकानात विक्रीला ठेवायच्या म्हणून विणलेल्या काही गोष्टी, दुकानदारानं नाकारल्यामुळे आईनं डोळ्यातून टिपं काढलेली मी पाहिली – झालं! तिच्या हातून त्या वस्तूंची पिशवी मी घेतली, त्यातल्या विणलेल्या टोप्यांपैकीच एक टोपी डोक्यावर चढवली त्यातलेच हातमोजेही घातले हातात आणि फेरीवाल्याप्रमाणे दारोदार हिंडून आईला दुकानातून मिळाले असते, त्याच्या दुप्पट पैसे मी त्या साऱ्या वस्तू विकून मिळवून दिले!

...कित्येकदा कुटुंबातले कर्ते पुरुष, मुलांबाळांकरता पाठीमागे खूप पैसा

ठेवण्याखातर आपण कामधंदा करत असल्याचं सांगतात... हे ऐकलं म्हणजे मला वाटतं, की असं आयतं सुख मुलांच्या आयुष्यात अलगद सोडण्यानं त्यांच्या स्वभावातली ईर्ष्या आणि धडाडीच नाहीशी होऊन जाते, याची त्यांना कितपत कल्पना असते, कोण जाणे! मुलांच्यासाठी ठेवलेला प्रत्येक डॉलर त्या भरीचा कमकुवतपणाही आणतो. मी तर म्हणेन, मुलाला द्यायला सर्वांत सार्थ नि सुंदर वारसा, म्हणजे त्याचं आयुष्य त्यानं स्वतः घडवण्याचं स्वातंत्र्य!— तेही स्वतःच्या पायावरच पहिल्यापासून उभं राहून—!

शिकविण्याच्या निमित्ताने सॅन फ्रॅन्सिस्कोतल्या बऱ्याच श्रीमंत घरांतून माझ्या बहिणीचा (नि माझाही) शिरकाव झाला होता; पण या घरातल्या सुखवस्तू मुलांचा हेवा मला कधीच वाटला नाही—अगदी नाही—उलट, मला त्यांची कीवच यायची. त्यांचं ते कूपमंडूकी अर्थहीन जीवन पाहून मी मनात आश्चर्य करायची—त्या लक्षाधीश लोकांच्या मुलांच्या पेक्षा माझी मीच मला हजारपटीनं अधिक श्रीमंत वाटत होते; कारण ज्यामुळं जगणं सार्थ वाटावं, अशा साऱ्या गोष्टींनी आमचंच जीवन समृद्ध होतं!

...'नृत्यशिक्षिका' म्हणून आमची लोकप्रियता वाढायला लागली. आम्ही म्हणत होतो की आमची ही एक अभिनव नृत्यशैली आहे—पण खरं सांगायचं तर घराणं, शैली, पद्धत वगैरे काही नव्हतंच! डोक्यात येईल त्या कल्पनेचा मागोवा घेत जायचं आणि नृत्य रचायचं; जे काही म्हणून मनाला सुंदर वाटेल ते शिकवायचं हीच पद्धती...माझ्या सुरुवातीच्या नृत्यरचनांपैकी एक म्हणजे 'मी हवेत शरसंधान केले' (I shot an arrow in the air) ह्या लाँग-फेलोच्या कवितेचं नृत्यांकन! मी ते काव्य वाचायचं आणि त्याच्या अर्थाचं त्यांना झालेलं भान, हावभाव आणि हालचाल, यामधून, व्यक्त करायला मुलांना शिकवायचं! संध्याकाळीं मी नृत्यरचना करत असताना आई मला पियानोवर साथ करायची...आमच्या ओळखीच्या एक गोड स्वभावाच्या वयस्कर बाई संध्याकाळी पुष्कळदा यायच्या आमच्याकडे. त्या पूर्वी व्हिएन्नाला होत्या. माझ्या-वरून त्यांना 'फॅनी एल्स्लर'ची आठवण येत असल्याचं त्या म्हणायच्या; नि मग फॅनी एल्स्लरच्या भरघोस यशाबद्दलच्या कौतुक-मिश्रित गोष्टी त्या पुनःपुनः सांगायच्या—"इसाडोरा दुसरी फॅनीच होणार यात शंका नाही!" असं त्या बोलायच्या—आणि इकडे माझ्या महत्त्वाकांक्षी स्वप्नरंजनाला जोर चढायचा! माझ्या आईला तिनं मला सॅन्फ्रॅन्सिस्कोमधल्या एका प्रसिद्ध बॅले नृत्याच्या शिक्षकाकडे घेऊन जायला सांगितलं; पण मला मात्र तिथलं शिक्षण बिलकूल आवडलं नाही!

त्या शिक्षकानं जेव्हा मला माझ्या पायाच्या अंगठ्यावरच उभं राहायला

सांगितलं, तेव्हा मी विचारलं सरळसरळ, " का ?–असंच का उभं राहायचं ?" ते उत्तरले, " ते सुंदर दिसतं म्हणून–". मी त्यावर म्हणाले, " छे ! ही गोष्ट बेंगरूळ–अन् एवढंच नव्हे तर अनैसर्गिक आहे ! "–आणि तिसऱ्याच धड्या-नंतर पुनः कधीही न परतण्याच्या निश्चयानं मी त्यांचा निरोप घेतला. शरीराच्या त्या अवघडलेल्या अवस्था आणि व्यायामसदृश कृती पाहून माझ्या स्वप्नाला मुळी तडाच गेला !... माझं स्वप्न होतं एका वेगळ्याच नृत्याचं–तसं म्हटलं तर त्याची रूपरेषा मला सांगता आली नसती–ते 'वेगळं'–म्हणजे कसं असणार होतं ह्याची स्पष्ट जाण मला नव्हती; माझ्या अन्तःप्रेरणेला अनुसरून एका अदृष्य सृष्टीचा शोध मी घेऊ पाहात होते... पण त्या सृष्टीत प्रवेश करायची कळ तर हवी ना माहीत व्हायला ?... तसं पाहिलं तर नृत्यकला उपजतच माझ्या अंगात होती, आणि माझ्या खंबीर आईच्या धाडसी पाठिंब्यामुळे तिची गळचेपी होण्याचा प्रसंगच आला नाही, हे काय कमी होतं ?... मला वाटतं, की पुढच्या आयुष्यात मुलाला जे काय म्हणून साधायचं, करायचं असेल, त्याची सुरुवात त्याच्या अगदी लहानपणीच झाली पाहिजे. शाळेतलं शिक्षण म्हणून जी काय एक चीज आहे, त्याच्या भरीस पडून किती तरी मुलांचं आयुष्य अगदी सामान्य नि चाकोरीबद्ध होऊन जातं; आणि काही तरी सुंदर अन् जगावेगळं करण्याची संधी त्याच्या हातून कशी निसटूनच जाते, या गोष्टीचा कितीसे पालक गंभीरपणे विचार करतात ?... पण मला वाटतं जगाची रीतच अशी असणार... नाहीतर सुधार-लेला नि सुसंस्कृत समाजधारणेला अत्यंत आवश्यक असलेला दुकानातला नि बँकेतला कारकून वर्ग तरी कुठून निर्माण झाला असता ?

...आमच्या आईची आम्ही चार मुलं ! जबरदस्तीच्या नि शाळकरी शिक्षणाच्या तंत्रानं ती आम्हाला देखील सर्वसामान्य व्यवहारी नागरिक बनवू शकली असती... आणि ती कधी कधी कंटाळून म्हणायची सुद्धा की, " माझ्या साऱ्याच मुलांचा पिंड कसा बाई कलावंताचा ? एक तरी कुणी व्यवहार-दक्ष निपजायचा होता ! "... पण खरं तर आम्ही कलावंत, कलात्म झालो, ते आईच्याच सौंदर्यवेड्या तरल स्वभावामुळं ! तिला व्यवहारातल्या सुखकल्पनांचं कोड अजिबात नव्हतं; उलट घरदार, खुर्च्या-कपाटं वगैरे, सर्व स्थावर संपत्तीत जमा होणाऱ्या वस्तूंबद्दलचा एक तऱ्हेचा तिटकारा आणि नैष्ठिक उदासीनताच तिनं आमच्या मनावर बिंबवली. तिचं आदर्श उदाहरण डोळ्यांसमोर असल्या-मुळेच मी माझ्या सबंध आयुष्यात दागदागिन्यांना कधी शिवले नाही...असल्या वस्तू म्हणजे निरर्थक क्षुद्र गोष्टी आहेत, अशीच तिची आम्हाला शिकवण होती.

माझ्या पाठीमागची शाळा सुटल्यानंतर तर मला वाचनाचा भलताच नाद लागला. ओकलंडमध्ये आम्ही त्यावेळी असताना तिथे एक सार्वजनिक

ग्रंथालय होतं आणि ते आमच्या घरापासून किती मैल दूर आहे याचा विचार न करता मी धावत उड्या मारीत नि नाचतसुद्धा तिथपर्यंत जायची नि परतायची! तिथली ती देखणी नि गोड लायब्ररियन–ग्रंथपालिका–कॅलिफोर्नियाची कवयित्री होती... इना कूलबर्थ नावाची. तिच्याकडून वाचनात खूप उत्तेजन मिळायचं मला–मी चांगली पुस्तकं मागितली, की ती खूष होते असं मला वाटायचं. तिचे डोळे अंतराग्नीनं तेजाळलेले नि भावुकतेनं उजळल्यासारखे, भारी भारी सुंदर होते!... पुढे कधीतरी माझ्या कानांवर आलं की माझ्या बाबांचा एकदा तिच्यावर खूप लोभ जडला होता. ती त्यांच्या आयुष्यातली कधीच न विझणारी प्रीती–ज्योत होती हे नक्की. कदाचित् पुढे मलाही तिचं आकर्षण वाटायला, त्या घटनेशी निगडीत असलेला एक अदृश्य धागाच कारणीभूत झाला असावा!

मी त्यावेळीं डिकन्स, थॅकरे, शेक्सपियर, यांचं सारं साहित्य आणि हजारो कादंबऱ्या वाचल्या! शिवाय चांगलं-वाईट, प्रतिभासंपन्न उत्स्फूर्त लेखन आणि फालतू पांढऱ्यावर काळं... सारंसारं काही आधाशीपणानं रिचवलं. दिवसभर गोळा केलेले मेणबत्तीचे तुकडे रात्रीपासून पहाटेपर्यंत जाळून त्या प्रकाशात मी वाचत बसे. एक कादंबरी मी त्या वेळीं लिहायला घेतली होती; एवढंच नाही तर एका वर्तमानपत्राचं संपादनही मी त्या वेळेला करत होते... अर्थात् त्यांत सारं काही 'इसाडोरा उवाच' असे! संपादकीय, लघुकथा नि स्थानिक बातम्यासुद्धा मींच लिहायची–भरीला मी एक रोजनिशी ठेवत होते; आणि त्यांत वापरण्याकरता एक गुप्त सांकेतिक भाषा मी शोधून काढली होती!... कारण? कारण या सुमाराला माझं स्वतःचं एक विशेष रहस्य होतं... मी प्रेमात पडले होते!!

...लहान मुलांच्या खेरीज आम्ही काही थोड्या मोठ्या विद्यार्थ्यांचेही नृत्य-वर्ग घेत होतो. माझी बहीण त्यांना, ज्याला 'सोसायटी डान्सिंग' म्हटलं जायचं असे वॉल्झ, मझुर्का, पोल्का वगैरे नृत्यप्रकार शिकवायची. ह्या वर्गात दोन तरुण पुरुष होते–एक अगदी कोवळा डॉक्टर होता आणि एक केमिस्ट. हा केमिस्ट कल्पनेपलीकडे देखणा होता, आणि त्याचं नावही सुंदर होतं अगदी–'व्हर्नन'! मी तर अकरा वर्षांचीच होते तेव्हा–पण दिसायची पुष्कळ मोठी–कारण माझे केस माथ्यावर बांधलेले असायचे, आणि अंगात असायचे लांबलांब फ्रॉक्स! 'रिटा'च्या नायिकेप्रमाणे मी माझ्या डायरीत लिहून टाकलं होतं–'मी प्रेमातिरेकाने वेडीपिशी झालेयू'–अन् मला वाटतं मी झालेही होते तशी! व्हर्ननला याची जाणीव होती की नव्हती, कुणास ठाऊक! मी स्वतः त्या वयात प्रेमाची कबुली देण्याएवढी धीट नव्हते... खूप लाजरी होते... आम्ही बॉल्सना आणि नृत्यसमारंभांना वगैरे बरोबर जात होतो, तिथे तर

जवळजवळ प्रत्येक नृत्य तो माझ्याबरोबरच करायचा – आणि मग नंतर रात्रभर जागून ते भलते रोमांचकारी अनुभव मी माझ्या डायरीत टिपून ठेवायची… ‘त्याच्या बाहुपाशात… तरंगत तरंगत’… वगैरे वगैरे! दिवसभर तो हम-रस्त्यावरल्या एका औषधाच्या दुकानात नोकरी करायचा; आणि नुसतं त्या दुकानाचं एकदा दर्शन घेण्यासाठी रोज मी मैल न् मैल चालत जायची! कधी-कधी दुकानात जाऊन “काय कसं काय?” अशी पृच्छा करण्याइतपत धैर्यही व्हायचं! त्याच्या घराचा पत्ताही मी शोधून काढला – एवढंच नाही तर त्या घराच्या खिडकीतून दिसणारा दिवा केवळ पाहण्यासाठी मी संध्याकाळी घरातून पळ काढत असे! हे प्रेमप्रकरण मला वाटतं दोन वर्षं टिकलं असावं – त्यापायी मी सोसलंही पुष्कळ. दुसरं वर्ष सरता सरता व्हर्ननं ओकलंड मधल्याच एका तरुण मुलीशी लवकरच लग्न करण्याचा आपला बेत जाहीर केला… मी आपली माझी दारुण निराशा माझ्या डायरीच्या पानात ओतली! मला व्हर्ननच्या लग्नाचा तो दिवस आठवतो… आणि डोक्यावरून शुभ्र ओढणी घेतलेल्या एका अगदी सामान्य रूपाच्या मुलीबरोबर व्हर्ननला खाली उतरताना पाहून जे काय वाटलं, तेही आठवतं!… त्यानंतर त्याची माझी भेट झालीच नाही…

गेल्या वेळी सॅन फ्रॅन्सिस्कोमध्ये मी नाचले, तेव्हा एक गृहस्थ माझ्या रंगपटात मला भेटायला आला… केस अगदी हिमधवल म्हणावेत असे… पण तरी वयानं तरुणच वाटणारा… आणि कमालीचा सुस्वरूप! मी चटदिशी त्याला ओळखला – व्हर्ननच होता तो – मी मनात विचार केला की, आता इतक्या वर्षांनंतर त्याला तारुण्यातल्या त्याच्याविषयींच्या आपल्या तीव्र ओढीबद्दल सांगायला काही हरकत नाही. मला वाटलं होतं, त्याला गंमत वाटेल… तर तो मुळीं भयंकर घाबरून गेलेला दिसला… आणि आपली बायको (म्हणजे ती सामान्य मुलगी!) अजून हयात असून तिच्यावरचं आपलं प्रेम कसं अजूनही अढळ आहे, वगैरे वगैरे गोष्टी सांगायला लागला! काही काही लोकांचं जिणं किती म्हणून साधं – एकांगी – एकेरी असावं!

…ही झाली माझ्या पहिल्या प्रेमाची कहाणी! मी भयंकर प्रेमात पडले होतें; आणि मला वाटतं, माझं असं प्रेमात बुडून जाणं… तनमनानं प्रेमलीन होणं तेव्हापासून आजवर कधी थांबलेलंच नाही! आता सध्या देखील अगदी अलीकडच्या एका अनावर आणि क्लेशकारक बाधेतून मोकळी झाल्यानंतरची विकल विश्रांती मी अनुभवते आहे! जणू काही शेवटच्या अंकाचा नेट लावण्यापूर्वी घ्यायचा विसावा मी घेते आहे… की खेळ खरोखरंच संपला म्हणायचा, कुणास ठाऊक! माझं छायाचित्र प्रसिद्ध करून वाचकांनाच या प्रश्नाचं उत्तर द्यायला लावावं, हे उत्तम!

३

माझ्या वाचनात आलेल्या पुस्तकांचा परिणाम असा झाला, की सॅनफ्रॅन्सिस्को सोडून कुठे तरी दूर परदेशी जायचा माझा पक्का विचार होऊन बसला. एखाद्या मोठ्या नाटक कंपनीत प्रवेश मिळवून त्यांच्याकरवी इथून सुटकासुद्धा करून घ्यायचा माझा बेत होता; तेव्हा सॅनफ्रॅन्सिस्कोमध्ये आठ दिवसांच्या कार्यक्रमांसाठी मुक्काम ठोकलेल्या एका फिरत्या नाटककंपनीच्या मॅनेजरला एक दिवस मी भेटायला गेले – आणि माझं नृत्य पाहायची त्यांना विनंती केली. एका मोठ्या अंधाऱ्या नि मोकळ्या रंगमंचावर एक दिवस सकाळी माझी चाचणी परीक्षा झाली – आई मला पियानोवर साथ करीत होती. मी माझा छोटा शुभ्र कुडता (tunic) घालून मेंडेलेझोनच्या निःशब्द गीतांपैकी (songs without words) काही रचनांवर नृत्य केलं. संगीत अगदी पूर्णपणे बंद झाल्यावर मॅनेजर जरा वेळ गप्पच बसले; आणि मग आईकडे वळून म्हणतात कसे,

... "हे नृत्य काही व्यावसायिक रंगभूमीच्या कामाचं नाही. चर्चमध्ये हे अधिक शोभून दिसेल – तुम्ही तुमच्या या पोरीला घरी घेऊन जा कशा!"

माझी निराशा झाली जराशी – पण त्यांच्या बोलण्यावर विश्वास काही बसला नाही – मी दुसरेच बेत आखायला लागले, सॅनफ्रॅन्सिस्को सोडण्याचे! घरातल्या सर्व जणांची मी एक बैठकच घेतली–आणि इथलं—सॅनफ्रॅन्सिस्कोमधलं—आयुष्य कसं नि का असह्य आहे, याची तपशीलवार कारणपरंपरा: एका तासाच्या अविरत बडबडीनंतर त्यांच्या गळी उतरवली! माझी आई, या साऱ्या प्रकारानं चक्रावूनच गेली; पण तरीही माझ्या मागे कुठेही यायला तिची तयारी होती – आणि प्रथम आमचंच दोघींचं पाऊल बाहेर पडलं – शिकागोची दोन प्रवासी

तिकिटं ! – मी कुटुंबाचं नशीब काढेपर्यंत माझे दोन्ही भाऊ आणि बहीण यांनी सॅनफ्रॅन्सिस्कोमध्येच रहायचं, आणि मग आम्ही जिथे असू तिथे येऊन मिळायचं, असं ठरलं.

जून महिन्यातल्या एका अगदी उन्हानं रखरखलेल्या दिवशी आम्ही शिकागोला येऊन पोहोचलो. – बरोबर एक छोटी ट्रंक, माझ्या आजीचे अगदी जुनाट पद्धतीचे काही डाग आणि फक्त पंचवीस डॉलर्स ! माझी कल्पना की शिकागोत पाऊल ठेवल्या ठेवल्या मला कार्यक्रम मिळेल आणि मग पुढचं सारं काही सुखकर आणि सोपं होऊन जाईल अगदी; पण तसं काही एक झालं नाही. माझं ते ग्रीक कुडतं – ट्युनिक – घालून मी एकामागून एक व्यवस्थापकांना भेटत गेले – नृत्य करून दाखवत राहिले . . . पण या साऱ्यांचं मत त्या पहिल्या व्यवस्थापकांच्या सारखंच ! " हे नृत्य फार छान आहे यांत काहीच शंका नाही – पण रंगभूमीला याचा काही उपयोग नाही ! "

जसजसे दिवस जाऊ लागले, तसतशी जवळची पुंजी संपत आली – आणि आजीच्या त्या डागांपैकी काही गहाण ठेवूनसुद्धा नीट भागेना. अर्थात् यानंतर ओघानं जे व्हायचं असतं ते अटळच ठरलं ! आमच्या खोलीचं भाडं थकल्यामुळे आमचं सामान ठेवून घेऊन एक दिवस आम्हाला घराबाहेर काढण्यात आलं – खिशात एक दीडकीदेखील नाही आणि डोक्यावर कसलाही निवारा नाही !

माझ्या फ्रॉकच्या गळ्याला एक अस्सल लेसची कॉलर होती. ती लेस-कॉलर विकायच्या प्रयत्नात माथ्यावरचं उग्र ऊन खात सारा दिवसभर मी तासन्तास चालले . . . शेवटी अगदी दुपार सरता सरता माझ्या कष्टांना यश आलं ( . . . मला वाटतं त्याचे मला दहा डॉलर्स मिळाले – ) आयरिश लेसचा तो एक फारच सुंदर नमुना असल्यामुळे भरपूर किंमत येऊन खोलीचं भाडं भरण्याइतपत पैसे हातात आले माझ्या. उरलेल्या पैशाचे मी एक पेटी भरून टोमॅटो घेतले . . . आणि काय ? . . . तो संपूर्ण आठवडा त्या टोमॅटोवरच काढला – नुसते टोमॅटो – ! बरोबर ब्रेड नाही की मीठ नाही ! माझ्या आईला बिचारीला तर इतका अशक्तपणा आला, की तिच्यानं साधं उठून बसवेना. दररोज उजाडता उजाडता मी मॅनेजरला भेटायला जायची वेगवेगळ्या – पण शेवटी तर जे काय काम मिळेल ते करायचा निश्चय करून, नोकरीसाठी ' एम्प्लॉयमेंट ब्यूरो 'त नाव नोंदवून आले.

काऊंटरवरच्या बाईनं विचारलं, " काय काम येतं तुम्हाला ? "

मी म्हटलं, " काहीही. "

" पण तू दिसतेस अशी की वाटतं तुला काहीच येत नसावं – "

शेवटी निराशेपोटी मी 'मेसनिक टेंपल गार्डन'च्या मॅनेजरकडे अर्ज टाकला मेंडलझोनच्या वसंतसूक्ताच्या ( Spring Song ) सुरांवर मी इथून तिथे; तिथून इथे तरळत हेलावत जात असताना, तो मॅनेजर तोंडात चांगला जाड चिरूट आणि डोक्यावर कलती हॅट, अशा थाटात कमालीच्या शिष्टपणानं माझं नृत्य पहात होता !

नंतर मला म्हणतो कसा, "तू फार सुंदर आहेस आणि एक प्रकारची लोचही आहे तुझ्यात ! पण हा मिळमिळीत ढंग बदलून तुझ्या या नृत्याला काही थोडी आकर्षक फोडणी देशील तर बघ—आपण तुला नोकरी देऊ लगेच !"

शेवटल्या उरलेल्या टोमॅटोवर कसावसा जीव जगवणाऱ्या माझ्या अशक्त आईचा विचार मनात येऊन मी त्याला विचारलं, "नृत्य आकर्षक करायचं म्हणजे नक्की काय करायचं असं म्हणता तुम्ही ?"

"तू करतेस तसलं काहीच नाही...काहीतरी स्कर्टस्, झालरी...आणि किक्स .:. झटक्यानं पाय उडवणं वगैरे...पाहिजे तर प्रथम तुझं ग्रीक पद्धतीचं नृत्य कर आणि मग मवाशी म्हटल्याप्रमाणे स्कर्ट, झालर वगैरे...असा बदल लोकांना अगदी अफलातून वाटेल !"

पण त्या झालरी तरी मी कुठून आणणार होते ?...आगाऊ किंवा उसने पैसे घेणं इथे बरोबर ठरलं नसतं; तेव्हा मग झालरी, किक्स आणि ते तिखटमीठ किंवा फोडणीचं सामान...सारं काही घेऊन दुसऱ्या दिवशी येते, असं सांगून मी निघाले तर खरी ! बाहेर अशी रखरख होती—अगदी शिकागो छाप !—थकलेल्या आणि भुकेनं भोवळलेल्या त्या स्थितीत मी आपली रस्त्यातून भटकत होते...एवढ्यात 'मार्शल फील्ड'च्या शानदार नि अवाढव्य दुकानांपैकी एक मला समोरच दिसलं. आत जाऊन मॅनेजरला भेटायची इच्छा मी प्रदर्शित केली. आत ऑफिसमध्ये गेल्यावर टेबलापाठीमागे बसलेला एक तरुण गृहस्थ मला दिसला. त्याच्या चेहऱ्यावरचा कनवाळू भाव पाहून मी त्याला सारी परिस्थिती समजावून सांगितली—म्हटलं, दुसऱ्या दिवशीच्या सकाळपर्यंतच्या उधारीवर जर मला एक स्कर्ट बनवून मिळाला, तर कार्यक्रमाच्या पैशातून मी सहज पैसे देऊन टाकू शकेन. त्या बिचाऱ्याला कशानं सुबुद्धी झाली कुणास ठाऊक, माझी विनंती त्यानं मान्य केली खरी ! किती तरी वर्षांनंतर त्याची माझी पुनः गाठ पडली होती—लक्षाधीश गॉर्डन सेल्फ्रिज होता तो !...

मी सारं साहित्य घेतलं : पांढरा आणि लाल कपडा स्कर्टच्या घेरासाठी आणि लेसवाल्या झालरी...हे गाठोडं काखेत मारून मी घरी येते, तर आई मृत्युपंथाला लागल्यासारखी निपचलेली ! तरी पण पठ्ठी धीरानं बिछान्यात उठून बसली, आणि माझा रंगवेष तिनं तयार केला. रात्रभर ती बिचारी जागली,

आणि उजाडता उजाडता शेवटची झालरसुद्धा शिवून टाकलीन् तिनं! हा ड्रेस घेऊन मी पुनः त्या रुफगार्डनच्या मॅनेजरकडे गेले. चाचणीसाठी ऑर्केस्ट्रा तयारच होता.

" काय वाजवायला सांगू ? " त्यानं विचारलं. ह्या गोष्टीचा विचार करायचं राहूनच गेलं होतं, पण मी आपलं सांगून टाकलं—'द वॉशिंग्टन पोस्ट!' हे त्यावेळी फारच लोकप्रिय झालेलं होतं. साथ सुरू झाली; आणि मनातल्या मनात पुढली पुढली सुचेल तशी जुळणी करीत मी शक्य तितकं चटकदार नृत्य बठवण्याचा प्रयत्न केला. झालं! मॅनेजर बेटा भलता खूष! लगेच तोंडातला चिरूट काढून तो म्हणाला :

" वाः वाः! फार छान! तू उद्या रात्री यायचं. मी तुझ्यासाठी मुद्दाम स्वतंत्र निवेदन देईन—अनाउन्समेंट करीन. "

त्यानं मला त्या आठवड्याचे पन्नास डॉलर्स दिले—लगेचच आगाऊ—तेवढी कृपा त्याने केली खरी.

हे रूफगार्डनवाले कार्यक्रम माझ्या दृष्टीनं चांगलेच यशस्वी ठरले; अर्थात् टोपण नावाखाली—पण खरं म्हणजे माझं मन त्यात बिलकूल रमत नव्हतं—मला त्या साऱ्या प्रकाराचा तिटकारा येत होता—तेव्हा त्या आठवड्याच्या शेवटी पुढच्या अनेक कार्यक्रमांच्या वायद्याचं किंवा दौऱ्याचं आमिष त्यानं दाखवलं होतं, तरी मी नकारच दिला त्याला. उपासमारीपासून आम्ही त्यामुळं वाचलो होतो. हे खरं; परंतु स्वतःच्या तत्त्वाविरूद्ध जाऊन लोकांचं असं मनोरंजन करणं मला पुरेपुरे झालं होतं अगदी—ती माझी पहिली आणि शेवटचीच वेळ मला वाटतं, तत्त्वाला मुरड घालण्याची!

शिकागोतला हा उन्हाळा म्हणजे माझ्या आयुष्यातला अत्यंत कटू आणि दुःखद कालखंडांपैकी प्रमुख होता. त्यानंतर जेव्हा म्हणून मी शिकागोत पाऊल टाकलं, तेव्हा तेव्हा त्या रस्त्याकडे पाहतांना माझं मन त्या उपासमारीच्या हळव्या आठवणींनी व्याकुळल्याशिवाय राहिलं नाही!

आश्चर्याची गोष्ट अशी, की अशा भयंकर प्रसंगातून जात असतानादेखील माझ्या खंबीर मनाच्या आईनं माझ्यापाशी घरी परत जाण्याबद्दल एक अवाक्षर-देखील काढलं नाही.

एक दिवस कुणीतरी मला एका पत्रकार बाईसाठी एक ओळखपत्र दिलं. 'ॲम्बर' म्हणायचे तिला. शिकागोतल्या एका प्रमुख वृत्तपत्राची ती सहसंपादिका होती. मी तिला भेटायला गेले. चांगली उंच, धिप्पाड, भारदस्त—पन्नासपंचावन्न वर्षांची असावी ती. तिचे केस लालट रंगाचे होते... मी तिला माझ्या नृत्याबद्दलच्या कल्पना सांगितल्या. तिनं सारं सहानुभूतीपूर्वक ऐकून घेतलं—आणि

अनायासे कलावंत नि साहित्यिक लोकांच्या भेटीगाठी होतील, या हेतूनं मला नि आईला ' बोहिमिया ' त येण्याचं आमंत्रण दिलं. संध्याकाळीं लगेच आम्ही त्या क्लबमध्ये गेलो. एका उंच इमारतीच्या सर्वांत वरच्या मजल्यावर ही जागा होती. काही रिकाम्या रिकाम्या वाटाव्या, अशा खोल्या आणि खुर्च्या-टेबलं; बस्! मात्र तिथे त्या दिवशी दिसलेला, जगावेगळ्या माणसांचा तो असामान्य मेळावा अभूतपूर्वच होता. त्या मधोमध उभी राहून, पुरुषी आवाजात ॲम्बर पुकारत होती—

" बोहिमियन मित्रहो — चला या बरं एकत्र....."

दर वेळेला तिनं असा पुकारा केला की सारेजण आपले बिअरचे चषक उंच उचलायचे, आणि उत्साहानं चीत्कार करून, गाणी गात तिला प्रतिसाद द्यायचे; दरम्यान मध्येच माझं तथाकथित ' आध्यात्मिक ' नृत्यही झालं! बोहिमियन तर सर्व गोंधळातच पडले—त्यांना त्याचा काय नि कसा अर्थ लावावा, काही कळेना! तरी पण ' एक छोटी गोड पोर ' असं कौतुक करून, त्यांनी मला त्यांच्या क्लबमध्ये दररोज संध्याकाळी येऊन बोहिमियन मित्रमेळाव्यात सामील होण्याचं आमंत्रण दिलं.

बोहिमियात लोकांची अगदी कमालीची मजेदार सरमिसळ असे. ह्या मठीत जवळजवळ सर्व देशातले कवी, कलावंत नि नट यांचा राबता असायचा. सर्वांना एकत्र बांधणारा एकमेव दुवा म्हणजे त्या सर्वांचं दारिद्र्य! कुणाच्या खिशात एक दिडकी देखील सापडायची नाही. क्लबमध्ये सॅन्डविचेस आणि बियर मिळायची म्हणून बरं, नाहीतर एरवी उपाशीच राहण्याची पाळीं! — असे आमच्यासारखेच होते कितीतरी बोहिमियन्स! बियर आणि सॅन्डविचेसचा पुरवठासुद्धा ॲम्बरच्या दिलदार दातृत्वामुळं व्हायचा!

बोहिमियन्सच्या या मेळाव्यात एक पोलिश गृहस्थ होता — चाळीस पंचेचाळीस वर्षांचा. माथ्यावर विटकरी लाल रंगाच्या केसांचं कुरळं जंजाळ, तशीच दाढी, आणि अगदी भेदक निळे डोळे. तो बहुधा पाईप ओढत एका कोपऱ्यात बसायचा; आणि इतर बोहिमियन्सच्या नादिष्ट चाळ्यांकडे जरासा उपहासानंच पहात असल्यासारखा भासायचा; पण तेव्हाच्या त्या साऱ्या गर्दीत ज्यांच्या ज्यांच्या समोर मी नाचले, त्यांपैकी हा मिरोस्कीच एक असा होता, की ज्याला माझं कार्य नि ध्येय यांचा काहीतरी उमज पडायचा. तोही असा कफल्लकच होता; — पण तरी कित्येकदा तो मला माझ्या आईसह कुठे तरी छोटयाशा एखाद्या होटेलमध्ये जेवायला घेऊन जायचा — किंवा ट्रॉलीमधून सहलीला शहराबाहेर न्यायचा. तिथे रानांतच मग आमची न्याहरी व्हायची. ' गोल्डनरॉड 'च्या सोनसळी फुलांचं त्याला भारी वेड! मला भेटायला यायचा

तेव्हा तेव्हा त्याच्या हातांत ही फुलंच फुलं असायची. ही लाल सोनेरी सोनसळीची फुलं आज देखील माझ्या मनात, मिरोस्कीच्या लाल कुरळ्या केसांच्या नि दाढीच्या आठवणीशीच निगडीत झाली आहेत!

मिरोस्की तसा विक्षिप्तच! तो कवी होता, चित्रकारही होता – पण जीवन व्ययवसा म्हणून शिकागोत तिसराच काहीतरी धंदा करायचा. त्यांत त्याचा जम कधीच्च बसू शकला नाही; त्यामुळे उपासमारीनं अर्धमेल्या अवस्थेत कसाबसा तो जगत होता.

अर्थात् त्याची ती व्यथा किंवा त्याचं प्रेम वगैरेची समज असण्याएवढी मोठी मी तेव्हा नव्हतेच... आणि खरंच! संस्कृतीचा तथाकथित वर्ख चढलेल्या त्या जमान्यातली अमेरिकन माणसं किती म्हणून बाळबोध नि एकमार्गी असत, याची त्यावेळची कल्पना करणं देखील आता अशक्यच आहे! माझा स्वतःचा आयुष्याकडे पाहण्याचा दृष्टिकोण सुद्धा तेव्हा अगदी स्वप्नाळू आणि भावनाप्रधान होता. या वेळेपर्यंत प्रेमाच्या शारीरिक परस्पर-चेष्टांचा अनुभव किंवा कल्पना मला अजिबात नव्हतीच; त्यामुळे मला पाहून मिरोस्कीच्या मनात उफाळून येत असलेल्या वासनेच्या ऊर्मीची मला कल्पना आली, ती किती तरी उशिरा! चाळीस पंचेचाळीस वर्षांच्या ह्या गृहस्थाला माझ्या सारख्या तेव्हांच्या मुग्ध, निरागस, कोवळ्या मुलीबद्दल अमर्याद ओढ वाटत होती – तो पागल झाला होता – पागल आणि बेभान! हे असलं अचाट प्रेम एखादा पोलिश माणूसच करू जाणे! माझ्या आईच्या मनात या प्रकाराबद्दल काहीच शंका न आल्यानं कितीदातरी आम्हाला एकांत मिळत होता... साहजिकच लाडिक हितगुज आणि जोडीनं रानच्या वाटेनं लांबलांब फिरायला जाणं, याचा मानसिक परिणाम जो व्हायचा तोच झाला... आणि एक दिवस माझं चुंबन घेण्याचा मोह आवरेनासा होऊन त्यानं मला लग्नाची मागणी घातली... बस्!... त्या क्षणी मला वाटलं की माझ्या वाट्याचं आयुष्यातलं एकमेव दिव्यभव्य प्रेम ते हेच!...

...इकडे उन्हाळा सरत आला, आणि आमची पुंजी तर पुरतीच सरली! शिकागोमध्ये राहून आता भागायचं नाही, असा विचार करून मी न्यूयॉर्कला जायचं नक्की ठरवलं... ठरवलं खरं, पण जायचं कसं?

एक दिवस वृत्तपत्रात ऑगस्टिन डाली आपल्या कंपनीसह शिकागोला आल्याचं मी वाचलं – ॲडा रेहान मुख्य नटी म्हणून त्याच्याबरोबर आली होती. अमेरिकेतला एक अतिशय कलाप्रेमी आणि गुणग्राही रंगव्यवस्थापक अशी ऑगस्टिन डालीची ख्याती होती; तेव्हा अशा या मोठ्या माणसाची भेट घ्यायचीच, असं मी ठरवलं. कितीदातरी दुपारी, संध्याकाळी मी रंगमंदिराच्या रंगपटाशी उभी राहिले; आणि कितीदा ऑगस्टिन डालीला भेटण्यासाठी लिहून

आणलेलं विनंतिपत्र माझ्या नावानिशी आत पाठवलं – " डाली साहेब फारच कामात आहेत ... त्यांच्या असिस्टंट मॅनेजरनाप्रथम भेटा – " असंच उत्तर आलं दरवेळेला ... मीही प्रत्येक वेळी त्याला नकार दिला, आणि " एका अत्यंत महत्त्वाच्या कामासाठी मला डालीसाहेबांनाच भेटले पाहिजे, " असा आग्रह धरला. शेवटी एक दिवस अगदी सरत्या संध्याकाळी त्या बड्या प्रस्थाला सामोरं जायची मुभा मला देण्यात आली.

ऑगस्टिन डाली चांगलाच रूपवान् गृहस्थ होता ... पण अनोळखी नवख्या लोकांसमोर चेहऱ्यावर भलती उग्र कळा कशी आणावी, याचं तंत्र त्याला पूर्णपणे अवगत होतं ... मी खरं म्हणजे घाबरले होते चांगलीच, पण तरीही उरलं सुरलं धैर्य गोळा करून त्याच्यापुढे मी एक लांबलचक नि अजब व्याख्यान दिलंच !

" डालीसाहेब मी आपल्यापुढे एक विशाल कल्पना मांडणार आहे. माझी खात्री आहे, या कल्पनेचा खरोखर अर्थ जिला प्रतीत होईल, अशी आपल्यासारखी व्यक्ती या देशात दुसरी शोधून देखील सापडणार नाही ... मला ... मला नृत्याचा शोध लागला आहे ... दोन हजार वर्षं काळाच्या पडद्याआड दडून राहिलेल्या नृत्यकलेचा साक्षात्कार मला झाला आहे ... तुम्ही ... तुम्ही स्वतः रंगभूमीशी संबद्ध असे श्रेष्ठतम कलावंत आहात, पण तुमच्या कलाप्रदर्शनात एका गोष्टीची उणीव निखालस भासते; ती गोष्ट म्हणजे नृत्यकला ... शोकांतिक समूहगान ... ग्रीक रंगभूमीच्या महत्तेचं रहस्य ज्यात सामावलेलं आहे, तो 'ट्रॅजिक कोरस' ! या न्यूनामुळे मला तुमची कला पांगळी वाटते ... माथं असावं, धडही असावं आणि त्यांना सावरणारे पाय मात्र नसावेत, तशी ... पण नृत्याची ही उणीव मी भरून काढू शकेन ... या युगाचं अंतर्बाह्य परिवर्तन घडवणारी एक क्रांतिकारी कल्पना मी आपल्यापुढे मांडणार आहे ... ही कल्पना मला कशी सुचली, हा अस्सल नृत्याचा साक्षात्कार मला कुणी घडवला, असं विचाराल, तर मी म्हणेन, प्रशांत सागरानं ! ... प्रशांत सागरानं, तसंच सिरानेव्हाडाच्या जंगलातल्या हलत्या डोलत्या सूचिपर्ण वृक्षांनी ... रॉकी पर्वताच्या माथ्यावर रंगलेलं अमेरिकेच्या सुधड यौवनाचं नृत्य माझ्या डोळ्यांनी टिपलं आहे ...

वॉल्ट व्हिटमन आपल्या राष्ट्रातला सर्वश्रेष्ठ कवी आहे ... आणि अशा या कविराजाच्या कवितेला साजेसं नृत्य मी साकार केलं आहे ... मी मुळी वॉल्ट व्हिटमनची मानसकन्याच आहे, असं का म्हणानात ! अमेरिकेतल्या किशोरांना अमेरिकेचं मनोगत ज्यातून पुरंपुरं व्यक्त करता येईल असाच माझ्या नव्या नृत्याचा पिंड असेल ... घाट असेल. ज्याच्या अभावी तुमची रंगभूमी चेतन्यहीन दिसते, अन् ज्याला तुमच्या रंगभूमीनं अजून ओळखलाच नाही, तो नृत्यकाराचा आत्मा, ते नृत्यकलेचं मर्म, माझ्या स्वरूपात तुमच्यापुढं उभं आहे ...

कारण ... कारण ..."

मधेमधे बोलून मला थांबवू पाहणाऱ्या ("पुरे पुरे—बस् ... पुष्कळ झालं—खूप झालं अगदी! ...") व्यवस्थापकाच्या अधिरतेकडे शक्य तेवढा कानाडोळा करून मी माझं घोडं पुढं दामटलंच!

"कारण तुम्ही जाणताच की" ... मी आणखीनच आवाज चढवून म्हणाले, "रंगभूमीचं, नाट्यकलेचं मूळच मुळी 'नृत्य' आहे. रंगभूमीचा—नाट्याचा जन्म नृत्यातूनच झाला ... आदिनट तरी दुसरा कोण होता? नर्तकच! तो नाचायचा आणि गायचा; ग्रीक शोकांतिकेची गंगोत्री देखील हीच! ... तेव्हा जोपर्यंत ह्या आदिनटनर्तकाच्या उत्स्फूर्त कलेचं समग्र दर्शन रंगभूमीला होत नाही, तोपर्यंत तिला तिच्या आत्म्याचा खरा शोध लागणारच नाही!"

एक हडकुळी, विक्षिप्त, जगावेगळी मुलगी आणि आपल्यासारख्याच्या समोर असं कंटाळवाणं वक्तव्य करण्याचं धाडस करते, हे पाहून डालीची मती गुंगच झाली! तो आपलं एवढंच म्हणाला, "—एका मूक नाट्यात एक छोटीशी भूमिका आहे. हे मूकनाट्य न्यूयॉर्कमध्ये रंगभूमीवर यायचं येणार आहे. एक ऑक्टोबरला तालमीसाठी तू हजर हो—योग्य वाटलं, जुळण्यासारखं असलं तर तुला कामा मिळेल ... काय नाव तुझं?"

"इझाडोरा." ... मी.

"इझाडोरा ... नाव तर छान आहे. बरं मग, न्यूयॉर्कमध्ये ऑक्टोबरच्या पहिल्या तारखेला भेटू."

मोठ्या आनंदानं धांवत पळत मी घरी गेले आईकडे, आणि म्हटलं ...

"माझं महत्त्व जाणणारा एक तरी माणूस भेटला म्हणायचा एकदाचा! त्या बड्या ऑगस्टीन डालीनं मला कामावर ठेवलं आहे, आहेस कुठे? ऑक्टोबरच्या पहिल्या तारखेला आपण न्यूयॉर्कला पोहोचायलाच हवं!"

ते खरं, पण आगगाडीच्या तिकिटांच्या पैशाची व्यवस्था काय? आता ही एक विवंचनाच होती ... इतक्यात माझ्या डोक्यात एक कल्पना उगवली.... सॅनफ्रॅन्सिस्कोतल्या एका स्नेह्यांना मी तार पाठवली ... 'झकास नोकरी ... ऑगस्टिन डाली ... एक ऑक्टोबरला न्यूयॉर्कला पोहोचणं अत्यावश्यक ... प्रवास खर्चासाठी शंभर डॉलर्स पाठवावेत.'

आश्चर्य असं की ते 'अघटित' घडलं! पैसे तर आलेच, आणि ठरल्याप्रमाणे मी नशीब काढलं, असं धरून पैशाबरोबर माझी बहीण एलिझबेथ नि भाऊ ऑगस्टिनसुद्धा! ...

आम्ही न्यूयॉर्कच्या गाडीत तर एकदाचे बसलो. सर्वच्या सर्व चौघेजण ... उराशी मोठ्या आशा आकांक्षा ... अपेक्षा ... आणि उत्साहाचं एक उत्कट

उद्याग! "आता तरी जगाचं लक्ष माझ्याकडे वळेल"... मी मनाशी म्हणत होते... ते जगाचं लक्ष खेचून घेण्यापूर्वी किती यातना, आणि थकवून टाकणाऱ्या किती प्रसंगांचे, नि घटनांचे अडथळे ओलांडायचं नशिबात होतं, हे आधी कळतं, तर माझं धैर्य खचलंच असतं!

माझ्या विरहाच्या कल्पनेनं इव्हान मिरोस्कीला पराकोटीचं दुःख झालं होतं... पण मग आम्ही अचल निष्ठेच्या शपथा घेतल्या! न्यूयॉर्कला जाण्यानं एकदा दैव उघडलं, म्हणजे उभयतांना लग्न करणं कसं सहज शक्य होईल, तेही मी त्याला समजावून सांगितलं ... माझी 'विवाह' संस्कारावर श्रद्धा अशी नव्हतीच; पण आईला बरं वाटावं म्हणून विवाह करावाच लागेल, असं मला वाटत होतं... मुक्त, अनिर्बंध प्रेमाखातर मी पुढे बंडखोरी पत्करली, पण तसं शस्त्र उगारून उभी राहण्याची ताकद एव्हांना माझ्या ठायी आली नव्हती...

४

प्रथमदर्शनी न्यूयॉर्क हे शहर शिकागोपेक्षा कितीतरी सुन्दर वाटलं मला; आणि त्यात पुनः सागराचं सान्निध्य! समुद्रकिनाऱ्यापासून दूर असलेल्या शहरात माझ्या जिवाला नेहमीच कोंडल्या कोंडल्यासारखं वाटत आलं आहे!......

सहाव्या हमरस्त्यालगतच्या छोट्या गल्यांपैकी एका गल्लीतल्या लॉजमध्ये आम्ही मुक्काम ठोकला. इथेसुद्धा माणसांचा अगदी अजब चित्रविचित्र मेळावा होता. शिकागोतल्या बोहिमियन लोकाप्रमाणे याही साऱ्या लोकांच्यात केवळ एकाच गोष्टीचं साम्य आढळून आलं!...कुणालाही भाडं द्यायची ऐपत नव्हती! तेव्हा बाहेर ढकललं जाणं न जाणं यांच्या सीमारेषेवरच त्यांचा मुक्काम असायचा!

...मग एक दिवस सकाळीं डालीच्या रंगमंदिराच्या रंगपटाच्या दाराशी मी माझी हजेरी लावली, आणि पुनः एकदा त्या बड्या माणसासमोर उभी राहिले! माझ्या सर्व कल्पना त्याच्या कानावर आणखी एकदा घालण्याची माझी इच्छा होती; पण तो गृहस्थ फारच घाईगर्दीत नि कसल्या तरी विवंचनेत व्यग्र असल्यासारखा भासला.

" मूकाभिनयात अत्यंत पारंगत असलेल्या जेन मे या नटीला पॅरिसहून मी आणलंय्. तुला मूकाभिनय येत असेल, तर तुझ्या योग्य एक भूमिका त्यात आहे. "

खरं म्हणजे मूकाभिनयाला मी 'कला' मानायला तयारच नाही. हालचाल, अंगविक्षेप म्हणजे एक प्रकारचा ललितरम्य नि भावगर्भ आत्माविष्कार असतो हें तर खरंच;...पण खरोखर 'शब्दा'शी म्हणाल तर त्याचा सुतराम् संबंध नाही!

असं असूनही मूकाभिनयात आंगिक हालचालींनी मुळी शब्दांचीच जागा घेतलेली असते, असं दिसून येतं ! याचा परिणाम एवढाच होतो, की नाट्यकला एका बाजूला राहते, नृत्य दुसऱ्या बाजूला राहतं, आणि मूकाभिनयाची कला त्रिशंकू सारखी मध्येच लोंबकळत राहते... निष्फळ, वांझोटी ठरते...

माझं खाजगी मत काही का असेना, इथलं हें काम स्वीकारण्याखेरीज मला गत्यंतरच नव्हतं ! तेव्हा मी ते हस्तलिखित घरी घेऊन गेले, जरा चाळून अभ्यासून पाहण्यासाठी...पण तो सारा प्रकार इतका बाष्कळ वाटत होता मला...काही विचारायला नको ! माझ्या ध्येयाला आणि महत्त्वाकांक्षेला तर यात स्पर्शसुद्धा होत नव्हता... पण करणार काय ?

पहिली तालीम हाच मुळी भयंकर स्वप्नभंग ठरला ! जेन मे ही लहान चणीची पण भलतीच तापट बाई ! जरा एवढसं काही इकडेतिकडे व्हायचा अवकाश, तिच्या रागाचा स्फोट झाला नाही, असं व्हायचंच नाही.

'तू' म्हणताना दरवेळेला त्या बाईकडे बोट करायचं; 'प्रेम' या अर्थी हृदयावर हात दाबून धरायचा; 'मी' म्हणायचं तर छातीवर धाडकन् मारून घ्यायचं,—असले हे मला मिळणारे मूकनाट्याचे पाठ फारच खुळचट वाटले मला; आणि तसल्या त्या खुळचटपणात काही रस नसल्यानं मी इतका रद्दी अभिनय केला की जेन मे उखडलीच ! डालीसाहेबाकडे वळून तिनं त्याची खात्री पटवून दिली, की माझ्यात बिलकूल दम नाही ! ती भूमिका पार पाडणं मला अशक्य आहे...तें 'निकाली' भाषण ऐकता ऐकताच मी भानावर आले. हे काम हातचं गमावलं, तर आमच्या त्या भयंकर मालकीणबाईच्या निवासामध्ये निवारा घेण्याची धडगतच नव्हती आमची, ह्याची जाणीव जागी झाली. आदल्याच दिवशी समूहगायिका म्हणून काम करणाऱ्या एका लहान मुलीला, तिची ट्रंक ठेवून घेऊन घर-मालकिणीनं कसं निष्ठुरपणे रस्त्यावर काढलं होतं, ते ताजं चित्र माझ्या मनःचक्षूसमोर एकदम तरळलं... माझ्या आईनं शिकागोत सोसलेल्या हालअपेष्टांच्या आठवणींनीदेखील मनाला एकाएकी दंश केला... आणि डोळ्यात तरारलेलं पाणी खळकन् निखळून गालावरून ओघळलं!... बहुधा माझा तो दीनवाणा दुःखी चेहरा पाहिल्यानंच की काय डालीसाहेबानं आपला मोहरा जरा बदलला... त्याच्या डोळ्यांत थोडी फार सहानुभूती डोकावू लागली. माझ्या खांद्यावर थोपटून तो जेन मे ला म्हणाला...

"शिकेल ती हळूहळू... निदान आसवं गाळताना तरी तिचा चेहरा किती बोलका वाटतोय..."

पण या तालमीच्या दिव्यांतून जाणं म्हणजे माझ्या लेखी 'हौतात्म्य'च होतं ! मला करायला सांगितलेले अंगविक्षेप माझ्या मते अगदी निरर्थक नि बाष्कळ-

पणाचे होते; आणि पार्श्वसंगीताशी तर त्यांचा बिलकूल मेळ बसत नव्हता... पण यौवनाला परिस्थितीशी मिळतंजुळतं घेणं फारसं अवघड जात नाही हेच खरं! कारण मीही ह्या माझ्या भूमिकेत हळूहळू चपखल बसून गेले!

जेन मे कडे 'पीरो'ची भूमिका होती, आणि एका प्रवेशात माझ्यावर या पीरोवर प्रेम करण्याचा प्रसंग होता. लयीच्या तीन वेगवेगळ्या मात्राखंडांत मी पीरोच्या जवळ जायचं, आणि तिनदा तिच्या गालाचं चुंबन घ्यायचं...हा अभिनय करताना रंगीत तालमीच्या वेळी मी अशी काही जोषात आले, की माझ्या लाल ओठांचे छाप पीरोच्या गोऱ्या गालावर चांगले स्पष्ट उमटून गेले! मग काय! पाहता पाहता 'पीरो'ची 'जेन मे' झाली, आणि संताप संताप होऊन तिनं माझे कान धरून पिळले! रंगभूमीवरचं माझं पहिलं पदार्पण, पाहिलं, किती सुन्दर साजरं झालं ते?

याही परिस्थितीत जसजसा तालमींना वेग आला, तसतशी जेन मे च्या भावगर्भ मूकाभिनयातली अतर्क्य संवेदनशीलता पाहून, माझं मन तिच्याबद्दलच्या कौतुकानं भारून गेल्याखेरीज राहिलं नाही! मूकनाट्याच्या क्षुद्र नि पोकळ कलाप्रकारात बंदिस्त होऊन पडली नसती, तर ती एक फार मोठी नर्तकी झाली असती खास!

मूकाभिनयाचं क्षेत्र त्या मानानं किती तरी संकुचित–कित्येकदा तर मूकाभिनय पाहताना कलावन्तांना मला विचारावंसं वाटे, की तुम्हाला बोलायचंच आहे, सांगायचं आहे काहीतरी, तर सरळ बोलत का नाही तुम्ही आपल्या तोंडानं? एखाद्या मुक्याबहिऱ्यांच्या निवासात असल्यासारखे, न बोलता हातवारे करण्याचा त्रास कशाला घेता?

...पहिल्या प्रयोगाची रात्र येऊन ठेपली. माझा वेष म्हणजे 'दीरेक्त्वार' छाप निळा रेशमी पेहेराव, भुऱ्या केसांचा टोप आणि एक भली मोठी गवती हॅट–अरेरे! नृत्यक्षेत्रातल्या क्रान्तीची उद्गात्री म्हणून जन्म घेतलेल्या माझ्या सारख्या कलावतीची कोण ही विटंबना! त्या पोशाखात मी मुळी 'मी' नव्हतेच ...पोशाखाच्या थडग्यात मी जणू जिवंत गाडली गेले होते...माझी आई, अगदी पहिल्या रांगेत बसली होती–तीही गोंधळूनच गेलेली दिसली–माझं ध्यान पाहून! पण तरीही त्या बिचारीनं सॅनफ्रॅन्सिस्कोला परतण्याबद्दल एक अक्षरही काढलं नाही तोंडांतून–तिची भयंकर निराशा झाल्याचं मात्र मला चांगलंच जाणवलं... अपरिमित कष्टांचा एवढा डोंगर पोखरला तो हा 'मूक' मूषक हाती लागावा म्हणूनच कां?...

मूकनाट्याच्या या तालमी सुरू होत्या, तेव्हाही आम्ही खंकच होतो सारे...त्यामुळे साहजिकच लॉजमधून आमची हकालपट्टी झाली अन् एकशे-

ऐंशीव्या रस्त्यावरच्या दोन खोल्यांच्या ओक्याबोक्या जागेत आम्ही रहायला गेलो. बसच्या तिकिटाएवढेही पैसे जवळ नसल्यानं ऑगस्टीन डालीच्या एकोणतिसाव्या रस्त्यापर्यंत मला पायपीटच करावी लागायची कित्येकदा. मग धुळीतून गदळींतून पळायचं...फुटपाथवरून उड्या मारीत जायचं आणि लाकडा-ओंडक्यावरून चालायचं...कुणीकडून तरी पायाखालची वाट लवकर संपल्यासारखी वाटावी, एवढंच! अनेक युक्त्याप्रयुक्त्या शोधून काढून माझं मी एक तन्त्रच बनवलं होतं वाट संपवायचं!...तालमीच्या मधल्या सुटीत, पैसे नसल्यानं दुपारचं खाणंपिणं करण्याचा प्रश्नच उद्‌भवत नव्हता!...तेव्हा मग रंगमंचाच्या बॅक्समध्ये मी लपून बसायची, अन् थकव्यानं झोपून जायची. न्याहारीच्या सुट्टीनंतर माझ्या पोटातल्या कावळ्यांच्या आक्रोशाच्या सुरावर दुपारच्या तालमी पुन्हा सुरू व्हायच्या. सहा आठवडे हीच वहिवाट!... कारण मूकनाट्याचे आठवडाभराचे प्रयोग होऊन जाईपर्यंत माझ्या हातात एक दिडकी देखील पडली नव्हती...

न्यूयॉर्कमध्ये तीन आठवडे प्रयोग केल्यानंतर कंपनी 'एक शहर-एक रात्र'-या हिशेबानं दौऱ्यावर निघाली.

आठवड्याला मला सर्व धरून एकंदर पंधरा डॉलर मिळायचे, त्यातून माझा खर्च भागवून, निम्मे मी आईला पाठवायची—कसातरी तिचा निर्वाह चालावा म्हणून. एखाद्या स्टेशनवर उतरलं की आपलं सामान उचलून पायी चालायला लागायचं...होटेलमध्ये जाणं शक्यच नव्हतं—परवडण्यासारखं एकादं स्वस्त लॉजिंग-बोर्डिंग हुडकायला निघायचं. खाणंपिणं, वगैरे सर्व धरून दिवसाला पन्नास सेंट ही माझी खर्चाची कमाल मर्यादा होती! त्यामुळे पुष्कळदा असा स्वस्त निवारा लाभेपर्यन्त अनेक मैलांची शिणलेली वाट तुडवावी लागे...कधी कधी या स्वस्ताईच्या शोधात मी भलत्याच एखाद्या संशयास्पद वस्तीत येऊन धडकायची!

एक प्रसंग तर मला अगदी ठळकपणे आठवतो—एका लॉजमधल्या खोलीला कुलपाची मुळी सोयच नव्हती, आणि तिथली बहुतेक सर्व पुरुषमाणसं दारूनं तर्र होऊन माझ्या खोलीत शिरण्याचा प्रयत्न करीत होती...मी भयंकर घाबरले... मग खोलीतलं कपड्यांचं भलंमोठं कपाट सरकवत ढकलत ओढून आणून दाराशी ठेवलं, आणि दार न उघडलं जाण्याचा पक्का बंदोबस्त केला...इतकं करूनही झोप कशी ती लागेना—मी आपली माझीच रखवाली करीत रात्रभर बिछान्यावर बसून राहिले...दौरे करत गावोगाव हिंडणाऱ्या रंगमंडळीच्या जीवनासारखं शापित जीवन इतर कुणाच्याही वाटेला येत नसेल मला वाटतं!

जेन मेला थकवा कसा तो माहीतच नव्हता...तिला दररोज तालीम हवीच असायची; नि दुसऱ्या कुणाचं काही पसंत पडायचं नाही.

माझ्याजवळ काही पुस्तकं होती...माझं वाचन अखंड चालू असे...इव्हान मिरोस्कीला मी दररोज एक लांबलचक पत्र लिहीत असे...अर्थात आतल्या आत मी किती खिन्न होते, याचा थांगपत्ता त्याला लागू दिला नव्हता मात्र मी पत्रांत.

दोन महिन्यांच्या अशा दौऱ्यानंतर मंडळी न्यूयॉर्कला परतली. व्यावहारिक दृष्टीनं पाहिलं, तर हा सारा कारभार अंगाशीच आला होता डालीसाहेबाच्या — आणि त्यामुळे त्याला चांगलाच हादरा बसला; आणि जेन मेला तर पॅरिसला परत जावं लागलं.

इकडे मला काळजी, माझं कसं होणार ! मी डालीला पुनः भेटले...आणि माझ्या कलाकल्पनांच्या साहाय्यानं त्याच्यावर छाप पाडायचा आणखी एक प्रयत्न करून पाहिला...डालीसाहेब आपला बहिऱ्यासारखा थंड आणि निर्विकार ! त्याला माझ्या कलेचं, कल्पनांचं, कशाकशाचंच काही सोयरसुतक नव्हतं !

" 'मिड समरनाईटस् ड्रीम' ( ग्रीष्मशर्वरीचे स्वप्न ) हे नाटक घेऊन एक संच मी बाहेर दौऱ्यावर पाठवतोय् — तुला हवं असेल तर पऱ्यांच्या नृत्याच्या प्रवेशात तू नृत्य कर "— डाली म्हणाला.

मानवी जाणिवा आणि भावभावना व्यक्त करण्याचं एक प्रभावी माध्यम म्हणजे नृत्य, अशी माझी धारणा ! पऱ्यांशी माझं काय काम होतं ? काय संबंध होता ?...पण मी होकार दिला आणि टिटानिया आणि ओबेरॉन ह्या पात्रांच्या प्रवेशाआधी रानातल्या प्रवेशात मेन्डेलझोनच्या शेर्झोच्या संगीतावर मला नाचायला मिळावं, असंही सुचवलं !

'मिड समर नाईटस् ड्रीम' चे प्रयोग लागले...एक शुभ्र नि सोनेरी जाळीचा सरळसोट कुडता, नि त्याला जोडलेले हलके पऱ्याचे चमकते पंख — हा माझा वेष होता ! "पंख नको" म्हणून मी खूप तक्रार केली...कारण माझ्या मते ते अगदी विचित्र दिसत होते. डालीसाहेबाला मी किती समजावलं की कागदाभेंडांचे पंख लावल्याशिवाय मी पंखांचा भास माझ्या हालचालींतून सहज निर्माण करू शकेन— पण छे ! त्याची समजूत काही पटे ना...पहिल्या रात्री मी एकटीच नृत्य करायला रंगमंचावर आले. मनातून मी अगदी आनंदून गेले होते. इतक्या धडपडीनंतर अखेर मी एका विशाल रंगमंचावर, प्रेक्षकांच्या विशाल समुदायापुढे नृत्य करणार होते ! — एकटी — एकटी नाचणार होते...आणि नाचलेच अशा हुरूपानं, की प्रेक्षकांनी उत्स्फूर्तपणे टाळ्यांचा कडकडाट करून मला उत्तेजनपूर्वक प्रतिसाद दिला ! 'फड जिंकला' म्हणतात, तसा आज मी 'मंच' जिंकला होता !

...विंगमध्ये परतले, ती डालीसाहेबाच्या खुषीची अपेक्षा करतच !... त्याचं अभिनंदन स्वीकारायच्या तयारीनंच... पण झाला तो प्रकार उलटाच ! तो भयंकर संतापलेला दिसत होता...

"ही काही संगीतसभा नाही की नृत्यमैफली गाजवण्याचा मंडप नाही"— तो कडाडला...प्रेक्षकांनी माझ्या या नृत्याला उचलून धरावं, याचा अर्थच त्याला कळेना!...दुसऱ्या प्रयोगाच्या रात्री मी रंगमंचावर पाऊल ठेवलं, तेव्हा बहुतेक सर्व दिवे विझवून अंधारच केलेला आढळून आला!... तिथून पुढे त्या नाटकांत जितक्यांदा मी नाचले, तितक्यांदा रंगमंचावर संपूर्ण अंधार होता! एका शुभ्र-धूसर आकृतीचं इतस्ततः फडफडणं सोडलं, तर त्या काळोखात प्रेक्षकांना आणखी काहीही दिसणं शक्य नव्हतं!...

न्यूयॉर्कमधले दोन आठवडे सरताच ही 'ग्रीष्मशर्वरी' देखील गावोगावांच्या दौऱ्यावर गेली, नि पुनः रूक्ष कंटाळवाण्या प्रवासाच्या, नि स्वस्त निवारा शोधण्याच्या चक्रात मी सापडले...एकच दिलासा होता – माझा पगार आठवड्याला पंधरा डॉलर्स ऐवजी आता पंचवीस डॉलर्स झाला होता.

...असंच एक वर्ष गेलं पाहता पाहता...

माझ्या मनातली व्यथा वाढत होती...माझी स्वप्नं, माझं ध्येय, माझी महत्त्वाकांक्षा,...कशालाच काही अर्थ नव्हता...कशाचा काही उपयोग नव्हता! ...कंपनीत फारच थोड्यांशी माझी मैत्री होती...साऱ्यांना माझं वागणं विचित्रच वाटायचं...मार्कस् ऑरेलियसचं पुस्तक घेऊन पडद्यापाठीमागे मी येरझारा घालत राहायची. मला रात्रंदिवस अस्वस्थ करणारी माझी मनोवेदना कमी व्हावी, म्हणून मी एक तत्त्वज्ञान बनवलं होतं माझ्यापुरतं...

या सफरीत मॉड विंटर नावाच्या एका मुलीशी मात्र माझी मैत्री झाली – ती राणी टिटानियाचं काम करायची...भारी गोड स्वभाव होता तिचा. माझ्याबद्दल तिच्या मनात सहानुभूती होती...तिला एक मजेदार वेड होतं...संत्री खाण्याचं! इतर काही नकोच असायचं. फक्त संत्री! मला वाटतं ती चुकूनच या जगात जन्माला आली असणार...कारण पुढे काही वर्षातच रक्तक्षयाची असाध्य बाधा होऊन ती मृत्यू पावल्याचं मी वाचलं!

...ऑगस्टिन डालीच्या कंपनीचं मुख्य आकर्षण म्हणजे ॲडा रेहान– ती एक महान् अभिनेत्री होती...शंकाच नाही; पण स्वतःच्या हाताखालच्या लोकांच्याबद्दल तिला बिलकूल सहानुभाव नव्हता. त्यामुळे कंपनीतल्या माझ्या वास्तव्यात तिचा अभिनय कधी कधी पहायला मिळणं हाच माझ्या लेखी एकमेव आनंदाचा विषय होता.

दौऱ्यावर जाणाऱ्या नटसंचात ॲडा क्वचितच असायची, पण दौऱ्यावरून मी न्यूयॉर्कला परतले की तिच्या 'रोझालिंड', 'बिआत्रिस' आणि 'पोर्शिया' या भूमिका पुष्कळदा पहायला मिळायच्या मला. ॲडा रेहान जगातल्या श्रेष्ठ नटींपैकी एक होती, यात वादच नाही; पण कंपनीतल्या लोकांना आपली माया लागेल, असं

एरवीच्या आयुष्यात आपण वागावं—असा विचारही या समृद्ध कलावतीच्या मनाला कधी शिवला नाही. एक नंबरची गर्विष्ठ आणि आत्मकेंद्रित वृत्तीची, इतर कुणात न मिसळणारी, अशी व्यक्ति होती ती. आम्हाला जाता येता, "काय, कसं काय?" वगैरे म्हणणं, किंवा सकाळसंध्याकाळी अभिवादन केलं तर त्याला प्रतिसाद देणं, हेही बहुधा तिला फार त्रासाचं वाटत असावं; कारण एक दिवस 'नाटकमंडळींपैकी कुणीही कु. रेहान यांना अभिवादन करण्याची जरूर नाही, असे जाहीर करण्यात येत आहे'—अशी सूचना विंगेला चिकटवलेली दिसली!

...पुरी दोन वर्षं मी डालीच्या कंपनीत काढली, पण त्या अवधीत ॲडा रेहानशी बोलण्याचं सुख काही मला एकदाही लाभलं नाही. कंपनीतल्या कनिष्ठ कर्मचाऱ्यांची दखल घेणं, म्हणजे तिला भलतंच कमीपणाचं वाटत असावं, हे उघड होतं. इतर पात्रांची मांडामांड—त्यांच्या उभं राहण्याच्या जागेत फेरफार, इत्यादि करण्याच्या नादात एकदा डालीनं रेहानला बरंच ताटकळवल्याचं मला आठवतं...ती पट्ठी आम्हा सर्वांकडे हेटाळणीनं बोट दाखवून उद्गारली, "या सामान्य माणसांसाठी तुम्ही माझा खोळंबा करता? कमाल आहे तुमची!" (मी त्या सामान्यांपैकी एक असल्यानं मला तो उल्लेख अजिबात रुचला नाही!)

ॲडा रेहान सारख्या आकर्षक व्यक्तिमत्वाच्या नि अभिनयकुशल कलावती-च्या हातून अशी चूक कशी झाली, हे मला एक कोडंच वाटतं. त्याचं केवळ एकच कारण असू शकेल...त्यावेळेला ॲडा पन्नाशीला आलेली होती...ऑग-स्टीन डालीचे आणि तिचे कितीतरी वर्षांचे जुने प्रेमसंबंध होते; पण पुढे पुढे काळ बदलायला लागला...डालीच्या कंपनीतल्या एखाद्या रूपवान् मुलीला कारणाशिवाय एकदम बढती मिळून दोन किंवा तीन आठवड्यांपुरता—किंवा दोन तीन महिन्यांपुरता—मुख्य भूमिकेचा मान मिळायला लागला! या एकाएकी घडणाऱ्या बदलाला तसं वरवर पाहणाऱ्याला तत्कालिक कारण सापडलं नसतं, पण ते रेहानला सापडलं असावं...आणि म्हणून रेहानला विषाद वाटत असावा! म्हणूनच तिचा त्याला विरोध असावा...काय कोण जाणे!...

एक मान्यवर कलावती म्हणून मी ॲडा रेहानला खूपच मानत होते. ती वेळ अशी होती, की तिच्याकडून मला थोडं जरी उत्तेजन मिळालं असतं, तरी त्यावेळी मला त्याचा कितीतरी उपयोग झाला असता...पण तिनं त्या सबंध दोन वर्षांत माझ्याकडं कधी ढुंकूनही पाहिलं नाही...टेंपेस्ट नाटकात, मिरांडा आणि फर्डिनंड यांच्या विवाहाच्या पहिल्या रात्रीनिमित्त माझं नृत्य रंगमंचावर चालू होतं—तर ॲडा रेहाननं मुद्दाम दुसरीकडे मान वळवून माझं नृत्य नाही तर नाहीच पाहिलं, हे आजही मला अगदी स्पष्ट आठवतं...माझा विरस झाला...शरमेनं आणि अपमानानं नृत्य चालू ठेवणं मला अशक्य होऊन गेलं....

' मिड समर नाईटस् ड्रीम 'च्या दौऱ्याच्या आमच्या वेळापत्रकानुसार शेवटी आम्ही शिकागोतही येऊन पोहोचलो...माझ्या तथाकथित भावी वराला पाहून मी खूपच आनंदून गेले होतें....

आताही उन्हाळाच सुरू होता...जेव्हा जेव्हा तालमी नसत, तेव्हा तेव्हा पूर्वीसारखे आम्ही लांबलांब फिरायला, रानावनात सहलीला जात असूं...हळूहळू इव्हान मिरोस्कीच्या बुद्धिमत्तेचा प्रत्यय मला जास्त जास्त यायला लागला....आणि काही आठवड्यांनी मी न्यूयॉर्कला जायला निघाले, तेव्हा तर आम्ही ठरवूनच टाकलं, की, माझ्या मागोमाग त्यानं न्यूयॉर्क गाठायचं, आणि मग आम्ही तावड-तोब विवाहबद्ध व्हायचं. आमच्या या बेताचा सुगावा लागल्याबरोबर माझ्या भावानं जरा आणखी चौकशी केली, हे माझं सुदैव! कारण त्या चौकशीमुळे कळलं की मिरोस्की विवाहित होता!...त्याची बायको लंडनला होती! माझी आई या साऱ्या प्रकारानं हादरूनच गेली – आणि तिनं माझी नि मिरोस्कीची ताटातूट करण्याचाच चंग बांधला!

# ५

आता आमचं सबंध कुटुंब न्यूयॉर्कलाच आलं होतं – आम्हाला एक हॉल – जोडूनच स्वतंत्र न्हाणीघर असलेला – कसाबसा मिळाला – तोच आमचा स्टुडिओ झाला! नाचण्यासाठी मोकळी ऐसपैस जागा असावी – म्हणून तिथे काहीही फर्निचर ठेवायला मला नको होतं...मग आम्ही स्प्रिंगच्या पांच गाद्याच विकत आणल्या. सलग मोठे पडदे लावून स्टुडिओच्या भिंती पुऱ्या झाकून टाकल्यानं, दिवसा त्या गाद्या त्यांच्या कडांवर उभ्या करून ठेवायची व्यवस्था झाली. या गाद्यांवरच झोपायचं... वर पांघरायला रजई घ्यायची... बस्...पलंग, खाटा वगैरे काही नाही!

सॅनफ्रँसिस्कोमधल्यासारखे इथेही एलिझबेथनं नृत्याचे वर्ग सुरू केले. ऑगस्टिन एका नाटककंपनीत दाखल झाल्यानं क्वचितच घरी असायचा... त्याला बहुतेक वेळा फिरतीच असायची. रेमंडनं वृत्तपत्रव्यवसायात शिरायचं धाडस केलं होतं... स्टुडिओ वगैरे मिळून सारा खर्च भागवण्यासाठी, आमच्या कामाव्यतिरिक्त, वक्तृत्व, गायन-वादन, इत्यादी वर्गांसाठी सुद्धा आम्ही स्टुडिओ भाड्यानं देऊ लागलो... निराळे शिक्षक असायचे... आणि 'तासांचा' हिशोब असायचा...

हा हॉल तसा मोठा असला, तरी एकच होता... जोडून लहानशी खोली वगैरे काहीच नाही; त्यामुळे दुसरे वर्ग भरले की आमच्या कुटुंबातल्या सरसकट साऱ्यांना बाहेर फिरायला जाणं भागच पडायचं! कधी कधी बाहेर बर्फ पडत असताना, अंगातली ऊब कशीतरी टिकवून धरण्याच्या प्रयत्नात सेंट्रल पार्कच्या बाजूनं रखडत चालल्याचं मला अजूनही आठवतं... मग एकदाची वर गाठण्याची वेळ यायची... आत काही चालू असेल, तर दाराशीच उभ्यानं कान द्यायचा!

वक्तृत्वाचे पाठ देणारा शिक्षक दररोज तीच कविता शिकवायचा, मला वाटतं!

"मेबल, लिटल् मेबल् बुइथ हर फेस अगेन्स्ट द पेन"... (मेबल्, तावदानाला चेहरा लावून बसलेली छोटी मेबल्) ही कविता अगदी भारावलेल्या आणि कारुण्यानं ओथंबलेल्या आवाजात त्या शिक्षकानं पुन्हा पुन्हा म्हणायची ... ते सारंच पठन भारी कृत्रिम वाटायचं... शिक्षकाच्या पाठोपाठ त्यांचा विद्यार्थी निखालस निर्विकार आवाजात त्या ओळी वाचून काढायचा!... शिक्षक हताशपणे विचारायचा, "पण यातलं कारुण्य तुला प्रतीतच होत नाही का? आत आत तुला ते जाणवत सुद्धा नाही का नुसतं?"...

या सुमाराला ऑगस्टिन डालीच्या डोक्यात रंगभूमीवर 'गीशा' (: जपानी कलावंतीण) सादर करण्याची कल्पना आली. त्यात त्यानं मला एका चौरंगी समूहगायनात भाग घ्यायला लावला. खरं म्हणजे माझ्या उभ्या आयुष्यात माझ्या गळ्याला एक देखील सूर शिवला नव्हता—अर्थात् मी बरोबर म्हणायला लागले की, माझ्यामुळे सगळ्यांचाच सूर बसरतो, अशी बाकीच्या तिघींची तक्रार असायची...मी त्याला एक खासा उपाय शोधून काढला! तोंड उघडं ठेवून अगदी गोड चेहऱ्यानं मी उभी रहायची त्यांच्यात—मात्र चुकून सुद्धा तोंडातून आवाज म्हणून काढायचा नाही. आई म्हणायची, "गाणं म्हणताना या इतर तिघी इतकी भयंकर तोंडं करताहेत, पण इसाडोराच्या चेहऱ्यावरचा गोडपणा मात्र बिलकूल ढळत नाही—कमाल आहे अगदी!"

ही रद्दी 'गीशा' म्हणजे ऑगस्टिन डालीच्या नि माझ्या ऋणानुबंधाची 'इतिश्रीच' ठरली! डालीनं मला एका बॉक्समध्ये खाली बसून रडताना पाहिल्याचं आठवतं...तो त्या अंधाऱ्या रंगमंदिरातून येत होता, खाली वाकून त्यानं माझ्या रडण्याचं कारण विचारलं. मी सरळ सांगून टाकलं, की त्यानं रंगभूमीवर जी काही भंकसगिरी चालवली होती, तिचा फोलपणा माझ्या सहनशक्तीपलीकडे होता! त्यावर, 'गीशा' बद्दल त्याचं मत काही माझ्यावेगळं नव्हतं, असं तो म्हणाला...पण आर्थिक बाजूकडे काही दुर्लक्ष करता येत नाही, व्यवसाय करणाऱ्याला, वगैरे वगैरे...आणि मग जणू काही माझं सांत्वन करण्यासाठी म्हणून त्यानं माझ्या पाठीवरून खाली माझ्या कपड्यांत हात सरकवायला सुरुवात केली ...मी चिडलेच त्यामुळे...

"प्रतिभेचं देणं लाभलेल्या माझ्यासारखींचा तुम्हाला योग्य तो उपयोग करून घेता येत नसेल, तर तुम्ही मला इथे ठेवून तरी कशाला घेतलंय्?" मी ठणकावलं!

डालीनं डोळे विस्फारून माझ्याकडे पाहिलं...आणि "हं!" असा उद्गार काढून तो तिथून निघून गेला!

डालीला पाहायची ती शेवटची वेळ... कारण पुढे थोड्याच दिवसांनी माझं

सारं धैर्य गोळा करून मी माझ्या नोकरीचा राजीनामा दिला ... आता मला नाटकाचा पुरेपूर उबग आला होता. तेच ते शब्द नि तेच ते हावभाव... रात्री-मागून रात्री तसेच ते ठराविक उच्चार नि साचेबंद आविष्कार... त्याच त्या कल्पना... जीवनाकडे पाहण्याचा त्यांचा तो विशिष्ट दृष्टिकोण... या सबंध चाकोरीची किळस माझ्या डोक्यात अगदी भिनून गेली होती !

...मी डालीकडून सुटले, ती सरळ 'कार्नेजी हॉल'मध्ये स्टुडिओत परतले... इथे नेहमीची पैशाची चणचण होतीच ! ते असो... पण पुन्हा एकदा मी तो छोटा शुभ्र ग्रीक कुडता अंगावर चढवला... आई पुन्हा पियानोशी बसली... दिवसा आमचा स्टुडिओ आम्हाला अगदी थोडाच वेळ वापरायला मिळायचा; तेव्हा माझी आई बिचारी पुष्कळदा सारी रात्र मला साथ करायची !

...एथेलबर्ट नेव्हिनच्या संगीतानं या सुमाराला मी अगदी भारून गेले होते. त्याच्या 'नार्सिसस', 'ऑफिलिया', 'वॉटरनिम्फस्', (जलपऱ्या) आणि इतर अशाच रचनांवर मी नृत्यं बसवली होती.

एक दिवस स्टुडिओमध्ये माझा नृत्याचा रियाज चाललेला असताना धाड्-दिशी दार उघडून एक तरुण आत घुसला. भडकलेले डोळे आणि माथ्यावर सुगीला आलेल्या पिकासारखे ताठ उभे केस !– गृहस्थ चांगलाच तरुण होता, पण ज्या व्याधीनं पुढे त्याला मृत्यू आला, त्या व्याधीच्या ग्रहणाची साक्ष मात्र त्याच्या ठायी आत्ताच स्पष्ट दिसत होती. तो झपाट्यानं माझ्याजवळ आला, आणि उद्गारला !

"माझ्या संगीताचा तू नृत्यासाठी वापर करतेस, असं माझ्या कानावर आलंय्... माझं संगीत, माझ्या रचना, या नृत्यासाठी नाहीत, सांगून ठेवतो ! त्याचा नृत्याशी कुणी मेळ घालणं मला बिलकूल खपायचं नाही !"

मी त्याचा हात धरून त्याला खुर्चीकडे नेलं हळूहळू.

"बसा इथे, " मी म्हटलं– "तुमच्या संगीताबरोबर मी तुम्हाला नाचून दाखवणार आहे; जर तुम्हाला खरोखरच ते आवडलं नाही, तर मी तुमच्या संगीताच्या वाटेला पुन्हा कधीही जाणार नाही...अगदी शपथपूर्वक सांगते हवं तर."

मग मी त्याची 'नार्सिसस' ही रचना नाचले त्याच्या समोर. ओढ्यात वाकून पाहता पाहता आपल्याच प्रतिबिंबाच्या प्रेमात सापडलेल्या नि विरहानं झुरून झुरून शेवटी काठच्या फुलात रूपान्तर पावलेल्या नार्सिससची व्यथा, या सार्थ स्वरमेळातून माझ्या कल्पनेला स्पष्टपणे जाणवत होती; तीच मी नेव्हिनसमोर नृत्यातून साकार केली...संगीताचे अखेरचे सूर वातावरणात अजून विरले देखील नव्हते, एवढ्यात नेव्हिन खुर्चीतून उडी मारून उठला, आणि धावत माझ्याजवळ

येऊन त्यानं मला दोन्ही हातानी कवळून धरलं. माझ्याकडे पाहता पाहता त्याच्या डोळ्यात अश्रू तरारले... "तू देवदूत आहेस कुणी...यक्ष, किन्नर, गंधर्व अप्सरांपैकी कुणी दैवी व्यक्ति आहेस तूं ! हेच, हेच गतिक्षेप माझ्या मनश्चक्षूंनी पाहिले होते. माझी रचना साक्षात् होत असताना हेच, असंच मला भावलं होतं ! "

त्यानंतर त्याची 'ऑफिलिया' आणि मग 'वॉटरनिम्फ्स' त्याच्यासमोर मी उभ्या केल्या...बघता बघता तो अधिकाधिक उत्सुक आणि मुग्ध होऊन गेला... आणि तिथल्या तिथे पियानोशी जाऊन माझ्यासाठीच त्यानं एक उत्स्फूर्त नृत्यसंगीत रचलं !...'ऋतुराज–वसंत' असं नाव होतं त्या रचनेचं. आजवर माझ्या मनात तीच एक खंत मूळ धरून आहे...की माझ्यासाठी 'ऋतुराज' हा स्वरबंध अनेकदा नेव्हिननं पियानोवर वाजवला, पण त्यानं तो लिपीबद्ध करायचं मात्र राहूनच गेलं !...

...नेव्हिन अगदी हरखूनच गेला होता; त्यामुळे कार्नेजी हॉलच्या छोट्या संगीतदालनात त्यानं आणि मी मिळून काही कार्यक्रम सादर करावेत, असं त्यानं लगेच सुचवलं... तो स्वतःच मला साथ करणार होता...

नेव्हिननं स्वतः जातीनं ह्या कार्यक्रमाची योजना केली. अनामत रक्कम वगैरे भरून हॉल ठरवला...आणि दररोज संध्याकाळीं तालमीसाठी तो आमच्याकडे यायला लागला. एथेलबर्ट नेव्हिनच्या व्यक्तिमत्त्वात श्रेष्ठ संगीतकाराला आवश्यक असे सारे गुण होते, असं मला नेहमीच वाटत आलं. असेरिकेचा 'शोपां' म्हणून एकाद्वेळी तो पुढे गाजलाही असता; पण परिस्थितीच्या क्रूर विळख्यात तो सापडला होता...देहाची कुडी नि प्राण यांचा मेळ अतूट ठेवण्याच्या प्राथमिक पण भयंकर धडपडीतच त्याला ती भीषण व्याधी जडली, नि अकाली मृत्यू आला !

...आमचा पहिला कार्यक्रम खूपच यशस्वी झाला, आणि त्यानंतरच्याही काही गाजलेल्या कार्यक्रमांच्यामुळे न्यूयॉर्कमध्ये अगदी खळबळ माजून राहिली. याचवेळीं, कार्यक्रमासाठी एकदा हुशार व्यवस्थापक गाठण्याएवढं व्यवहारी शहाणपण आमच्यात असतं, तर माझ्या यशस्वी व्यवसायाचा ओनामा त्या क्षणीच घडला असता...पण आम्ही कसले कमालीचे अन्नाडी !...तरया बऱ्याच शिष्ट नि श्रीमान् महिला आमच्या प्रेक्षकवर्गात होत्या...तेव्हा मला मिळालेल्या थोड्याफार यशामुळे न्यूयॉर्कच्या गर्भश्रीमंत दिवाणखान्यातून नृत्य करण्याची आमंत्रणं मला यायला लागली. फिट्झेराल्डनं अनुवादित केलेल्या उमर खय्यामच्या पुऱ्या काव्याचं नृत्यांकन मी त्यावेळी केलं होतं – माझ्या नृत्याच्या वेळीं कधी ऑगस्टिन तर कधी एलिझबेथ, त्या काव्याचं मोठ्यानं पठन करत असे....

...उन्हाळा जवळ येत चालला होता. श्रीमती ॲस्टरबाईंनी त्यांच्या न्यूपोर्टच्या अलिशान प्रासादात नाचण्यासाठी मला बोलावलं होतं. मी, आई आणि एलिझबेथ, यांना बरोबर घेऊन गेले. न्यूपोर्ट म्हणजे त्यावेळी एक अत्याधुनिक विश्रांतीस्थान समजलं जायचं. इंग्लंडची जशी महाराणी, तशीच अमेरिकेची ही ॲस्टरबाई नामक असामी होती! तिच्या पुढ्यात उभे राहणारे लोक राजघराण्यात कुणापुढे नसतील एवढे कमाल दबलेले नि भ्यालेले दिसत! पण माझ्याशी ती फार प्रेमानं वागायची. तिच्या त्या प्रासादाच्या परिसरातल्या हिरवळीवर हे नृत्यकार्यक्रम व्हायचे... आणि मग न्यूपोर्टमधल्या अगदी उच्चभ्रू मोजक्या समाजाच्या उपस्थितीत त्या हिरवळीवर माझं नृत्यप्रदर्शन व्हायचं...माझ्याकडे या प्रसंगी घेतलेलं एक छायाचित्रसुद्धा आहे...त्यांत ॲस्टरमहोदया हॅरी लर यांच्या शेजारी बसलेल्या आहेत – आणि व्हॅण्डरबिल्ट, बेल्मों, फिशेस वगैरे मंडळींच्या रांगांच्या रांगा आजूबाजूला दिसताहेत....

त्यानंतर मी न्यूपोर्टमधल्या इतर दिवाणखान्यातून देखील नाचले, परंतु या श्रीमन्त महिलांच्या पैशाच्या बटव्याचं तोंड एवढं आवळलेलं असे की, जाणंयेणं आणि जेवणखाण, एवढं सुद्धा आम्हाला मिळालेल्या 'मान' धनांतून निघायचं नाही! शिवाय माझं नृत्य त्या पाहायच्या, आणि त्याना ते फार आकर्षक वाटत होतं...वगैरे वगैरे सारं खरं असूनही मी नक्की काय करते, याची त्यांना किंचितशी-देखील समज नव्हती; त्यामुळे न्यूपोर्टची वारी एकंदरित निराशाजनकच ठरली!

ही सर्व मंडळी इतकी शिष्ट होती, स्वत:भोवतीच्या श्रीमंतीच्या वलयामुळं स्वत:त इतकी मग्न होती, की कलात्मकतेचा स्पर्शही त्यांना होणं शक्य नव्हतं ...त्या काळी सामाजिक संदर्भात 'कलावंत' हीनच समजला जायचा...सर्व-साधारण सेवकवर्गापेक्षा जरा वरच्या दर्जाचा, पण अखेर सेवकच जणू! आता तो काळ, आणि ती भावना पार बदलून गेली आहे म्हणा...विशेषत: पॅडरेव्स्की एका संघराज्याचा पंतप्रधान झाल्यापासून!

कॅलिफोर्नियात असताना तिथल्या जीवनाचा कंटाळा येऊन मी न्यूयॉर्कला आले; आता न्यूयॉर्कलाही मला चैन पडेना...तिथल्यापेक्षा मनमोकळ्या, कला-प्रेरक वातावरणाचा शोध घेण्याची दुर्दम्य इच्छा माझ्या मनात उद्भवली– माझा मनोरथ लंडनच्या दिशेनं धावू लागला! कोणकोण लेखक नि चित्रकार मला तिथे भेटतील, याची स्वप्नं मी रंगवू लागले. जॉर्ज मेरेडिथ, हेन्री जेम्स, वॉटस, स्विन-बर्न, बर्नजोन्स, व्हिसलर...साऱ्या नावांच्या उच्चारणात देखील जादुगिरी होती! खरं सांगायचं तर, न्यूयॉर्कमधल्या माझ्या सबंध वास्तव्यात बुद्धिनिष्ठ सहानुभूती किंवा माझ्या कल्पनांच्या बाबतीत मिळालेलं समजदार सहाय्य, असलं काही माझ्या अनुभवाला आलंच नाही कधी!...

इकडे एलिझबेथची नृत्यशाळा मात्र भरभराटीला आली होती...कार्नेजी हॉलमधला स्टुडिओ सोडून आम्ही 'विंडसर' होटेलच्या तळमजल्यावरच्या मोठ्या दोन खोल्यांत आलो होतो. ह्या खोल्यांचं भाडं आठवड्याला नव्वद डॉलर्स होतं...तेव्हा नृत्य वर्गाची जमा होणारी फी, हे भाडं नि आमचा इतर खर्च, यांचा मेळ बसणं शक्य नाही, हे लगेचच लक्षात आलं. खरं सांगायचं तर बाह्यतः आमचा व्यवसाय 'तेजीत' होता, तरी बॅन्केतल्या शिलकीच्या व्यवहारात चांगलीच 'मंदी' दिसत होती! विंडसर होटेलमधलं वातावरण सुद्धा अगदी उदास उदास असायचं... त्यामुळे आणि खर्चाची तोंडमिळवणी करण्याच्या सततच्या विवंचनेमुळे तिथे सुख असं कधी लागलंच नाही.

एकदा रात्री मी आणि एलिझबेथ बिलं भरण्यासाठी रोख पैशांची व्यवस्था कशी करावी, ह्या काळजीत शेकोटीजवळ बसलो असताना, मी एकदम उद्‌गारले ,' एकच गोष्ट आपल्याला तारू शकेल ! हे होटेल आगीत जळून खाक झालं पाहिजे ! "... तिसऱ्या मजल्यावर एक चांगली श्रीमंत म्हातारी रहायची... तिच्या खोल्या जुन्यापुराण्या सामानानं, वस्तूंनी आणि चित्रांनी खच्चून भरल्या होत्या. सकाळी न्याहारी करण्यासाठी बरोबर आठ वाजता खाली जेवणघरात येण्याची या म्हातारीची सवय होती. विचार करकरून आम्ही ठरवलं की, दुसऱ्या दिवशी सकाळी तिची भेट घ्यायची, आणि तिच्याकडे कर्जाऊ रक्कम मागायची... मी तशी ती रक्कम मागितली देखील— तिनं पैसे देण्याचं नाकारलं आणि वर कॉफीबद्दल जोरात तक्रार करत बसली... म्हणे, "मी आज अनेक वर्षं या होटेलमध्ये राहतेय्— पण यापेक्षा चांगली कॉफी देणं जर या लोकांना जमत नसेल तर मी हे होटेल सोडून निघून जाईन, सांगून ठेवतेय् ! "

तिनं प्रतिज्ञा केल्याप्रमाणे ती गेलीच ! फक्त त्यावेळी पुरं होटेलही ज्वाळांच्या भक्ष्यस्थानी पडलं होतं, आणि तिची कुडीही जळून कुरकुरीत झाली होती ! एलिझबेथनं तिचा नृत्यवर्ग मोठ्या धैर्यानं नि प्रसंगावधानानं वाचवला...हातात हात धरून सर्वांना एका रांगेनं बाहेर घेऊन आली ती...आम्ही आमचं सामान मात्र काही सुद्धा वाचवू शकलो नाही—त्यात सारं सारं काही गेलं...आमच्या घरातल्या मोठ्या मोठ्या तसबिरीसुद्धा...या तसबिरी दुर्मिळ होत्या...आम्हाला त्यांचं फार फार महत्त्व होतं !...निरुपायानं आम्ही त्याच रस्त्यावरच्या 'बकिंग-हॅम' होटेलच्या वरच्या मजल्या वरच्या एका खोलीचा आसरा घेतला...आणि थोड्याच दिवसांत न्यूयॉर्कमध्ये पाऊल ठेवताना ज्या स्थितीत आम्ही होतो, त्याच स्थितीला येऊन पोहोचलो — पुनश्च हरिः ओम् ! जवळ एक दमडी सुद्धा नाही ! यालाच म्हणतात नशिबाचा खेळ !— "आपण लंडनला गेलंच पाहिजे हाच याचा अर्थ ! " मी म्हटलं...

# ६

कार्यक्रमांच्या मोसमाच्या अखेरीअखेरीस या सर्व दैवदुर्विलासामुळे आम्ही न्यूयॉर्कमध्ये उघड्यावर पडल्यासारखे झालो होतो; अशा वेळीं लंडनला जाण्याच्या कल्पनेनं माझ्या मनात मूळ धरलं. विंडसर हॉटेलमधल्या त्या अग्निप्रलयानंतर आमच्याकडे सामानसुमान असं काही नव्हतंच, पण अंगावरच्या कपड्याखेरीज बदलायला जरुरीपुरते कपडेसुद्धा नव्हते!...ऑगस्टिन डालीकडच्या, नोकरीच्या नि त्यानंतर न्यूपोर्ट किंवा 'न्यूयॉर्क फोर हन्ड्रेड'च्या शिष्ट नि श्रीमन्त समाजापुढे माझं नृत्य सादर करण्याच्या अनुभवानं माझा दारुण स्वप्नभंग झाला होता. अमेरिका – माझा मायदेश – मला जर एवढाही प्रतिसाद देणार नसेल, तर त्या बंद, निर्मम दारावर टिचक्या वाजवत राहणं, – त्या थंडगार वृत्तीच्या प्रेक्षकांसमोर पुन्हा पुन्हा जीव मुठीत धरून उभं राहणं, अगदी व्यर्थ होतं, अशी माझी धारणा झाली...आता एकाच उत्कट इच्छेनं मला घेरलं होतं...लंडन! लंडन गाठायचं...

आमच्या कुटुंबात आता चार जणच उरले होते; कारण एका फिरत्या नाटक-कंपनीत 'रोमिओचं' काम करताना दौऱ्यातल्या प्रवासात, 'ज्युलिएटचं' काम करणाऱ्या एका सोळा वर्षांच्या पोरीवर ऑगस्टिनचं प्रेम बसलं – आणि एक दिवस घरी येऊन त्यानं आपलं लग्न झाल्याची घोषणा देखील केली! त्यानं लग्न करणं म्हणजे सरळ सरळ फितुरीच होती आमच्या लेखी! आई तर इतकी भडकली होती...तिच्या त्या भयंकर रागाचं कारण मला कधीच उमगलं नाही; काय झालं तिला कोण जाणे! – पण मी वर्णन केलेल्या माझ्या बाबांच्या प्रथम भेटीच्या वेळीं ती जशी वागली होती, अगदी तोच प्रकार आताही घडला...दुसऱ्या खोलीत जाऊन तिनं धाडकन् दार लावून घेतलं...एलिझबेथनं मौनाची गुळणी

घेतली, आणि रेमंडचं तर माथंच फिरलं जणू ! सहानुभूती काही वाटली असेल, तर ती एकट्या मलाच...इकडे या चमत्कारिक वागण्यानं ऑगस्टिन व्यथित होऊन पांढराफटक पडलेला ! मग त्याच्याबरोबर जाऊन त्याच्या बायकोला भेटण्याचं आश्वासन मी त्याला दिलं...एका आड बाजूच्या गल्लीतल्या ओसाड हॉटेलकडे तो मला घेऊन गेला – तिथे पाच जिने चढून गेल्यावर एका खोलीत आम्हाला ' ज्युलिएट ' भेटली ! दिसायला गोड होती तशी...नाजुक होती, पण अशक्त नि आजारी दिसत होती – त्याचं कारणही लगेच त्यानं मला विश्वासात घेऊन सांगितलं...तिथे पाळणा हलायचा होता !

आमच्या लंडनला जायच्या बेतांतून ऑगस्टिन अर्थातच वगळला गेला. एकाद्या कुणी आपल्या ध्येयापासून ढळावं...मार्गभ्रष्ट होऊन बाजूला ओळण घ्यावी– आणि ज्या दिव्य श्रेयाचा मागोवा घेत इतर पुढे पुढे चालले आहेत, त्या श्रेयाला तो अपात्र ठरावा, तसा ऑगस्टिन प्रवाहपतित झाला होता, अशी आम्ही सर्वांनी कल्पना करून घेतली होती !!

... पुन्हा एकदा उन्हाळ्याची चाहूल लागली... पुन्हा एकदा एका उजाड स्टुडिओमध्ये आम्ही दाखल झालो – नेहमीप्रमाणे रंक अवस्थेत ! एवढ्यात मला एक भेदी कल्पना सुचली ! ज्या ज्या दिवाणखान्यातून मी नाचले होते त्या त्या बंगल्यातल्या समृद्ध गृहस्वामिनींना विनवून लंडनला जाण्याइतपत रक्कम गोळा करायचं मी ठरवलं ! सेंट्रल पार्कवर डोळा ठेऊन असणाऱ्या राजवाड्यावजा हवेलीतल्या बाईसाहेबांना मी प्रथम भेटले. ही हवेली एकोणसाठाव्या रस्त्यावर होती. मी त्यांना विंडसर होटेलच्या आगीत आमच्या सर्वस्वाची कशी राख झाली ते तर सांगितलंच – पण न्यूयॉर्कमध्ये रसिकतेच्या अभावी आमच्या कलेचं चीज होत नसल्याचंही बोलून दाखवलं... आणि वर, लंडनला गेल्यानं आमची किंमत लोकांना पटणार असल्याची माझी खात्री असल्याचंही ठासून सांगितलं !

शेवटी एकदाच्या त्या बाईसाहेब उठल्या... मेजाजवळ गेल्या आणि पेन हातात घेऊन चेक लिहू लागल्या. घडी करून तो चेक त्यांनी मला दिला... मीही भरल्या डोळ्यांनी त्यांचा निरोप घेतला, आणि हलक्या मनानं उडत्या पिसासारखी तरंगतच बाहेर पडले... पण हाय ! पाचव्या रस्त्यापर्यन्त गेल्यावर मी घडी उलगडून पाहिलं तर चेक फक्त पन्नास डॉलर्सचा ! आम्हाला सर्वांना लंडनला जायला एवढीशी रक्कम म्हणजे भलतीच अपुरी ! तेवढ्यानं काय साधणार होतं ?

यानंतर मी दुसऱ्या एका लखपतीच्या श्रीमतीजींना गाठायचा प्रयत्न केला. त्यांची हवेली पाचव्या रस्त्याच्या शेवटी होती. एकोणसाठाव्या गल्लीतून ह्या बाई-साहेबांच्या हवेलीपर्यन्तचे पन्नास ब्लॉक मी पायीच ओलांडले !... इथलं माझं

स्वागत तर पहिल्यापेक्षाही थंडपणे झालं!... एका वयस्क बाईसाहेबांनी दार उघडलं, आणि माझी विनंती ऐकताक्षणीच, ती किती अव्यवहारीपणाची होती, यावर मला चार तिखट शब्द सुनावले! त्याच्याही पुढे जाऊन तिनं काय म्हणावं, तर: "बॅले नृत्य करत असतीस तर तुझ्या विनंतीचा थोडा तरी विचार मी केला असता... कारण माझ्या ओळखीच्या एका बॅलेनर्तकीनं खोऱ्यानं पैसा ओढलेला मला माहीत आहे..." इकडे माझ्या विनंतीअर्जाचं घोडं तसंच पुढे दामटण्याच्या प्रयत्नात मला भोवळच आल्यासारखं वाटायला लागलं, आणि मी खरोखरच बाजूला कलंडले! दुपारचा चारचा सुमार, शिवाय जेवणबिवण काहीच झालेलं नव्हतं माझं! हा प्रकार पाहून मात्र त्या बाईसाहेब अस्वस्थच झाल्या जराश्या, अन् घंटी वाजवून त्यांनी एका रुबाबदार बटलरकरवी माझ्यासाठी कपभर चॉकोलेट आणि टोस्ट असं खायला आणवलं.... माझी आसवं चॉकोलेटमध्ये निथळत होती, नि त्या टोस्टवरही घरंगळत होती – तरी तिकडे लक्ष न देता मी तशीच त्या यजमानीणबाईंना, आम्ही लंडनला जाणं फार जरूर का आहे, हे पटवत राहिले...!

"आज ना उद्या मी कीर्तिशिखरावर जाऊन पोहोचेन यात शंकाच नाही ..." मी त्यांना सांगितलं..."आणि त्यावेळी, अमेरिकन कलागुणाची बूज राखल्याचं सर्व श्रेय तुमच्याच पदरात पडणार आहे, याची कल्पना करा!" हे नि ते... !

शेवटी जवळ जवळ साठ कोटी डॉलर्सचं भांडार हाती असलेल्या त्या धनवन्तीनंही मला एक चेक दिला! किती? पन्नास डॉलर्स! अन शिवाय वर बजावलं मला की, "जेव्हा केव्हा तुला पैसे मिळतील, तेव्हा हे माझे पैसे परत पाठवायला विसरू नकोस!"

मी तिचे पैसे कधीच परत केले नाहीत; माझ्या लेखी ते कुणा गरिबाला देऊन टाकणंच अधिक बरोबर होतं!

...अशा तऱ्हेने न्यूयॉर्कमधल्या बहुतेक सर्व कोट्याधिशांच्या भाग्यवतींना मी कौल लावला...तेव्हा कुठे एक दिवस आमच्या लंडनच्या सफरीच्या नावानं तीनशे डॉलर्सची भली मोठी (?) पुंजी आमच्याकडे जमली! अगदी कफल्लक अवस्थेत लंडनला पोहोचायचं असतं, तरीही एखाद्या सामान्य बोटीची सेकंड क्लासची तिकिटं काढणं काही या रकमेत जमण्यासारखं नव्हतं! पण 'हल'ला जाणाऱ्या, गाईगुरं वाहणाऱ्या एखाद्या बोटीच्या शोधात राहून ती मिळेपर्यंत धक्क्याच्या आसपास वावरण्याची चतुर कल्पना तेवढ्यात रेमंडला सुचली. ह्या बोटीच्या कॅप्टनला रेमंडची इतकी दया आली की नियमात बसत नसूनही, आम्हाला प्रवासी म्हणून त्याच्या जहाजावर घेण्याचं त्यानं ठरवलं; आणि एक दिवस सकाळी हातातल्या काही पडशापिशव्याच केवळ घेऊन आम्ही जहाजावर

चढलो ! ट्रंका वगैरे होत्याच कुठे ? विंडसर होटेलच्या आगीत त्यांची केव्हाच आहुती पडली होती !...मला वाटतं रेमंडला पुरं शाकाहारी बनण्याचं सारं श्रेय आमच्या या सफरीलाच असावं. मध्यपरिचमेच्या सपाटीकडून लंडनला चालवलेली, तडफडणारी बिचारी मुकी दोनतिनशे जनावरं तळघरात एकत्र कोंडलेली होती बोटीच्या...आपल्या शिंगांनी एकमेकांना भोसकत केविलवाणेपणानं रात्रंदिवस हंबरतहुंबरत राहणाऱ्या प्राण्यांचं कसलं दयनीय दृश्य ते ! त्या दृश्याचा आमच्या मनावर खोल कुठेतरी चरा उमटून गेला आहे...!

...मोठ्या जहाजावरच्या सुखसोईंनी परिपूर्ण अशा कॅबिनमध्ये पडल्या पडल्या कितीदा तरी मला त्या गुरंवाहू बोटीवरच्या आमच्या सफरीची आठवण होते. साऱ्या अडचणींना न जुमानता उसळी मारणारी त्यावेळची ती आनंदी नि उत्साही मनःस्थिती आठवते—आणि शेवटी मनात असा विचार येतो की खरंच, सतत सुखासीन वातावरणात राहण्यानंच तर मनुष्याच्या मनात विकृती उत्पन्न होत नसतील ना ?...

...खारवलेलं गोमांस आणि चहा – तोही कसल्या गवती चवीचा–हे एवढंच आमचं खाणंपिणं होतं बोटीवर ! अंगाखाली भिंतीलगत जोडलेली निजायची अरुंद अन कठीण फळकुटं ! खोल्या – कॅबिन्स–कोठडीवजा, अगदी लहान !...अर्थात् तिकिटांचा दर सुद्धा अगदी हास्यास्पद वाटेलसा क्षुल्लकच होता...तरीपण 'हल'ला पोहोचेपर्यंतच्या दोन आठवड्यांच्या प्रवासात आम्ही फार फार मजेत होतो ! या असल्या बोटीवरून स्वतःच्या खऱ्या नावानं प्रवास करण्याची मला जराशी लाज वाटत होती – त्यामुळे आम्ही आजीच्या – आईच्या आईच्या– 'ओ गॉर्मन' या नावानं सह्या ठोकल्या होत्या...मी तर स्वतःला 'मॅगी ओगॉर्मन' म्हणवत होते !

बोटीवरचा 'फर्स्ट मेट' आयरिश होता...चांदण्या रात्री कित्येकदा मी त्याच्या बरोबर टेहळणीच्या जागी वर असायची. तो वारंवार मला लग्नाची मागणी घालायचा – म्हणायचा, "मॅगी ओ गॉर्मन, बघ, मनावर घेत असशील माझ्याशी लग्न करायचं तर...मी तुला नवरा म्हणून अगदी सुखात ठेवेन !" कॅप्टनसुद्धा मोठा दिलदार माणूस होता – त्याला कधी कधी लहर यायची...एखाद्या रात्री तो व्हिस्कीची बाटली काढायचा आणि आम्हा सर्वांना नरमगरम पेय बनवून द्यायचा...एकंदरीत कष्टाचे असले, तरी हे दिवस फार आनंदात गेले. त्या गरीब मुक्या प्राण्यांचं हंबरणंहुंकारणं तळमजल्यातून कानावर आलं, की मन मात्र त्यामुळे विषण्ण व्हायचं...अशा रानटी पद्धतीनं गुरांची नेआण करायची प्रथा अजून चालू आहे की काय, न कळे !

...मे महिन्यात एक दिवस सकाळी 'ओ गॉर्मन' परिवार 'हल'ला उतरला,

आगगाडीत चढलो आणि काही तासानंतरच 'डंकन' कुटुंब लंडनला येऊन पोहोचलं! 'टाईम्स' मधल्या जाहिरातीच्या बळावर 'मार्बल आर्च' च्या जवळ राहाण्याची जागा मिळाली. लंडनमधले पहिलेपहिले दिवस एकप्रकारच्या निर्मळ निरानंदात, एक पेनीवाल्या बसमधून फिरण्यातच गेले — आजूबाजूची प्रत्येक गोष्ट, प्रत्येक वस्तू पाहून उफाळणाऱ्या विस्मयजनक आनंदाची चव तोंडात घोळत असताना, आमच्या जवळची पुंजी किती बेताची होती, हे मुळी आम्ही विसरूनच गेलो होतो! प्रेक्षणीय स्थळं पाहण्याचा तर आम्ही सपाटाच लावला — 'वेस्टमिन्स्टर ॲबे', 'ब्रिटिश म्युझियम,' 'साउथ केन्सिग्टन म्युझियम,' 'टॉवर ऑफ लंडन,' इत्यादी पाहण्यात आम्ही तासन्तास घालवले — क्यू गार्डन्स 'रिचमंड पार्क,' 'हॅम्प्टन कोर्ट,' यांना भेटी देऊन आम्ही आमच्या लॉजकडे परतत असू, ते उतके उन्मन नि श्रांत...! आमचं सारं वागणं खरं म्हणजे हौशी प्रवासी लोकांसारखंच निष्काळजी होतं — जणु काही अमेरिकेतले कुणी आमचे वडील, काका, मामा आम्हाला पैसे पुरवायला होतेच पाठीशी! काही आठवड्या-नंतर आमच्या लॉजच्या मालकीणबाईंचा, बिल चुकतं करण्याबाबतचा तगादा कानावर येईपर्यंत आमच्या बेदरकार मुशाफरी स्वप्नांतून आम्हाला जागच आली नव्हती!

...मग एक दिवस 'नॅशनल गॅलरी' मध्ये 'कॉरेजिओ'च्या 'व्हीनस' आणि 'ॲडोनिस' वरचं एक मनोरंजक व्याख्यान ऐकून आम्ही परत येऊन पाहतो, तो लॉजचं दार आमच्या देखत धाडकन् लावलं गेलेलं...आमचं सामान आत...पण आम्ही सर्व मात्र उंबरठ्यावरच! सर्वांचे खिसे चाचपून पाहिले तर जेमतेम सहा शिलिंग सर्वमिळून! मग काय, परत फिरलो—मार्बल आर्च अन् केन्सिग्टन गार्डन्स कडे...आणि पुढे काय करायचं ह्याचा विचार करत एका जागी बैठक मारून बसलो, झालं!

## ७

आमच्या आयुष्याचा एक मानसिक चित्रालेख काढता आला असता, तर तो पाहून केवढं चकित व्हायला झालं असतं! वाटलं असतं, हे सारं घडलं, ते खरोखरी माझ्याच आयुष्यात का?–कारण माझ्या आठवणीप्रमाणे, लंडनच्या रस्त्यातून भटकणारी ती चार पात्रं, चार्लस् डिकन्सच्या कल्पनासाम्राज्यात देखील सहज शोभून दिसावीत अशीच होती! आता या क्षणी तर मला त्यांच्या अस्तित्वाची शंकाच येते आहे! भूतकाळात डोकावून पाहताना, संकटांच्या नि अडचणींच्या झुंडींच्या झुंडींशी टक्कर घेऊन सुद्धा, आम्हा तरुण पोरांचा आनंदोत्साह टिकून राहिला होता, याचं मला तेवढं कौतुक वाटत नाही – कौतुक वाटतं ते तारुण्याची शीव केव्हाच ओलांडून गेलेल्या माझ्या बिचाऱ्या आईचं! तिच्या वैयक्तिक जीवनात ती कष्टच उपसत आली होती. संकटांचा मारा तिनं पदोपदी सोसला होता – आणि तरी देखील या भटकन्तीच्या हालअपेष्टांना नि दुर्दैवाच्या परंपरेला, सर्वसाधारणपणे सर्वांच्याच वाट्याला येणाऱ्या अडचणी, असं समजून ती आम्हाला साथ देत होती, ही खरी अतर्क्य गोष्ट!

...हातांत पैसा नाही, मदतीला मित्र नाहीत, आणि रात्रीपुरता निवारा मिळवण्याचं कुठलंही साधन हाताशी नाही, अशा स्थितीत आम्ही लंडनचे रस्ते पालथे घातले...दोन तीन होटेल्समधून चौकशी केली परंतु आमच्याकडे सामानसुमान काहीच नसल्यानं, आगाऊ भाडं घेण्याचाच सर्व ठिकाणी हट्टाग्रह दिसला! दोन तीन लॉज – निवास – धुंडाळले; प्रत्येक वेळी मालकिणींचं तसंच ते निर्दय तुसडेपणाचं वागणं! शेवटी 'ग्रीन पार्क' मधल्या एका बाकाचा आश्रय करण्यापर्यंत पाळी आली – पण तिथूनही एका प्रचंड पोलिसानं येऊन आम्हाला उठवलं

अन् पुढे वाटेला लावलं !

तीन दिवस आणि तितक्याच रात्री, हाच प्रकार चालू होता. – दिडकीला मिळणारे बनपाव खाऊन आम्ही दिवस काढत होतो – आणि तरी अंगात चैतन्य कसं अखंड सळसळत होतं, कुणास ठाऊक ! ब्रिटिश वस्तूसंग्रहालयात आम्ही दिवसन् दिवस घालवत होतो. ' विंकलमन'च्या ' अथेन्सची यात्रा ' ( Journey to Athens ) या पुस्तकाचा इंग्रजी अनुवाद मी वाचत होते; वाचता वाचता आमच्या विचित्र परिस्थितीचा पूर्ण विसर पडून माझ्या डोळ्यांतून घळघळ अश्रू वाहायला लागले – त्या अश्रूंचा आमच्या दैवदुर्विलासाशी काहीच संबंध नव्हता ही गंमत ! उलट निष्ठेनं पुऱ्या केलेल्या शोधक सफरीनंतर परततांना विंकलमनला आलेल्या दुःखद मृत्यूनं मला रडूं कोसळत होतं !

चौथ्या दिवशी मात्र भल्या पहाटेच काही तरी उपाय शोधायचा मी निश्चय केला. आई, रेमंड अन् एलिझबेथ यांना एक चकार शब्द देखील तोंडातून न काढता माझ्या मागे यायला मी सांगितलं. लंडनमधल्या होटेल्सपैकी एका अत्यंत अलिशान होटेलमध्ये मी सरळ शिरले ! रात्रपाळीच्या पोर्टरला अर्धवट झोपेतून उठवलं, आणि आम्ही रात्रीच्या गाडीनं नुकतेच आल्याचं सांगितलं; पुढे म्हटलं, की आमचं सामान लिव्हरपूलहून लौकरच येईल, तोपर्यंत त्यानं आम्हाला रहायला खोल्या निश्चित् करून द्याव्यात – आणि सकाळची न्याहारी-कॉफी, बफव्हीट केक्स, आणि इतर अमेरिकन खाद्य-विशेष वगैरे सर्व वरच पाठवून द्यावं !

त्या सबंध दिवसभर आम्ही मऊ मऊ गाद्यागिरद्यांवर झोपलो. अधून मधून पोर्टरला फोन करून आमचं सामान न आल्याबद्दल कडवट शब्दात मी तक्रार करीत राहिले. – " बदलायला कपडे नसताना बाहेर पडणारच कसं आम्ही ? " मी उद्गारले. ... अर्थातच रात्रीची जेवणं वरच्या वर खोल्यातूनच झाली !

ह्या सोंगाच्या बतावणीनं आता कमाल मर्यादा गाठली होती, हे लक्षात घेऊन दुसऱ्या दिवशी पहाटे आम्ही जसे आलो, तसेच होटेलमधून चालते झालो. रात्रपाळीच्या पोर्टरला या वेळी उठवलं नाही, एवढंच !

रस्त्यावर आलो, तेव्हा एका दिवसभराच्या विश्रांतीनं पुष्कळच ताजं तवानं वाटत होतं – आणि पुन्हा एकदा जगाशी सामना द्यायची उभारीही आली होती. त्या दिवशी सकाळी आम्ही फिरत फिरत चेल्सीला गेलो. तिथल्या त्या जुन्या चर्चच्या आवारातल्या कबरस्तानात आम्ही बसलो असता, वाटेवर पडलेल्या एका वर्तमानपत्राकडे माझं लक्ष गेलं, नि ते उचलता उचलता त्यातल्या एका परिच्छेदावर माझे डोळे स्थिरावले. न्यूयॉर्कमध्ये ज्यांच्या दिवाणखान्यात मी नाचले होते, अशा एका श्रीमतीजींनी ग्रॉव्हनर चौकात बंगला घेतला होता, आणि

तिथे पार्श्वी मेजवान्यांची झड लागलेली होती. मला एकदम एक कल्पना स्फुरली !

" इथेच थांबा, " मी इतर सगळ्यांना सांगितलं

दुपारच्या जेवणापूर्वी मग मी एकटीच ग्रॉव्हनर चौकात जाऊन पोहोचले. त्या बाई घरीच होत्या. त्यांनी मला खूप अगत्यपूर्वक बसवून घेतलं, तेव्हा त्यांना मी लंडनला आलेली असून न्यूयॉर्कमधल्याप्रमाणे दिवाणखान्यांतून नृत्यप्रदर्शन करत असल्याचं सांगितलं.

" शुक्रवारच्या रात्रीच्या माझ्या इथल्या मेजवानीच्या संदर्भात ही कल्पना अगदी चपखल बसते ! " – त्या म्हणाल्या; " जेवणानंतर तुझ्या भावनृत्याची थोडी झलक तू दाखवू शकशील का ? " – त्यांनी मला पुढे विचारलं—

मी होकार दिला – आणि सहज युक्तीनं कार्यक्रम निश्चित समजण्यासाठी थोडीशी रक्कम आगाऊ देण्याची जरूरी असल्याचं सुचवलं ! बाई फार दिलदारीनं वागल्या, आणि दहा पौंडाचा एक चेक तावडतोब त्यांची लिहून दिला माझ्या हातात. तो चेक घेऊन धावत धावत मी चेल्सीच्या कबरस्थानात गेले, तर तिथे रेमंडचं एक व्याख्यान रंगात आलेलं ! विषय ? ' आत्म्याचे प्लेटॉनिक स्वरूप' !

" ग्रॉव्हनर चौकातल्या अमुक अमुक बाईच्याकडे शुक्रवारी मला नाचायचंय्.. बहुधा ' प्रिन्स ऑफ वेल्स ' देखील तिथे येईल ... आता काय, आपलं नशीब उघडलंच म्हणायचं ! ... " वगैरे बडबड करत मी त्यांना तो चेक दाखवला – तेव्हा रेमंड म्हणतो, " खरं तर आपण एक स्टुडिओ शोधून काढून या रकमेतून त्याचं एक महिन्याचं भाडं आगाऊच देऊन टाकलं पाहिजे ... लॉजसारख्या भाडोत्री ठिकाणी, हलक्या दर्जाच्या सामान्य बायकांकडून अपमान व्हायचे प्रसंग आपल्यावर आता येताच कामा नयेत ! "...

मग चेल्सीमध्ये किंग्ज रोडच्या बाजूलाच शोधता शोधता एक छोटा स्टुडिओ आम्हाला सापडला ... त्या रात्री आम्ही त्याच स्टुडिओत झोपलो ... गाद्या-बिद्या काही नव्हत्याच तिथे, तेव्हा जमिनीवरच आम्ही पसरलो ... पण पुन्हा एकदा कलावंतासारखं जिणं जगत असल्याचा आम्हाला जणू प्रत्यय आला, अन् समाधान वाटायला लागलं ... रेमंडच्या विचारांशी आम्ही सर्व सहमत झालो – आणि निश्चय केला की भाडोत्री निवासासारख्या ' बूर्ज्वा ' – कनिष्ठ मध्यम-वर्गाला शोभणाऱ्या शिष्ट ठिकाणी उतरायचा कमीपणा इतःपर कधीही पत्करायचा नाही ! ... स्टुडिओचं भाडं देऊन उरलेल्या पैशातून थोडीशी 'उद्या'ची तरतूद म्हणून आम्ही तयार खाद्यपदार्थांचे डबे विकत घेऊन ठेवले; आणि ' लिबर्टी 'मधून दुपट्ट्यासाठी वापरतात तसला तीनचार वार कपडा खरेदी करून शुक्रवारच्या त्या बाईंच्या पार्टीत मी त्याचा उपयोग केला...

मी त्या दिवशी ' नार्सिसस ' नाचले – त्यावेळी मी फारच हडकुळी होते;

आणि पाण्यात पडलेल्या स्वतःच्या प्रतिबिंबावर भाळलेल्या शेलाट्या, यौवनसंमुख किशोराचीच ती भूमिका होती. नेव्हिनची 'ऑफिलिया' सुद्धा मी त्या दिवशी सादर केली. लोक मला पाहून एकमेकात कुजबुजून म्हणत होते, "या एवढ्याशा पोरीच्या चेहऱ्यावर हा शोकविकल भाव उमटतो तरी कसा?"...मेन्डेलझोनचं 'वसन्तगान' मी त्या संध्याकाळी अगदी शेवटी नाचले...

माझ्या आईनं मला साथ केली. अँड्र लँगनं अनुवादित केलेल्या थिऑक्रिटसच्या काही कवितांचं वाचन एलिझबेथनं केलं; आणि रेमंडनं 'नृत्य – आणि भविष्य-कालीन मानवी जीवनाच्या मानसशास्त्रावर होणारे नृत्याचे संभाव्य परिणाम' यावर एक छोटसंभाषण केलं! हे सारं खरं म्हणजे त्या मस्तपैकी जेवण करून सुस्तावलेल्या खुशाल चेंडू प्रेक्षकांच्या डोक्यावरूनच गेलं; पण तरी देखील हा कार्यक्रम खूपच यशस्वी झाला, आणि आमच्या यजमानीणबाईही खूष झाल्या—

माझ्या पारदर्शक नृत्यवेषाबद्दल, किंवा नुसतेच सॅण्डल्स् घालून, किंवा पायात काहीच न घालता नाचण्याबद्दल कुणी अवाक्षरही काढलं नाही, हे इंग्लंडच्या उच्चभ्रू सभ्यतेला साजेसंच होतं – पण याच साध्यासुध्या दृश्यानं पुढे काही वर्षांनी जर्मनीत खळबळच माजवून टाकली होती! इंग्रजी सभ्यतेच्या कल्पना इतक्या दुसऱ्या टोकाला गेलेल्या आहेत, की माझ्या नृत्य वेषाच्या अभिनव कल्पनेची कुणी काही म्हणता काही दखल घेतली नाही! मग नृत्यातल्या माझ्या कल्पना-नाविन्याबद्दल काही उद्गार काढणं तर त्याहून दूर! प्रत्येकजण म्हणायचा, "वा! सुंदर!" किंवा "फारच मजेदार!" – "शतशः धन्यवाद!"...किंवा असलंच काहीतरी – बस्!

मात्र या कार्यक्रमानंतर प्रसिद्ध प्रसिद्ध हवेल्यांतून मला नृत्याची पुष्कळ निमंत्रणं यायला लागली. एक दिवस मी राजघराण्यातल्या कुणा असामीपुढे किंवा लोथर बाईसाहेबांच्या बगिच्यात नाचत असायची, तर दुसऱ्या दिवशीच पुन्हा उपास घडायचा! कारण या कार्यक्रमांचे पैसे कधी क्वचितच मिळायचे...बहुधा नाहीच! यजमानीणबाईचं ठीक असे; त्या म्हणायच्या, "अमुक जहागिर-दारीणबाईच्या पुढे किंवा तमुक संस्थानच्या राणीसाहेबांपुढे तुझं नृत्य होईल ...आणि इतक्या बड्या बड्या मंडळींनी तुला नृत्य करताना पाहिल्यानं, लंडन-भर तुझं नाव होऊन जाईल!"

असाच एक दिवस माझ्या पक्का स्मरणात आहे. त्या दिवशी एका मदतीसाठी केलेल्या कार्यक्रमात मी चार तास नाचल्यानंतर, त्याचं जणू बक्षीस म्हणून, एका उपाधिविभूषित बाईसाहेबांनी मला चहा ओतून दिला, अणि आपल्या हातानं स्ट्रॉबेरीची फळं दिली!...पण आधी काही दिवस एकादं पेय सोडून काहीही माझ्या पोटात गेलेलं नसल्यानं ती फळं, आणि त्याच्या बरोबरची ती सकस साय माझ्या

वृक्षाखाली उतरेच ना !...त्यानं मला कष्टच झाले जास्त !...याच वेळी दुसऱ्या एक बाई गिन्नींनी भरलेली एक भली मोठी थैली माझ्या समोर उचलून धरत म्हणाल्या,..." आमच्या अंध मुलींच्या वसतिगृहासाठी पैशाची केवढी टांकसाळ तू जमा करून दिली आहेस पाहा तर ! "

आई नि मी भलत्याच भावनाप्रधान...त्यामुळे त्या क्षणी त्या बायका आमची कसली, कधी न ऐकलेली जीवघेणी थट्टा करण्याचं पातक करीत होत्या, हे आम्ही त्यांना स्पष्ट शब्दात सुनवू शकलो नाही...उलट समाजात वावरताना कपडे वगैरे टाकठीक असावेत आणि संपन्न दिसावं, म्हणून पैसे राखून ठेवता ठेवता पोटभर जेवणखाण देखील आम्ही करत नव्हतो !

स्टुडिओसाठी आम्ही काही गिरदी असलेल्या खाटा विकत घेतल्या, आणि एक पियानो देखील भाड्यानं घेतला...पण आमचा बहुतेक वेळ ब्रिटिश वस्तुसंग्रहालयातच जायचा. रेमंड तिथल्या ग्रीक फुलदाण्यांची आणि बास–रिलिफ्सची रेखाटनं करायचा – आणि मी ? त्यावरच्या आकृतींच्या पदलालित्याची लय, त्यांच्या मदिरमस्त माथ्यांची उभार ठेवण, नि त्यांच्या हातातल्या द्राक्षवेलींनी गुर-फटलेल्या खांदींचे हेलकावे, यांची प्रतीती ज्या ज्या म्हणून संगीत रचनेतून येते असं मला वाटेल, त्या त्या संगीताच्या साथीवर मी त्यांतला भाव व्यक्त करायची !... ब्रिटिश वस्तुसंग्रहालयातल्या त्या ग्रंथागारांत सुद्धा आम्ही तासन् तास घालवत होतो. तिथल्या एका उपहारगृहातला दिडकीवाला बनपाव आणि दुधी कॉफी, हे आमचं दुपारचं जेवण.

लंडनच्या सौंदर्यानं आम्हाला भुरळ घातली होती. आमच्या उत्साहाला उधाण आलं होतं. अमेरिकेत असताना सतत भासणारी संस्कृतिविशेषांची नि वास्तुशिल्पाच्या अभिजात सौंदर्याची उणीव इथे भरून निघाली होती. आता या सौंदर्याचं अगदी आकंठ पान मी करू शकत होते...

...न्यूयॉर्क सोडण्यापूर्वीच मिरोस्कीला नुसतं भेटून सुद्धा वर्ष होऊन गेलं होतं. अन् त्यानंतर शिकागोतल्या एका मित्राचं मला पत्र आलं. मिरोस्कीनं स्पॅनिश लढाईत आपण होऊन उडी घेतली होती, आणि त्या संदर्भात तो फ्लॉरिडापर्यंत पोहोचला असताना विषमज्वर होऊन त्यातच वारला, अशी वार्ता त्यातून कळली. ह्या पत्रानं मला भयंकर धक्का दिला...त्यातल्या वार्तेच्या खरेपणावर मुळी माझा विश्वासच बसेना. एके दिवशी दुपारी मग मी पायीपायीच ' कूपर इन्स्टिट्यूट'मध्ये गेले आणि जुन्या वर्तमानपत्राच्या चळती चाळायला सुरुवात केली...अन् इतर अगणित नावांच्या बरोबरच मिरोस्कीचं नावही मृताच्या यादीत मला आढळून आलं...एक बारीक अक्षरांतली छोटीशी नोंद ! बस् !

माझ्या मित्रानं पत्रातून मिरोस्कीच्या बायकोचं नाव आणि लंडनमधला तिचा

पत्ताही पाठवला होता – तेव्हा एक बग्गी ठरवून मी मिरोस्कीबाईंना हुडकून काढायला बाहेर पडले. पत्ता बराच दूरचा होता – हॅमरस्मिथमध्ये कुठेतरी !... माझ्या मनावरचे अमेरिकेचे जुने पुराणे संस्कार अजून पुरते पुसले गेले नसल्यानं इव्हान मिरोस्कोनं आपल्या पत्नीला लंडनमध्येच सोडून येणं, आणि माझ्यापाशी तिच्याबद्दल साधा उल्लेखही न करणं, ही गोष्ट मला भयंकर वाटत होती ! तेव्हा मी माझ्या बेताचा कुणालाही सुगावा लागू दिला नाही. गाडीवाल्याला तो पत्ता दाखवला...निघाले...किती वेळ चालले होते कुणास ठाऊक...बऱ्याच मैलांचा रस्ता काटल्यासारखं वाटत होतं...लंडनच्या शिवेबाहेरच गेले मी जवळजवळ ! रस्त्याच्या बाजूला हुबेहूब एकसारख्या नि राखी रंगाच्या छोट्या घरांच्या रांगाच रांगा होत्या तिथे. सर्वांची फाटकं उदासवाणी नि एकजात मळखाऊ; पण प्रत्येका-वरची नावाची उपाधी मात्र आपल्या शेजारच्यापेक्षा चढत्या प्रमाणात भारदस्त ! 'शेरवुड कॉटेज' काय, 'ग्लेन हाऊस,' 'एलेस्मियर' काय, 'एनिसमोअर' काय, एकापेक्षा एक निरर्थक नि विसंगत नावं ! अंगापेक्षा बोंगाच फार ! आणि शेवटी 'स्टेला हाऊस' ! मी तिथे जाऊन घंटी वाजवली तर लंडनमध्ये सर्रास आढळतात, त्याहूनही मरगळलेल्या चेहऱ्याच्या एका 'मेड'नं – मोल-करणीनं – दार उघडलं. मी मिरोस्कीबाईंची चौकशी केली, तसं तिनं मला एका हवाबंद पडवीत नेऊन बसवलं...'केट ग्रीनवे'चा पांढऱ्या मलमलचा फ्रॉक, त्याखाली निळ्या रंगाचा शेव, डोक्यावर मोठी गवती हॅट, आणि खांद्यावर रुळणाऱ्या केसांच्या कुरळ्या बटा असा माझा वेष होता...

वरच्या मजल्यावरून धावपळ करणाऱ्या पावलांचा आवाज येत होता... आणि त्यातच कुणीतरी धारदार नि स्पष्ट आवाजात "मुलींनो, हं, जरा नीट–शिस्तीनं" असं म्हणत होतं.

'स्टेला हाऊस' ही एक मुलींची शाळा होती...माझा गोंधळ उडालेला होता...एकीकडे भीती वाटत होती, तरी मिरोस्कीच्या शोचनीय मरणाची आठवण असूनही मत्सराची एक चावरी बोचरी भावना माझ्या मनाचा ताण वाढवत होती ! एवढ्यात आयुष्यात कधी पाहिली नाही अशी, एका अकल्पित व्यक्तींची छोटी मूर्ती आत प्रविष्ट झाली ! जेमतेम चार फूट उंची, संपूर्ण झिजून कमालीची कृश झालेली अंगकाठी ! राखी रंगाचे लखाखते डोळे...विरळ पांढरे केस...लहानसा फिक्कट चेहरा आणि फिक्क्याच पातळ ओठांची घट्ट मुडप !

माझं स्वागत काही फारसं अगत्यपूर्वक झालं नाही ! मी तिला, मी कोण, ते समजून सांगायचा प्रयत्न केला...

"मला माहीत आहे...इझाडोरा तू. तुझ्याबद्दल इव्हान मला कितीदा तरी लिहायचा."

" माफ करा हं...पण, पण तुमच्याबद्दल मात्र तो माझ्याजवळ कधीच काही बोलला नाही !"

" नाहीच...नाहीच बोलायचा तो..खरं म्हणजे मी त्याच्याकडे जायचीच होते...तेवढ्यात...तो गेलाच कायमचा...आता मुळी तोच नाही !"

अशा काही अर्थगर्भ आवाजात ती हे म्हणाली, की मला रडूच कोसळलं... तीही रडायला लागली...आणि त्या सहानुभवामुळेच की काय, जुन्या कधीच्या मैत्रीणी असाव्यात तशी जवळीक आमच्यात निर्माण झाली !

तिनं मला वर तिच्या खोलीत नेलं. इव्हान मिरोस्कीच्या छायाचित्रांनी साऱ्या भिंती झाकून गेल्या होत्या. त्याच्या तरुणपणची छायाचित्रं होती तिथे. त्या चेहऱ्यांत अदृष्टपूर्व असं सौंदर्य नि जोम होता – जोष होता. लढाऊ गणवेशातला एक फोटो त्यानं तिला पाठवला होता, तो तिनं क्रेपनं सजवून लावला होता. ...इव्हान आपलं नशिब काढायला अमरिकेला गेला – पण दोघांनी बरोबर जाऊ शकण्याइतके पैसे त्यांच्याकडे कसे नव्हते, वगैरे आपल्या एकत्र जीवनाची पुरी कहाणी तिनं मला सांगितली.

" मी पुढे त्याच्याकडे जाणार होते – तो नेहमीच लिहायचा की, 'थोड्याच दिवसात पुरेसे पैसे माझ्या हातात येतील, आणि मग तूही इकडे येऊ शकशील.'... "

वर्षामागून वर्षं गेली – तिनं एका शाळेतली मुलींच्यावर देखरेख करणाऱ्या गव्हर्नेसची, नोकरी तशीच चालू ठेवली होती – तिचे बिचारीचे केस सुद्धा पिकले ...पण इव्हानकडून अमेरिकेला जायचे पैसे कधीच आले नाहीत...कधीच नाही !

ह्या लहानखुऱ्या पण मोठ्या धीराच्या वयस्क – (वयस्कच वाटली मला तेव्हा ती–) बाईच्या वाट्याला आलेल्या भोगवट्याची, धाडसी सफरी नि प्रवास यांनी भरलेल्या माझ्या आयुष्याशी तुलना करताना मला काही समजेनासंच झालं ! ती मिरोस्कीची पत्नी होती – तिला त्याच्याकडे जायचं – तर सर्वात कमी दर्जाच्या तिकिटानं का होईना, ती का गेली नाही ?...तेव्हा आणि पुढेही मला हा एक प्रश्न नेहमीच पडे ! – एखाद्या व्यक्तीला एखादी गोष्ट फार करावीशी वाटली, तर तिनं ती का म्हणून नाही करायची ? मी तर मला जे करावसं वाटलं, ते तात्काळ करत गेले, विचार करत कधीच थांबून राहिले नाही...अर्थात् त्यामुळे पुष्कळदा मी अडचणीत आले, संकटात सापडले, पण निदान माझ्या इच्छापूर्तीचं समाधान मी मिळवलं; आणि ही बिचारी छोटी, अति-विचारी बाई – तिच्याच्यानं एका पुरुषासाठी – तो पुरुष म्हणजे खुद्द तिचा नवराच असूनही – त्यानं बोलावून घेईपर्यन्त वर्षानुवर्षं धीर कसा धरवला असेल, तिची तीच एक जाणे !

इव्हानच्या छायाचित्रांनी भरून गेलेल्या तिच्या खोलीत तिनं माझा हात घट्ट

धरून ठेवला होता...तशीच त्या स्थितीत अंधार पडायला लागल्याची जाणीव होईपर्यंत, मी बसून राहिले...ती इव्हानबद्दल बोल बोल बोलत होती...मी निघाले, तेव्हा तिनं पुन्हा यायचं माझ्याकडून कबूल करून घेतलं – मात्र मीही तिला जेव्हा आमच्याकडे बोलावलं तेव्हा तिनं नकार दिला...अगदी उजाडल्यापासून ते रात्री उशिरापर्यंत मुलींना शिकवायचं नि त्यांच्या वह्या तपासायचं काम तिला करावं लागत होतं; आणि एका क्षणाचीही उसंत मिळत नव्हती त्यातून, त्यामुळे तिला ते शक्य नव्हतं...

...मी गाडी तर थांबवून ठेवली नव्हती, तेव्हा वेगवेगळ्या बसेसच्या मजल्या-वरून प्रवास करत मी घरी परतले. मला आठवतं – इव्हान मिरोस्की आणि त्याची ती बिचारी बायको – यांच्या वाट्याला आलेल्या दुर्दैवाचा विचार करत मी रस्ता-भर रडतच होते !...पण त्या बरोबरच माझ्या मनात एका वेगळ्या समाधानाचा दरवळ होता...माझ्या स्वतःच्या स्वतःवर चालू शकणाऱ्या सत्तेचा मला अभिमान वाटत होता...आणि आपल्याला हव्या तशा घटना आपोआप घडून येण्याच्या क्षणाची वाट पाहण्यात आयुष्य बरबाद करून, अखेर अयशस्वी ठरणाऱ्या माणसां-बद्दल तिरस्कार वाटत होता...ऐन बहरातलं यौवन किती निष्ठूर होऊ शकतं पाहा !

इथपर्यन्त रात्री झोपताना इव्हान मिरोस्कीचा फोटो नि त्याची प्रेमपत्रं उशा-गती ठेवूनच मी झोपायची – पण त्या दिवसानंतर त्या पत्रांची रवानगी एका बंद पाकिटातून ट्रंकेकडे झाली !

* * *

चेलसी स्टुडिओमधल्या वास्तव्याचा पहिला महिना संपत आला, तेव्हा हवा इतकी गरम होती, की केन्सिंग्टनमध्ये एक फर्निचरनं सज्ज असा स्टुडिओ भाड्यानं मिळत होता, तो आम्ही घेतला. इथे माझ्यासाठी एक पियानो होता, आणि आत काम करायला चांगली विस्कळ जागा होती, पण जुलै अखेर एका-एकी लंडनमधला चालू मोसम संपुष्टात आला...इकडे ऑगस्ट महिना आमच्या-समोर 'आ' वासून उभा राहिलेला... आणि कार्यक्रमांच्या मोसमांतील कमाईची शिल्लक म्हणून गाठीशी अगदीच थोडे पैसे उरलेले, अशी आमची परिस्थिती ! मग पुरा ऑगस्ट महिना आम्ही केन्सिंग्टन वस्तुसंग्रहालय आणि ब्रिटिश वस्तु-संग्रहालयातलं ग्रंथालय यातच काढला ! ग्रंथालय बंद झालं, की कितीदातरी ब्रिटिश वस्तुसंग्रहालयापासून केन्सिंग्टनमधल्या आमच्या स्टुडिओकडे आम्ही पायीपायीच येत असू.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे एक दिवस संध्याकाळीं मिरोस्कीबाईची ठेंगणी मूर्ती आमच्याकडे डोकावली. ती मला जेवायला बोलवायला आली होती. इतकी खुशीत होती ती ! माझी भेट घेतली म्हणजे तिच्या मते तिनं एक पराक्रम केला

होता! तिनं बर्गन्डीची एक बाटलीसुद्धा आमच्या जेवणासाठी मागवून घेतलीन्.

...शिकागोमध्ये पाहिलेल्या इव्हान मिरोस्कीच्या रूपाचं बरोबर वर्णन करायला, नि तो काय काय बोलत असे, ते तपशीलवार सांगायला तिनं मला विनवलं – मीही इव्हानला ती सोनसळी रानफुलं वेचायची किती आवड होती, अगि एकदा हातात ही फुलंच फुलं सावरून तो उभा असताना त्यांच्या तांबूस केसांवर सूर्याची उन्हं चकाकताना मी कशी पाहिली – अन् त्यामुळं त्याच्या स्मृतीशी या फुलांची सांगड माझ्या मनानं कशी घातली होती, वगैरे सारं काही तिला सांगितलं... ती रडत होतीच, अन् माझी आसवंही मला आवरत नव्हती...आणखी एक बर्गन्डी आम्ही संपविली...स्मृतींच्या, आठवणींच्या डोहात यथेच्छ डुंबलो... आणि मग माझा निरोप घेऊन स्टेला हाऊसला परत जाण्यासाठी बस-रस्त्यांच्या भूलभुलैयामध्ये ती शिरली!...

...सप्टेंबर आला, तसा एलिझबेथच्या नावानं एक चेक आला – न्यूयॉर्क मधल्या, तिच्या पूर्वीच्या एका विद्यार्थिनीच्या आईनं तिला प्रवासखर्चासाठी पैसे पाठविले होते. तसा तिच्या विद्यार्थिनींच्या आयांशी तिचा थोडा फार पत्र-व्यवहार होता; तेव्हा त्यापैकीच कुणी एकीनं हा चेक पाठवला – एलिझबेथनंही ठरवलं, की अमेरिकेला परत जायचं आणि थोडेसे पैसे कमवायचे – "कारण" ती म्हणाली, "मला पैसे मिळाले तर मी तुला थोडे पाठवू शकेन - आणि तुला तर आज ना उद्या लवकरच श्रीमंती नि प्रसिद्धी या दोन्ही गोष्टी मिळणार आहेतच, तेव्हा मग मला नक्कीच तुझ्याकडे परत येता येईल."

मला आठवतं, की केन्सिंग्टनच्या मोठ्या रस्त्यावरच्या एका दुकानात आम्ही गेलो, आणि एलिझबेथसाठी एक गरम प्रवासी कोट विकत घेतला. त्यानंतर तिला बोटट्रेनमध्ये बसवून देऊन उरलेली आम्ही तिघं स्टुडिओत परतलो; पण मग पुढले काही दिवस आम्हाला फारच उदास उदास वाटत राहिलं...आनंदी आणि लाघवी स्वभावाची एलिझबेथ आमच्यातून गेली होती...! ऑक्टोबरची थंड, भकास नि रुक्ष चाहूल यायला लागली होती...लंडनमधल्या धुक्याचा आमचा पहिलाच अनुभव होता; अन् दिडकीवाल्या – पेनीवाल्या–सूपच्या राजवटीत रक्त-क्षय झाल्यासारखी पिळवटलेली दिसत होतो आम्ही सारीजणं! आतापर्यंत ब्रिटिश वस्तुसंग्रहालयाचं आकर्षण देखील विरून गेलं होतं – लांबच लांब वाटायचे दिवस – आणि बाहेर निघायला मनाला उभारीच नसायची...असाच कसला तरी बनवलेला पट आणि पुठ्याचे तुकडे घेऊन आम्ही पांघरूणात गुरगुटून सोंगट्या खेळत बसत असू!

आमच्या अतर्क्य उत्साहाचं, मागे वळून पाहताना मला जसं आश्चर्य वाटतं, तसंच आश्चर्य त्या दिवसातल्या त्या नैराश्याचं, मनाच्या संपूर्ण कोसळून पडण्या-

चंही वाढल्याशिवाय राहात नाही!...कधीकधी तर असेही दिवस उगवत, की सकाळी उठून बाहेरच्या जगाला सामोरं जाण्याचं धैर्य न झाल्यानं सारा वेळ आम्ही झोपूनच राहात असू!!

शेवटी एलिझबेथचं एक पत्र आलं, अन् त्याबरोबर पैसेही! न्यूयॉर्कला पोहोचल्यावर पाचव्या रस्त्यावरच्या 'बकिंगहॅम' होटेलमध्ये ती उतरली होती– यथाकाल तिनं आपली शाळाही तिथे थाटली, आणि एकंदरीत तिचं तसं बरं चाललं होतं...ह्या बातमीनं आमच्या जिवात जीव आला...एवीतेवी स्टुडिओचं भाडं भरलेली मुदत संपुष्टात आलीच होती, तेव्हा केन्सिंग्टन चौकातलं एक लहानसं, पण फर्निचरनं सुसज्ज घर आम्ही भाड्यानं घेतलं. यामुळे तिथल्या चौकातल्या उद्यानाची चावी मिळण्याचा एक विशेष हक्क आम्हाला लाभला.

उन्हाळा अगदी रंगात आला असताना, एका रात्री रेमंड नि मी उद्यानात नाचत होतो...इतक्यात मोठी काळी हॅट घातलेली एक अत्यंत सुंदर बाई समोर आली, आणि म्हणाली, "कुठून, आलात कुठून तुम्ही इथे? पृथ्वीवरूनच की आणि कुठून?"

मी म्हटलं, "पृथ्वीशी मुळीच नातं नाही आमचं! आम्ही चंद्रावरची माणसं...!!"

"पृथ्वीवरची असा नाहीतर चंद्रावरची असा, भारीच गोड माणसं आहात तुम्ही...चलणार का माझ्याबरोबर माझ्या घरी?

आम्ही तिच्या मागोमाग केन्सिंग्टन चौकातल्या तिच्या घरी गेलो...फार सुंदर घर होतं तिचं – नि तिथे टांगलेल्या बर्न जोन्स, रोझेट्टी, वुइल्यम मॉरीस, यांच्यासारख्या चित्रकारांच्या अद्भुत सुंदर चित्रांतून चहूबाजूंनी तिची छबी प्रतिबिंबित होत होती...

श्रीमती पॅट्रिक कॅम्पबेल होती ती! तिनं आमच्यासाठी पियानो वाजवला, आणि मग जुनी इंग्लिश गाणी ऐकवली; नंतर काव्यवाचन सुद्धा झालं, अन् शेवटी मी तिच्यासमोर नाचले...ती एक पराकोटीची देखणी स्त्री होती – काळ्या केसांचा विपुल संभार, टपोरे काळे डोळे, सायीसारखी सोपस कांति, आणि कंठाची ती दैवी ठेवण! तिनं आमच्यावर अगदी मोहिनी अस्त्रच जणू सोडलं होतं...तेव्हाच्या त्या उदासीनता आणि नैराश्य यांच्या गर्तेतून आम्ही बाहेर निघू शकलो, ते केवळ या बाईची भेट झाली म्हणूनच! ही भेट म्हणजे आमच्या नशिबाच्या युगांतराची नांदीच ठरली जणू काही – कारण पॅट्रिक कॅम्पबेल बाईंना माझं नृत्य इतकं आवडलं की त्यांनी श्रीमती जॉर्ज विंडहॅम या बाईसाठी मला ओळखपत्र सुद्धा दिलं! लहानपणी कॅम्पबेल बाईंनी 'ज्युलिएट'च्या वाचनाच्या निमित्तानं कलाप्रांतांत पहिलं पाऊल टाकलं, ते विंडहॅमच्या घरी

म्हणे...श्रीमती विंडहॅमनीही माझं चांगलं स्वागत केलं. खुल्या शेकोटीपुढे बसून इंग्रजी परंपरेप्रमाणे घेतलेल्या दुपारच्या चहाचा, तो पहिलाच प्रसंग माझ्या आयुष्यातला !

...बाकी खुली शेकोटी, ब्रेड लोणी, सॅण्डविचेस्, खूप कडक चहा – आजूबाजूला पिवळसर धुकं, आणि इंग्लिश आवाजात उमटणारं ते सुसंस्कृत उच्चार वैशिष्ट्य – 'ड्रॉल' – या साऱ्या प्रकारांत काही विशेष खुमारी आहे खास ! त्यामुळे आधी मला लंडनची मोहिनीच केवळ जाणवली असेल, असं म्हटलं, तर या क्षणापासून मी लंडनच्या प्रेमातच पडले असं म्हणायला हरकत नाही !

एका स्वस्थ, सुखरूप, सुसंस्कृत नि निर्व्याज वातावरणाच्या जादूनं हे घर भारलेलं होतं. त्या जादूचा असर माझ्यावर खूपच झाला; पाण्याबाहेर तडफडणारी मासोळी पुन्हा जिथल्या तिथे पाण्यात पडावी, तसं मला वाटलं – मुळी परकेपणाच उरला नाही – आणि त्यात ते सुंदर ग्रंथालय ! त्याचं तर मला फारच आकर्षण वाटलं...

याच घरात प्रथम सुस्वभावी इंग्लिश नोकरांची अलौकिक दानत माझ्या प्रत्ययाला आली. त्यांच्या वावरण्यात त्यांचा एक खास बरंदाजपणा नि आत्मविश्वास दिसून येतो. नोकर म्हणून काम करण्यात त्यांना कमीपणा वाटत नाही, आणि अमरिकेत जशी नोकरांना सामाजिक स्तराच्या शिडीवर वर वर चढायची हाव असते – तसं इथे अजिबातच नसतं; उलट सर्वांत श्रेष्ठ, मान्यवर घराण्यातल्या परिवारासाठी काम करण्यात इथले नोकर स्वतःला धन्य समजतात. त्यांच्या वाडवडिलांनी त्यांच्या अगोदर हेच केलेलं असतं, आणि त्यांची मुलंबाळंही पुढे हेच करणार असतात. त्यांच्या या विशिष्ट वृत्तीच्या बळावर मनःशांती नि जीवनातली सुरक्षितता त्यांनी जणू आपल्या मुठीत पकडून ठेवली आहे !

विंडहॅमबाईंनी त्यांच्या दिवाणखान्यात एक दिवस संध्याकाळी माझ्या नृत्याचा कार्यक्रम घडवून आणला. लंडनमधले एकजात सारे कलावंत आणि साहित्यिक त्यावेळीं तिथे उपस्थित होते. इथेच मला असा एक माणूस भेटला, की ज्याच्या व्यक्तित्वानं माझ्या साऱ्या जीवनावर पुढे एक खोल ठसा उमटवला – मला भेटल्यावेळी तो जवळजवळ पन्नास वर्षांचा असावा. त्याचं माथं इतकं सुंदर...माझ्या आठवणीत असलेल्या अत्यंत सुंदर उत्तमांगातच त्याची गणना होऊ शकली असती ! दृष्टीत भरण्यासारख्या विशाल कपाळाखाली जरासे खोल वाटणारे डोळे; जुन्या शिल्पात आढळतं तसं अभिजात रेखीव नाक, नाजूक जिवणी, उंच सडसडीत नि खांद्यात किंचित वाकलेली अंगकाठी, पांढऱ्या केसांचा मधोमध पाडलेला भांग, कानावर येणारी केसांची कुरळी मोड, आणि चेहऱ्यावरचा कमालीचा गोड भाव ! या व्यक्तीचं नाव 'चार्लस हाले.' एका प्रसिद्ध

पियानोवादकाचे हे चिरंजीव. आश्चर्याची गोष्ट अशी, की जेवढी म्हणून तरुण तरुण मुलं तिथे होती, ती सर्व माझ्या पुढे पुढे करायला एका पायावर तयार असताना देखील, त्यांच्यापैकी एकाचंही मला आकर्षण वाटलं नाही — इतकंच काय, त्यांच्या तिथल्या उपस्थितीची सुद्धा मला जाणीव नव्हती! आणि इकडे या पन्नाशी गाठलेल्या माणसाला पाहिल्याक्षणी माझ्या मनात एक विवश भावबंध निर्माण झाला होता!

...मेरी ॲण्डरसनच्या तरुणपणी हालेचा अन् तिचा चांगलाच स्नेह होता — तेव्हा त्याच्या स्टुडिओमध्ये मला चहाला बोलावलेलं असताना 'कॉरिओलानस' मधल्या 'व्हर्जिलिया'च्या भूमिकेत मेरी घालत असलेला वेष त्यानं मला दाखवला. तिची एक पवित्र आठवण म्हणून त्यानं तो जपून ठेवला होता! त्याच्या स्टुडिओला दिलेल्या या पहिल्या भेटीपासून आमची मैत्री दृढतर होत गेली. माझे पाय त्याच्या स्टुडिओकडे वळले नाहीत, अशी काही एकही दुपार जात नव्हती. तो माझ्याजवळ बर्न जोन्सबद्दल खूप खूप बोलला. तो मुळी-त्याचा जिवाभावाचा मित्रच होता; शिवाय रोझेट्टी, बुइल्यम मॉरिस आणि राफेलपूर्व चित्रकारांच्या शैलीबद्दल, आणि व्हिसलर, टेनिसन यांच्या संबंधातही त्यानं मला खूप काही सांगितलं. या साऱ्यांनाच तो चांगलं ओळखत होता. या पूर्वसूरींच्या कलाविष्काराचा जो काही अर्थ मला लागला, त्याचं श्रेय काही प्रमाणात या प्रसन्न कलावंताच्या मैत्रीला आहे खास!... त्याच्या स्टुडिओतला माझा वेळ भारल्यासारखा, मंतरल्यासारखा भासायचा!

नवचित्रकार आपली प्रदर्शनं जिथे भरवायचे, त्या 'न्यू गॅलरी'चा चार्लस हाले हा त्यावेळीं एक संचालक होता. ते छोटं प्रदर्शनालय फारच आकर्षक होतं. त्याच्या मधोमध एक चौक, आणि चौकात एक कारंजं होतं. तिथे माझ्या नृत्य-प्रदर्शनाची योजना करावी अशी चार्लस हालेला कल्पना सुचली. त्यानं मग माझी त्याच्या मित्रांशी ओळख करून दिली. सर बुइल्यम रिचमंड चित्रकार, श्री. अँड्र्यू लॅन्ग आणि सर ह्युबर्ट पॅरी हे संगीत रचनाकार — ह्या सर्वांनी एका परिसंवादाच्या रूपानं माझ्या कार्यक्रमाला हातभार लावण्याचं कबूल केलं. सर बुइल्यम रिचमंड यांचा विषय : 'चित्रकला नि नृत्यकला यांचे परस्परसंबंध;' ॲन्ड्र्यू लॅन्ग यांचा : 'ग्रीक पुराणे आणि नृत्यकला;' आणि सर ह्युबर्ट पॅरी यांचा विषय : 'संगीत आणि नृत्य' — असं ठरलं.

दुर्मिळ जातीच्या झाडाफुलांनी, आणि तालवृक्षाच्या बांधीव ओवऱ्यांनी वेढलेल्या कारंज्याभोवती मी नाचायची... हे सर्व कार्यक्रम कमालीचे यशस्वी झाले. वृत्तपत्रांनी मला उचलून धरलं होतं, आणि चार्लस् हाले तर माझ्या यशानं अत्यंत हर्षभरित झालेला होता. लंडनमधल्या नाव घेण्याजोग्या प्रत्येक

व्यक्तीकडे मला चहाचं किंवा जेवणाचं आमंत्रण असायचं... ते काही थोडे दिवस नशिबाची आमच्यावर कृपादृष्टीच होती असं म्हटलं पाहिजे!

एके दिवशी दुपारी श्रीमती रोनॉल्डबाईच्या छोट्या घरातल्या गर्दीगर्दीतल्या स्वागतसमारंभाच्या वेळी मला भावी राजे एडवर्ड – अर्थात तेव्हाचे प्रिन्स ऑफ वेल्स – यांच्यापुढे ओळख करून देण्यासाठी नेण्यात आलं. "हे तर मूर्तिमंत 'गेन्जबरह्' सौन्दर्य आहे!" – ते उद्गारले! आणि ह्या नामाभिधानानं लंडनच्या समाजातल्या माझ्या विषयीच्या साधारणपणे वाढत्या औत्सुक्यात चांगलीच भर पडली.

आता परिस्थिती जराशी सुधारल्यानं, आम्ही वॉरिकशायरमध्ये एक मोठा स्टुडिओ घेतला; आणि तिथे 'नॅशनल गॅलरी'तल्या इटालियन कलेच्या आस्वादातून उद्भवलेल्या नवजात कल्पनेला 'साक्षात्' करण्याच्या प्रयत्नात माझे दिवस जाऊ लागले;... पण मला वाटतं, की त्यावेळी बर्नजोन्स आणि रोझेट्टी यांच्याही कलेचा माझ्यावर दाट पगडा होता.

याच सुमाराला ऑक्सफर्डहून नुकत्याच आलेल्या मृदु आवाजाच्या आणि स्वप्नाळू डोळ्यांच्या एका तरुण कविराजांनी माझ्या जीवनात पाऊल टाकलं. तो स्टुअर्ट घराण्यातल्या वंशावळीतला होता... त्याचं नाव 'डग्लस एन्स्ली' होतं. काखेत तीन चार मोठे ग्रंथ घेऊन दररोज संध्याकाळी दिवस मावळायच्या सुमाराला तो स्टुडिओत यायचा; आणि स्विनबर्न, कीटस्, ब्राऊनिंग, रोझेट्टी आणि ऑस्कर वाइल्ड, यांचं काव्य वाचून दाखवायचा. मोठ्यानं वाचन करायची त्याला खूप हौस होती, अन् मीही त्याच्या वाचनावर बेहद्द खूष होते. अशा वेळी तिथे थांबून आमच्यावर लक्ष ठेवण्याची फार जरूरी आहे, असं बिचाऱ्या आईला वाटायचं; अन् तसं म्हटलं तर तिला ते काव्य आवडायचंही खूप...मात्र ऑक्सफर्डची काव्यवाचनाची पद्धत काही तिला उमजायची नाही... मग तासाभरानं, नि विशेषतः वुइल्यम मॉरिसच्या काव्याच्या वाचनानं तर तिला झोपच लागायची.. आणि तशी ती झोपली की हे तरुण कविराज पुढे व्हायचे, आणि माझ्या गालाचं हळुवार चुंबन घ्यायचे!

ह्या मैत्रीनं मला तृप्त केलं होतं; तेव्हा एन्स्ली आणि चार्लस् हाले या दोघांखेरीज इतर मित्रांची मला आवश्यकता भासत नव्हती–सर्वसामान्य तरुण पोरांचा तर मला फार कंटाळा यायचा–खरं म्हणजे लंडनमधल्या दिवाणखान्यातून ज्यांनी मला नृत्य करताना पाहिलं होतं, असे पुष्कळ युवक आजूबाजूला होते. ते सर्व माझ्याकडे मोठ्या आनंदानं आले असते–किंवा मला बाहेर घेऊन जायला एका पायावर तयार झाले असते...पण माझं वागणं असं काही उच्चभ्रू शिष्टपणाचं असे, की ते सारेजण जागच्या जागी थिजून जात!

चार्लस् हाले कॅडोगन रस्त्यावर एका छोट्या जुन्या बंगल्यात राहायचा. त्याच्याबरोबर राहणारी त्याची अविवाहित बहीण भारी गोड स्वभावाची होती. माझ्याशी तीही फार प्रेमानं वागायची, आणि कितीदा तरी अनौपचारिक जेवणाचे लहानसहान बेत आखून ती मला बोलवायची. आम्ही तिचेच टेबलाभोवती असू जेवायला. हाले आणि त्याची बहीण यांच्याबरोबरच मी हेन्री आयरविंग आणि एलन टेरी यांना बघायला पहिल्यांदा गेले. आयरविंगला मी प्रथम ' द बेल्स 'मध्ये पाहिलं. त्याच्या महान् कलेच्या दर्शनानं मी इतकी उचंबळून नि भारावून गेले, की पुढे कितीतरी दिवस त्याचंच चिंतन माझ्या मनात चाललं होतं...आठवडेच्या आठवडे माझा डोळ्याला डोळा काही लागला नाही ! एलन टेरीबाबत सांगायचं, म्हणजे त्या वेळेपासून ती माझ्या जीवनाचा आदर्श बनून राहिली, नि आजवरही तशीच आहे...आणि आयरविंगचं म्हणाल तर, आयरविंगला आधी किंवा कधी पाहिलेलंच नाही, अशांपैकी कुणीही, त्याच्या कलाविष्काराच्या थरारून टाकणाऱ्या सौन्दर्याची, किंवा त्याच्या भावाभिनयातल्या उत्तुंगतेची कल्पना करू शकणार नाही ! त्याच्या वेधक बुद्धिमत्तेचं आणि नाट्यगुणांचं वर्णन करणं तर अशक्यच आहे. त्याच्या प्रतिभेचा प्रभाव असा विलक्षण की त्या प्रकाशात त्याचे दोषही कौतुक करण्यासारख्या गुणपदवीला पोहोचत. त्याच्या व्यक्तिमत्वात डान्टेच्या प्रतिभेचा आणि राजतेजाचा काहीतरी अंश होता खास !

...उन्हाळ्यात एकदा चार्लस हाले मला वॉट्स या श्रेष्ठ चित्रकाराला भेटायला घेऊन गेला; मग तिथे त्याच्या बागेत मी नृत्य केलं. त्याच्या घरात एलन टेरीचा अतर्क्यसुंदर चेहरा अनेक चित्रांतून पुनःपुन्हा रेखाटलेला मला दिसला. आम्ही बागेत बरोबर हिंडत असताना त्याची कला नि जीवन यांबद्दल खूप खूप सुंदर गोष्टी त्यानं मला सांगितल्या.

एलन टेरी त्यावेळीं आपल्या वैभवशाली स्त्रीत्वाच्या अगदी पूर्ण रूपात तळपत होती ! वॉटस्च्या कल्पनाशक्तीला आव्हान देणारी एकाकाळची उंच नि सडसडीत बांध्याची तरुणी काही ती या वेळेपर्यंत राहिली नव्हती. भरदार वक्षस्थळ, उभार नितम्ब नि एकप्रकारची राजेशाही अस्मिता – म्हणजे सध्याच्या आदर्शाच्या कल्पनेच्या अगदी विरुद्ध होतं तिचं सर्व काही. आजकालच्या प्रेक्षकांनी एलन टेरीला तिच्या उत्कर्षावस्थेत पाहिलं असतं, तर बहुधा तिच्यावर जेवण्याखाण्यातल्या नियंत्रणाचा, पथ्यपाण्यासारख्या उपायांचा नि उपदेशाचा पाऊस पडला असता !... मी मात्र थोडसं धाडस करून असं स्पष्टपणे म्हणते की, आजकालच्या आपल्या नट्यांप्रमाणे कृश नि कृत्रिमपणे तरुण दिसण्याच्या प्रयत्नांत तिनं वेळ घालवला असता, तर भावप्रकटनांतल्या तिच्या त्या अलौकिकतेला नक्की काही तरी इजा पोहोचली असती ! ती कधीही लहान दिसली नाही;

– कुठंही दिसली नाही; पण स्त्रीत्वाची ती एक फारफार सुंदर प्रतिमा होती, यांत काहीच शंका नाही !

अशा तऱ्हेनं लंडनमध्ये त्यावेळच्या अगदी निवडक नि उच्च समजल्या जाणाऱ्या बुद्धिमन्तांच्या नि कलावंतांच्या सहवासात मी वावरले...हिवाळा मागे पडू लागला, तसतशी सीझनमधल्यापेक्षा कार्यक्रमांची संख्या बरीच कमी व्हायला लागली; तेव्हा मग मी 'बेन्सन' यांच्या कंपनीत गेले – थोड्या दिवसांसाठी. मात्र तिथं 'मिडसमर नाईट्स् ड्रीम' मधल्या पहिल्या परीचं काम करण्यापलीकडे माझी मजल कधी गेलीच नाही. नाट्यव्यावसायिकांना माझ्या नृत्याचा काहीच उमज तरी पडत नसावा, किंवा त्यांच्या नाट्यनिर्मितीला माझ्या कल्पना कशा उपयोगी आणि फायदेशीर ठरतील, याची समज तरी त्यांना नसावी असं दिसत होतं; पण रीनहार्ड, गेमियर वगैरे 'ॲडव्हान्स गार्ड ऑफ द थिएटर' (म्हणजे नाट्यक्षेत्रातली 'तथाकथित' आघाडीची मंडळी) च्या तर्फे सादर केल्या गेलेल्या, माझ्या नृत्यप्रणालीच्या हीन आवृत्त्या पुढे किती निघाल्या, हे लक्षात घेतलं, की हा सारा प्रकार इतका अतर्क्य वाटतो की, काय सांगू !

एक दिवस माझी लेडी (त्यावेळी श्रीमती) ट्री हिच्याशी ओळख झाली. तालमीच्या वेळी एकदा मी तिच्या रंगपटातल्या खोलीत गेले – तिनं खूप अगत्य दाखवलं तेव्हा मला – पण मग तिच्याच सूचनेप्रमाणे, माझा नृत्यवेष चढवून मी वीरबोम ट्री साहेबांच्या समोर नाचायला म्हणून तिच्याबरोबर रंगमंचावर गेले – मेंडेलझोनचं 'वसन्तसूक्त' नाचले, तरी त्यानी मात्र, माझ्याकडे पाहिलं देखील नाही; उलट लक्ष नसल्यासारखं कुठंतरी रंगमंचाच्या झालरींकडेच ते दृष्टि लावून बसले होते. पुढे मॉस्कोत एका मोठ्या मेजवानीच्या प्रसंगी हातात मद्याचा पेला घेऊन त्यांनी मला 'जगातली एक महान् कलावती' म्हणून गौरवून माझं शुभचिन्तन केलं, तेव्हा ह्या गोष्टीची मी त्यांना आठवण करून दिली !

ते उद्गारले, "काय म्हणतेस काय ? तुझं नृत्य, तुझं सौन्दर्य, तुझं यौवन मी पाहिलं आणि तरीही मी थंडच राहिलो, तुझं कौतुक केलं नाही म्हणतेस ? वाः ! म्हणजे माझ्यासारखा मूर्ख मीच असलो पाहिजे !...आणि आता – आता फार उशीर झालाय् – फार फार उशीर झालाय्... !"

"छे, फार उशीर कोणत्याच गोष्टीला होत नसतो जगात" मी म्हटलं... त्या क्षणापासून पुढे त्यांनी माझं अपार कौतुक केलं...पण त्याबद्दल मी नंतर सांगेन...

खरं सांगायचं म्हणजे त्यावेळी एका गोष्टीचा मला काही केल्या उमज पडत नव्हता. तसं पाहिलं तर लंडनमध्ये मला भेटलेल्या ॲन्ड्र्यू लॅन्ग, वॉट्स्, सर एडविन आर्नोल्ड, ऑस्टिन डॉब्सन, चार्लस् हाले, या साऱ्या रथीमहारथींना

धरून एकजात साऱ्या चित्रकार आणि कवी लोकांच्या मनात माझ्याबद्दलच्या उत्साही कौतुकाची एकच लाट निर्माण झालेली होती; असं असूनही नाट्य-व्यवसायाचे संचालक मात्र माझ्या बाबतीत अगदी निर्लेप, निर्विकार कसे राहिले होते कोण जाणे! जणु काही त्यांच्या नाट्यकलेच्या ढोबळ, ठोस, व्यवहारी कल्पनेच्या मानानं माझ्या कलेचं स्वरूप फारच आध्यात्मिक, अन्तर्मुख होतं!

.. सबंध दिवसभर मी स्टुडिओत कामात व्यग्र असे. संध्याकाळकडे ते कविराज तरी काव्यवाचन करायला यायचे, किंवा आमचे चित्रकार तरी मला बाहेर घेऊन जायचे; नाहीतर माझं नृत्य पहात बसायचे. त्या दोघांत भयंकर वैर निर्माण झालेलं असल्यानं कधीही एकाच वेळी येऊन न ठेपायची ते काळजी घ्यायचे! कविराज म्हणायचे की, "त्या म्हाताऱ्याबरोबर इतका वेळ घालवणं तुला शक्य होतं, ही गोष्टच मुळी माझ्या समजेपलीकडची आहे!" चित्रकारानं म्हणायचं, "तुझ्या सारख्या बुद्धिमान् मुलीला त्या बुद्धूच्या सहवासात काय मिळतं एक देवच जाणे!" मला मात्र या दोन्ही तऱ्हेच्या मैत्रीत सारखंच सुख वाटत होतं – आणि माझ्या मनाचा निश्चय होऊ शकत नव्हता, की कुणावर माझं अधिक प्रेम आहे!...रविवार मात्र हालेसाठीच राखून ठेवलेला असायचा. त्या दिवशी आम्ही हालेच्या स्टुडिओमध्ये स्ट्रासबर्ग चे प्रसिद्ध 'पते दै फ्वा ग्रा' (एकप्रकारच्या बदकाच्या कलेजांची पेस्ट) शेरी आणि हालेनं स्वतः बनवलेली कॉफी, यांचा दुपारच्या जेवणाच्या निमित्तानं आस्वाद घेत असू.

एक दिवस त्यानं सेरी ॲण्डरसनचा तो प्रसिद्ध नृत्यवेष चढवायची मला परवानगी दिली...आणि त्या वेषभूषेत त्यानं कितीतरी पोझेसमधे माझी रेखा-चित्रं काढली.

...अशा तऱ्हेनं हिवाळ्याची सांगता झाली!

# ८

आमच्या आय-व्ययाचा व्यवस्थित मेळ कधीच बसला नाही, आणि सदोदित तुटीचंच अर्थकारण असलं, तरी एकंदरीनं हा काळ आमच्या लेखी काहीसा स्वास्थ्याचा होता –; पण याच 'स्वस्थ' वातावरणामुळे रेमंडला 'अस्वस्थ' वाटायला लागलं! तो पॅरिसला गेला, अन् वसंतात तर पॅरिसला निघून येण्याबद्दल त्याच्या आम्हाला तारावर तारा यायला लागल्या – तेव्हा मग एके दिवशी आईनं आणि मी आमचं सारं बिऱ्हाडबाजलं आवरलं, आणि चॅनल बोट पकडली –

...लंडनचं धुकं मागं टाकून, वसंत ऋतूतल्या एका सकाळीं आम्ही शेर-बुर्गला येऊन पोहोचलो. फ्रान्स एखाद्या बगिच्यासारखंच वाटलं प्रथमदर्शनी – त्यामुळे शेरबुर्ग ते पॅरिसच्या प्रवासात आमच्या तिसऱ्या वर्गाच्या डब्याच्या खिडकीतून ओणवून आम्ही एकदा बाहेर काढलेली डोकी शेवटपर्यंत बाहेरच राहिली होती!...रेमंड स्टेशनवर आला होता. त्यानं त्याचे केस कानावरून लांब वाढवले होते...खाली वळलेली कॉलर आणि उडता टाय होता...त्याचा हा कायाकल्प पाहून आम्ही जराश्या चकितच झालो होतो – पण रेमंडनं सांगितलं की, तो जिथे राहत होता, त्या लॅटिन क्वॉर्टरमध्ये हीच फॅशन होती...मग त्याच्या राहत्या जागी आम्हाला त्यानं नेलं...गेल्या गेल्या जिन्यावरून पळत खाली चाललेली ठेंगणीठुसकी दुपारची 'मेड'–मोलकरीण आम्हाला दिसली...त्यानंतर पुरी बाटली उघडून रेमंडनं भरपूर 'रेड वाईन' – लाल मद्य – पाजलं आम्हाला. रेमंडच्या मते तीन सेंटाईम्सना हे मद्य मिळायचं त्यावेळीं. मद्यपानानंतर मात्र आम्ही एखाद्या स्टुडिओच्या शोधात निघालो. रेमंडला फ्रेंच भाषेतले

केवळ दोन शब्द माहीत होते; तेव्हा ' शेर्शे आतेलिए ' ( स्टुडिओ शोधणे — स्टुडिओच्या शोधात ) असं म्हणत म्हणत आम्ही रस्तोरस्ती फिरत होतो ! पण आम्हाला हे माहीत नव्हतं की फ्रान्समध्ये ' आतेलिए ' म्हणजे स्टुडिओच असं नाही, तर कुठल्याही तऱ्हेचं छोट्यामोठ्या यांत्रिक कामासाठी वापरलं जाणारं 'वर्कशॉप' सुद्धा ! शेवटी संध्याकाळ टळता टळता एका आवारात आम्हाला एक स्टुडिओ आढळला — तोसुद्धा फर्निचरसकट महिना पन्नास फ्रॅन्क्स् एवढ्या अतर्क्य भाड्यात ! आम्ही भलतेच खुळलो आणि एक महिन्याचं आगाऊ भाडंही देऊन मोकळे झालो ! तो स्टुडिओ इतका स्वस्तात का मिळाला होता, त्याचं कारण आमच्या लक्षात आलं नव्हतं, ते रात्री कळून चुकलं ! ! दिवसभरानंतर आम्ही विश्रांती घ्यायच्या तयारीत असताना भूकंपाच्या भयंकर धक्क्यांनी गद्‌गदावा तसा स्टुडिओ हादरायला लागला...जणू काही ती पुरी वास्तू हवेत फेकली जाऊन पुनः भुईसपाट आदळत होती...अन् हा प्रकार एकसारखा चालला होता...शेवटी हे काय प्रकरण असावं, ते बघायला रेमंड खाली गेला, तेव्हा त्याला कळलं की रात्रपाळी करणाऱ्या छापखान्याच्या वर आमचा हा स्टुडिओ होता...म्हणूनच तर स्टुडिओचं भाडं एवढं कमी होतं ! ह्या प्रकारामुळं आमच्या उत्साहावर थोडंफार विरजण पडलं खरं — पण तरी त्या काळात पन्नास फ्रॅन्क्सची आम्हाला खूपच किंमत होती — तेव्हा मला एक शक्कल सुचली...मी म्हटलं की ' हा आवाज समुद्राच्या गाजेसारखा आहे...तेव्हा आपण अशी कल्पना करूया, की आपण सारे समुद्रकिनारी राहतोय् — बस् ! '

तिथे रखवाली करणारी बाई आमचं जेवणाचं पहायची. पंचवीस सेंटाईम्स-मध्ये दुपारचं जेवण आणि प्रत्येकी एक फ्रॅन्कमध्ये रात्रीचं जेवण — मद्या-सकट ! सलाद ( — काकडी टोमॅटो — लेट्युस सलाद पत्ती . . इ. ) चा वाडगा घेऊन ती यायची आणि शिष्टाचार संभाळून किंचित हसून " सलाद थोडं वर खाली करून घ्यायला हवं साहेब, बाईसाहेब . . थोडं हलवून वर खाली सारखं करून घ्यायला हवं . ." असं पुटपुटायची. . .

. . मी आले म्हटल्यावर त्या ' मेड 'चा नाद सोडून देऊन रेमंड आपला सारा वेळ माझ्या कारणी लावू लागला. पहाटे पाच वाजल्यावाजल्या उठायचं . . ' आपण पॅरिसमध्ये आहोत ' या जाणिवेनं उत्साहाचं वारं असं काही अंगात संचारलं होतं, की दिवसाची सुरुवात मुळीं ' लक्झेम्बर्ग ' उद्यानात नाचत नाचत व्हायची . . त्यानंतर मग साऱ्या पॅरिसभरची पदयात्रा . . अन् 'लूव्हर ' मध्ये तर तासन्‌तास...! रेमंडनं केलेल्या ' ग्रीक व्हाजेस ' ( फुलदाण्या ) च्या रेखाटनांचा संग्रह आधी पुष्कळ मोठा होताच . . अन् शिवाय पहारेकऱ्यांना आमचा संशय यावा, इतका वेळ आम्ही त्या ' ग्रीक व्हाजेस ' च्या दालनात

घालवत होतो. शेवटी खाणाखुणांनी मी पहारेकऱ्याची समजूत पटवली — म्हटलं की! मला फक्त नाचायचं आहे . . नाचायलाच केवळ मी इथे येते ! ' तेव्हा कुठे मग, 'निरुपद्रवी वेड्यापिरांशी आपली गाठ पडलीय् ,' असं समजून त्यानं आमचा नाद सोडला ! . . . त्या सेगवलेल्या जमिनीवर बैठक मारून आम्ही तासन्तास इकडून तिकडे तिकडून इकडे करत खालचे खण न्याहाळत होतो; किंवा चवड्या-वर उभं राहून " बघ, बघ इथं ' डायनिसस ' आहे," नाहीतर " इकडे ये; इथं आपल्या मुलांची हत्या करणारी ' मिडिआ,' आहे " असं म्हणत होतो . . .

कितीतरी दिवस आम्ही ' लूव्हर ' ला पुन्हापुन्हा परतून येत होतो...आणि ते बंद व्हायच्या वेळेस मोठ्या मिनतवारीनं बळेबळेच बाहेर पडत होतो — आमच्या-कडे ना पैसा होता, ना पॅरिसमध्ये आमची कुणी मित्रमंडळी होती . . पण आम्हाला दुसरं काही नकोच होतं . . ' लूव्हर ' हाच आमचा स्वर्ग होता ! . . . त्यावेळी तिथे ज्यांनी आम्हाला पाहिलं होतं असे काही लोक पुढे मला पुनः भेटलेही. . . माझा तो पांढरा पोशाख अन् 'लिबर्टी' हॅट. . . आणि रेमंडची मोठी काळी हॅट, उघडी कॉलर आणि उडता टाय. . . लोकांच्या मते आम्ही दोघं जरा चमत्कारिकच दिसत होतो — आयुष्याच्या अगदी नव्हाळीत असलेले पण मनानं ' लूव्हर ' मध्ये अगदी पूर्ण गुंतून पडलेले ! ' लूव्हर ' बंद झाल्यानंतर संध्या-काळी ' त्युइलरी ' उद्यानातल्या शिल्पाकृतींच्या समोरून रेंगाळत रेंगाळत आम्ही परतत असू. . .आणि मग पांढरे वाटाणे, सलाद आणि रेड वाईन-लाल मद्य— . . .असं जेवण ! बस् ! एवढ्यावर इतर कुणाहीसारखे आम्हीही सुखात होतो. . . आनंदात होतो !

रेमंडचं आपल्या पेन्सिलीवर चांगलंच प्रभुत्व होतं, त्यामुळे काही थोड्या महि-न्यांच्या अवधीतच 'लूव्हर' मधील सर्व ग्रीक व्हाजेसच्या प्रतिकृती त्याच्या वहीत साकारल्या होत्या. . .शिवाय त्याच्या या संग्रहात काही छायालेख (सिलुएट्स्) ही होते. . . पुढे छापील स्वरूपात ते छायालेख ग्रीक प्रतिकृतींचेच होते, असा सर्वांचा समज झाला . . .पण खरं म्हणजे मी नग्नावस्थेत नृत्य करत असताना, रेमंडनंच काढलेल्या माझ्या छायाचित्रावरून ते आलेख रेमंडनं रेखाटले होते !

' लूव्हर ' खेरीज ' क्ल्यूनी ' वस्तुसंग्रहालय, ' कार्नाव्हाले ' वस्तुसंग्रहालय, ' नोत्रदाम, ' आणि पॅरिसमधल्या झाडून साऱ्या संग्रहालयांना आम्ही भेटी दिल्या. त्यात ऑपेरा समोरच्या ' कार्पो समूहा 'नं नि ' आर्क द त्रिओम्फ ' वरच्या 'द रूयद' यांनी मी विशेष प्रभावित झाले होते. . .तिथलं एकही स्मारक असं नव्हतं, की ज्यापुढे आदरमिश्रित कौतुकानं, भक्तिभावानं आम्ही उभे राहिलो नाही ! ज्या संस्कृतीचा मागोवा घेत घेत आम्ही — दोन अमेरिकन तरुण जीव—धडपडत इथपर्यंत आलो होतो, तिच्या साक्षात् दर्शनानं आमची मनं

उचंबळून आली नाहीत, तरच नवल !

...वसंतऋतूचं बघता बघता ग्रीष्मात रूपांतर झालं...याच सुमाराला इ. स. एकोणीसशेच्या त्या भव्य प्रदर्शनाचं उद्‌घाटन झालं; त्यामुळे एक दिवस उजाडता-उजाडताच हाले ' र्‍यू दे ला गेते 'च्या माझ्या स्टुडिओत उगवला – ! त्याला पाहून मला जेवढा आनंद झाला, तेवढंच रेमंडला कठीण वाटलं ! हाले ते प्रदर्शन पहायलाच आला होता; तेव्हा मी सतत त्याच्या बरोबरच असे; आणि खरंच ! त्याच्यापेक्षा गोड स्वभावाचा नि बुद्धिमान् मार्गदर्शक 'गाईड' मला दुसरा कुणीतरी मिळाला असता का ?...दिवसभर आम्ही तिथे प्रदर्शनातल्या इमारतीतून आत-बाहेर करत होतो – हिंडत होतो; संध्याकाळी मग आयफेल मनोऱ्याच्या तिथे जेवायचं. हाले म्हणजे प्रेमळपणाची साक्षात् प्रतिमाच होती...थकल्यासारखं झालं की तो मला झुलत्या खुर्चीत बसवायचा...आणि थकवा तर मला कितीदा तरी यायचा. कारण त्या प्रदर्शनात बडलेलं कलादर्शन ' लूव्हर ' मधल्यासारखं दर्जेदार नि बरोबरीचं वाटलंच नाही मला !...तरी पण एकप्रकारे मी मजेत होते; ...कारण पॅरिसवर माझं मन जडलं होतं आणि हालेही मला फारच प्रिय होता.

दर रविवारी ' व्हर्साय 'च्या उद्यानात फिरण्यासाठी किंवा ' सँ जेर्मां 'च्या रानावनातून भटकण्यासाठी आगगाडी पकडून आम्ही शहराबाहेर धाव घेत असू. मी रानात त्याच्या पुढ्यात नाचायची...आणि तो माझी रेखाचित्रं काढायचा – सारा उन्हाळा हा असा गेला मजेत...रेमंड आणि बिचारी आई यांना अर्थातच तो तितकासा सुखद वाटला नाही !

एकोणीसशे सालच्या त्या प्रदर्शनाची एक सुंदर आठवण माझ्या मनावर ठसली आहे. जपानची करुण-रस-प्रवीण नर्तिका ' सादी याक्का ' हिचं नृत्य ! रात्रीमागून रात्री मी आणि चार्लस् हाले त्या कारुण्यमूर्ती कलावतीचं नृत्य पहात होतो, नि आमची मनं प्रत्येकवेळी तेवढीच हर्षनिर्भर होत होती...!

...आठवता आठवता आता असं वाटतं, की सादी याक्काच्या नृत्याखेरीज त्या प्रदर्शनातल्या आणखी एका गोष्टीनं मी – जरा जास्तच प्रमाणात म्हटलं तरी चालेल – खूप भारावून गेले होते; होते का ? आहे ! कारण आयुष्यभर त्या स्मृतीचं भान मी उराशी जपून ठेवलं आहे ! ते ' रोदां ' दालन ! – त्या अद्‌भुत प्रतिभेच्या शिल्पकाराच्या समग्र कलाकृतींचं अगदी प्रथमच जनतेसमोर मांडलं गेलेलं ते खुलं प्रदर्शन ! त्या दालनात पाऊल टाकल्याक्षणी मी त्या महान् कलामहर्षीच्या शिल्पांसमोर अवाक् होऊन उभी राहिले !...तसं पाहिलं तर रोदांची माझी प्रत्यक्ष ओळख मुळीच नव्हती...पण त्याच्या कलेतून एका संपूर्णतया नव्या विश्वाचा साक्षात्कार झाला मला...मी गेल्यावेळी प्रत्येकदा, " डोकं कुठंय् त्याचं ? " किंवा " तिचा हात कुठंय् ? " असले काहीतरी अडाणी अनपढ लोकांचे प्रश्नोद्गार

कानावर पडायचे माझ्या...मग मला इतकी चीड यायची की काही वेळा तिथल्या तिथे वळून मी त्या लोकांना चांगली झाडत असे...त्यांचा चांगला खरपूस समाचार घ्यायची मी. मी म्हणे..." ही काही ती प्रत्यक्ष वस्तू नाही. हे आहे त्या वस्तूचं प्रतीक – जीवनातल्या श्रेयध्येयाबद्दलची ही एक कविकल्पना आहे...कसं समजत नाही तुम्हाला ! "

...पुढे हिवाळ्याची चाहूल लागली, आणि प्रदर्शनाचे तर शेवटचेच थोडे दिवस राहिले. चार्लस् हालेला लंडनला परत जाणं भाग होतं...पण मग जाण्यापूर्वी त्यानं 'चार्लस् नूफ्लार' नावाच्या त्याच्या भाच्याशी माझी ओळख करून दिली. जाताना हाले त्याला म्हणाला, "बघ, – इझाडोराला मी तुझ्या हवाली करतोय् – तुझ्या भरवशावर सोडतोय् ! " नूफ्लार एक पंचविशीतला तरुण होता – थोडा फार छंदीफंदी, जरा ज्यादाच माणूस म्हणायचा ! पण त्याच्या हवाली केल्या गेलेल्या या छोट्या अमेरिकन पोरीच्या निरागसतेनं त्याला संपूर्णतया मोह पाडला होता. त्यानं माझा फ्रेंच कलेच्या आस्वादाचा अभ्यास पुरा करून घेण्याचा विडाच उचलला जणू ! अर्थात् मग 'गोथिक' कलेची माहिती आणि त्या निकषावर तेरावा, चौदावा, पंधरावा अन् सोळावा लुई, या फ्रेंच राजांच्या कारकीर्दीतल्या कलायुगाच्या रससमीक्षणाचा पहिलाच अनुभव... हे सारं ओघानंच आलं...

'र्‍यू दे ला गेएते' मधला आमचा स्टुडिओ आम्ही कधीच सोडला होता; आणि उरल्या सुरल्या नगण्य शिलकीची बाजी लावून 'आव्हन्यू ले वीलिये 'मध्ये एक मोठा स्टुडिओ घेतला. रेमंडनं या स्टुडिओची केलेली सजावट अगदी निखालस आगळीवेगळी होती ! हलक्या पातळ पत्र्याच्या गुंडाळ्या करून गॅसच्या नळ्यांच्या तोंडावर त्यानं बसवल्या; त्यामुळे पत्र्यातून मधून मधून प्रखर ज्वाला बाहेर पडत राहिल्यानं रोमन मशालींचा परिणाम जरी साधला, तरी गॅसची बिलं मात्र आमची भरमसाठ वाढायला लागली !

याच स्टुडिओतल्या आमच्या वास्तव्यात माझ्या आईची संगीताची जुनी ओढ पुनः वर उफाळून आली – अन् आमच्या लहानपणी चालायचं, तसं शोपां, शूमान, बिथोवन, यांचं संगीत ती तासन्तास वाजवू लागली. न्हाणी, किंवा झोपायची खोली, अशी स्वतंत्र काहीं व्यवस्था आमच्या स्टुडिओत नव्हतीच... पण रेमंडनं सर्व भिंतींवर 'ग्रीक कॉलम्स' (स्तम्भ) च्या प्रतिकृतींचा साज चढवला...आणि एकाद–दोन कोरीव काम केलेली कपाटं आमच्याकडे होती, त्यातच आम्ही आमच्या झोपायच्या गाद्या वगैरे ठेवून दिल्या...रात्री त्या गाद्या कपाटातून खाली काढायच्या नि त्यावर झोपायचं ! याच सुमाराला रेमंडच्या डोक्यातून त्या नव्या, पट्ट्याच्या 'सॅंडल्स'ची कल्पना निघाली...कारण कोणत्याही

तऱ्हेचा 'बूट' हा अगदी टाकाऊच – 'किळसवाणा' म्हणावा एवढा तिरस्करणीय – असा निष्कर्ष त्यानं काढला होता !...नाहीतरी त्याचा मेंदू संशोधकाचाच होता; त्यामुळे अर्धीपाऊण रात्र तो स्वतःच्या अभिनव कल्पना प्रत्यक्षात आणण्याच्या नादात टाकठोक करतच घालवायचा – आणि इकडे मी आणि माझी गरीब बिचारी आई, कुठंतरी पेट्यापेटाऱ्यावर लवंडून देऊन कशीबशी शक्य तेवढी झोप घेण्याचा प्रयत्न करत असू !

चार्लस् नूफ्लार आमच्याकडे वारंवार यायचा. एक दिवस तो आपल्या दोघा मित्रांनाही आमच्या स्टुडिओत घेऊन आला. सुरेख चेहऱ्या-मोहऱ्याचा तरुण 'ज्याक् बोन्यी,' आणि 'आन्द्रे बोनिये' नावाचा एक साहित्यिक युवक. नूफ्लारला माझा अतिशय अभिमान होता; त्यामुळे आपल्या मित्रमंडळींना 'अमेरिकन व्यक्तिमत्वाचा एक अजब, अतर्क्य नमुना' म्हणून माझी ओळख करून द्यायची आणि मला त्यांना भेटवायची, त्याला भारी हौस वाटे. त्यांना माझं नृत्य दाखवणं मग ओघानंच आलं. त्यावेळी शोपांच्या संगीतप्रस्तावांचा, आणि त्याच्या 'वाल्झ आणि 'माझूर्का' चा माझा अभ्यास चाललेला होता ...माझी आई पियानो फारच छान वाजवायची...स्वरांवरून फिरणाऱ्या तिच्या बोटांचा स्पर्श पुरुषवादकांच्यासारखा धीट नि स्थिर होता...एक प्रकारची भावशीलता नि अंतःप्रेरणा तिच्या वादनातून झिरपत असायची...मला साथ करण्यांत ती सहज तासन्तास व्यतीत करत असे !...

याच सुमाराला ज्याक् बोन्यीच्या मनात एक कल्पना उगवली...त्यानं त्याची आई 'मादाम दे सॉं मार्सो'–'मार्सो' या प्रसिद्ध शिल्पकाराची पत्नी–हिच्या करवी त्यांच्या स्नेहीमंडळींसाठी माझ्या नृत्याचा रंग जमवायचं ठरवलं !

मादाम दे सॉं मार्सोंचा दिवाणखाना पॅरिसमधलं एक अत्यन्त कलात्मक आणि सज्जाविशिष्ट कलादालन समजलं जात होतं; तेव्हा तिथे तिच्या यजमानांच्या स्टुडिओमध्येच माझ्या तालमीची व्यवस्था झाली...पियानोवर साथ करणाऱ्या वादकाचं व्यक्तिमत्त्व विलक्षण वेधक होतं....अन सुरांची पखरण करणारी त्याची बोटं तर जादूगाराचीच असावीत...क्षणार्धात मी त्याच्याकडे आकृष्ट झाले...!

"अहा ! कसलं देखणेपण हे...कसला गोडवा...किती सुंदर पोर ही !" असे उद्गार काढता काढता मला बाहूपाशात घेऊन फ्रेंच पद्धतीप्रमाणे माझ्या दोन्ही गालांचं त्यानं चुंबन घेतलं !

...तो दुसरा तिसरा कुणी नसून 'मेसाजर' होता...महान् रचनाकार – नायक, मेसाजर !

माझ्या रंगावतरणाची पहिली संध्याकाळ !...त्या दिवशी ज्या मेळाव्यासमोर मी नृत्य केलं, त्यातली मंडळी इतकी स्नेहशील आणि उत्साही होती, की माझं मन

भरूनच आलं! नृत्य संपेतो जेमतेम कळ काढून सारीजणं उद्गारली, " वाहवा... ...वा ! फार सुंदर...फार छान...आहे तरी कोण ही पोरगी ? कसली चिमुरडी पोर ! " आणि पहिलं नृत्य संपतासंपता उंच्यापुऱ्या बांध्याचा नि भेदक नजरेचा एक पुरुष उठला, अन् त्यानं मला मुळीं मिठीतच घेतलं !

" नाव काय तुझं पोरी ? " त्यानं विचारलं.

" इझाडोरा. "

" पण शिवाय काही तरी लाडकं नाव असेलच की ! "

" लहानपणी मला ' डोरिटा ' म्हणायचे. "

" ओ : दोरीता ! " तो उद्गारला, आणि माझ्या डोळ्याचं अन् माझ्या मुखाचं सुद्धा चुंबन घेत आवेगानं म्हणाला, " तू – तू भारी भारीच गोड आहेस पोरी ! "

एवढ्यात मादाम मार्सोनं माझा हात हातात घेऊन मला सांगितलं –

" हाच तो असामान्य – ' सार्दू ' ! "

खरं म्हणजे पॅरिसमधल्या एकजात साऱ्या नाव घेण्याजोग्या व्यक्ती त्या दालनात उपस्थित होत्या...फुलांच्या नि स्तुतिसुमनांच्या वर्षावात मी सर्वांचा निरोप घेऊन तिथून निघाले, तेव्हा मला घरी पोहोचवताना माझे, नूफ्लार, ज्याक् बोन्यी आणि आंद्रे, हे तीन शिलेदार अभिमानानं आणि समाधानानं नुसते हरखून गेले होते...कारण त्यांच्या या अजब धिटुकलीनं आज मैदान जिंकलं होतं !

या तीन तरुणांच्यापैकी उंचापुरा प्रसन्न चार्लस् नूफ्लार, किंवा देखणा ज्याक् बोन्यी सोडून लहानखुऱ्या खुज्या बांध्याचा आणि फिक्कट चेहऱ्याचा आन्द्रे बोनियेच माझा जिवलग मित्र व्हायचा होता ! कांती फिकी, चेहरा वाटोळा आणि डोळ्यांना चष्मा...पण मन कसं – केवढं ! ! शिवाय मी एक जगावेगळी वेडी होतेच !...( माझ्या मेंदूचे व्यवहार अतर्क्यच असायचे ! )...लोकांचा विश्वास बसणार नाही खरा...पण खरं सांगते, माझ्या काळजानं खेळलेले प्रीतीचे खेळ आणि बुद्धीनं – डोक्यानं – उपभोगलेली प्रीतिप्रकरणं ( हीही संख्येनं काही कमी नव्हती ! ) जन्मभर मी सारख्याच रंगतीनं अनुभवली, निभावली !

आंद्रेच्या पहिल्यापहिल्या पुस्तकाचं लेखन तेव्हा चालू होतं – ' पत्रार्क ' आणि ' सीमोन्द '. तो दररोज मला भेटायला यायचा. त्याच्यामुळेच उत्तमोत्तम फ्रेंच साहित्याशी माझा परिचय झाला.

सहज बोलण्याइतपत फ्रेंच भाषा मी आतापर्यंत आत्मसात् केली होती; अनेकदा दुपारी खूप वेळ किंवा संध्याकाळच्या प्रहरी, आंद्रे बोनिये माझ्यासाठी मोठ्यानं वाचन करायचा. त्याच्या आवाजाला एक अत्यंत मधुर अशी

झार होती. ' मोलियेर ', ' फ्लोबेर ' ' तेओफील गोतियेर ' ' मोपासाँ ' वगैरेंच्या साहित्याचं वाचन आन्द्रेनं माझ्याबरोबर केलं. ' मेटरलिंक 'चं ' पेली ए मेलीसाँद' आणि तत्कालीन आधुनिक फ्रेंच ग्रंथ नि पुस्तकं सुद्धा त्यानेंच प्रथम मला वाचून दाखवली.

दररोज दुपारी स्टुडिओच्या दारावर एक बुजरी टकटक ऐकू यायची. तो आन्द्रे बोनियेच असायचा – खाकेत नेहमी एकादं नवं पुस्तक किंवा मासिक असायचं. आई माझ्या त्याच्याबद्दलच्या उत्सुक भावाचं कारणच समजू शकत नव्हती; कारण आदर्श प्रियकराच्या तिच्या व्याख्येत तो बिलकूल बसत नव्हता...मी सुरुवातीलाच सांगितलं तसा तो लठ्ठ नि ठेंगणा होता...अन् त्याचे डोळे बारीक होते! त्या डोळ्यातली बुद्धिमत्तेची नि हजरजबाबीपणाची चमक लक्षात यायला माझ्यासारखं जात्याच लोकविलक्षण डोक्याचं मनुष्यच हवं होतं!...अनेकदा दोन तीन तास वाचन केल्यावर आम्ही ' सीन ' बसच्या वरच्या मजल्यावर बसून चांदण्यात ' नोत्रदाम ' न्याहाळण्यासाठी ' ईल द ला सीते 'पर्यंत खाली जात असू. तिथल्या शिल्पाच्या एकेका खंडावरची प्रत्येक आकृती त्याच्या ओळखीची होती; कातळाकातळाचा इतिहास तो मला सांगू शकत होता. आम्ही मग चालत परतत असू घरी...अधेमधे त्याच्या बोटांचा लाजवट स्पर्श माझ्या बाहूंवर मला जाणवायचा...रविवारीसुद्धा एकादी आगगाडी पकडून आम्ही ' मार्ली 'पर्यंत जात असू. मनमोकळं हसू उधळत, हात पालवत, एकाद्या किन्नरी किंवा परीसारखी रस्त्यारस्त्यातून मी त्याच्यापुढे कशी नाचत जात असे, त्याचं आन्द्रेनं आपल्या पुस्तकात, आमच्या या रानावनातून भटकण्याच्या संदर्भातल्या एका प्रसंगी वर्णनसुद्धा केलं आहे.

मला विश्वासात घेऊन तो आपल्या मनावर बडलेले संस्कार, उठलेले तरंग नि ठसे, आणि ज्या दर्जाची साहित्यनिर्मिती त्याला अभिप्रेत होती, त्याबद्दलच्या त्याच्या कल्पना, यांना मोकळी वाट देत असे. हे साहित्य अर्थातच ' सर्व प्रती खपल्या...वी आवृत्ती निघाली – ' या सदरात मोडण्यासारखं यशस्वी ठरलं नसतं ही खात्री असली, तरी आंद्रे बोनियेचं नाव शतकानुशतकं त्याच्या पाठीमागे राहील, आणि त्याच्या काळातल्या उत्तम साहित्यिकांमध्ये त्याची गणना होत राहील, हे मात्र नक्की!.. एक दिवस तो माझ्या समोर उभा राहिला, तो उदास नि पांढऱ्या फटक चेहेऱ्यानंच! त्याच्या या अस्वस्थपणाचं कारण तो काही केल्या मला सांगेना...आणि काहीशा निर्धारानं नाकासमोर दृष्टी लावून आपला स्वस्थ बसून राहिला!...जाताना माझ्या कपाळाचं चुंबनसुद्धा अशा तऱ्हेनं त्यानं घेतलं की मला वाटलं...हा आपल्या मृत्यूलाच सामोरा जातो आहे!...या कल्पनेनं एका भयंकर अस्वस्थतेत मी तीन दिवस काढल्यावर हे राव येऊन हजर झाले ते

भलतेच खुषीत !...आणि सांगायला लागले की एका द्वन्द्वयुद्धात प्रतिस्पर्ध्याला जखमी करून ते परतले आहेत ! हे द्वन्द्व कशाबद्दल होतं, काय होतं, मला कधीच समजलं नाही ! खरं म्हणजे आंद्रेच्या खाजगी जीवनाची मला काहीच कल्पना नव्हती. तो बहुधा दररोज दुपार कलल्यावर साधारण पाच सहाच्या दरम्यान यायचा...मग मला काही तरी वाचून दाखवायचा, किंवा फिरायला न्यायचा... बाहेरचं हवामान आणि 'मूड' जसा असेल त्याप्रमाणे ! एकदा 'ब्वा दॅ ब्युदों' मध्ये चौकात शिरण्यापूर्वीच अलीकडे मोकळ्याजागेत आम्ही बसलो – उजव्या रस्त्याला 'सुदैव', डाव्याला 'शांति' अगदी समोरच्या रस्त्याला 'चिरंजीवन' अशी नावं त्यानं दिली..."अन् आपण बसलो आहोत त्या रस्त्याचं नाव ?" मी विचारलं – "प्रीती !" तो हलक्या आवाजात उत्तरला ! "तर मग इथेच मला थांबायला आवडेल सर्वांत !" मी खुषीत येऊन उद्गारले. त्यावर त्यानं काय म्हणावं ! "इथे थांबणं आपल्याला शक्य नाही !" एवढंच तो म्हणाला, नि उठून ताडताड नाकासमोरच्या रस्त्याने आपला चालायला लागला !

"पण मला सोडून निघून जायला काय झालं ? का सोडून जातोयस् मला ?" – असं म्हणत मी तशीच धडपडत त्याच्या मागे धावत सुटले...हिरमुसल्या नि कोड्यात पडलेल्या मनानं... ! पण घरी पोहोचेपर्यंत, त्यानं काही तोंडून एक अवाक्षर काढलं नाही; आणि जेमतेम स्टुडिओच्या दारापाशी मला सोडून एकदम निघून गेला...ही अजब आणि झंझावाती मैत्री वर्षभर टिकली होती, आणि माझ्या निरागस हृदयानं त्या मैत्रीला वेगळंच आवाहन करण्याचं स्वप्न पाहिलं होतं...एक दिवस संध्याकाळी मी रेमंड नि आई यांना ऑपेरा बघायला पाठवून घरी एकांत मिळवण्याचा डावही रचला होता ! गुपचूप जाऊन दुपारी शँपेनची बाटली आणून ठेवली होती...संध्याकाळी एक छोटं टेबल फुलाबिलांनी सजवून तिथे शँपेन अन् दोन पेले ठेवण्याचा थाटही मी, जमवला होता...सारं झाल्यानंतर माझा कुडतेवजा पारदर्शक वेष घालून आणि केसामध्ये गुलाबांची फुलं खोवून अगदी 'तेस' च्या भावनेनं आंद्रेची मी वाट बघत बसले....तो आला अन् माझ्याकडे पाहून चकित झाला...अन् मग भयंकर शरमून गेला ! शँपेनला तर तो बोटच लावेना...त्याच्या बरोबर मी नाचले सुद्धा...पण त्याचं चित्त हरवल्यासारखंच झालं होतं...अखेर शेवटी, रात्री संपवायलाच पाहिजे, असं बरचसं लिखाण करायचं असल्याचं निमित्त करून तो एकाएकी निघून गेला ! ते गुलाब, ती शँपेन...तो एकांत...अन् मी एकटी एक ! अपमानाची कडू चव गिळत मी रड रड रडले...!

...त्यावेळी मी किती तरुण नि डोळ्यात भरण्याजोगी देखणी होते हे आठवलं म्हणजे त्या प्रसंगाचा अर्थ लावणं मला कठीणच वाटतं...आजवर मला त्याचं

कोडं उलगडलेलं नाही, एवढं म्हटलं तरी पुरे !... तेव्हा मात्र माझं मन ‘ त्याचं माझ्यावर प्रेमच नाही ! ’ हाच मंत्र घोकत राहिलं होतं; मग दुखावलेला स्वाभिमान अन् डिवचली गेलेली अस्मिता, यांच्या प्रेरणेनं माझ्या तीन शिले-दारांपैकी उरलेल्या दोघातल्या एकाबरोबर मी खूपच बसट वाढवली. प्रियाराधनाच्या आलिंगन-चुंबनादी प्रकारात आंद्रे जेवढा मागासलेला, तितकाच हा उंच-निंच, भुऱ्या केसांचा देखणा पुरुष उत्सुक नि धीट होता!...ह्याहि पण प्रकरणाचा शेवट वाईटच झाला...झालं काय, की एक दिवस रात्री ‘ काबिने पार्तिक्यूलिए’-मध्ये चांगली अस्सल शॅपेनची मेजवानी झाल्यानंतर त्यानं मला एका होटेल-मधल्या एका खोलीत नेलं – खोली श्री व श्रीमती ‘ अमूक ’ अशा जोडप्याच्या नावावर घेतली होती ! – इकडे माझा थरकाप झाला, तरी एकीकडे एकतऱ्हेचं सुखही अनुभवाला येत होतं माझ्या...‘ अखेर आज तरी प्रीती म्हणजे काय ते मला कळणार ! ’...मी मनात म्हणत होते...एवढ्यात त्यानं मला त्याच्या बाहूंनी कवळलं...आणि त्याच्या लाडीक जवळीकीतून निर्माण झालेल्या स्पर्श-स्पंदनांच्या कल्लोळात मी जणू पुरती वाहून गेले !...काळीज धाडधाड उडत होतं पण धमनीधमनी सुखवर्षावात न्हाऊन निघत होती ! – माझं सारं अस्तित्वच आनंदाच्या त्या पुरानं वेढून टाकलं होतं ! ‘ अखेर जीवनाच्या सादेला माझ्या-कडून प्रतिसाद मिळण्याचा तो जागा क्षण जवळ आलाच म्हणायचा ’ ! मन हर्षानं गुणगुणलं...एवढ्यात एकाएकी तो दचकला – आणि पलंगाच्या तिथे गुडघे टेकून अकल्पनीय आवेगानं ओरडला, “ पोरी, का मला आधी सांगितलं नाहीस तू ? केवढा घोर अपराध माझ्या हातून घडला असता, तुला कल्पना आहे ?...नाही...नाही...तू तशीच पवित्र राहिली पाहिजेस...उठ चल, ताबड-तोब कपडे चढव अंगावर तुझे ! ”...आणि माझ्या रडण्याभेकण्याकडे दुर्लक्ष करून, माझा कोट माझ्या अंगाभोवती टाकून घाईघाईने मला टॅक्सीकडे घेऊन गेला. घरी जाईतो साऱ्या रस्ताभर स्वतःला तो इतक्या तावातावानं शिव्या देत होता की मी भलती बाबरून गेले.

खरंच, असा कोणता अपराध त्याच्या हातून घडणार होता ? मी स्वतःलाच छेडत राहिले...मला चक्करल्यासारखं, आजारी नि अगदी बेचैन वाटत होतं... भयंकर हिरमोड झालेली मनाची अवस्था...आणि स्टुडिओच्या दाराशी तसल्या अवस्थेत कुणीतरी आणून सोडण्याचा पुनः प्रत्यय ! माझा हा भुऱ्या केसांचा युवक तर कधीच पुन्हा परतला नाही – लवकरच तो कोणत्या तरी वसाहतीलाच निघून गेला...!...आणि अनेक वर्षांनी मला जेव्हा पुढे कधी भेटला, तेव्हाही त्यानं मला त्याच्या पूर्वीच्याच धारणेनं प्रश्न केला, “ तू मला खरोखर क्षमा करू शकशील का ?...” मी विचारलं; “ पण कशाबद्दल– ? ”...

...प्रीतीच्या अनोळखी राज्याच्या शिवेवर मी उभी असताना कुतूहलापोटी चाललेली माझी तरुणपणची धाडशी प्रकरणं ही अशी होती !...मला ती शीव ओलांडायची आस लागली होती...पण माझ्या सान्निध्यात का कोणास ठाऊक माझ्या प्रेमिकांच्या मनात माझ्याबद्दल आदरयुक्त भीती नि एक प्रकारचा भलताच धर्मनिर्दिष्ट संयम उफाळून यायचा ! त्यामुळे कितीतरी वर्षं मी 'अलीकडे 'च राहिले होते !...या शेवटल्या धक्क्यानं मात्र माझं भावविवश मन चांगलंच हादरून गेलं होतं...म्हणूनच की काय, मनाच्या साऱ्या शक्तीनिशी मी कलेला सामोरी गेले !...प्रीतीनं आड केलेलं सुख, कलेनं मुक्त हस्तानं माझ्यावर उधळलं...!

* * *

मनुष्यातल्या आंतरिक चैतन्याची ज्यातून प्रतीती येईल, अशा दिव्य नृत्याच्या चिंतनात मी पुरे दिवसन्‌दिवस आणि रात्री देखील स्टुडिओत घालवल्या... तासन्‌तास वक्षाच्या मधोमध मणिपूरचक्राशी समांतर हात जोडून, मी अगदी स्वस्थ उभी असे. माझं असं ध्यानस्थ असल्यासारखं घटका घटका निश्चल उभं राहाणं पाहून आईला काळजीच वाटायची...पण मी शोध घेत होते, मागोवा घेत होते...साऱ्या हालचालींच्या मुळाशी असलेल्या चेतक–केंद्राचा, साऱ्या शक्तींच्या जागृतिस्थानाचा मागोवा ! साऱ्या वेगवेगळ्या सैरभैर हालचालींना जन्म देणाऱ्या एकरूपतेचा ठाव मला घ्यायचा होता...तसा तो मी घेतलाही... नृत्यनिर्मितीला आवश्यक असणारी अंतर्मुख दिव्यदृष्टीच जणू मला लाभली... अन् माझ्या नृत्यशालेची कल्पना ज्या तात्त्विक बैठकीवर मी पुढे उभारली, तिची पायाभरणी या आधारावर इथेच जणू झाली !...बॅलेनृत्याची धारणा यापेक्षा अगदीच वेगळी होती. त्यानुसार सर्व हालचालींचं मूळ केंद्र आणि कळ पाठीच्या मधोमध कण्याच्या शेवटाशीच होती – बॅलेच्या अभ्यासकांना हेच तत्त्व पढवलं जायचं. ' या मध्यवर्ती आधारानं बाहू, पाय आणि कबंधाच्या हालचाली विश्रांत-पणे व्हायला हव्यात – ' ( म्हणजे सांध्याला सांधा जोडलेल्या कठपुतळ्यांच्या-प्रमाणेच की ! ) – असं बॅले शिक्षक म्हणत...या पद्धतीनं जिथे हालचालीच कृत्रिम नि कळसूत्री होतात, तिथे त्यांचं आत्म्याशी संधान साधण्याची गोष्ट दूरच !...

माझी धाव आणि धारणा या उलटच होती !...मला अभिप्रेत होतं ते आध्यात्मिक भावदर्शन ! आणि हे भाव जिथून पाझरून धमनीधमनीतून खळाळतात नि शरीरातल्या थिरकत्या अणुरेणूंना प्रकाशस्नात करतात, त्या जीवनाच्या मूल-स्रोताच्या शोधात मी होते ! आत्मप्रत्ययाचं द्रष्टेपण घडवणाऱ्या त्या केंद्रवर्ती कुंडलिनीचा मागोवा मी घेत होते ! कित्येक महिन्यानंतर या मूलकेंद्रावर माझ्या साऱ्या शक्ती एकाग्र करण्याचा अभ्यास मला जमला...आणि तिथून पुढे ?

...मी संगीत ऐकू लागले, की त्यांतली कंपनं नि सुरांचे किरण माझ्या हृदयातल्या त्या प्रकाशमय शक्तिकेंद्राचा जणू वेध घ्यायला लागत; तिथे त्यांचं प्रतिबिंब आध्यात्मिक दृष्टेपणाच्या गाभ्यात पडायचं. बुद्धीच्या किंवा मनाच्या नव्हे, तर आत्म्याच्या दर्पणात उमटलेल्या त्या प्रतिबिंबातून संक्रमित होणारे भाव मग नृत्यक्षेपातून साकार होऊ लागायचे...कलेचं स्वरूप नि प्रेरणा याबद्दलची माझी ही मूळ धारणा मी कितीदा तरी कलावंतांना समजावून सांगण्याचा प्रयत्न केला आहे. स्टॅनिस्लाव्ह्स्कीच्या 'माझे कलाजीवन' (My life in Art) या पुस्तकात मी त्याला ते सांगितल्याचा त्यानं उल्लेखही केला आहे...

माझी ही जाणीव शब्दातून व्यक्त करणं फारच कठीण आहे, असं वाटेल वरवर पाहाता...पण माझा अनुभव मात्र अगदी वेगळा होता. मी माझ्या नृत्य-वर्गातल्या चिमुकल्यांच्या समोर उभी राहायची नि म्हणायची, "हे संगीत आहे ना, ते अगदी जिवाचे कान करून – मनापासून ऐका – हं – आता सांगा पाहू – तुमच्या जिवाच्या अगदी खोलवर कुठेतरी काही स्पर्श झाला आहे, कुणी जागं होतय्, असं संगीत ऐकताना वाटतं की नाही तुम्हाला ? ...सहजच जी तुम्ही मान वर उचललीय्, हात उभारले आहेत...आणि प्रकाशाच्या वाटेवर अलगद तुमची पावलं पडताहेत, ते या काळजातल्या अनाम जागृतीमुळे ना ? "...त्यांना सारं काही उमजायचं...! ही भावजागृती, म्हणजेच माझ्या कल्पनेनुसार नृत्याच्या दिशेनं पडणारं पहिलं पाऊल होय...!

लहानात लहान मूलसुद्धा हे समजू शकतं.. अन् एवढी समज आली, की तिथपासून पुढे मुलांच्या साध्या चालण्यात आणि साऱ्या हालचालीत सुद्धा एक आत्मिक सामर्थ्य नि त्याचा स्पर्श झालेलं लालित्य जाणवायला लागतं...केवळ बुद्धीच्या किंवा अंगोपांगाच्या आधारानं केलेल्या हालचालीत हा असा प्रत्यय येणारच नाही! म्हणूनच तर 'त्रोकादेरो' किंवा 'मेट्रोपॉलिटन ऑपेरा हाऊस'-मध्ये भल्यामोठ्या प्रेक्षकवर्गाला जागच्या जागी खिळवून ठेवायची किमया माझ्या शाळेतल्या बाळगोपाळ मंडळींना साधायची...एरवी असं मोहनास्त्र वश असतं, ते फार मोठ्याच कलावंतांना फक्त !...मात्र जसजशी ही मुलं वयानं वाढायला लागायची, तसतसं आपल्या व्यवहारवादी ऐहिक संस्कृतीच्या घातप्रत्याघातांना त्यांना तोंड द्यावं लागून, ह्या आत्मिक शक्तीचा मात्र लोप व्हायचा...त्यांची अंतःप्रेरणाच मुळी नष्ट व्हायची !

माझ्या बालपणातली आणि तारुण्यातली माझ्या अवतीभोवतीची विशिष्ट परिस्थिती आणि वातावरण, यामुळे माझ्यातही ही शक्ती खूपच वाढली होती– आणि म्हणूनच आयुष्याच्या वेगवेगळ्या टप्प्यांवर एकेकदा, बाहेरची सारी सृष्टी दृष्टीआड करून ह्या शक्तीच्या प्राणदायी रसातच मी बुडून जाऊ शकले!...

आताही पार्थिव प्रेम मिळवण्याच्या माझ्या अपयशी प्रयत्नानंतर मी शरण गेले ती याच शक्तीला !...

त्यानंतर आन्द्रे जेव्हा जेव्हा आला, – जरासा बुजतबिचकत अन् काहीशा अपराधीपणानं – तेव्हा तेव्हा मी त्याला ' नृत्यकला – आणि मानवी हालचालीं-बाबतचा एक नवविचार ' यावर तासन्तास माझी प्रवचनं ऐकवली ! अन् मला कबूल केलंच पाहिजे, की तो बिचारा कंटाळल्यासारखा किंवा थकल्यासारखा कधीच दिसला नाही – मला सुचलेली प्रत्येक नृत्यमुद्रा किंवा क्षेप त्याला मी समजावून देत असताना अगदी गोडव्यानं, सहानुभूतीनं आणि धीरानं तो ऐकत असायचा. त्यावेळी मी आणखी एक स्वप्न पहात होते...स्वप्न एकाच मूळ, 'आदी' चलनवलनाचं...ह्यांतूनच पुढे अनेक क्षेप, असंख्य हालचाली उद्भवणार होत्या – माझ्या इच्छाशक्तीच्या मध्यस्थीशिवायच – एका अज्ञात पण निसर्ग-सिद्ध कार्यकारणभावामुळेच केवळ ! नृत्याच्या विषयांच्या विविधतेला अनुसरून या मूळ नृत्यचलनाचे पुढे प्रस्तारविस्तार कसे होतील, याचाही मी विचार केला होता...उदा. ' भीती ' पोटी जन्मलेला प्राथमिक क्षेप, – त्याच्याच पाठो-पाठ नैसर्गिक प्रतिक्रियांच्या नियमानुसार निर्माण झालेली ' दुःख ' या भावनेची प्राथमिक हालचाल, अन् यातूनच साकार होणारं ' शोकनृत्य '; किंवा ' प्रीती ' चा एक मूळ आविर्भाव...त्यातून उकलत, उलगडत जाणारी अनेक चलनवलनं ...फुलाची एक एक पाकळी विलग व्हावी, तशी हळुवार अगम्य, अदृष्य प्रक्रिया ...नि त्यातून सुगंधासारखं दरवळणारं अन् तरल होत जाणारं नर्तिकेचं व्यक्तिमत्व...!

अशा या आगळ्या नृत्याला संगीताची खरीखुरी साथ अभिप्रेत नव्हतीच... कुठल्या तरी, जाणिवेपलिकडच्या अनाहत संगीताच्या लयींतून त्याची निर्मिती होणार होती...माझ्या या अभ्यासामुळे, चिंतनामुळेच शोपांच्या सांगितिक उपोद्घातांना नृत्यांतून साकार करण्याचा प्रयत्न मी केला. ' ग्लूक 'च्या संगीताची ओळखही आता झालेलीच होती...शिवाय आईला, मला साथ करण्याचा कंटाळा कसा तो नव्हताच— ' ऑरफियस 'ची ' अथ ' पासून ' इति ' पर्यंतची पारायणं ती माझ्यासाठी पुन्हा पुन्हा करत राहायची...अगदी आमच्या स्टुडिओच्या खिडकीतून उषेची चाहूल लागेपर्यंत...

ही खिडकी खूपच उंच होती पुरं छत तिनं व्यापलं होतं...आणि पडदा वगैरे काही नव्हता...वर पाहिलं की आकाश, चंद्र, तारे यांचं दर्शन व्हायचं ! कधी कधी धुवांधार पाऊस पडला की, पाण्याचे छोटे छोटे ओघळ जमिनीपर्यंत वाहावायचे...कारण स्टुडिओच्या अगदी वरच्या खिडक्या पावसापासून सुरक्षित कधीच नसतात...शिवाय सारी जागा मिळून एकच दालन असल्यानं

आमचे वेगवेगळे उद्योग चालवायला स्टुडिओ तेवढा सोयीस्कर नव्हता ... पण 'यौवन' सर्व अडीअडचणी आणि गैरसोयींना शह देऊ शकतं... आणि माझी आई म्हणजे तर काय? अस्मितेला निपटून टाकणाऱ्या वैराग्याचं, नि अनासक्तीचं, एक चालतं बोलतं दैवी प्रतीकच!... माझ्या कार्यात मला हवं ते सहाय्य करायचं, एवढाच तिला ध्यास!

त्यावेळीं 'काऊंटेस ग्रेफुल' ही उच्चभ्रू समाजाची अनभिषिक्त सम्राज्ञीच समजली जात होती... तिच्या दिवाणखान्यांत नृत्य करण्याचं मला आमंत्रण आलं. पॅरिसमधली एकजात सारी प्रतिष्ठित मंडळी धरून साऱ्या अत्याधुनिक मंडळींचा फड तिथे जमला होता. 'ग्रीक कलेचं मूर्तिमंत पुनरुज्जीवन', अशा गौरवपूर्ण शब्दांनी तिनं माझं स्वागत केलं. – पण मला वाटतं 'पिअर लू'च्या ॲफ्रडाईटीचा किंवा 'शॉसो दे बीलीती'चा तिच्या विचारांवर असर असावा!– कारण माझ्या नृत्यातून तर, ब्रिटिश वस्तूसंग्रहालयातल्या शीत प्रकाशात पहिलेल्या डोरिक स्तम्भांवरच्या आलेखांची नि पार्थेनॉनच्या अवशेषांची भावकथा झिरपत होती!

काऊंटेसनं आपल्या दिवाणखान्यातच एक छोटासा रंगमंच उभारला होता – त्याच्या पाठीमागच्या नक्षीदार खिडकीच्या जाळीजाळींतून एक एक लाल गुलाब खोवलेला होता. ही लाल गुलाबांची पार्श्वभूमी माझ्या नृत्यातल्या भाविकतेला आणि माझ्या त्या साध्या वेषभूषेला अगदीच विशोभित दिसत होती. खरं म्हणजे त्या काळांत पिअर लू, शॉसो दे बीलीती, ओव्हिडचं 'मेतामार्फोज' आणि साफोची गीतं, वगैरे सारं कांही मी वाचलं होतं – पण या सगळ्या लिखाणातला वैषयिक ध्वनि मुळीं मला जाणवलाच नव्हता! – तारुण्याच्या उंबरठ्यावर उभ्या असलेल्या मुलांमुलींनी वाचण्यायोग्य साहित्याची सक्त छाननीपूर्वक निवड करण्याची काहीच जरुरी नसते, हेच नाही का यावरून सिद्ध होत? ज्या गोष्टींचा प्रत्यक्षात अनुभव घेतलेला नसतो त्या गोष्टी वाचण्यात आल्या, तरी सुद्धा त्यांचा खरा खुरा बोध होणं अगदी अशक्य आहे, असंच मला वाटतं!

...माझा पिंड त्याच त्या अमेरिकेत 'प्युरिटन' कर्मठ स्वभावातून घडलेला होता, हे अजूनही स्पष्ट दिसत होतं – कदाचित् माझ्या आजीआजोबांचा पूर्वेतिहास याला कारण असू शकेल. इ. स. अठराशे एकोणपन्नासात पहिल्यापहिल्या वसाहती करणाऱ्यांच्या धाडसानं सपाटी ओलांडत, कुणीही न वावरलेल्या किंवा हुंगलेल्या जंगलातून वाट काढत काढत रॉकी पर्वताच्या रांगा आणि धगधगती वाळवंटं त्यांनी पार केली; रेड इंडियन लोकांसारख्या कट्टर शत्रूंच्या झुंडींच्या झुंडींपासून आपला बचाव करत, किंवा प्रसंगी त्यांच्याशी लढा देत त्यांनी वसाहती केल्या!... किंवा माझ्या वडिलांचं स्कॉटिश रक्त माझ्यातल्या

सनातनीपणाला कारणीभूत असेल...काय असेल ते असो...! अमेरिकेच्या मातीनं तिच्या पोटच्या बहुतेक तरुणतरुणींना जसं घडवलं, त्याच नमुन्यावर मी घडले होते, एवढं खरं!...सनातनी नि गूढवादी स्वभाव आणि आपल्यातल्या उपजत वैषयिक प्रवृत्तींना मागे सारुन धीरोदात्ततेलाच आवाहन करण्याची सतत ओढ...मला वाटतं, सगळे अमेरिकन कलावंत याच मुशीतून निघालेले आहेत...वॉल्ट व्हिटमनच पहा—त्याचं लिखाण तर एका काळीं निषिद्ध मानलं गेलं होतं—शिवाय त्यानं कितीदातरी शारीरिक सुखाचं नानापरीनं कोडकौतुक सुद्धा केल्याचं आढळून आलं आहे...सारं काही खरं; पण त्याच्या हृदयात डोकावून पाहिलं तर तोही एक सनातनी, कर्मठ प्राणी आहे, असंच आढळून येईल...थोड्या फार फरकानं हीच कथा आमच्या सर्व साहित्यिकांची, शिल्पकारांची आणि चित्रकारांची सुद्धा आहे!

फ्रेंच कलेची ऐन्द्रिय जडणघडण पाहिली, की तुलनेनं मनात येतं, अमेरिकेची खडकाळ ओबडधोबड भूमी, वाऱ्यानं झपाटलेले विशाल नि उघडे माळ, किंवा अब्राहम लिंकनच्या व्यक्तिमत्त्वाची सर्वदूर पडलेली छाया, यांपैकी कोण या वृत्तीला कारण? कोण जबाबदार? अमेरिकन शिक्षणपद्धतीचा कल तर इन्द्रियसंवेदनांना जवळजवळ नामशेष करण्याकडेच आहे, असंही कुणी म्हणू शकेल—खरा अमेरिकन, दंतकथेतून रंगवला जातो तसा, 'कांचनमृगापाठीमागं धावणारा' किंवा 'पैशाचा लोभी' तर नाहीच नाही—तो आदर्शवादी आहे. गूढवादी आहे!—पण म्हणजे अमेरिकन पिंडात विषयसंवेदना नाहीतच, असा मात्र माझ्या म्हणण्याचा कुणी क्षणभरसुद्धा विपर्यास करू नये...उलट सामान्यतः ॲन्ग्लोसॅक्सन रक्त किंवा केल्टिक अंश असलेलं अमेरिकन रक्त, निकराच्या क्षणी, इटालियनांच्यापेक्षा अधिक गरम, फ्रेंचांच्यापेक्षा जास्त वैषयिक, आणि रशियनांच्याहून पराकोटीच्या विवशतेनं अतिरेकाला शरण जाणारं असतं!...मात्र पहिल्यापासूनच्या संस्कारांच्या सवयींनी त्या स्वभावाला एका लोखंडाच्या काटेरी खडबडीत भिंतीत जणू कोंडून घातलेलं आहे—त्यामुळे आयुष्यात काही अघटित घडलं, तरच या संकोचाच्या बंदिस्त भिंती कोसळून तो स्वभाव उफाळून बाहेर पडू शकतो—अन् तसं ते उधाण फुटलं, की मात्र या ॲन्ग्लोसॅक्सन किंवा केल्ट प्रियकरापेक्षा झपाटलेलं प्रेम करणारा प्रेमिक इतर कुठल्याही देशात सापडणार नाही, असंच म्हणावं लागेल!...मला तर असे काही प्राणी माहीतही आहेत...! दोन पाजामा सूट्स्; एक रेशमी, अगदी अंगाशी काहीतरी मृदूमऊच असावं म्हणून ..एक लोकरी,—उबेसाठी; बरोबर 'टाईम्स्', 'लॅन्सेट' ही वर्तमानपत्रं, आणि एक ब्रायर पाईप—असा सर्व सरंजाम झोपण्यासाठी केलेला असून सुद्धा, एकाएकी

ह्यांचं रूपांतर ग्रीक लोकांना मागं टाकणाऱ्या भोगलालस 'सॅटर्स'मध्ये व्हायचं... आणि मग पाहता पाहता वासनेचा निद्रित ज्वालामुखी अशी आग ओकायला लागायचा – एखाद्या इटालियनानंही घाबरून आठवडाभर घुंगट ओढून बसावं!!

...तर त्या दिवशी संध्याकाळी काउंटेस ग्रेफुलच्या बंगल्यात अप्रतिम सजलेधजलेल्या नि माणिकमोती ल्यालेल्या बायकांनी कोंदून गेलेल्या दिवाण-खान्यात, मी फारच उदास उदास झाले होते – त्या हजारो लाल गुलाबांचा गुदमरून टाकणारा सुगंध, पुढल्या रांगेतल्या गर्भश्रीमंतांच्या तरुण पिढीची एकटक दृष्टी, आणि माझ्या नाचत्या पावलांच्या बोटांचा ओझरता स्पर्शसुद्धा होऊ शकेल, इतकी रंगमंचाच्या जवळ आलेली त्यांची नाकं! ... मला वाटलं की तो सारा प्रसंग, म्हणजे एक मूर्तिमंत अपयशच होतं... पण दुसऱ्याच दिवशी सकाळी काउंटेसनं मला एक धन्यवादाची स्नेहाळ चिठ्ठी पाठवली! मात्र त्यात बिदागीच्या पैशासाठी तिच्या दरवानाच्या रहात्या ठिकाणी येऊन जायला सांगितलं होतं, तसं दरवानाच्या दाराशी जायला लागणं मला बिलकूल आवडलं नाही... कारण पैशाच्या बाबतीत मी आणखिनच हळवी होते... पण करणार काय? ... त्या बिदागीच्या पैशांमुळेच तर स्टुडिओचं भाडं देणं शक्य होणार होतं!

...पण यापेक्षा एक कितीतरी आल्हादकारक संध्याकाळ मला आठवते. 'मादाम मादलीन लै मार'चा प्रसिद्ध स्टुडिओ! मी 'ओरफे'च्या संगीतावर नाचत होते... प्रेक्षकांत पाहिलं, तर फ्रान्सची 'सॅफो'च म्हणावी, अशा, 'कांतेस दै नोएल'च्या, प्रतिभेनं विलसणाऱ्या चेहऱ्याचं प्रथमदर्शन मला घडलं! ... हो, आणि 'ज्यां लोरे'ही तिथे होता ... त्यानं वर्तमानपत्रातून त्या प्रसंगाचं साक्षेपी वर्णन देखील केलेलं मला आठवतं....

लूव्हर् आणि नॅशनल लायब्ररी (राष्ट्रीय ग्रंथसंग्रहालय), या आमच्या दोन महान् आनंदधामांच्या जोडीला मी एक तिसरी वास्तू शोधून काढली होती – ऑपेराचं सुंदर ग्रंथालय! तिथल्या ग्रंथपालाला माझ्या संशोधनाबद्दल इतकं कुतूहल आणि उत्सुकता वाटली, की त्यानं पहिल्यांदा नृत्यावरची सगळी, आणि नंतर ग्रीक संगीत आणि नाट्यकला यावरची पुस्तकं, आणि ग्रंथसुद्धा, माझ्या उपयोगासाठी मोठ्या प्रेमानं माझ्या स्वाधीन केले; मग अगदी पहिल्या पहिल्या इजिप्शियन लोकांपासून ते तहत आजपर्यंतचं, नृत्यावर जेवढं आणि जे काही लिहिलं गेलं होतं, ते सारं वाचून काढायचा मी चंग बांधला – आणि वाचलेल्यातल्या विशेष नोंदी देखील एका टिपणवहीत करून ठेवल्या – पण एवढा सारा जगड्व्याळ ग्रंथपसारा डोळ्याखालून घालण्याचा अचाट प्रयोग

करून झाल्यावर मला बोध झाला, की 'नृत्यगुरू' म्हणून मानण्यासारख्या माझ्या लेखी तीनच व्यक्ती होत्या :– ज्यां – ज्याक् रूसो ('एमिल'), वॉल्ट व्हिटमन् आणि नित्शे ! बस् !

... एक दिवस दुपारी चांगलंच अंधारून आलं होतं - अशा वेळी स्टुडिओच्या दारावर टकटक ऐकू आली ... एक स्त्री तिथे उभी होती. तिचा तो उंचापुरा भारदस्त बांधा, नि समर्थ व्यक्तिमत्व असं परिणामकारक होतं, की तिच्या प्रवेशाला एकच उपमा शोभली असती ... वाग्नरच्या त्या प्रसिद्ध रचनांपैकी एकाद्या गंभीर, समर्थ आणि भविष्यकालीन घटनांची सूचना वाहणाऱ्या अर्थगर्भ नि द्रष्ट्या स्वरप्रबंधाच्या साक्षात्काराची ! तोच अनाहत स्वरमेळ त्या क्षणापासून माझ्या जीवनाच्या धमनीतून वहातो आहे ... ! अन् वाहताना त्याच्या त्या कंपनातून कधी अस्तित्व घुसळून काढणाऱ्या वादळी तर कधी दुःखद, अश्या घटनांचे तुषार उडवत धावतो आहे ... !!

"राजकुमारी पोलिन्याक् मी" – ती स्त्री म्हणाली, "काउंटेस ग्रेफुलची मैत्रीण. तुला नृत्य करताना पाहून तुझ्या कलेबद्दल माझ्या मनात कुतूहल निर्माण झालंय् ... माझ्यापेक्षाही माझ्या पतींच्या मनात ... ते एक संगीतरचनाकार आहेत."

जरा भारी आणि पुढे आलेला खालचा जबडा, आणि मनस्वी हनुवटी; त्यामुळे थोडं काम बिघडलं होतं – नाहीतर एरवी तिचा चेहरा तसा सुरेख होता एकाद्या रोमन बादशहासारखा; मात्र तिच्या डोळ्यातल्या आणि चेहऱ्याच्या ठेवणीतल्या कामलालस निमंत्रणाला बाहेरून एक थंड अलिप्तपणाचं कवच होतं; तिच्या आवाजातही एक तऱ्हेचं काठिण्य, नि धातूवर आघात केल्यासारखा कर्कशपणा होता. तिच्या सारखीच्या कंठातून हा असा शब्द, म्हणजे एक गूढच वाटायचं ! खरं म्हणजे तिचा आवाज जास्त समृद्ध आणि घुमारदार असेल, अशीच अपेक्षा कुणीही केली असती ... पण मग नंतर हळूहळू मला उमजलं, की तिची ती थंड निर्लिप्तता आणि तो विशिष्ट आवाज, या दोन्ही गोष्टी – म्हणजे तिच्या संवेदनशील स्वभावातला भलताच बुजरेपणा नि संकोच लपविण्यासाठी वापरलेला एक मुखवटा होता – ! नाहीतर एरवी तिला कशाची वाण होती ? राजघराण्याचा प्रतिष्ठित आब तिच्या पाठीशी होताच की ! ... मी माझी कला, माझ्या आशाआकांक्षा, याबद्दल तिच्याशी बोलले, आणि त्या राजकन्येनं ताबडतोब मला तिच्या स्टुडिओत नाचण्याचं आमंत्रण दिलं. ती चित्रकार तर होतीच, पण चांगल्यापैकी संगीततज्ञही होती. पियानोप्रमाणे ऑर्गनही ती वाजवायची. राजकुमारीला आमच्या पिळवटलेल्या चेहऱ्यावरून, आणि उजाड नि भयंकर थंड स्टुडिओवरून आमच्या गरिबीची कल्पना आली असणार;

कारण जशी आली, तशीच अकस्मात् ती निघाली असताना, जाता जाता जरा संकोचानं ती टेबलावर एक पाकीट ठेवून गेली—त्यात दोन हजार फ्रॅन्क्स् होते!

ती स्वभावानं जराशी थंड आणि सहानुभूतीशून्यच आहे, असाच तिच्याबद्दल लोकापवाद होता; पण माझ्या मते तरी मघा सांगितल्यासारख्या अकल्पित गोष्टी सहज करून जाणं, हा श्रीमती पोलिन्याक्ची स्वभावधर्मच असावा.

दुसऱ्याच दिवशी मी तिच्याकडे गेले. माझी राजकुमार पोलिन्याक्शीही गाठभेट झाली. तोसुद्धा चांगला गुणी संगीतज्ञ होता. देखणा परंतु किरकोळ अंगयष्टीचा हा सद्गृहस्थ नेहमी मखमलीची एक छोटी, काळी टोपी वापरायचा. त्याच्या नाजूक आणि सुरेखशा चेहऱ्याला ती महिरपीसारखी दिसे ... मी माझा नृत्यवेष चढवला आणि त्यांच्या संगीताच्या दालनात त्याच्यासमोर नाचले. तो तर आनंदानं स्तिमितच झाला होता ... 'एक तरल दिव्य साक्षात्कार; किंवा ज्या एका स्वप्नाच्या साकार होण्याची कधीपासून तो वाट पहात होता, ते स्वप्न,' अशा शब्दांनी त्यानं मला गौरवलं ... नृत्यात्मक चलनवलन आणि नाद किंवा संगीत, यांचे परस्पर संबंध, आणि 'कला' या स्वरूपात नृत्याचं पुनरुज्जीवन करण्याचं माझं ध्येय, माझ्या आशाआकांक्षा, या सर्व गोष्टीत त्यानं खूपच रस घेतला ... मग 'हार्पूसिकॉर्ड' नावाचं एक सुंदर पुरातन वाद्यही त्यानं माझ्यासाठी मोठ्या आनंदानं वाजवून दाखवलं—बरंच लाडकं असावं त्याचं ते वाद्य ... त्याची ती निमुळती रेखीव बोटं हार्पूसिकॉर्डच्या तारांना जणू कुरवाळत होती ... त्याचं वादन ऐकून माझ्या मनात आनंदास्वादाची एक लाटच उसळली अन् शेवटी, "किती गोड मुलगी आहेस तू ... इझाडोरा, कौतुक करावं तितकं थोडंच आहे तुझं!" असं जेव्हा तो उद्गारला, तेव्हा किंचित् लाजून मी उत्तर दिलं, "माझीही तुमच्याबद्दल हीच भावना आहे. तुमच्यासाठी कधीही नाचायला, नि तुमच्या सुंदर संगीतरचनेतून स्फूर्ती घेऊन दैवी नृत्यरचना करायला, मला फार आवडेल!"—तसं म्हटल्यावाचून मला राहवलंच नाही!

आम्ही त्यावेळी एकत्र काम करायचे कितीतरी बेतही रचले ... अरेरे! या जगात जिकडेतिकडे किती हृदयद्रावक वैफल्य भरून राहिलं आहे! बरोबर काम करण्याचा आमचा उभयतांचा बेत माझ्या दृष्टीनं तर अमूल्य होता—पण लगोलगच झालेल्या पोलिन्याक्च्या अवचित् मृत्यूनं तो सारा विस्कटून गेला! ...

... राजकुमारीच्या स्टुडिओतला हा माझा नृत्यप्रयोग फारच यशस्वी झाला. तिनं अगदी स्वतःच्या मोजक्या निमंत्रितांकरताच केवळ ही मैफल न ठेवता, आपल्या स्टुडिओचं दार बाहेरच्यांनाही मोठ्या मनानं खुलं ठेवल्यानं, माझ्या कार्याबद्दलचं कुतूहल सर्वसाधारणपणे सगळीकडेच जागृत झाल्याचं आढळून आलं; मग आम्हीही हळूहळू प्रत्येकाकडून थोडं थोडं प्रवेशमूल्य घेऊन, आमच्या

स्वतःच्या स्टुडिओतही अशी छोट्या मैफलींची एक ' बारी 'च सादर करायला सुरुवात केली. साधारणपणे वीस ते तीस प्रेक्षक स्टुडिओमध्ये मावू शकत. राजकुमार आणि राजकुमारी पोलिन्याक् या सर्व मैफलींना आवर्जून उपस्थित राहायचे. आणि एकदा तर, मला आठवतं, कौतुकाच्या भरात राजकुमारांनी आपल्या डोक्यावरची काळी मखमलीची टोपी काढून हवेत उंच उडवली आणि मोठ्यानं बांग दिली. " इझाडोरा चिरायू होवो ! "...

' यूजेन कारिएर ' सुद्धा सहपरिवार या कार्यक्रमाला येत असे. एकदा तर त्यानं नृत्यावर एक छोटसं व्याख्यान देऊन मला खूप गौरवलं... त्यात इतर गोष्टींबरोबर तो म्हणाला, – " इझाडोराच्या मनात मानवाच्या नैसर्गिक भाव-भावनांना नृत्यातून वाट करून द्यायची आहे; आणि या तिच्या इच्छेच्या पूर्तीसाठी तिला ग्रीक कलेचे नमुने आदर्श म्हणून आढळले – बास रिलिफच्या स्वरूपातल्या सुंदर प्रतिमांबद्दलचं कौतुक तिच्या हृदयात उधाणलं, आणि त्यातूनच तिला स्फूर्ती मिळाली; पण इझाडोराची मूळ प्रकृतीच ' शोधका 'ची असल्यानं ती तिथेच थांबली मात्र नाही. तिनं मागे वळून साऱ्या आविर्भावांच्या गंगोत्री-कडे, निसर्गाकडेच पुन्हा धाव घेतली – आणि ग्रीक नृत्याचं अनुकरण नि पुनरुज्जीवन करण्याच्या कल्पनेतलं तथ्य समजताउमजतानाच तिला स्वतःच्या अभिव्यक्तीची खरी शैली सापडली ! तिच्या बुद्धीचा वावर ग्रीक कलेत असतो, पण अखेर कौल लावते अन् मानते, तो ती तिच्या स्वतःच्या आत्म्याचाच ! ती नृत्यांतून आपल्यापुढे साकार करते, तो असतो तिचा स्वतःचाच आनंदानुभव, नि स्वतःच्याच व्यथेची कथा ! कलाविष्काराच्या त्या जननक्षणातली तिची उन्मनी अवस्था, आणि तिनं चालवलेला सुखाचा शोध – या साऱ्यापोटी दडली आहेत, ती तिची स्वतःचीच इप्सितं ! त्या सर्वांची इतकी सुरेख मांडणी नव्यानं आपल्यासमोर करत असताना, त्याच वेळी ती आपल्याही भावनांना आवाहन करते – ग्रीक कलेच्या, तिनं आपणासाठी क्षणकाळ जिवन्त केलेल्या प्रतिमांसमोर, आपणही तिच्यासारखेच लहान होतो, तरुण होतो – एका नव्या आशेच्या प्रभावानं आपलं अस्तित्व उजळून निघतं – आणि अटळ गोष्टींना सामोरं जाताना प्रकट झालेली तिची विवशता अनुभवताना आपणही आपल्या आशेवर तिलांजली देऊन बसतो...

एवंच, इझाडोराचं नृत्य आता ' करमणूक ' या सदरात राहिलेलं नाही – ते तिच्या स्वत्वाचं मूर्तिमंत दर्शन आहे ! ती एक चेतन नि संपूर्णपणे जिवन्त कलाकृती आहे...आणि त्या कलाकृतीत आपल्या प्रत्येकाच्या भाग्यालेखात विधात्यानं पूर्वीच कोरलेल्या कार्याचा नेट धरायला लावणारी प्रेरकशक्ती आहे... स्फूर्तिदायित्व आहे !

# ९

खरं म्हणजे या वेळेपर्यंत माझ्या नृत्याचा चांगलाच बोलबाला झाला होता, आणि अनेक लक्षणीय व्यक्तींच्या मनात त्याबद्दल कौतुक निर्माण झालेलं होतं... पण आमची आर्थिक परिस्थिती मात्र आणीबाणीचीच होती. कित्येकदा स्टुडिओचं भाडं कसं द्यायचं, याचीच काळजी लागून राहायची... नि कित्येकदा चुल्यासाठी कोळसा नसल्यानं थंडीचा भयंकर त्रास सोसायला लागायचा; तरी पण या गरिबीनं, आणि नन्नात्मक परिस्थितीनं घेराव केला असतानाही मला माझं ते तासनतास स्टुडिओच्या मध्यावर उभं राहणं आठवतं. एकटं! थंड नि भकास स्टुडिओत एकटं उभं राहणं, अन् अन्तरांतल्या भावना नृत्याविर्भावातून सहज उमटाव्यात, यासाठी स्फूर्तीच्या त्या एका क्षणाची वाट पहाणं! अखेर माझं अंतर्मन उचंबळून यायला लागायचं, आणि माझ्या आत्म्याची भाषा नृत्यातून टिपली जायची...

...एके दिवशी मी अशीच तंद्रीत उभी असताना एक जरा ज्यादा पोशाखी गृहस्थ आमच्याकडे आला–कोटावर चांगली महाग केसाळ कॉलर अन् हातात हिऱ्याची आंगठी वगैरे थाट!

तो म्हणाला "मी बर्लिनहून आलोय्–तू नुसत्या उघड्या पावलांनी नृत्य करतेस, त्याबद्दल आम्ही ऐकलंय्...(माझ्या कलेची त्यानं केलेली ही किंमत पाहून, मला केवढा भयंकर धक्का बसला असेल, तुम्हीच कल्पना करा!) मी एका सर्वात अलिशान विविधरंजनगृहाच्यातर्फे तुझा कार्यक्रम ठरवायला आलोय्–चल, आताच सगळं ठरवून टाकू."

जणू काही त्यानं प्रत्यक्ष 'सुदैवच'च माझ्या पुढ्यांत वाढून आणलं असावं,

अशा थाटांत रुंद हसत तो हातावर हात चोळत होता!...पण मी जखमी गोगलगाईनं शंखात शिरावं, तशी आतल्या आत विरताना विमनस्कपणे उत्तरले, "धन्यवाद! पण तुमच्या त्या 'विविधरंजन'गृहांतून माझ्या कलेचं प्रदर्शन करायची माझी बिलकूल तयारी नाही...!"

"तुझ्या ध्यानात आलेलं दिसत नाही...कितीतरी ज्येष्ठ-श्रेष्ठ कलाकार आमच्या विविधरंजनगृहात येऊन गेलेले आहेत...विचार कर, केवढा तरी पैसा यात मिळू शकेल. एका 'नाईट'ला पाचशे मार्क्सची तर माझी आत्ताच बोली आहे...पुढे याहूनही जास्त बिदागी मिळेल. शिवाय 'जगातली पहिली उघड्या पावलांनी नृत्य करणारी नर्तकी' म्हणून तुला मोठ्या थाटमाटात आम्ही रंगमंचावर सादर करू! काय, ठीक ना?"

"छे! मुळीच ठीक नाही." – रागावून मी पुन्हा म्हटलं...कोणत्याही अटीवर मी या गोष्टीला तयार नाही!"

"कमाल आहे...कमालच आहे!...पण मी 'नकार' घेणाऱ्यांपैकी नाही ...हा काय, कराराचा मसुदादेखील मी आणलाय् तयार करून!"

"नाही म्हणजे नाही! तुमच्या त्या रंजनगृहासाठी माझी कला नाहीच मुळी...मी येणार आहे एक दिवस बर्लिनला...त्यावेळी तुमच्या फ़िलार्मोनिक वाद्यवृन्दाच्या साथीवर मला नाचायला मिळेल, अशी मला आशा आहे... पण ते एखाद्या संगीतमंदिरात...कसरतीचे नि दरवेशांचे कार्यक्रमदेखील जिथे होतात, तसल्या त्या मनोरंजनगृहात नक्कीच नाही!!...देवा देवा!...काय तो भयंकर प्रकार...छे छे!...मुळीच नाही...कधीच...कोणत्याही अटीवर नाही!!" मी त्याला अभिवादन केलं आणि म्हटलं, "या आता!"

आमच्या आजूबाजूची परिस्थिती, आणि फाटकेतुटके कपडे पाहून या जर्मन ठेकेदाराचा आपल्या कानावर विश्वासच बसेना. दोन दिवस त्यानं पुन्हा खेटे घातले...अन् शेवटी जेव्हा महिन्याभरासाठी, प्रत्येक नाईटला हजार मार्क्स देऊ करूनसुद्धा त्याला माझ्याकडून नकारच मिळाला, तेव्हा मात्र तो भयंकर चिडला, अन् त्यानं माझ्यावर 'दुमेस मेदल्!' – मूर्ख मुलगी कुठची,' असा शेरा मारला!...मग मी जी उसळले, अन् ओरडले,

"मी युरोपला आलेय् ती उगाच नाही – मला नृत्याच्या माध्यमातून धर्माचं पुनरुत्थान घडवून आणवायचं आहे – मानवी देहाचं सौन्दर्य आणि पावित्र्य यांचा साक्षात्कार त्या देहाच्या भावात्मक हालचालींतून मला घडवायचा आहे... भरल्या पोटी ढेकर देत कलास्वाद घेण्याचा आव आणणाऱ्या ऐदी, ऐतखाऊ, 'बूर्झ्वा' वर्गाचं, भोजनोत्तर मनरंजन करण्यासाठी मी कधीच नाचणार नाही! कृपा करा आणि इथून निघा...चला...निघा, निघा!"

" हजार रुपयांची नाईट तू नाकारतेयस् ? " त्यानं 'आ' वासून विचारलं ! "

" अर्थात् ! " मी गंभीरपणे उत्तरले... " एवढ्या तेवढ्याचं काय विचारता ? तुम्ही दहा हजार दिले, एक लाख दिले, तरी माझा नकार ठरलेलाच आहे !... मी ज्या श्रेयाचा मागोवा घेऊ पहातेयू तिथपर्यंत तुमची नजर पोहोचणं कदापीही शक्य नाही ! " ... अन् तो जायला निघाला तेव्हा भरीला असंही म्हटलं मी, की " एक दिवस मी बर्लिनला येणारच आहे ... गटे आणि वाग्नर यांच्या देश-बांधवांसाठी मी नाचणार आहेच आहे...पण ते त्यांच्या इभ्रतीला शोभून दिसेल, अशा दर्जेदार रंगमंदिरात...आणि बहुधा हजार मार्क्सपेक्षाही जास्त मानधन घेऊन ! "

मी वर्तवलेलं हे भविष्य अक्षरशः खरं ठरलं ! कारण तीनएक वर्षांनीच, 'क्रॉलस् ऑपेरा हाऊस'मध्ये बर्लिनच्या प्रसिद्ध फिलार्मोनिक ऑर्केस्ट्राच्या साथीवर मी नाचले, तेव्हा पंचवीस हजार मार्क्सच्या वर तिकिटविक्री गेली होती ! आणि हेच ठेकेदार तेवढी जाणीव बाळगून फुलांची भेट घेऊन माझ्या निवासात आले होते ... " तुमचं म्हणणं बरोबर होतं—कुमारी डंकन ... आता एवढी कृपा करा; तुमच्या हाताचं चुंबन घेऊ द्या मला .. " असं म्हणून त्यानं त्याची चूक खेळकरपणे कबूल केली.

...तरीपण काही दिवस पैशाच्या दृष्टीनं तंगीचेच होते. राजेरजवाड्यांकडून होत असलेला गुणगौरव किंवा वाढती प्रसिद्धी यांचा दिवसाकाठी पोटभर जेवण्याशी काही मेळ बसत नव्हता !...त्यावेळी एक लहानखुरी स्त्री आमच्या स्टुडिओत वारंवार यायची. एखाद्या इजिप्शियन राजकन्येसारखी दिसायची ती. खरं म्हणजे रॉकी पर्वतराजींच्या पश्चिमेकडच्या प्रदेशातून ती आलेली होती.... आणि आपल्या व्यवसायांत वर्षानुवर्षे प्रसिद्धीच्या शिखरावर असताना ती त्या मूळ प्रांताचंच नाव लावत आली होती. एखाद्या किन्नरीसारखी ती गायची... तें असो...हळूहळू व्हायोलेट फुलांचा सुगंध येणाऱ्या चिठ्ठ्या स्टुडिओच्या दरवाजाखालून सरपटत यायला लागल्या ! ...अन् अशी एखादी चिठ्ठी आली रे आली, की चोरट्या पावलानं रेमंड घरातून नाहीसा होतो, हेही माझ्या लक्षात आलं...रेमंडला तर सकाळच्या नाश्त्यापूर्वी फिरायला जायची सवय कधीच नव्हती ... तेव्हा मी ' दोन अधिक दोन ' सारखं एक साधं गणित मांडलं, आणि काय उत्तर काढायचं, ते मनाशी काढलं !

...इकडे रेमंडनंही अमेरिकेला जाणाऱ्या संगीतमेळाव्यात ' अमुक कुणी तरी ' म्हणून आपली नेमणूक झाल्याचं जाहीर करून टाकलं !

...अन् मग आई आणि मी, आम्ही दोघीच पॅरिसमध्ये उरलो ! आईची प्रकृती ठीक नसायचीच—तेव्हा मग ' र्यू मार्ग्युएरित 'वरच्या एका छोट्या

होटेलमध्ये आम्ही रहायला गेलो. इथे आई एकदाची नीट गादीवर झोपू शकत होती–स्टुडिओतल्यासारखा, थंड लादीचा गारठा इथे जाणवत नव्हता; आणि वेळच्या वेळी दोनदा जेवणही मिळत होतं, कारण या निवासात जेवायचीही व्यवस्था होती.

इथेच एका जोडप्याकडे माझं लक्ष गेलं; बाकी तसं काय, त्या जोडप्यानं कुणाचंही, कुठंही लक्ष वेधून घेतलंच असतं! ती–जवळजवळ तिशीच्या आंतबाहेरची...आकर्षक...विशाल डोळे–असले विलक्षण डोळे मी कधी कुठे पाहिले नव्हते!–मृदु, अगाध, लुकलुकते...मनोवेधक डोळे–नजरेत वासनेचा पेटता अंगार फुललेला असतानाच, न्यूफौन्डलंडच्या भल्या मोठ्या कुत्र्याच्या दृष्टीतला नम्र बापुडवाणेपणादेखील तरळत असायचा! लालीलाल रंगाचे तिचे केस...त्यामुळे तिच्या चेहऱ्याला अग्निज्वालांची महिरप असल्याचा भास व्हायचा...तिच्या प्रत्येक हालचालीत प्रेमार्जवाचं स्पन्दन जाणावायचं... मला आठवतं, की तिच्या डोळ्यांचा ठाव घेऊ पहाणं, म्हणजे एखाद्या ज्वालामुखीच्या जागृत विवरात पाऊल घालण्यासारखंच आहे, असं माझ्या मनात त्यावेळीं आलं होतं!

...तो–लहानखुरा; भिवयांची ठेवण मोठी प्रसन्न; पण चेहऱ्यावर मात्र त्याच्या तारुण्याच्या मानानं काहीसं थकलेभागलेपण. कुणीतरी एक तिसरा त्यांच्याबरोबर नेहमी असायचाच. ती तिघजणं बोल बोल बोलत असायची अखंड; बरं, ते संभाषण इतकं जिवंत अन् जिव्हाळ्याचं...मला वाटायचं, इतर सामान्य लोकांच्याप्रमाणे विसाव्याचा, किंवा कंटाळ्याचा असा एकही क्षण या त्रयीच्या अनुभवाला येत नसावा...उलट आतल्या धगधगत्या ज्वाळांच्या आंचेनं त्यांचे प्राण अहर्निश पेटलेले असावेत....निखळ सौंदर्याचं प्रतीकच जणू अशी त्याची प्रज्ञाज्योत, तर समर्पणाला, आणि पुढे कोणत्याही स्वरूपांत मागे न उरायला सदैव सिद्ध असणाऱ्या स्त्रीहृदयातच तेवते तशी तिची प्रेमज्योत! तिसऱ्या त्या व्यक्तीचीच वृत्ती जास्त सुस्त–सतत वैषयिक सुखावर भर देऊन जीवनरस चाखल्यानं पेंगुळलेली, झाकळून गेल्यासारखी वाटली...

एक दिवस ती तरुणी माझ्या टेबलापाशी आली आणि म्हणाली, “हा माझा मित्र ऑंरी बातेय्, अन् हा ज्यां लोरे. ह्यानं तुमच्या कलेबद्दल काही थोडं फार लिखाणही केलंय्...आणि मी बर्त बादी. तुमच्या स्टुडिओत एखाद्या संध्याकाळी यायची आमची इच्छा आहे....तुम्ही आम्हाला नाचून दाखवणार असाल तर...”

मी अर्थातच आनंदानं अगदी फुलून गेले. ‘बर्त बादी’च्या आवाजासारखा कमालीचा वेधक, मायाळू, जीवनानंदानं आणि प्रेमानं थिरकणारा आवाज

तोपर्यंत, तसं म्हटलं तर आजपर्यंतसुद्धा – मी कधी ऐकला नव्हता – ऐकला नाही! अन् तिच्या सौंदर्याचा तर माझ्यावर इतका काही पगडा बसला होता... ते दिवस खरं म्हणजे बायकांच्या अगदी बेंगरूळ फॅशन्सचे... बावळटपणाचे... पण त्या काळातही फिरत्या रंगातले किंवा चमकणाऱ्या टिकल्या लावलेले अंगासरसे बेतशीर नि आकर्षक गाऊन्स घालून ती वावरायची. एकदा एका सम्मेलनात 'बातेय्'च्या कवितांचं वाचन करण्यासाठी ती निघाली असताना, तसला एक गाऊन तिच्या अंगावर मी पाहिला होता. त्यावेळी जांभळ्या फुलांचा संभार तिच्या माथ्यावर मुकुटाप्रमाणे शोभत होता. खरोखर, कुठल्याही कवीला याहून सुंदर वाग्देवी, स्फूर्तिदात्री म्हणून लाभली नसेल!

त्यानंतर कितीदातरी ते सर्वजण आमच्या स्टुडिओत यायचे. एकदा तर बातेयूनं आमच्या तिथे काव्यवाचन देखील केलं.

बाकी माझ्यासारख्या अल्पवयीन अशिक्षित अमेरिकन मुलीच्या दैवातच काही अतर्क्य योग संभवत असणार...एरवी पॅरिसमधल्या बुद्धिमंताच्या नि कलावंतांच्या काळजामनाची दारं उघडायची किल्लीच मला गवसणं, हे कसं शक्य होतं?... पॅरिस!... पुरातन ग्रीसच्या वैभवशाली काळात अॅथेन्सला जे महत्त्व होतं, तेच या युगात, आमच्या या जगात आज पॅरिसला आहे...

...पॅरिसच्या परिसरात दूरदूर भटकण्याची मला नि रेमंडला सवय होती. असल्या भटकंतीत कित्येकदा विलक्षण मनोवेधक स्थळं आमच्या आढळात यायची; म्हणजे उदाहरणादाखल – 'पार्क मॉसो' जिल्ह्यातलं तें त्रिनी वस्तु-संग्रहालय...ती एका विक्षिप्त फ्रेंच लखपतीनं मागे ठेवलेली आपल्या कर्तृत्वाची खूण! तसंच, असंच कधीतरी पाहण्यात आलेलं 'म्यूज़े गीमे', नि त्यातलं पौर्वात्य वैभव...तसं ते 'म्यूज़े कार्नव्हाले' (कार्नव्हाले वस्तुसंग्रहालय); तिथे नेपोलियनचा मुखवटा पाहून आम्हाला फारच गंमत वाटली होती; आणि 'म्यूज़े क्ल्यूनी' – तिथल्या पर्शियन तबकांसमोर रेमंडनं तासन्तास घालवले होते; आणि पंधराव्या शतकातल्या एका किनखापी पटावरची ती रमणी, नि तो शृंगाश्व (युनिकॉर्न), यांनी तर त्याला वेडच लावलं होतं!

फिरता फिरता आम्ही एक दिवस 'त्रोकादेरो'पाशी आलो. तिथे सोफ़ोक्लिसच्या 'इडिपस रेक्स'चं पोस्टर दिसलं; त्यावरून कळलं की त्या दिवशीच्या दुपारच्या प्रयोगात 'मूने स्यूली' काम करणार होता! खरं तर 'मूने स्यूली'चं नाव तोपर्यंत आमच्या कानावर आलं नव्हतं, तरी पण ते नाटक पहायची मात्र भारी ओढ वाटली; तेव्हा मग पोस्टरवरचे तिकिटांचे दर आणि आमचा खिसा यांचा काही मेळ जमतो का, ते पाहिलं! आमच्याकडे निघाले फक्त तीन फ्रॅन्क्स् आणि तिथे वरच्या चढत्या रांगातला कमीतकमी दरसुद्धा

प्रत्येक खुर्चीला पंच्याहत्तर सेंटाईम्स होता!...त्याचाच अर्थ त्या दिवशीच्या जेवणाला फाटा! तरीसुद्धा आम्ही अगदी वरच्या रांगेच्या मागे उभं राहण्याच्या जागेकडे आपला मोर्चा वळवलाच!

'त्रोकादेरो'च्या रंगमंचावर पडदा असा नव्हताच. काही आधुनिक लोक ज्याला तथाकथित ग्रीक कला समजतात, त्याचं अगदी भिकार अनुकरण नेपथ्यरचनेत दिसत होतं. पेहेराव–वस्त्रप्रावरणं, यांच्यावरच्या पुस्तकातून 'ग्रीक वेषभूषा' म्हणून जो काय प्रकार वर्णिलेला आढळतो, तसल्या बेकार अवतारात 'कोरसनं'–ग्रीक गायकसमूहानं–प्रवेश केला. साधारणसं काहीतरी संगीत आणि एक पांचट गोड धुन वाद्यवृन्दातून तरळत आमच्या कानापर्यंत येत होती... रेमंड अन् मी एकमेकांकडे पहायला लागलो... त्या दिवशीचा आमचा उपास म्हणजे फुकटचा स्वार्थत्यागच होता, असंही मनात येऊन गेलं ... इतक्यात रंगमंचाच्या डाव्या बाजूच्या छपरीखालून–ती छपरी म्हणजे राजवाडा अशी कल्पना होती–एक व्यक्ती रंगमंचावर आली–ऑपेरातल्या (संगीतिकेतल्या) त्या रद्दी कोरस–समूहगायनानंतर अन् त्यापेक्षा जरा बऱ्यापैकी 'कोमेदी फ्रॅंसेज' नंन्तर (फ्रेंच प्रहसनात्मक प्रवेशानंतर) आपला हात उंचावून त्या व्यक्तीनं सुरुवात केली :—

"मुलांनो, कादमसच्या तरुण वंशजांनो, या राजवाड्याच्या दिशेनं का आरोळ्या ठोकता आहांत तुम्ही? आणि या माळांचं नि हारांचं काय इथे प्रयोजन?"

खरंच त्या आवाजाच्या पहिल्याच उच्चारणानं माझ्या मनात जी भावना उचंबळून आली, तिचं वर्णन कसं करावं! इतिहासजमा झालेल्या त्या वैभवशाली ग्रीसच्या अलोट कीर्तीच्या काळात, डायनिससच्या रंगमंदिराच्या वेळीं, सोफोक्लिसच्या उत्कर्षाची परिसीमा झाली असताना, पुऱ्या रोममध्ये–किंवा तसं म्हणायचं तर कोणत्याही देशात नि कोणत्याही काळात, असा दुसरा आवाज अस्तित्वात असू शकेल किंवा नाही, कुणास ठाऊक!...त्या क्षणापासून मुने स्यूलीची व्यक्तिरेखा नि त्याचा आवाज, यांच्या परिमाणाच्या कक्षा रुंदावायला, पसरायला लागल्या...अवघ्या शब्दब्रह्माला त्यांची गवसणी पडली! साऱ्या कला–सारं नृत्य, त्यांनी आपल्यात सामावून घेतलं...अन् पाहता पाहता विस्फारणाऱ्या त्या आकृतीनं आणि विस्फुट होणाऱ्या आवाजानं, असं अनावर विश्वरूप धारण केलं, की 'त्रोकादेरो' रंगमंदिराच्या उंचीरुंदीच्या साऱ्या सीमा त्या अतिमानवी कलावंताला वेढून घ्यायला, सामावून घ्यायला, जणू तोकड्या पडल्या!...दूर पाठीमागे उभ्याउभ्या रेमंडनं अन् मी श्वास रोखून धरला होता... आमचे चेहरे पांढरेफटक पडले–डोकी भोवंडायला लागली...

डोळ्यांना आसवांच्या धारा लागल्या...आणि जेव्हा तो पहिला अंक संपला, तेव्हा त्या आनंदाच्या धुंदीत एकमेकांना मिठी मारण्यावाचून काही दुसरं सुचलं नाही!...नंतरच्या मध्यंतरात तर आम्ही दोघांनी ठरवून टाकलं, की आमच्या यात्रेची सांगता व्हायची असेल तर ती इथेच... ज्यासाठी परदेशी येण्याचा एवढा अट्टाहास आम्ही केला होता, ते श्रेय गवसण्याचं एकमेव स्थान हेच!

दुसरा अंक सुरू झाला, आणि त्या महान् शोकान्तिकेचा पदर न् पदर आमच्यासमोर उलगडू लागला. त्या तरुण विजयसंपन्न राजाच्या आत्मविश्वासाला कधीच नव्हे ते नव्या शंकांचे, अस्वस्थतेचे पहिले तडे गेले. काहीही किंमत, कोणतंही मोल देऊन सत्य जाणून घेण्याची प्रबळ इच्छा त्याच्या मनात उत्पन्न झाली –...आणि...आणि मग तो परम महत्त्वाचा क्षण आला! मुने स्यूलीचं नृत्य सुरू झालं...हेच – माझ्या अन्तश्चक्षूंसमोर सतत तरळत होतं ते हेच दिव्य दृश्य!... एका धीरोदात्त व्यक्तिमत्त्वाची नृत्यरेखा...!

... इतक्यात आणखी एक मध्यांतर...मी रेमंडकडे पाहिलं. त्याचाही चेहरा फिकटलेला...डोळे जळजळणारे...स्वतःच्या पायावर स्वतःचा ताबा नसावा, तसे आम्ही झोकांड्या खात होतो!...तिसरा अंक– अवर्णनीय!...कुणीच तो अनुभव शब्दात पकडू शकणार नाही...जे लोक प्रत्यक्ष तिथे होते, मुने स्यूलीला ज्यांनी रंगमंचावर प्रत्यक्ष पाहिलं आहे, त्यांनाच त्या क्षणी आम्हाला काय वाटलं, त्याचा उमज पडेल!

...ज्या पापात्म्याच्या शोधात सारे गढले आहेत, तो पापात्मा आपण स्वतःच आहोत, याची जाणीव झाल्यानं इडिपस राजाची अवस्था बेभान झाली... एकीकडे आपल्या हातून घडलेल्या अधर्म्य पापकर्माबद्दलची टोचणी अन् एक अनाकलनीय भीती; आणि दुसरीकडे दुखावलेल्या स्वाभिमानामुळे झालेला संताप नि दुःख...या सर्व संमिश्र भावनांचे झटके त्याला आलटून पालटून येत असताना त्या अंतिम, दुःखातिशयाच्या क्षणी त्यानं आपल्या हातांनी आपले डोळे उखडून काढले...अन् आता आपण कुणालाही पाहू शकणार नाही, याची जाणीव होऊन आपल्या मुलांना साद घालत, जवळ बोलावत त्या विकल अवस्थेत तो अखेर रंगमंचावरून गेला...तेव्हा... त्रोकादेरोचा तो प्रचंड प्रेक्षक-समुदाय...ते सहा हजार लोक – हुंदके देऊन देऊन गदगदत होते!

रेमंड आणि मी, त्या लांबलचक जिन्यावरून इतक्या सावकाशीनं आणि निरुपायानं उतरत होतो, की रखवालदाराला आम्हाला शेवटी हाकलून बाहेर काढावं लागलं...मला झालेल्या कलेच्या साक्षात्काराचं पुरं भान मला तिथेच प्रथम झालं...इथून पुढची माझी वाट मला आता सापडल्यासारखीच होती!

...आम्ही घरी परतलो, ते मुळी स्फूर्तीची धुंदी चढल्यासारखे... पुढे कित्येक आठवडे त्या दिव्य अनुभवाच्या बळावरच जणु आम्ही जगत होतो...एक दिवस याच रंगमंचावर या महान् मूने स्यूलीबरोबर मीही उभी राहीन, असं स्वप्न मला दूरान्वयानं देखील कधी पडलं नव्हतं!!

* * *

प्रदर्शनातल्या रोदांच्या कलाकृती पाहिल्याक्षणीच त्याच्या प्रतिभेच्या दर्शनानं मी भारावून गेले होते...माझ्या मनाच्या पाठीमागं सतत ती जाणीव होती... एक दिवस मग मी युनिव्हर्सिटीच्या त्या रस्त्यावरच्या त्याच्या स्टुडिओची वाट धरली. रोदांच्या शोधात मी केलेल्या या वारीची तुलना, 'पॅन' देवाला शोधायला त्याच्या अद्‌भुत् गुहेकडे निघालेल्या 'सायकी'च्या पदयात्रेशीच होऊ शकली असती. फरक इतकाच की मी वाट पुसत होते ती 'अपोलोला'... 'इरॉस'ला नव्हे!

रोदां चांगला औरस चौरस, ठेंगणा पण शक्तिवान् होता. केस अगदी डोक्याच्या लगोलग कापलेले, आणि चांगली भरघोस दाढी. खऱ्याखुऱ्या अगदी श्रेष्ठ कलावंताच्या अंगभूत साधेपणानं आणि सहजतेनं त्यानं मला आपल्या कलेचं दर्शन घडवलं...जाता जाता त्यानं घडवलेल्या पुतळ्यांची नावंही तो चुटपुटती सांगत होता...तरीपण त्या नावांना त्याच्या लेखी फारसं महत्त्व असावंसं वाटलं नाही...तो त्या शिल्पाकृतींच्या अंगावरून हात फिरवीत होता. त्यांना जणू कुरवाळीतच होता...त्याच्या त्या स्पर्शानं तो संगमरवर वितळून शिश्याच्या रसासारखा पाझरत असल्याचा भास मला त्यावेळी झाल्याचं स्पष्ट आठवतं! अखेरशेवटी त्यानं थोडीशी मळलेली माती घेतली आणि एक मोठा श्वास घेऊन तळहातात धरून ती माती तो मळू लागला...धगधगत्या भट्टीसारखी उष्णता त्याच्या शरीरातून जणू वाहायला लागली...अन्...काही क्षणातच स्त्रीच्या स्तनाची एक प्रतिकृति त्याच्या बोटांखाली श्वासोच्छ्‌वास करत असावी तशी धुगधुगू लागली...!

...त्यानं माझा हात हातात धरला, अन् टॅक्सीनं मला माझ्या स्टुडिओत आणलं...मी चटकन् कपडे बदलून माझ्या नृत्याचा कुडता चढवला आणि 'थिऑक्रिटस'चं एक निसर्गसूक्त त्याच्यासमोर नाचले...आन्द्रे बोनियेनं त्याचं माझ्यासाठी भाषांतर असं केलं होतं :

"'पॅन'ची होती 'एको'वर प्रीती,
पण 'एको'ची आस धरे 'सॅटर'चा ध्यास..."

...नंतर 'नवनृत्या' बद्दलच्या माझ्या कल्पना त्याला समजावून सांगण्यासाठी मी क्षणभर थांबले...तर माझ्या ध्यानात आलं, की त्याचं लक्षच

नव्हतं – त्याला काहीही ऐकू येत नव्हतं ... पापण्या पाडून तो माझ्याकडे एकटक पहात होता ... त्याचे डोळे चकाकत होते ... पेटले होते ... अन् नंतर त्याच्या स्वतःच्या कलाकृतींच्याकडे पहावं, तसंच मला पहात न्याहाळत तो माझ्याजवळ आला ... त्याचे हात माझ्या मानेवरून, स्तनांवरून, नितंबावरून, उघड्या पायांवरून नि पावलांवरून हळुवारपणे फिरले ... त्यानं माझे दंड हलकेच थोपटले ... हे असं, शिल्प घडवण्यासाठी माती मळल्यासारखं माझ्या सर्वांगाचं मर्दन त्यानं चालवलं असताना, त्याच्या अंगातून स्रवणाऱ्या उष्ण धर्मानं मी जणू काही जळून वितळून जाते आहे, असं मला वाटलं ... माझं संपूर्ण अस्तित्व त्याच्या ठायी समर्पण करण्याची एकच एक इच्छा माझ्या मनात उफाळून येत होती ... अन् घरच्या संस्कारांमुळे बुजले भ्याले नसते, तर मी तेच केलं असतं ... पण ऐन वेळी मी मागे झाले, कुडत्यावर माझा फ्रॉक ओढून घेतला आणि त्याला निरोप दिला ... तो गोंधळूनच गेला होता ... !

रोदांला यानंतर मी पाहिलं, ते पुढे दोन वर्षांनंतर. बर्लिनहून मी पॅरिसला परतले, तेव्हा त्यानंतर कितीतरी वर्षं माझी त्याची मैत्री होती – मी त्याला माझा गुरू मानत होते.

'युजिन कारिएर' नावाच्या आणखी एका महान् कलाकाराची माझी याच सुमाराला भेट झाली. रोदांच्या भेटीपेक्षा हा अनुभव अगदी निराळा, पण तेवढाच आनंददायी ठरला. 'केझर' या लेखकाची पत्नी मला त्याच्या स्टुडिओत घेऊन गेली ... आमच्या एकाकीपणाबद्दल कणव वाटून कितीदातरी ही केझरबाई मला तिच्याकडे बोलवायची – आपल्या कुटुंबात मला सामावून घ्यायचा प्रयत्न करायची, तिच्या घरी व्हायोलिन वाजवायला शिकणारी तिची मुलगी, आणि तिचा होनहार कलावंत मुलगा लुई (– एक तरुण संगीतरचनाकार म्हणून तो आता प्रसिद्धीला आला आहे.), यांच्या संगतीत तिथे जेवणाच्या टेबलाभोवती किती सुंदर मनोमेळ जमायचा ... साक्षीला संधीप्रकाशात तेवणारी एक दीपकळी ... ! ... तिथल्या भिंतीवर एक विलक्षण, वेधक, नि उदासवाणं चित्र मी पाहिलं होतं – केझरबाई म्हणाली, "यूजिननं काढलेला माझा हा पोर्ट्रेट आहे."

एक दिवस ती मला, 'हेगेसिप् मोरो' रस्त्यावरच्या युजिनच्या घरी घेऊन गेली. सर्वांत वरच्या मजल्यावरच्या त्याच्या स्टुडिओपर्यंत चढून गेल्यानंतर आत पाहिलं तर तो मधे ... अन् आजूबाजूला त्याचा कुटुंब परिवार, अन् मित्रमंडळी यांचा गराडा ! ... त्या क्षणींच मला कधीही प्रत्ययाला न आलेलं एक 'भान' झालं ... युजिनच्या तिथल्या अस्तित्वातल्या फार मोठ्या आध्यात्मिक सामर्थ्याची जाणीव मला झाली ... प्रज्ञा आणि प्रकाश ! ... सर्वगामी सौहार्दाचा – स्नेहाचा

एक झराच जणू त्याच्या व्यक्तित्वांतून एकसारखा झुळझुळत होता... त्याच्या चित्रातलं सौंदर्य, सामर्थ्य अन् कलेची किमया... साऱ्या साऱ्यातून त्याच्या पुनित आत्म्याचा साक्षात्कार घडत होता..

ख्रिस्ताच्या पुढ्यात उभं रहाण्याचा यदाकदाचित् प्रसंग आला असता, तर मला जे वाटलं असतं, त्याचाच अनुभव युजिन्च्या सान्निध्यात मला आला ... विस्मयादरानं मी इतकी भारून गेले... गुडघे टेकून त्याला शरण जाण्याचीच इच्छा माझ्या मनात उफाळून आली; माझ्या स्वभावातल्या जन्मजात भित्रेपणानं आणि संकोचानं मला मागं खेचलं नसतं, तर मी तसं नक्की केलंच असतं !

पुढे पुष्कळ वर्षांनी ह्या भेटीच्या प्रसंगाचं वर्णन करताना मादाम योस्कानं लिहिलं आहे :

"प्रत्यक्ष युजिन् कारिएरच्या पहिल्या भेटीचा योग एक सोडून दिला, तर माझ्या लहानपणच्या कोणत्याही घटनांपेक्षा कारिएरच्या स्टुडिओत झालेली तिची (इझाडोराची) भेट, मला सर्वात स्पष्टपणे आठवते... आठवतं की त्या दिवशी तिचा चेहरा आणि तिचं नाव, दोन्ही माझ्या आत्म्याच्या अगदी थेट गाभ्यापर्यंत आत घुसली... कारिएरच्या घराचा दरवाजा ठोठावताना त्या दिवशीसुद्धा माझं काळीज नेहमीप्रमाणे धडधडत होतं... दारिद्र्याच्या त्या मूर्तिमंत निधानात पाऊल ठेवताना उफाळून येणारा भावनावेग मला नेहमीच मोठ्या कष्टानं, प्रयत्नानं आवरून धरावा लागायचा.—'मोंमार्त्र' मधलं ते छोटसं घरकुल... आनंदभरल्या मनानं अबोलपणे आपलं काम करणारा थोर कलाकार युजिन्... अवतीभोवती त्याची जिवलग मंडळी... पत्नी आणि आई... नेहमीचे त्यांचे काळ्या लोकरीचे कपडे... मुलं... ज्यांच्याकडे नावाला एकसुद्धा खेळणं नाही खेळायला, अशी मुलं !... पण साऱ्यांचे चेहरे कसे सदाफुलीसारखे सदाप्रसन्न, अन् त्यांच्या लाडक्या कलाकाराबद्दलच्या जिव्हाळ्यानं ओतप्रोत !... हं !... देवाघरची प्रेषित माणसं ती !

तो नम्र कलामहर्षी आणि त्याचा तो पाश्चर इन्स्टिट्यूटमधला अबोल मित्र मेचनीकॉफ यांच्यामध्ये इझाडोरा होती – दोघांच्याहूनही अधिकच निःस्तब्ध उभी राहिलेली. लिलियन गिशचं एक उदाहरण सोडलं, तर इझाडोरा त्या दिवशी दिसत होती, तितकी लाजरीबुजरी अमेरिकन मुलगी माझ्या पाहाण्यात आजपर्यंत कधी आलेली नाही. मुलानं पहावं, कौतुक करावं अशी गोष्ट असली की त्याला तिथे जवळ न्यावं तशा आविर्भावानं युजिन्नं माझा हात धरून इझाडोरापाशी मला नेलं, आणि म्हणाला, "ही इझाडोरा डंकन"... एवढंच... मग सारं शांत... अन् त्या शांततेच्या कोंदणात विलसणारं ते नाव 'इझाडोरा !'... मग एकाएकी नेहमी अगदी हळुवार हलक्या स्वरात बोलणाऱ्या युजिन्ची

धीरगंभीर आवाजातली घोषणा : "ही तरुण अमेरिकन मुलगी जगात क्रांती घडवून आणणार आहे!"

... लक्झेम्बर्गमधल्या कारिएरनं काढलेल्या त्याच्या परिवाराच्या चित्रासमोरून जाताना माझ्या डोळ्यात आसवं जमली नाहीत, असं कधीं होत नाही ... तो स्टुडिओ आठवतो — पुढे तिथे वारंवार जाणाऱ्या मित्रमंडळीपैकीच मी एक झाले होते, ते आठवतं ... त्या परिवारानं मला एकदम आपलं म्हटलं, आपल्यात सामावून घेतलं, ही तर माझ्या तारुण्यातली एक सर्वांत जिव्हाळ्याची आठवण म्हणून मी जतन केलेली आहे.... कितीदा तर स्वतःला स्वतःबद्दल संदेह निर्माण झाला असताना, 'या कुटुंबानं मला आपलं म्हटलं होतं', हाच विचार मनात आणून मी माझ्या आत्मविश्वासाला सावरून धरू शकले आहे; कारण युजिन् कारिएरच्या प्रतिभेची पाखर एखाद्या वरदानासारखी माझ्या सबंध जीवनावर पसरलेली आहे ... कलेतला परमोच्च आदर्श गाठण्याचं खडतर व्रत पाळताना माझा निश्चय ढळू नये, म्हणून याच प्रतिभेनं मला वारंवार उत्तेजन दिलं — कलाविष्काराच्या पवित्र विश्वातही परम पवित्र, अशा स्थानाकडे माझी पावलं वळावीत, म्हणून याच प्रतिभेनं वेळीं खुणेचा हात पालवला ... एवढंच नव्हे, तर दुःखातिशयानं माझ्यावर वेड लागायची पाळी आली असताना कारिएरच्या, चित्रकलेच्या सान्निध्यानंच मला सावरलं होतं ... माझी जीवनावरची श्रद्धा पुन्हा अढळ झाली, ती त्यामुळेच! ...

... दुसऱ्या कोणाच्याही कलेनं एवढ्या अंगभूत सामर्थ्याचा साक्षात्कार जगाला घडवलेला नाही ... कोणत्याही कलाजीवनानं अवतीभोवतीच्या माणसांना आधारभूत ठरावी अशी दैवी दयाशीलता दाखवलेली नाही ... त्याची चित्रं वस्तुसंग्रहालयात खरं म्हणजे ठेवायचीच नाहीत ... एखाद्या आध्यात्मिक शक्तीनं भारलेल्या मंदिरात लावायची ... म्हणजे मग साऱ्या मानववंशाला तिथे येऊन त्या महात्म्याशी संवाद साधता आला असता — पुनित होता आलं असतं, आशीर्वाद घेता आला असता ...!

# १०

एका रात्री त्या ' वेस्टर्न नाईटिंगेल ' ( पाश्चिमात्य गानकोकिळा ) च्या बरोबर ' लोई फुलर ' माझ्या स्टुडिओत आली. अर्थात् मी तिला नाचून दाखवलं, आणि मग नेहमीप्रमाणे माझ्या साऱ्या नृत्यकल्पना तिला समजावून सांगितल्या ... सदासर्वकाळ येणाऱ्या जाणाऱ्या प्रत्येकासमोर माझं हेच चालायचं ... मला वाटतं नळबिळ दुरुस्त करणारा मिस्त्री जरी आत आला असता, तरी मी हेच केलं असतं ... लोइ फुलरनं बराच उत्साह दाखवला ... दुसऱ्या दिवशीच लगेच ती बर्लिनला जाणार होती; तेव्हा मीही बर्लिनला जाऊन तिच्या संचांत सामील व्हावं, असं तिनं सुचवलं ... ती स्वतः एक मोठी कलावती तर होतीच. ... पण शिवाय मला अत्यंत आवडणाऱ्या ' सादा याक्को 'च्या कार्यक्रमांची नि प्रयोगांची व्यवस्थाही ती पाहत असे. सादा याक्को आणि मी मिळून जर्मनीत कार्यक्रम करावेत, अशीही लोइ फुलरनं सूचना केली. मी तर काय, एका पायावर तयार होते — तेव्हा मग जर्मनीला जायचं, अन् लोई फुलरला भेटायचं असं सारं नक्की ठरलं.

शेवटच्या दिवशी आन्द्रे बोनिये माझा निरोप घ्यायला आला तेव्हा, नोत्रदामपर्यंत जाऊन अखेरची तीर्थयात्रा आम्ही केली आणि मग त्यानं मला स्टेशनवर पोहोचवलं. निरोपादाखल मोठ्या संकोचानं माझं एक हलकंसं चुंबन घेतलं त्यानं ... पण मला मात्र त्याच्या चष्म्यापाठीमागे एक वेदना तरळून गेल्याचा भास झाला ... !

बर्लिनला होटेल ' ब्रिस्टल ' मधल्या एका भव्य अपार्टमेंटमध्ये लोई फुलर भेटली, तेव्हा तिच्या भोवती तिचा कलापरिवार होता ... दहाबारा सुंदर युवती

तिच्या भोवती भोवती फिरत आळीपाळीनं तिचं चुंबन घेत होत्या... तिचे हात दाबत, थोपटत होत्या!... मी ज्या सरळसाध्या संस्कारात वाढले, तिथे आईचा आमच्या सर्वांवर खूप जीव होताच की – पण हे कुरवाळण्यागोंजारण्याचं प्रकरण अजिबात नव्हतं! त्यामुळे प्रेम व्यक्त करायचा हा भलता अतिरेकी प्रकार पाहून मला धक्काच बसला... हे सारंच मला नवखं होतं... प्रेमानं अगदी ओतप्रोत असं इथल्यासारखं वातावरण इतर कुठेच माझ्या अनुभवाला आलं नव्हतं...

...लोई फुलरच्या दिलदारपणाला – दातृत्वाला सीमाच नव्हती... मी गेल्यागेल्या घंटी वाजवून तिनं माझ्यासाठी असं काही राजेशाही जेवण मागवलं ... की तो सर्व थाट तिच्या बटव्याला किती महाग पडणार आहे त्याचा अंदाज करण्याचा मोह मी टाळूच शकले नाही!

लोई फुलरला त्या रात्री ' वुइंटर गार्डन्स 'मध्ये नाचायचं होतं; पण तिच्याकडे पाहून ठरल्याप्रमाणे तिथे वेळेवर ती कशी पोहोचणार कुणास ठाऊक, असं मला राहून राहून वाटत होतं... पाठीच्या मणक्यांतून उठणाऱ्या भयंकर कळांनी ती अगदी हैराण झाली होती... तिच्या सुंदर परिवारातल्या मुली थोडथोड्या वेळानं तिच्या पाठीच्या न् खुर्चीच्या मधोमध बर्फाच्या पिशव्या दाबून ठेवत होत्या... तरी " आणखी एक पिशवी दे ग... जरासा शूळ कमी होतो... शमल्यासारखा वाटतो त्यानं ... " असं ती म्हणतच होती...

लोई फुलरला पाहण्यासाठी त्या रात्री आम्ही सर्व बॉक्समध्ये बसलो होतो ...खरंच! काही क्षणांपूर्वीच्या वेदनेनं तडफणाऱ्या त्या रोगी स्त्रीशी आमच्या समोरच्या या स्वरूपप्रभेचा काहीतरी संबंध होता का? ... पाहता पाहता या या डोळ्यांसमोर ती अनेकरंगी ऑर्किडपुष्पाचं रूप ल्याली!... हेलावणारं, तरंगांच्या झुल्यावर झुलणारं समुद्रफुल झाली! ... अखेरशेवटी चक्री देठाच्या कमळाचंसुद्धा रूप तिनं घेतलं – ! मर्लिनची सारी जादू... प्रकाश, रंग नि बदलत्या, तरळत्या रूपाकारांची ती मयसभाच बनली खरोखर! ... कसली असामान्य प्रतिभा ही! लोई फुलरचं अनुकरण किती नर्तकींनी कितीदा केलं... एकीच्याही कलाविष्कारातून त्या विलक्षण प्रतिभेची दूरान्वयानं नुसती आठवणसुद्धा कधी होऊ शकली नाही...! मी अगदी स्तिमित झाले... अन् स्तिमित झालेल्या त्या क्षणातच एक अपूर्व भानही झालं मला ... जाणवलं की हा कलेचा उद्रेक म्हणजे एकाएकी प्रत्यक्ष निसर्गालाच आलेलं भावनेचं उधाण होतं... याची पुनरावृत्ती होणं केवळ अशक्यच नाही का? साऱ्या प्रेक्षकवर्गाच्या देखता डोळा ती अनंत शबल रूपं, प्रतिरूपं धारण करते आहे ... छे! विश्वास बसणंच कठीण! – असं पुन्हा घडणं नाही – आणि जे घडलं त्याचं यथार्थ वर्णन कुणीही करू शकणार नाही... बदलत्या रंगांची आणि उडत्या – लहरत्या लिबर्टी शेवांची मूळची

कल्पना लोई फुलरचीच. प्रकाशयोजनेच्या नि फिरत्या रंगांच्या निर्मितीच्या मुळाशी ज्या प्रेरकशक्ती होत्या, त्यांपैकी एक लोई फुलरसुद्धा ... मी हॉटेलकडे परतले, ती अगदी भारावलेल्या, आणि या अतर्क्य कलाविष्कारानं भान हरपून गेलेल्या अवस्थेतच ... !

दुसऱ्या दिवशी सकाळीं मी बर्लिनच्या पहिल्यावहिल्या दर्शनासाठी बाहेर पडले ... ग्रीसच्या नि ग्रीक कलेच्या स्वप्नात आधीच रंगून गेलेली मी ... बर्लिनच्या वास्तुशिल्पाची प्रथमक्षणी माझ्यावर खूपच छाप पडली ... " पण, पण हे ... ग्रीसच आहे साक्षात् " ... मी उद्गारले ...

... मात्र जरा बारकाईनं परीक्षण केल्याबरोबर माझ्या लक्षात आलं की बर्लिन ग्रीससारखं नव्हतं — मुळीच नव्हतं ! ग्रीसची नॉर्डिक आवृत्ती होती ही ! हे काही डोरिक स्तम्भ नव्हेत, ऑलिम्पियाच्या निळ्यानिळ्या आकाशाचा वेध घेणारे — हे तर जर्मन वास्तुशिल्पकारांचं ग्रीसबद्दलचं काल्पनिक पांडित्य ! ... आणि मग जेव्हा कैसरचं राखीव पोलीसदल बदकाच्या चालीनं ' पॉटस्दामर प्लाझ ' च्या त्या तथाकथित डोरिक स्तभांमधून बाहेर पडताना मला दिसलं, तेव्हा आल्या-पावलानं सरळ मी ब्रिस्टलकडे परतले, अन् स्वतःशीच पुटपुटले : " एक ग्लास बियर द्या बाई ताबडतोब ... मी भलतीच थकलेय् अगदी ! "

थोडे दिवस आम्ही बर्लिनला होतो, आणि मग ब्रिस्टल सोडून लोई फुलरच्या संचाबरोबर लाईप्झिगला गेलो. सर्वांच्या ट्रंक्स मागेच ठेवल्या होत्या ! पॅरिसहून जी लहानशी एक ट्रंक मी येताना बरोबर आणली होती, तीही अर्थात् इतरांच्या सामानाबरोबर मागेच राहिली ! म्यूझिकहॉलसूशी ... संगीतदालनांशी संबंध असलेल्या एका यशस्वी कलावतीच्या संदर्भात हे असं का घडत होतं, हे त्यावेळी मी समजू शकत नव्हते ... शँपेनच्या मेजवान्या, राजविलासी हॉटेलमधला अलिशान निवास ... या सर्व सुखासीन जीवनक्रमानंतर ट्रंक्ससुद्धा मागे ठेवून दौऱ्यावर जाण्यापर्यंत पाळी यावी ... याचा अर्थच मला लागत नव्हता; मग पुढे मला कळलं की, सादा याक्कोच्या कार्यक्रमांची सारी व्यवस्था लोई फुलरनं अंगावर घेतली होती ना, त्याचा हा परिणाम होता. सादा याक्कोचे प्रयोग पडत होते ... आणि ती तूट भरून काढण्यात लोई फुलरची सारी आवक खर्च होत होती ......

इथल्या साऱ्या जलपऱ्या, वनदेवता नि स्वर्गीय अप्सरांच्या अधूनमधून एका विलक्षण व्यक्तीला वावरताना मी पहायची ... काळा व्यवस्थित वेष ... लाजरा, संकोची स्वभाव ... रेखीव, पण काहीसा उग्र चेहरा ... काळेभोर केस कपाळावरून सरळ मागे विंचरून नेलेले ... आणि उदास, बुद्धिमान् डोळे ! हात बहुधा खिशात अडकवलेलेच असायचे ... कलाविषयात खूप रस वाटायचा

तिला; विशेषतः लोई फुलरच्या कलेविषयी बोलताना तर तिच्या वक्तृत्वाला एक प्रकारचं ओज चढायचं! तिथल्या त्या रंगीबेरंगी फुलपाखरांच्या अवतीभोवती फिरताना ती अमरत्वाचं प्रतिक असलेल्या ईजिप्तच्या त्या पौराणिक 'स्कारब' किड्यांसारखी दिसायची...तिला पाहताक्षणीच मी तिच्या व्यक्तित्वावर भाळून गेले...तिच्याकडे आकर्षित झाले...पण मला वाटलं, लोई फुलरवरच्या तिच्या प्रेमापायी तिची सारी भावुकता खर्ची पडल्यानंतर आता मला द्यायला, तिच्याकडे होतंच कुठे काय?

लाइप्झिगमध्येसुद्धा दररोज रात्री मी लोई फुलरचं नृत्य बॉक्समध्ये बसून पहात असे...तिच्या त्या तरल सुंदर पारदर्शी कलेच्या दर्शनानं माझं मन अधिकाधिक उचंबळून यायचं...तो अद्‌भुत जीव...प्रवाही व्हायचा, प्रकाशमय व्हायचा...प्रत्येक रंगात अन् ज्योतीत ते व्यक्तिमत्व उत्क्रांत होत असताना अखेर वाटायचं, की लवलवत्या ज्योतींच्या एका अभूतपूर्व चक्राकारात विरून अनंताप्रत तरळत जाण्याचा लोईच्या आत्म्यानं जणू संकल्पच सोडला आहे...!

...लाइप्झिगमधला एक प्रसंग मला आठवतो...बऱ्याच जणांच्या बोलण्यानं मला पहाटे दोन वाजताच जाग आली होती...कानावर पडणारे आवाज सारे सरमिसळ होते—तरी पण ज्या लालट केसांच्या मुलीला आम्ही 'नर्सी' म्हणून हाक मारत होतो, तिचा आवाज मात्र मी ओळखला...तसंच कारण होतं तिला 'नर्सी' म्हणायचं; कारण कुणाचंही डोकंबिकं दुखत असलं की ती सेवा-शुश्रूषेला नेहमीच पुढे व्हायची...तर त्या कुजबुजीच्या गोंधळातून मला नर्सी बर्लिनला परत जाण्याबद्दल बोलते आहे एवढं कळलं...कुणा एका व्यक्तीला भेटून आम्हा सर्वांना म्युनिकला जाता येण्याएवढी रक्कम मिळण्याची व्यवस्था होते का, हे ती पाहाणार होती...एवढं सारं बोलणं वगैरे झालं. अन् नंतर त्या तेवढ्या मध्यरात्री ही लाल केसांची मुलगी माझ्याकडे आली...आली अन् मोठ्या आवेगानं माझं चुंबन घेऊन ओथंबलेल्या स्वरात म्हणाली, "बर्लिनला जायला निघतेय् मी..." बर्लिनचा प्रवास म्हणजे फक्त काही तासांचा प्रश्न होता...त्यामुळे आम्हाला सोडून जायला तिला एवढं अस्वस्थ नि बेचैन वाटायला काय झालं होतं, याची कल्पना मला येईना!...म्युनिकला जाण्यापुरते पैसे घेऊन ती केव्हाच परतलीसुद्धा...

म्यूनिकहून व्हिएन्नाला जायची आमची इच्छा होती...पण पुन्हा पुरेसे पैसे नव्हतेच...आणि यावेळीं ते कुठून तरी मिळतील, अशी सुतराम् शक्यता नव्हती...तेव्हा अमेरिकन कॉन्सलची मदतीसाठी भेट घ्यायला मी आपण होऊन पुढे झाले..."तुम्ही आमच्या तिकिटांची व्यावस्था केलीच पाहिजे," असंच सरळ मी कॉन्सलला सांगितलं...अन् शेवटी माझ्या विनवण्यामनधरण्या-

मुळेच आम्ही व्हिएन्नाला जाऊन पोहोचलो... आमच्याजवळ काही सामानसुमान असं नसूनसुद्धा हॉटेल ब्रिस्टलमधल्या एका मोठ्या राजविलासी अपार्टमेंटमध्ये आमची उतरायची व्यवस्था झाली होती...मात्र लोई फुलरच्या कलेबद्दलचा आदर नि प्रेम किंचितही कमी झालेलं नसतानाही, माझ्या मनात तऱ्हतऱ्हेचे इतर विचार यायला लागले होते. माझ्या आईला पॅरिसला एकटी सोडून मी या सुंदर पण अर्धवट बायकांच्या मेळाव्यात काय करत होते ? दौऱ्याच्या संदर्भात जातायेता घडणाऱ्या प्रत्येक नाट्यपूर्ण घटनेची, सहानुभूती बाळगणारी – पण एक असहाय्य साक्षीदार होऊन राहाण्यापलीकडे माझा इथे काय उपयोग होता ?......

हॉटेल ब्रिस्टलमध्ये ती लाल केसांची नर्सीच माझी खोलीतली सोबतीण होती. एकदा पहाटे चार वाजताची गोष्ट ! तिनं एक मेणबत्ती पेटवली आणि, "तुझा गळा दाबण्याची देवानं मला प्रेरणा केली आहे."... अशी घोषणा करत ती माझ्या बिछान्याच्या दिशेनं पुढे पुढे यायला लागली !

...एखाद्या मनुष्याला एकाएकी वेड लागलेलं पाहिलं, तर त्याच्या मनाविरुद्ध शक्य तेवढं जाऊ नये, असं ऐकलेलं असल्यानं, मनातून भयंकर घाबरले असूनही मी वरकरणी शांत राहिले. अन् म्हटलं, "ठीक आहे, पण मला आधी प्रार्थना तर करू देशील की नाही ?..."

"बरं कर प्रार्थना." अशी परवानगी देऊन तिनं माझ्या पलंगाशेजारच्या छोट्या मेजावर ती मेणबत्ती ठेवली.

मी हलकेच पलंगावरून उतरले, आणि सैतान पाठीस लागला असावा, तशी जीव घेऊन पळत सुटले...धाडकन् दरवाजा उघडला...खोल्यामधल्या लांबलचक बोळातून धावतउडत...अन् रुंद जिन्यावरून धापा टाकत हॉटेलच्या कारकुनाच्या कचेरीत शिरले...अंगावर रात्री झोपताना घातलेला पोशाख तसाच...आणि केसांच्या बटा मागे उडत असलेल्या ... मी किंचाळले, "एका बाईला वेड लागलंय् ! वेडी झालीय् ती !"

नर्सी माझ्या पाठलागावर होतीच...डॉक्टरलोक येऊन पोहोचेपर्यंत तिला आवरून धरायला हॉटेलमधले सहा कारकून लागले ! त्यानंतर डॉक्टरांच्या तपासणीचा तो निष्कर्ष ऐकून मला इतकं लाजल्यासारखं झालं, की आईला पॅरिसहून निघून येण्याबद्दल मी तार ठोकली – आई आलीसुद्धा लगेच...माझ्या अवतीभोवतीच्या सध्याच्या परिस्थितीबद्दल मी तिला सारं सांगितलं, आणि विचारांती ठरवलं की इतःपर व्हिएन्नात रहायचं नाही...

व्हिएन्नामध्ये लोई फुलरबरोबर असताना मुद्दाम खास कलावंतांसाठी म्हणून मी 'क्यूनस्लर हाऊस'मध्ये नाचले होते एका रात्री. तिथे प्रत्येक पुरुषानं एक एक लाल गुलाब आपल्या बरोबर आणलेला होता; आणि माझं 'बॅकॅनल'-

'मद्यदेवाचं नृत्य' नाचून झाल्यावर लालीलाल गुलाबांच्या वर्षावानं मला पूर्णपणे झाकून टाकलं होतं... त्या दिवशी संध्याकाळी, हंगेरीचा, कलाविषयक कार्यक्रमांचा एक व्यवस्थापक ठेकेदार तिथे आला होता... 'अलेक्झांडर ग्रॉस' त्याचं नाव... तो माझ्याजवळ येऊन म्हणाला, "कधी नशीब काढायला बाहेर पडलीस, तर बुडापेस्टला माझ्याकडे ये..."

... आता चालू परिस्थितीनं मी भयंकर बाबरून गेलेच होते; आणि शक्य तितक्या लवकर आईला घेऊन व्हिएन्ना सोडून जायचा निर्धारही मी केला होता ... तेव्हा मला ग्रॉसचीच आठवण झाली... अन् नेहमीप्रमाणे सध्यापेक्षा जास्त उज्ज्वल भविष्यकाळाची स्वप्नं पहात आम्ही बुडापेस्टची वाट धरली ... ग्रॉसनं 'युरेनिया' थिएटरात माझे तीस वैयक्तिक नृत्यकार्यक्रम करण्याचा करार माझ्याशी केला...

एकाद्या रंगमंदिरात प्रेक्षकांसमोर एकटीनं नाचण्याबाबत केलेला माझा हा पहिलाच करार असल्यानं मी जरा 'नाही–होय' करत होते – माझं नृत्य सुसंस्कृत लोकांसाठी, कलावंतासाठी, शिल्पकार–चित्रकार–सांगितिक यांच्यासाठी आहे; ते सर्वसामान्य प्रेक्षकवर्गासाठी नाही, असं माझं म्हणणं होतं. अलेक्झांडर ग्रॉस म्हणाला, "असं मुळीच नाही... कलावंतांचा पिंड कमालीचा चिकित्सक असतो... त्यांना जर तुझं नृत्य आवडलं असेल, तर साधारण प्रेक्षकांना ते शंभर पटीनं जास्त रुचेल ..."

त्या करारपत्रावर मी सही करावी म्हणून ग्रॉसनं माझी खूप समजूत घातली... आणि खरोखर ग्रॉसचं भविष्य मुळीच खोटं ठरलं नाही ... उलट चांगलंच फळाला आलं! 'युरेनिया' रंगमंदिरातल्या पहिल्या प्रयोगाचं यश अवर्णनीयच ठरलं... बुडापेस्टमधले ते तीसच्या तीस प्रयोग मी भरगच्च प्रेक्षागारात केले!

बुडापेस्ट! एप्रिलचा महिना... वर्षभरातले वसंत ऋतूचे दिवस! पहिल्या नृत्यप्रयोगानंतर लवकरच एकदा अलेक्झांडर ग्रॉसनं एका रेस्तराँमध्ये आम्हाला जेवायला नेलं होतं... तिथे जिप्सी संगीत वाजत होतं... अहाहा! जिप्सी संगीत!... माझ्यातल्या यौवनसुलभ भावनांना साद घालणारं, जागं करू पहाणारं ते पहिलंच आवाहन... माझ्या अंतरातल्या विश्रब्ध, मुग्ध जीवनकळींच्या पाकळ्या, त्या संगीतानं हळूहळू उमलायला लागल्या नसत्या तरच नवल! हंगेरीच्या मातीतून स्वराकार ल्यायलेलं हे जिप्सी संगीत... असं संगीत दुसरं कुठे अस्तित्वात आहे का?... जॉन वॉनामेकरच्या ग्रामोफोनच्या दुकानांत ध्वनिमुद्रिकांच्या विभागात पुष्कळ वर्षानंतर एकदा आम्ही बोलत बसलो होतो, ते आठवतं... त्याच्या त्या ध्वनियंत्रातून बाहेर पडणाऱ्या अद्‌भुत संगीताकडे

तो माझं लक्ष वेधू पहात होता. मी त्याला म्हटलं, "तुझी ही सुबक छानदार यंत्रं...कुशल संशोधकाच्या तपश्चर्येचा हा परिपाक आहे, सारं खरं...पण धूळभरल्या रस्त्यांतून तरंगणाऱ्या—तरळणाऱ्या, हंगेरीतल्या एकाही शेतकऱ्याच्या उत्स्फूर्त जिप्सी संगीताच्या त्या सुरांची सर, तुमच्या या यांत्रिक संगीताला यायची नाही! एवढंच काय, हंगेरीचा एकटा एक जिप्सी संगीतकार घेतला तरी तो जगातल्या साऱ्या ग्रामोफोन्सना भारी ठरेल!..."

# ११

बुडापेस्ट शहर सारंच मोहरून गेल्यासारखं दिसत होतं. नदीपलीकडल्या टेकड्यांवर प्रत्येक बागेतून लायलॅक फुलं फुलून आली होती...प्रत्येक रात्री हंगेरीचा तुफानी प्रेक्षकसमुदाय उत्साहातिशयानं मला डोक्यावर घेत होता... डोक्यांवरच्या टोप्या उडून रंगमंचावर येत होत्या. 'एल्येन' च्या आरोळ्या उठत होत्या.

...सकाळीच टिपलेलं—सूर्यप्रकाशात चमचम करत झुळझुळ वाहणाऱ्या नदीचं दृष्य मनापुढे सारखं तरळत असल्यानं, वाद्यवृंदांच्या निर्देशकाला थोडीशी पूर्व-सूचना मी दिली; अन् एका रात्री नृत्यप्रयोगाच्या शेवटी स्ट्रॉसच्या 'द ब्ल्यू डान्यूब' ( नीलनदी डान्यूब ) वर उत्स्फूर्त नृत्य केलं...एकाएकी विजेचा धक्का बसावा, तसा याचा परिणाम झाला—साराच्या सारा प्रेक्षकवर्ग एकदम एक-प्रकारच्या उत्साहोन्मादानं उठून उभा राहिला...त्यांच्या त्या उत्साहातिरेकाचा पूर ओसंडून जाऊन त्यांची डोकी स्थिर होईपर्यंत कितीदा तो 'वाल्झ' – दादरा, मला पुन्हा पुन्हा नाचावा लागला, याची गणतीच नाही.

त्या दिवशी तिथे इतर प्रेक्षकांसारखंच ओरडून नि आरोळ्या ठोकून तुफान करणारा एक हंगेरियन तरुण होता...दैवी रूपसंपदा—नि बांधा...त्यानंच माझ्यासारख्या मुग्ध, अनाघ्रात परीचं एका वादळी—जंगली, बेजबाबदार, निर्घोर नि विलासी रमणीत रूपान्तर घडवून आणलं...मी जणू मद्यदेवाची महंतीण बनून गेले...सगळीकडून असा बदल घडवून आणण्याचा कटच झाला होता जणू! वसन्त ऋतू, मुलायम चांदण्या रात्री—आणि रंगमंदिरातून बरोबर परतताना सुखवणारी लायलॅकच्या मोहराच्या दरवळानं जडावलेली सुगंधी हवा! प्रेक्षकांचा अनिवार उत्साह...

आणि पूर्णतया सुखलोलुप जीवन आणि बंधमुक्त माणसांच्या सहवासात झोड-लेल्या पहिल्यावहिल्या सेजवान्या... जिप्सी संगीत, मिरपुडीचा स्वाद दिलेला हंगेरीयन 'गुलाश' आणि हंगेरीच्या जड मदिरा...मला वाटतं माझ्या आयु-ष्यात प्रथमच मी व्यवस्थित खातपीत होते...जास्तच खाणं होत होतं खरं म्हणजे...खाद्यपदार्थांच्या लयलुटीनं मी उत्तेजित होत होते...तर काय सांगायचं होतं मला ?... जिप्सी संगीत, हंगेरियन खाद्यपदार्थ नि मदिरा, या सर्वांचा परिणाम असा झाला की, आजपर्यन्त जे शरीर संगीताच्या दैवी, पवित्र मेळाची अभिव्यक्ती करण्याचं एक साधन म्हणूनच मी धारण करत, वागवत आले, त्या माझ्या शरीराला आज या संदर्भाबाहेरची जाग प्रथमच जाणवायला लागली... आजपर्यन्त ज्यांचं अस्तित्व मला जेमतेमच जाणवलं होतं, त्या माझ्या स्तनकळ्या मादर्वानं फुलू लागल्या...उमलू लागल्या...काळजात कसलेसे गोड पण 'कसनुसे' भावतरंग उठवून त्या मला लाजवूखिजवू लागल्या. .! आजवर मुलांच्यासारख्या ताठर दिसणाऱ्या माझ्या नितम्बांनी एकाएकी वेगळीच वळणं घ्यायला आरंभ केला...! माझ्या साऱ्या अस्तित्वांतून भावनेचं एक प्रमाथी उधाण सारखं जाणवू लागलं; अभिलाषा आणि एक अचूक ओढ, यांचा प्रत्यय मला सतत यायला लागला...इतका की माझा डोळा डोळ्याला लागेनासा झाला...त्या तापदायक अन् जीवघेण्या अस्वस्थतेनं तडफडत मी या कुशीवरून त्या कुशीवर करत रात्र काढू लागले...

एक दिवशी दुपारची गोष्ट...एका मित्रमेळाव्यांत सोनेरी 'टोके' मद्याच्या पेल्याच्या काठावरून माझी दोन काळ्याभोर विशाल डोळ्यांशी दृष्टिभेट झाली... हंगेरियन वासनेनं पेटलेले नि माझ्या विषयींच्या आत्यन्तिक कौतुकानं चमकणारे ते डोळे माझ्या दृष्टीचा ठाव घेत होते जणू !...तो एक दृष्टिक्षेप बुडापेस्टच्या वसन्तागमाच्या साऱ्या अर्थाला गवसणी घालून बसला होता !...तो चांगलाच उंचनिंच होता...सारी प्रमाणं कशी भव्यभरदार होती...घनदाट कुरळ्या झुल-पांनी भरलेलं माथं...अन् त्या केसांच्या काळ्याशार कान्तीत किंचित् जांभळ्या रंगाचे किरण...खरंच...मायकेल अँजेलोच्या 'डेव्हिड'साठी मॉडेल म्हणून तो सहज चालला असता !...हसला, की त्याच्या त्या आरक्त, आसक्त, ओठांतून पांढरीशुभ्र सशक्त दंतपंक्ती दिसायची...आमच्या दृष्टभेटीच्या पहिल्याच क्षणी आमच्या उभयतांतल्या संमोहन शक्तींनी झेप घेऊन जणू मिठीच मारली होती एक-मेकींना...त्या पहिल्या नजरेतच आम्ही परस्परांच्या बाहुपाशात बद्ध झालो होतो. आता घडणारं घटित टाळू शकणारी एकही शक्ती पृथ्वीवर उरली नव्हती...

"Your face is like a flower. You are my flower...My flower..." तो वारंवार म्हणत होता...हंगेरियन भाषेत flower 'फ्लॉवर'

म्हणजे देवदूत !... "तुझा चेहरा एखाद्या देवदूतीसारखा आहे...." म्हणायचा तो...

'लॉज फॉर द रॉयल नॅशनल थिएटर' (रॉयल नॅशनल थिएटरशी संबंद्ध असलेला निवास) असं लिहिलेला कागदाचा छोटा चौकोनी तुकडा त्यानं माझ्या हातात दिला...त्याच रात्री मी अन् आई त्याची रोमिओची भूमिका पहायला गेलो...तो एक चांगलाच्च निपुण नट होता...पुढे तर हंगेरीत तो सर्वश्रेष्ठ ठरला...

रोमिओच्या यौवनाची प्रज्वलित ज्योत आपल्या स्वतःच्या ठायी धगधगल्याचा साक्षात्कार ज्या अभिनयातून त्यानं मला घडवला, त्यामुळे तर मी त्याला पुरतीच शरण गेले... नाटकानंतर त्याच्या रंगपटातल्या खोलीत मी त्याला भेटायला गेले. कंपनीतली सारी मंडळी माझ्याकडे चौकस नजरेनं पाहून गालांतल्या गालात हसत होती. जणू काही प्रत्येकालाच माझं गुपित समजलं होतं अन् त्यामुळे आनंदही झाला होता! आनंदात नव्हती अशी एकच व्यक्ती तिथे होती. एक नटी!... आई न् मी, आमच्या बरोबर तो आमच्या होटेलमध्ये आला, आणि मग आम्ही झोपण्यापूर्वी दोन घास जेवलो काही तरी... कारण नाट्यप्रयोगापूर्वी नटवर्ग कधीच जेवत नाही...

त्यानंतर, मी अगदी गाढ झोपलेली आहे असा भरवसा आईला वाटल्याची खात्री झाल्यानंतर मी हळूच परतले, आणि आमच्या अपार्टमेंटच्या अगदी पुढच्या छोट्या दालनात माझ्या रोमिओला भेटले. आमच्या झोपण्याच्या खोलीशी हे दालन एका लांब बोळानं जोडलेलं होतं... रोमिओनं मला सांगितलं, की त्याच्या रोमिओच्या भूमिकेचा त्याला तोपर्यंत भावलेला अर्थ, त्या रात्री पुरा बदलून गेला होता! कारण... त्याला आज नवीन अर्थप्रतीती झाली होती! "यापूर्वी भिंतीवरून पलीकडे उडी घेताक्षणी नेहमीच्या सर्वसाधारण वहिवाटीच्या आवाजातच मी

'He jests at scars that never felt a wound
But, soft, what light through younder window break ?
It is the East, and Juliet is the Sun'

...वगैरे संभाषण सुरू करायचा... पण आज ? आज तुला आठवतं ?... मी ते सारे शब्द...त्या शब्दांनीच घसा दाटून यावा तसे... हलक्या आवाजात हितगुज करावं तसे बोललो...! याचं कारण काय माहीत आहे ?... कारण तुझी भेट झाल्यापासून, प्रेमाच्या जादूचा रोमिओच्या आवाजावर काय परिणाम व्हावा याचा अंदाज मला आलाय्... खरी समज मला आताच आलीय् या भूमिकेची. रोमिओच्या प्रीतीचा खरा अर्थ, इझाडोरा, तुझ्यामुळेच मला उम-

जलाय्... आता ती सबंध भूमिका मी एका वेगळ्याच दृष्टिकोणातून वठवीन" असं म्हणत तो उठला, आणि प्रवेशामागून प्रवेश घेत पुरा 'रोमिओ' त्यानं माझ्या डोळ्यासमोर उभा केला! "खरंच... आज मला नव्यानंच उमजतंय् की अगदी खरोखरच प्रेमात पडलेला रोमिओ, **हे** वाक्य **असं** म्हणाला असता... आणि **असं** म्हणाला असता...आधी ही भूमिका करताना जी कल्पना मी मनाशी पक्की केली ती, त्यापेक्षा अगदीच वेगळ्या शैलीनं..." असे उद्गार काढण्यापुरता काय तो तो अधूनमधून थांबायचा अन् पुढं म्हणायचा, "आता कोडं उलगडलंय् माझ्यापुढं सारं...आहा...माझी देवदूती ती! लाडके,...तू माझी स्फूर्तिदेवता आहेस...प्रेरणा आहेस... या प्रीतीच्या बळावर मी खात्रीनं एक मोठा कलावंत होईन!..." पहाटेची चाहूल खिडकीच्या तावदानावर येईपर्यंत सारखा तो आपला रोमिओच्या भूमिकेतले उताऱ्यांवर उतारे माझ्यासमोर पाठ म्हणून दाखवत होता...

इकडे मी आनंदानं बेभान होऊन ते सारं पहात-ऐकत राहिले होते... अधूनमधून काही सूचना करत होते... एकदा आविर्भाव सुचविण्याचं धाडस सुद्धा मी केलं! आणि धर्मोपदेशकासमोरच्या त्या प्रवेशात तर आम्ही दोघं जोडीनं गुडघे टेकून बसलो, अन् आमरण प्रीतिनिष्ठेच्या आणाशपथा घेतल्या! छे: ! — यौवन, वसंतागम, बुडापेस्ट, नि विशेषतः...रोमिओ!...सगळ्या तुझ्या आठवणी जाग्या होतात, तेव्हा सारं काही अगदी कालपरवाच्या रात्री घडलं असावं, असंच आजही वाटतं...तो काळ फार मागे राहिल्याची जाणीव विरूनच जाते... !!

एका रात्री त्याचा नि माझा, असे दोघांचेही प्रयोग आटोपल्यावर आईच्या अगदी न कळत आम्ही त्या छोट्या दालनात गेलो...आईची कल्पना की, मी निर्धास्त झोपले होते...सुरुवातीला स्वतःच्या भूमिकांच्या तोंडचे उतारे पाठ म्हणण्यावर रोमिओ खूष होता...आपल्या कलेबद्दल, रंगभूमीबद्दल बोलण्याचं समाधान पुरेसं वाटत होतं त्याला...पण हळूहळू रोमिओचं लक्षण काही ठीक दिसेना...कसली तरी बेचैनी होती...एखाद्या क्षणी तर तो कमालीचा अस्वस्थ... अन् बोलायला काही सुचत नसल्यासारखा दिसत होता...अधूनमधून मुठी आवळत होता...आजाऱ्यासारखीच अवस्था झाली होती त्याची...त्यामुळे त्याचा मूळचा सुंदर चेहरा भयंकर साकळल्यासारखा आणि डोळे तांबारलेले दिसत होते...रक्त येईतो दातांखाली धरल्यानं ओठ तर सुजूनच गेले होते... !

मला सुद्धा ताप चढल्यासारखं नि भोवळल्यासारखं वाटत होतं...कारण त्याला जवळ—अगदी अगदी जवळ घेण्याची दुर्दम्य ऊर्मी माझ्या मनांत उसळून उफाळून येत होती...अखेर संयमाचे सारे बंध तटातट तुटले, आणि पेटत्या वासनेच्या आवेगभरानं त्यानं मला उचलून खोलीत नेलं...! भीती आणि

अत्यानंद यांच्या हिंदोळ्यावर झुलणाऱ्या मनाला एका क्षणात सारी कल्पना आली !... माझ्या मनांत पहिले तरंग उठले ते भयंकर भीतीचे, हे मला कबूल करायलाच हवं. . .पण मग त्याची ती तडफड पाहून माझ्या काळजांत इतकी अपार करुणा निर्माण झाली की मला वाटतं, त्यामुळेच कदाचित् . . .निव्वळ वेदनेच्या त्या क्षणापासून पळून जाण्याची ऊर्मी मी दाबून ठेवू शकले...!

...त्या दिवशी पहाटे आम्ही बरोबरच त्या होटेलबाहेर पडलो, आणि रस्त्यात मिळाली ती उशिराच निघालेली दोन घोड्यांची बग्गी करून बऱ्याच मैलांचं अंतर काटलं...थेट शहराबाहेर निसटलो...वाटेत एक शेतकऱ्याचं खोपटं लागलं... शेतकऱ्याच्या कारभारणीनं जुन्या पद्धतीचा चारखांबी पलंग आत असलेली एक खोली आमच्या स्वाधीन केली .. तो सारा दिवस आम्ही त्या गावरानातच काढला...अधूनमधून रोमिओनं माझी आसवं पुसायची...आणि माझं रडणं उसासणं बाहेर ऐकू जाणार नाही, अशा बेतानं माझं सांत्वन करायचं... !

मला वाटतं त्या दिवशी संध्याकाळी माझ्या प्रेक्षकवर्गासमोर मी अगदीच वाईट नाचले... माझी मनःस्थितीच मुळी ठीक नव्हती... बेचैन वाटत होतं... पण नंतर माझ्या रोमिओची पुनः नेहमीच्या दालनांत भेट झाली, तेव्हा तो तर अगदी आनंदाच्या शिखरावर असल्यासारखा प्रफुल्लित न् प्रसन्न दिसत होता, हे पाहिल्यानंतर माझ्या साऱ्या त्रासाची नि मनस्तापाची भरपाई होऊन चुकल्यासारखं मला वाटलं!... पुन्हा एकदा त्याच अनुभवाला सामोरं जाण्याची ती इच्छा मनात बळावायला लागली... कारण मोठ्या हळुवारपणे माझी समजूत काढून रोमिओनं मला आश्वासन दिलं होतं... म्हणाला होता, "पृथ्वीवर साक्षात् स्वर्गसुखाची प्रतीती हवी असेल, तर ती इथेच...याच अनुभवात मिळेल तुला!" आणि खरोखर लवकरच पुढे हे त्याचं भविष्य खरं ठरलं. . . !

रोमिओचा आवाज भारी छान होता... त्याच्या देशाची, तशीच इतरही कितीतरी जिप्सी गाणी तो मला म्हणून दाखवायचा... त्यातले शब्द नि त्याचा भावार्थ समजावून सांगायचा, शिकवायचा... अलेक्झांडर ग्रॉसनं बुडापेस्टच्या ऑपेरा हाऊसमध्ये एका संध्याकाळी एक मोठा कार्यक्रम योजला होता. . . त्यांत 'ग्ल्यूक'च्या संगीतानंतर, एक साधासा हंगेरियन वाद्यवृंद रंगमंचावर आणवून, जिप्सी गाण्यांवर नृत्य करायची माझी एक कल्पना होती... विशेषतः त्यातलं ते एक हंगेरियन प्रीतिगीत— असं :

One little girl in the world exists.
She is my dear pigeon
The good Lord must love me well

Because he gave me you.

गाण्याचा भावार्थ असा होता :

‘ एक आहे चिमुरडी पोर...माझ्या विश्वात...
माझं कबूतर आहे ते...लाडकं कबूतर !
देवाची असणार माझ्यावर माया...फारच...
कारण त्यानं तर दिलीन् मला ही भेट, ‘ तुझी ’... !

...फारच गोड गाणं. . .उत्कट आसक्तीनं, ओढीनं भारलेलं, प्रेमभरानं गुंज-णारं. . .आंसवांची उतरंड पटपट ढळेल असं. . .मी अशी भावनेनं भारल्या-सारखी नाचले, की एवढ्या मोठ्या प्रेक्षकवर्गाला रडूं आवरणं कठीण होऊन बसलं. . .कार्यक्रमाची अखेर ‘ राकोव्हस्की मार्च ’ नं झाली. . .मी होते माझ्या लाल कुडत्यात. . .राकोव्हस्की संगीताच्या नृत्यांकनातून हंगेरीच्या हुतात्म्यांना, वीरांना...क्रान्तीच्या ऋचेनं आळवत. . . !

या शेवटच्या विशेष कार्यक्रमानंच बुडापेस्टच्या सीझनची सांगता झाली. . . . नि दुसऱ्याच दिवशी मी आणि रोमिओ सटकलो, थोड्या दिवसांची सुट्टी त्या शेतकऱ्याच्या खोपटात एकत्र घालवायला !—आयुष्यांत प्रथमच रात्रभर एकमे-कांच्या मिठीत गाढ झोपण्याचं ते सुख आम्ही अनुभवलं. . .पहाटे जाग येताना त्याच्या केसांच्या काळ्याभोर सुगंधी झुळपांमध्ये गुंतून पडलेले माझे केस पाहून होणारा अनुपम आनंद. . .माझ्या भोवती लपेटलेल्या त्याच्या बाहूंचा तो स्पर्श. . . ते सारं सुख मी प्रथमच अनुभवलं. . . !

. . .आम्ही बुडापेस्टला परतलो मात्र – आमचा स्वर्ग ढगाळण्याची पहिली खूण क्षितिजावर उमटली, ती माझ्या आईच्या दुःखव्यग्र, चिंतातुर दिसण्यानं, आणि दरम्यान न्यूयॉर्कहून परतलेल्या एलिझबेथच्या वागण्यानं ! मी जणू काही गुन्हाच केला होता असं एलिझबेथला वाटत असावं. . .त्यांची ती चिन्ताव्यग्रता शेवटी मला इतकी असह्य झाली, की बळेबळेच त्या दोघींना ‘ टायरोल ’ची छोटीशी हवाबदल करून यायला मी पाठवलं. . .

तेव्हाच्या, आणि एरवी नेहमीच्या अनुभवानं सुद्धा, माझ्या स्वभावाचा जो एक विशेष माझ्या लक्षात आला आहे तो असा : माझ्या आंतरिक संवेदनांचा आवेग किंवा वासनेचं उधाण किती का तीव्र असेना, माझा मेंदू — माझी बुद्धी अगदी ‘त्या’ क्षणी देखील पूर्णपणे कार्यतत्पर असते. . .विजेच्या चमकेच्या वेगानं नि दिमाखानं तिचं कार्य चालू असतं. . .त्यामुळे सामान्यपणे ‘डोकं ठिकाणावर न राहणं’ याचा जो अर्थ होतो, त्या अर्थानं माझं डोकं कधीच जागचं हालत नाही; उलट विषयसंवेदनांचं सुख जेवढं उत्कट, तितकी बुद्धीला, विचारांना जाग अधिक, अशीच वस्तुस्थिती असते. . . मग येते एक निकराची वेळ !...जेव्हा मेंदू मुळी

विषयेंद्रियांपुढे उभा ठाकतो...आणि त्यांचा प्रत्यक्ष टीकाकारच बनतो – त्यांची निराशा, अपेक्षाभंग करत! ज्या सुखाशेच्यासाठी माणसाची जीवितेच्छा कमालीची आर्त असते, त्या सुखाचीच टर उडवत —! अन् त्या संघर्षाचं स्वरूप असं काही असह्य होतं शेवटी, की एखाद्या अमली पदार्थाचं सेवन करून, सततची नि अनाहूत टीकाटिप्पणी करत राहणाऱ्या त्या बुद्धीची धारच बोथटून टाकावी, अशी अनावर ओढ माझ्या इच्छाशक्तीला लागते...! ज्यांचे स्वभाव सामोऱ्या आलेल्या क्षणाच्या वैषयिकतेला निःशंकपणे आत्मसमर्पण करू शकतात, त्यांचा मला किती हेवा वाटतो म्हणून सांगू...! नीरक्षीरविवेक करणाऱ्या, नि अलिप्तपणे वर बसूनसुद्धा, खाली संघटित झालेल्या इंद्रियगणाच्या कानी आपली अनाहूत टीका पोहोचवण्याचा हट्टाग्रह धरणाऱ्या मेंदूची भीती ज्यांना नाममात्रसुद्धा वाटत नसते — त्यांचा हेवा वाटावा नाहीतर काय?

सारी वस्तुस्थिती ही अशी असूनही एक क्षण असाहो उगवतो, की मेंदूलासुद्धा थोडीफार शरणागती पत्करून, निरुपायानं म्हणावं लागतं: "ही... तुझी कलासुद्धा जमेस धरून आयुष्यांतलं इतर सारं काही, या क्षणाच्या साफल्यापुढे, वैभवापुढे एकदम वाफेसारखं, निरर्थक आहे, हेच खरं! ... आणि म्हणूनच याच क्षणासाठी मी माझं अधिष्ठान सोडून स्खलनाला, सर्वनाशाला...फार काय मृत्यूला देखील सामोरा जायला तयार आहे...अगदी राजीखुषीनं!"... मेंदूचा हा पराजय म्हणजे बेशुद्धीपूर्वीचा शेवटला आचकाच असतो जणू काही...अन् हा आचकाच पुढे बुद्धीच्या नि आत्म्यावरच्या भयंकर संकटपरंपरेला कारणीभूत ठरतो...

अर्थात् अशी ती सारी वसरगुंडी होती...अन् एकदा वासनेची ओळख झाल्यावर — त्या सर्व घटकापळातून हळूहळू चढणाऱ्या अन् माथं फिरवून टाकणाऱ्या त्या अंतिम नशेच्या बळावर पुढे पुढे सरकून — त्या अखेरच्या 'निदानी' क्षणाची ती बेबंद मुक्ती चाखल्यानंतर... सारासार विचारच मला मुळी करवेना...माझ्या कलेचा होऊ घातलेला खेळखंडोबा, माझ्या आईचं हताशपण किंवा माझ्या छोट्या जगाचा पार चुथडा होण्याची शक्यता...कशाकशाचीही मला क्षिती वाटेना!

कुणाला माझ्या वागण्याचा न्याय-निवाडा करणं शक्य असेल तर त्यांनी अवश्य तो प्रयत्न करावा...पण प्रथम दोष द्यावा तो निसर्गाला किंवा देवाला...कारण जगात अनेक एकाहून एक वरचढ सुखं आहेत, हे आमच्यासारख्यांना स्वतःच्या अनुभवानं पूर्णपणे ठाऊक असलं, तरी त्या एका अमूल्य क्षणाची, अन् त्या अवीट, अतर्क्य सुखाची सर इतर कशालाही न येणं हे कर्तृत्व ईश्वरी इच्छाशक्तीचं आहे...हा ईश्वरी संकेत आहे...! नशेतली भरारी जितकी उंच तितकंच तिथून जागृतीच्या दरीत होणारं पतनही खोल...अन् परिणामी भयंकर...हे साहजिकच नव्हे का?...

अलेक्झांडर ग्रॉसनं माझ्यासाठी एक हंगेरीभरचा नृत्यदौरा आयोजित केल
होता... किती तरी शहरांतून माझे कार्यक्रम झाले – ' ज्ञीवेन किर्हेन ' ( सात
चर्चेस )मध्ये सुद्धा; तिथेच ती सात क्रांतिकारक सेनापतींना फाशी दिल्याची
गोष्ट मी ऐकली... त्याचा माझ्या मनावर इतका परिणाम झाला, की, शहरा
बाहेरच्या एका मोठ्या विस्तीर्ण पटांगणात, ' लिझ् ' च्या वीरश्रीयुक्त नि धीरगंभी
संगीतावर मी त्या सेनानींच्या स्मरणार्थ एक ' मार्च ' ( = समर संगीत ) नाचले

सबंध दौऱ्यात हंगेरीच्या त्या सगळ्या छोटया छोटया शहरांतून प्रेक्षकवर्गा
माझं अभूतपूर्व कौतुक केलं... प्रत्येक ठिकाणी एक पांढऱ्या शुभ्र घोड्यां
बग्गी माझ्यासाठी तिष्ठत असायची, अशी व्यवस्था अलेक्झांडर ग्रॉसनं केले
होती...पांढरे शुभ्र घोडे... बग्गीतही पांढऱ्या शुभ्र फुलांची रास... आणि शु
वस्त्र ल्यालेली मी ! कौतुकाच्या नि अभिवादनाच्या आरोळ्या नि ललकाऱ्या य
गुंजन वातावरणात भिनलेलं असायचं... अन् दुसऱ्याच कुठल्या विश्वातून अ
तरलेल्या एका तरुण पाहुण्या देवतेप्रमाणे शहराच्या या टोकापासून त्या टो
पर्यंत माझी अशी मिरवणूक निघायची...पण, कलेतून मिळणारा अलौकिक आ
आणि जनसामान्यांचं अमाप कौतुक, हे सारं सतत अनुभवत असताना देख
माझ्या काळजातल्या रोमिओबद्दलच्या असह्य ओढीमुळे माझा जीव सा
तळमळत होता... तडफडत होता... रात्री एकांतात तर विशेषच !... व
होतं, त्याच्या मिठीतला एकच एक क्षण पुन्हा मिळणार असेल, तर त्याच्या बदल
ह्या यशावर, एवढंच काय माझ्या कलाप्रेमावर देखील तिलांजली द्यायला
माघार घेणार नाही...! बुडापेस्टला परत कधी जाईन, असं मला झालं हो

अखेर तो दिवस उजाडला... रोमिओ मला स्टेशनवर भेटला, तो सुद्धा अ
आनंदभरानं... तरी पण मला त्याच्यात काहीतरी अनाकलनीय बदल झा
आतून जाणवलं...तेवढ्यात त्यानं ती बातमी सांगितली मला... ' मार्क अँ
ची भूमिका आता तो करणार होता... त्याच्या नाट्यजीवनात प्रथम
त्यामुळे त्याच्या तालमी सुरू करण्याची घाई पाठीमागे होती त्याच्या... भू
झालेल्या बदलामुळे, त्याच्या त्या कलावंत– उत्कट मनावर एवढा परिणाम
होता की काय न कळे... तसा काही नीट उमज पडत नव्हता पण
गोष्टीची मात्र खात्री पटली होती, की रोमिओच्या वृत्तीतला तो निर्हेतुक, नि
वासनावेग ओसरला होता... प्रीति सरली होती... तो आमच्या लग्ना
अशा खात्रीनं बोलत होता, की जणु काही सारं निश्चित् ठरलंच आहे !...
बिऱ्हाड कुठे करायचं ते ठरवायला तो मला काही फ्लॅट्सहि दाखवायला
गेला... न्हाणीची व्यवस्था नसलेले फ्लॅट्स पहाताना... आणि न संपणा
चढता-उतरताना माझ्या मनात हिव भरल्यासारखं झालं होतं... एक

बधिरपणा जाणवत होता...

"बुडापेस्ट मध्ये राहून आपण काय करणार ?" मी विचारलं.

"काय ?... रोज रात्री बॉक्समध्ये बसून तू माझा अभिनय पहाशील... आणि हळूहळू माझे सारे 'क्यू' ज् तू मला देऊ शकशील...माझ्या अभ्या-सात, माझ्या चिंतनात मला तू मदत करू शकशील..."

त्यानं मला मार्क ॲन्टनीची भूमिका पाठ म्हणून सुद्धा दाखवली...पण आता त्याच्या त्या वृत्तीतली भावोत्कटता रोमन जनतेच्या ठायी केंद्रित झाली होती... अन् माझी...या त्याच्या 'ज्युलिएट'ची त्या केंद्रस्थानी नांवनिशाणी देखील नव्हती...दखल नव्हती...!

एक दिवस शहराबाहेर बरच दूरवर हिंडणं फिरणं झाल्यावर एका गवताच्या गंजीच्या बाजूला बसलो आम्ही... अन् अखेर त्यानं मला विचारलं, की मी माझ्या कलोपासनेच्या मार्गानं पुढे जावं, आणि त्यालाही त्याच्या वाटेनं जायला मोकळं करावं, हेच विचारांती अधिक सयुक्तिक नव्हतं का ? अगदी हेच शब्द नसतील त्याचे, पण त्याच्या म्हणण्याचा भावार्थ तरी हाच होता !....ती गवताची गंजी....समोरचं शेत....आणि माझ्या जिव्हाराला चेरून टाकणारा तो थंडपणा....सारं काही अजून तसंच्या तसंच आठवतं !...त्या दिवशीच दुपारी मी अलेक्झांडर ग्रॉस बरोबर एक नवा करार केला... व्हिएन्ना, बर्लिन आणि जर्मनीतल्या साऱ्या मुख्य शहरांचा नृत्यदौरा करण्याचा... !

रोमिओचं, मार्क ॲन्टनीच्या भूमिकेतलं पहिलं रंगावतरण मी पाहिलं. त्याच्या संबंधातलं माझ्या डोळ्यासमोरचं शेवटलं दृश्य म्हणजे रंगमंदिरातल्या प्रेक्षक-वर्गाचा वेडा उत्साहोन्माद...अन् फुटक्या काचांची रास गिळली असावी, तशी आसवं–अवघडलेली माझी अवस्था...! दुसऱ्या दिवशीच मी व्हिएन्नाला निघाले... 'रोमिओ' केव्हाच नामशेष झाला होता...मी निरोप दिला तो 'मार्क ॲन्टनी'ला !... मार्क ॲन्टनी... उग्रगंभीर अन् आपल्यातच इतका व्यग्र की, त्या आठवणीनं बुडापेस्ट ते व्हिएन्ना हा प्रवास, आजवरच्या सगळ्या प्रवासी आयुष्यातला सर्वांत कटू आणि विषण्ण अनुभव ठरला. एकाएकी साऱ्या विश्वातून आनंद लोपून गेला आहे असं वाटत होतं...व्हिएन्नाला तर मी आजारीच पडले; शेवटी अलेक्झांडर ग्रॉसनं मला हॉस्पिटलमध्ये दाखल केलं...कितीतरी आठ-वडे विलक्षण त्रासात, अंथरुणाला हताशपणे खिळूनच मी काढले...बुडापेस्टहून रोमिओ आला...माझ्या खोलीत त्यानं आपला पलंग देखील आणवला... तो अगदी जिव्हाळ्यानं नि समजुतदारपणानं वागत होता...पण एक दिवस पहाटे जाग आल्याक्षणीच काय घडलं, कोण जाणे !... खोलीत पलीकडे कॉटवर झोपलेल्या रोमिओच्या आकृतीपासून मला दूर केल्यासारखी, ती कॅथलिक भिक्षुणी

परिचारिका मखोमय उभी राहिलेली होती...तिचा काळ्या प्रावरणातला तो चेहरा दिसल्याबरोबर माझ्या कानांनी माझ्या प्रीतीच्या शवसंस्काराच्या घंटाच जणू ऐकल्याचा मला भास झाला...!

त्या आजारातून उठून बरं व्हायला मला खूपच दिवस लागले...तेव्हा लवकर आराम पडावा म्हणून अलेक्झांडर ग्रॉस मला फ्रान्सेसबादला घेऊन गेला. मनाची मरगळ — सुस्ती, आणि विषण्णता होतीच... त्यामुळे इथल्या निसर्गरम्य परिसरांत किंवा प्रेमळ मित्रमंडळींच्या सहवासातसुद्धा रमावं तसं मन रमत नव्हतं. ग्रॉसची पत्नी आली होती...रात्रभर डोळ्याला डोळा लागायचा नाही,— अशा माझ्या स्थितीत तिनं मोठ्या आपुलकीनं मला सोबत केली...इतक्यात सुदैवानं एक गोष्ट घडली! ते भारी 'दक्षिणा' वगैरे डॉक्टर लोक आणि तशाच महागड्या नर्सेस, यांनी मिळून माझं बँकेतलं 'खातं' अक्षरशः खाऊन टाकलं होतं, हे पाहून ग्रॉसनं मुळी माझे कार्यक्रमच ठरवून टाकले...फ्रान्सेसबाद, मारियनबाद आणि कार्ल्सबादला... मग एक दिवस मी माझी ट्रंक उघडून माझे नृत्यवेष बाहेर काढले; अन् एकाएकी माझ्या डोळ्यांना आसवांच्या धारा लागल्या... माझा तो लालीलाल कुडता...क्रांतीची सारी नृत्यं नाचताना मी तो घालायची... त्याचे तर मी पटापट मुके घेतले...अन् मला आठवतं, त्या क्षणी मी एक शपथ घेतली! निर्धार केला, की प्रेमाच्या पायी मी कलेशी प्रतारणा यापुढे कधीच करणार नाही!... या वेळेपर्यंत माझ्या नावाची जादू सर्वदूर पसरली होती... एक प्रसंग तर मला अगदी नीट आठवतो...एका रात्री ग्रॉस अन् त्याची पत्नी यांच्याबरोबर मी एका हॉटेलमध्ये जेवत होते...समोरच्या खिडकीच्या जाड नि किंमती प्लेटग्लासच्या तावदानासमोर बघता बघता एवढी गर्दी जमली, की शेवटी त्यामुळे ती भली मोठी खिडकी मोडून पडली!...हॉटेलचा मालक बिचारा वैतागून गेला...

प्रीतीची व्यथा, वेदना नि वैफल्य, या साऱ्या भावानुभवांचं मी कलाविष्कारात संक्रमण केलं...मृत्यूच्या पूजापीठावरून जीवनाचा निरोप घेणाऱ्या 'इफिजिनिया'-च्या कथेवर मी एक नृत्यरचना केली......म्यूनिक्‌ला, ग्रॉसनं ठरवलेल्या शेवटच्या कार्यक्रमाच्या तिथे आई नि एलिझबेथ यांच्याशी माझी पुनर्भेट झाली, तेव्हा मला एकटी नि सुटी परतलेली पाहून त्यांना खूप आनंद झालेला दिसला...पण माझी उदासीनता आणि माझ्यात झालेला बदल मात्र त्यांना चांगलाच जाणवला...!

म्यूनिक्‌मधल्या कार्यक्रमाच्या आधी एलिझबेथ नि मी 'ॲबासिआ'ला गेलो...सारे रस्ते या टोकापासून त्या टोकापर्यन्त पालथे घातले...एखाद्या हॉटेलमध्ये उतरायला जागा मिळते का ते पाहत — शोधत;...नाव नाही! जागा मिळाली नाहीच...मात्र त्या छोट्याशा निवांत गावात बहुतेकांचं लक्ष आम्ही वेधून

घेतलं खास...कारण ग्रॅन्ड ड्यूक फर्निनंडनी सुद्धा स्वारीनिशी जाताना आम्हाला हेरलं...! आम्ही त्याचं कुतूहल जागं केलं असावं...त्यांनी आमची सहानुभूतीनं विचारपूस केली अन् आमचं स्वागत केलं...अन् शेवटी होटेल 'स्टिफनी'च्या उद्यानातल्या आपल्या बंगल्यावर उतरण्यासाठी आम्हाला पाचारण केलं...खरं म्हणजे हा सारा प्रसंग सहजगत्या घडलेला...सारं काही अगदी निर्हेतुक जुळून आलेलं...पण तेवढ्यानंसुद्धा राजवर्तुळात बऱ्याच कंड्या पिकल्या...मोठ्या मोठ्या सरदारदरकदारांच्या पत्नी, आणि मानपानवाल्या स्त्रिया आमच्या दारी पायधूळ झाडायला लागल्या, तेव्हा मी आपली भोळसरपणे समजले की त्या सर्वांना माझ्या कलेत रस वाटत असावा...खरा प्रकार अगदीच वेगळा होता! ...त्या बायका यायच्या, त्या आम्हाला त्या बंगल्यात उतरवणाऱ्या ड्यूकच्या लेखी आमचं खरं स्थान काय होतं, याचा अंदाजअदमास घ्यायला! ह्याच साळकायामाळकाया होटेलच्या सेजवानीच्या दालनात ग्रँड ड्यूकच्या टेबला-समोर रोज रात्री लवून लवून मुजरे, नमस्कार-चमत्कार करताना दिसायच्या... मीही तोच रिवाज अनुसरला...आणि वर इतर स्त्रिया वाकायच्या त्याहूनही अधिक लवून ड्यूकना अभिवादन करायला लागले...

आता खूपच लोकप्रिय झालेला पोहण्याचा पोशाख मी इथेच प्रथम वापरून रूढ केला...भारी चिनी क्रेपचं निळं कुडतं ..खोल घेतलेला गळा.. खांद्या-वरून नेलेल्या लोभ्या अरुंद पट्ट्या...गुडघ्याच्या किंचित् वरच असलेला स्कर्ट... पाय नि पावलं उघडीच...त्या युगातल्या स्त्रियांची सक्त काळ्या पोशाखात पाण्यात उतरण्याची प्रथा, नि गुडघे नि घोटे यांच्या मधोमध लांबीचे स्कर्ट्स, काळे पुरे लांब मोजे, पोहोण्याचे काळे बूट, असला एकंदर वेष ध्यानात घेतला, म्हणजे माझ्या त्या पेहरावात मी काय धमाल उडवून दिली असेल, याची कल्पना तुम्ही सहज करू शकाल!...सूर मारण्याच्या पुलासारख्या ठिकाणाच्या आजूबाजूनं चक्कर मारण्याची ग्रँड ड्यूक फर्डिनंडची सवय होती...त्याच्या हातात नाटकं-संगीतिका वगैरे पाहण्याची दुर्बिण असायची...त्यांनी ती माझ्यावर फिरवली, आणि सहज कुणालाही ऐकू जावं अशा आवाजात उद्‍गारला, "किती सुंदर आहे ही डंकन पोरगी!...ओः!...किती कमालीची सुंदर! हे वसंतऋतूतलं सृष्टिसौंदर्यसुद्धा फिकं वाटतंय् तिच्यापुढे!"

काही दिवसानंतर व्हिएन्नाच्या 'कार्ल' रंगमंदिरात माझे कार्यक्रम चालू असताना, आपल्या तरुण अधिकाऱ्यांच्या नि शिलेदारांच्यासहित ग्रॅन्ड ड्यूक दररोज रात्री रंगमंचालगतच्या बॉक्समध्ये येऊन बसायचा...साहजिक लोकांना तेवढंच बोलायला फावायचं! पण ड्यूकचं माझ्याबद्दलचं कुतूहल खरोखरच केवळ सौंदर्यप्रियतेच्या नि कलाप्रेमाच्या पोटी निर्माण झालेलं होतं...खरं तर ड्यूक

स्त्रियांची संगत टाळतानाच दिसायचा...त्याच्या त्या तरुण उमद्या पदाधिकाऱ्यांच्या लवाजम्यावरच तो खूष होता...तृप्त होता...पुढे काही वर्षांनी माझ्या कानावर आलं, की ऑस्ट्रियन सरकारनं ड्यूक फर्डिनंडला एक वटहुकून काढून साल्झबर्गच्या एका उदासअंधाऱ्या 'शाटो' (=जुना किल्ला) मध्ये कैदेत टाकलं...फर्डिनंडबद्दल अपार सहानुभूतीनं माझं मन भरून आलं. कदाचित् तो इतरांपेक्षा थोडा वेगळा असेल...पण खरोखरचा, आत्यंतिक माया करणारा माणूस, तसं म्हटलं तर सामान्यांच्या तुलनेनं थोडाफार वेडाच नसतो का ?...

ॲबाझियामधल्या त्या बंगल्यात आमच्या खिडक्यांच्या समोर एक पाम-तालवृक्ष होता...समशीतोष्ण हवेत असा वृक्ष वाढलेला पाहण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग...पहाटेच्या वाऱ्यानं थरथरणाऱ्या त्या झावळ्या माझं लक्ष वेधून घ्यायच्या... माझ्या नृत्यांतल्या बाहूंच्या, हातांच्या नि बोटांच्या थरथरत्या हालचाली मी रचल्या त्या, या झावळ्यांपासून स्फूर्ती घेऊनच...! आज पहावं तर माझं अनुकरण करणाऱ्यांनी या हालचालींचा कसला दुरुपयोग चालवला आहे !... या हालचालींच्या उगमाचा शोध घ्यायला, ताडामाडांच्या झावळ्यांची जवळिक साधायला सारे विसरतात...झावळ्यांचं ते थरथरणं, झिरमिरणं, ते हेलझोल-सारं काही मननानं, चिंतनानं आत्मसात् करायचं सारे विसरतात... बाह्य कृतीत वस्तुजात उतरण्यापूर्वी त्याला आंत मुरवून घ्यायचं नाकारतात...! अन् मी ?... पुष्कळदा याच झाडावर दृष्टी खिळलेली असताना माझ्या मनातलं कलेचं विश्वच वितळून जायचं, आणि 'हाइने'च्या हळव्या ओळीच आठवणीच्या कोशांतून तरळत यायच्या :

'A lonely palm in the south'

दक्षिणेच्या देहलीशी...एक एकाकी तालवृक्ष ..

...ॲबाझियाहून मी आणि एलिझबेथ म्युनिक्ला गेलो...त्यावेळीं साऱ्या म्यूनिक्चा जीव 'क्यूीन्स्लर हाऊस'मध्ये अडकला होता, कारण म्यूनिक्ची स्वादिष्टसुंदर 'म्यूनहेनर' बीअर घुटक्याघुटक्यांनी पोटांत मुरवायला आणि तत्त्वज्ञान, कला इत्यादी विषयांवर निरुपण करायला 'कार्लबाख्', 'लेम्बाख्', 'स्टक' यांच्यासारख्या गुरुजनांचा मेळावा तिथे भरायचा...माझा म्यूनिक्मधला पहिला कार्यक्रम क्यूीन्स्लर हाऊसमध्ये व्हावा, असं ग्रॉसच्या मनात होतं. लेंबाख् आणि कार्लबाख् यांची त्याला काहीच हरकत नव्हती...पण स्टकचं ठाम मत होतं, की क्यूीन्स्लर हाऊस सारख्या संगीताच्या मंदिरात नृत्याचा कार्यक्रम ठेवणं बिलकुल योग्य नाही !... मग एक दिवस सकाळी उठून मी स्टकला त्याच्या घरीच गांठलं...माझ्या कलेची सर्वसिद्ध पात्रता मला त्याला पटवून

द्यायची होती...तिथे त्याच्या स्टुडिओत मी माझे नेहमीचे कपडे उतरवून नृत्यवेष चढवला; त्याला नृत्य करून दाखवलं, आणि मग माझ्या ध्येयाच्या पावित्र्याविषयी, आणि 'नृत्या'ला एक 'कला' म्हणून मान्यता मिळण्याच्या शक्यतेविषयी, सतत चार तास बोलत राहिले...मध्ये क्षणभर सुद्धा थांबले नाही! पुढे पुष्कळदा आपल्या मित्रमंडळींना तो सांगायचा की, त्या दिवशी-एवढे दिङ्मूढ आपण आयुष्यात कधीच झालो नव्हतो! ऑलिंपस पर्वतावरून कुठल्या दुसऱ्याच विश्वातून एकादी जंगलपरी एकाएकी समोर उभी ठाकावी, तसं म्हणे त्याला वाटलं...अर्थात् स्टकची सम्मती मिळालीच...आणि म्यूनिक्च्या क्यूॅन्स्लर हाऊसमधला माझा तो पहिला कार्यक्रम, म्हणजेच त्या शहरानं अनेक वर्षांत चाखला नाही, असा अदृष्टपूर्व कलाविलास ठरला...!!

त्यानंतर 'काइम ज़ाल' मध्ये सुद्धा मी नाचले. तिथे आलेला विद्यार्थीवर्ग तर खरोखरच वेडा झाला होता...माझ्या व्हिक्टोरियाचे घोडे सोडून ही मुलंच माझी गाडी ओढून रस्त्यारस्त्यातून मला मिरवत घेऊन जायची...आपली कॉलेजांतली गाणी गायची...पेटत्या टॉर्चेस हातांत धरून उड्या मारत गाडीच्या दोन्ही बाजूंनी चालायची...रात्रींमागून रात्री हा रथयात्रेचा प्रकार चालायचा...! कधीकधी तर त्यांच्याकडे मी माझे रुमाल किंवा फुलं फेकेपर्यंत त्यांनी थव्यानं माझ्या खिडकीखाली जमून तासन्तास गाणी म्हणावीत...अन् मग त्या रुमालांची वाटणी होऊन प्रत्येक टोपीत एक एक तुकडा खोवलेला दिसावा...

एका रात्री त्यांनी मला विद्यार्थ्यांच्या उपाहारगृहातच नेलं...आणि तिथल्या एका टेबलावर मी नाचत असतानाच कुणीतरी मला तिथून दुसऱ्या... तिथून तिसऱ्या टेबलावर न्यावं असा खेळ रात्रभर चालला...मुलांची गाणी अव्याहत चालू होतीच... आणि मधूनच 'इझाडोरा, इझाडोरा, किती अगाधसुंदर आहे हे जीवन!' हे पालुपद कानावर पडत होतं! 'सिंम्प्लिस्सिमुस'मध्ये या बेहोष रात्रीचं वर्णन जेव्हा प्रसिद्ध झालं, तेव्हा शहरातल्या चार तथाकथित सभ्य लोकांना धक्काच बसला... माझ्या 'पोशाखाचे अन् शालीचे अगदी धांदोरे निघाले होते, आणि पहाटे मला त्यांनी घरी पोहोचवलं, तेव्हा त्यांतला प्रत्येक धांदोरा एका एका टोपीत फडकत होता.'... वगैरे वगैरे सारं खरं असलं, तरी जे काय घडलं ते अगदी सहज होतं—नि सारी मजा अगदी निरागस होती, हेही काही खोटं नाही!

या सुमाराला म्यूनिक् म्हणजे जणू काही कलात्मक आणि बौद्धिक घडामोडींचं एक गजबजलेलं मोहोळच होतं...सारे रस्ते विद्यार्थ्यांनी गजबजलेले असायचे... प्रत्येक तरुण मुलीच्या बगलेत एकादी फाईल, किंवा संगीताच्या छापील पाठांची गुंडाळी असायची...प्रत्येक दुकानाची खिडकी म्हणजे दुष्प्राप्य, दुर्मिळ पुस्त-

कांचा, जुन्या छापील चित्रांचा किंवा नव्या चित्तवेधक ग्रंथावृत्त्यांचा खरोखर खजिनाच असायचा. हे सारं...नि शिवाय वस्तुसंग्रहातल्या अद्भुत चिजांचं भांडार, हेमंत ऋतूतली उन्हात न्हायलेल्या पर्वतराजीवरून झुळझुळत येणारी खुसखुशीत हवा – रुपेरी केसांच्या गुरु लेम्बाग्व्च्या स्टुडिओला दिलेल्या भेटी अन् 'कारव्हेल हॉर्न' आर्दीकरून थोर थोर तत्त्वज्ञांच्याशी वारंवार पडणाऱ्या गाठी !... यामुळे माझ्या बौद्धिक नि आध्यात्मिक जीवनाच्या कल्पनेला जो तडा गेला होता, तो पुनः एकदा सांधायची स्फूर्ती मला झाली...

मी जर्मन भाषेचा अभ्यास सुरू केला...शोपेनहावर आणि कांट मी मुळांतूनच वाचायला सुरवात केली...आणि थोड्याच दिवसात क्यूैन्स्लर हाऊसमध्ये दररोज रात्री होणाऱ्या सांगीतिक, तत्वज्ञ आणि इतर कलाकार यांच्या मोठमोठ्या चर्चा नि वादविवादांचाही बोध मला व्हायला लागला... कमालीचा रस वाटायला लागला मला त्यात.. म्यूनिक्च्या सुंदर बिअरचा आस्वाद घ्यायला शिकणं अर्थात् ओघानच आलं ! अन् अशा तऱ्हेनं नुकत्याच बसलेल्या मानसिक धक्क्यानं बिथरलेलं मन किंचित् शान्त झालं . . .

एका रात्री क्यूैन्स्लर हाऊसमधल्या एका कलामहोत्सवाच्या विशेष प्रसंगी नृत्य करत असताना, पहिल्याच रांगेत बसून टाळ्या देणाऱ्या एका व्यक्तीची विलक्षण वेधक छायाकृती मला दिसली... त्यावरून मला एका मोठ्या चित्रकाराचीच आठवण झाली... या चित्रकाराच्या कलेचं मर्म समजावून घ्यायला नुसतीच मी सुरवात केलेली होती...तीच ती भारावलेली भिवई...ते उठून दिसणारं नाक... फक्त जिवणी जरा जास्त मृदु होती... आणि सामर्थ्याचा तेवढासा आढळ नव्हता तिथे.. कार्यक्रमानंतर कळलं की हा झीगफ्राड वाग्नर . रिचर्ड वाग्नरचा हा मुलगा ! तो नंतर आमच्या मित्रवर्तुळातच दाखल झाला... आणि माझ्या अत्यंत प्रिय मित्रांमध्येच ज्याची पुढे गणना व्हायची होती, त्या या व्यक्तीला भेटायचं अन् त्याचं कौतुक करण्याचं भाग्य मला लाभलं. त्याचं संभाषण-बोलणं भारी बुद्धिचतुर नि वेधक असायचं... त्याच्या थोर पित्याच्या आठवणी त्याच्या त्या बोलण्यातून वारंवार निघायच्या. . . एकादं तेजोवलय आपल्या मस्तकाभोवती वागवावं, तशा त्या पवित्र आठवणी जणू तो आपल्या व्यक्तित्वाभोवती अहोरात्र वागवत होता....

... मी त्यावेळीं शोपेनहावर प्रथमच वाचत होते... आणि 'संगीत आणि आपली इच्छाशक्ति,' यांच्या परस्परसंबंधाची जी तात्त्विक उकल त्याला झाली होती, त्याच्या जाणिवेनं मी अगदी भारून गेले होते !

हे अतर्क्य रूप – ज्याला जर्मन लोक 'गाइस्ट' म्हणतात, असीम शुचितेच्या जाणिवेची ही विलक्षण प्रतिमा, – परमपवित्र विचाराचं हे निधान, जेव्हा माझ्या

वाटेत आलं, तेव्हा मला वाटलं की कुणा दैवी द्रष्ट्यांच्या नि उच्च कोटीच्या विचारवंतांच्या विश्वाची माझी तोंडओळख होते आहे...माझ्या प्रवासी, भटक्या जीवनात मला भेटलेल्या साऱ्या बुद्धिमंतांच्याहून ही बुद्धि किती पवित्र होती–सोज्वळ होती... किती विस्तृत, विशाल कक्षा होत्या या बुद्धीला ... ! जीवनाचं तात्विक आकलन होणं, हीच इथे मानवी समाधानाची परिसीमा मानली जात होती. याच्याशी तुलना होण्याजोगी एकच गोष्ट होती आणखी ... संगीताचं त्याहूनही पवित्र विश्व !

... म्यूनिक्च्या वस्तुसंग्रहालयातल्या इटलीच्या दिव्य कलाकृती म्हणजेही माझ्या दृष्टीनं कलेचा एक अभिनव साक्षात्कारच होता ... तेव्हा इटलीच्या सीसेपासून आम्ही अगदी जवळ होतो, ही गोष्ट ध्यानात येताक्षणी आमच्याच्यानं राहवलंच नाही – एका अनावर उर्मीचा मागोवा घेत घेत आम्ही – मी, एलिझ्-बेथ आणि आई – फ्लॉरेन्सला जाणाऱ्या गाडीत बसलो...

# १२

टायरोल पार करून जाऊन पर्वताच्या उन्हावल्या बाजूनं उतरत उतरत अंब्रायन सपाटीपर्यन्तचा तो प्रवास—तो अद्‌भुत अनुभव मी कधीच विसरणार नाही...!

...आम्ही फ्लॉरेन्सला आगगाडीतून उतरलो; अन् तिथली कलालयं, उद्यानं आणि ऑलिव्ह फळांचे बगिचे—वनराया, यांतून धुंदपणे भटकण्यात पुढचे कितीतरी आठवडे चालवले.

...त्यावेळी 'बॉटिचेली'नं माझ्या तरुण कल्पक मनाची पकड घेतली होती... बॉटिचेलीच्या 'प्रिमाव्हेरा' (वसंत) या प्रसिद्ध चित्रासमोर दिवसचे दिवस मी बसून राहायची...त्यांतून मिळालेल्या प्रेरणेच्या आधारानं मी पुढे एक नृत्य-रचनाही केली होती.. त्यांत त्या मूळ कलाविष्कारांतून स्फुरित होणारी अंगो-पांगांची मृदु नि अदृष्टपूर्व संचलनं नृत्यांतून साकार करायचा माझा प्रयत्न होता...एकाच सार्थ आविर्भावानं वसन्तऋतूचा, नि त्याच्या ठायी लपलेल्या नवसृजनाच्या मर्माचा वेध घेणारी ती मध्यवर्ती आकृती...! अर्धी 'ॲफ्रडायटी' ... अर्धी 'मॅडोना'...फुलांनी झाकलेल्या धरतीची ती दिसेल न दिसेलशी 'कसक-मसक'... पऱ्यांचं ते वर्तुळ, उडणारे पश्चिमवाऱ्याचे अधिनायक 'झेफ़िर'...सारे त्या मध्यवर्ती आकृतीभोवती गोळा झालेले...

तासनतास या चित्रासमोर बसलेली असायची मी. माझ्या मनावर त्याची मुळी मोहिनीच पडली होती. एका सुस्वभावी म्हाताऱ्या रखवालदारानं मला एक छोटं मेज दिलं होतं आणून तिथे बसायला. मला वाटणारं ते कलाकौतुक तो दुरून वात्सल्यानं न्याहाळत राहायचा... त्या चित्रांतली ती फुलं प्रत्यक्ष

उमलताना मला दिसायला लागेपर्यन्त मी तिथे बसून असायची... मग हळूहळू ती अनावृत पावलं नाचायला लागायची...तें देह हेलावू—डोलू लागायचे...होता होता माझ्या अंतरातून आनंदलहरी उठायला लागायच्या...अन् साफल्याच्या क्षणी मी संकल्प सोडायची : "ह्या चित्राला मी नृत्यांकित करीन... नि मोठ्या कष्टानं मला मिळालेला हा प्रेमाचा, वसन्तागमाचा, नवसृजनाचा संदेश इतरांपर्यन्त पोहोचवीन...या परमानंदाची प्रतीती त्यांना मी नृत्यांतून देईन..."

कलालय बंद व्हायची वेळ आली तरी मी आपली त्या चित्रासमोरच अवघडलेली!... वसंताचा अर्थ मला याच सुंदर क्षणाच्या रहस्यगर्भातून उलगडायचा होता... मनात वाटायला लागलं की आजपर्यंतचं आपलं आयुष्य हा एक अडाणी गोंधळ होता...डोळे मिटून केलेला शोध होता... मी म्हटलं, "या चित्राचं हृद्गत मला समजलं, तर मात्र आनंदाच्या पोषणाची युक्ती आणि समृद्ध जीवनाची वाटच मी दुसऱ्यांना सहज दाखवून देऊ शकेन... एखाद्या माणसानं अगदी चांगल्या हेतूनं युद्धावर जावं आणि भयंकर जखमी होऊन परतल्यावर शहाणं होऊन, इतरांच्यावर ती जायबंदी होण्याची पाळी येऊ नये म्हणून, त्यांना शांतिपाठ देण्याचा निश्चय करावा... अशा या माणसासारखीच माझी जीवनाकडे बघण्याची दृष्टी झाली होती...

फ्लॉरेन्समधल्या बॉटिचेलीच्या ज्या चित्राला मी नृत्यस्पर्श करणार होते, त्या 'प्रिमाव्हेरा' चित्रासमोर वसून माझं हे असं चिन्तन चालायचं...जुन्या मूर्तिपूजक पंथाच्या (pagan) अनोळखी लोकजीवनाबद्दलची किती ती गोडी वाटायची...! किती गोड कल्पना असायची मनात...ॲफ्रडाईटीचं चमकदार व्यक्तित्व येशूच्या दिलदार आणि प्रेमळ माऊलीच्या शरीराकृतींतून प्रत्ययाला यायचं आणि नव्यानं फुटणाऱ्या फांद्यांकडे झेपावणाऱ्या अपोलोत सेंट सेबास्टियनचं साम्य आढळायचं!!...या साऱ्या संवेदना प्रशांत आनंदाचा पूर यावा, तशा ओघात माझ्या हृदयात शिरत...अन् मग तिथे जाणवलेल्या त्या अकल्पिताचं रूपांतर नृत्यात करण्याच्या माझ्या इच्छेला उधाण येई... 'भविष्याची चाहूल' असं नावसुद्धा मी त्या रचनेला मनोमन देऊन टाकलं होतं...

इथे एका जुन्या राजवाड्याच्या दालनात फ्लॉरेन्समधल्या एका कलावंतांच्या संस्थेसाठी मी 'मॉंतव्हर्द'च्या आणि त्यापूर्वीच्या सांगीतिकांच्या काही अनामिक संगीतरचनांच्या साथीवर नाचले... 'व्हिओल दामूर'साठी बांधलेली एक अति सुन्दर बंदिश नाचताना मनात मी – 'एक देवदूत आपल्या हातातलं काल्पनिक व्हायोलिन वाजवत आहे,' अशी कल्पना केली होती...

या वेळेपर्यंत व्यवहाराकडे दुर्लक्ष करणाऱ्या आमच्या नेहमीच्या स्वभावानुसार, आमच्या जवळची सारी पुंजी संपून गेली होती... अर्थात् अलेक्झांडर ग्रॉसला एक तार ठोकणं आम्हाला भागच पडलं – की बर्लिनला त्याच्याच तिथे जाऊन पोहोचण्यासाठी आवश्यक तेवढी रक्कम त्यानं पाठवावी...! त्यावेळी ग्रॉस माझ्या बर्लिनमधल्या पहिल्या नृत्यपदार्पणाची तयारी करण्यात गुंतला होता.

बर्लिनला येऊन पोहोचल्यावर रस्त्यांतून जाता जाता पाहते, तर काय ? सारं शहर म्हणजे माझ्या नावाची एक ज्वलंत जाहिरातच झालेलं ! 'क्रॉलस् ' ऑपेरा हाऊसमध्ये फिलार्मोनिक वाद्यवृंदासहित इझाडोरा डंकन—पहिलाच नृत्यप्रयोग.' वगैरे... वगैरे... मी अगदी बावरूनच गेले—' उंटर डेन लिंडेन ' मधल्या होटेल ' ब्रिस्टल 'च्या स्वीटकडे अलेक्झांडर ग्रॉसनं आम्हाला नेलं ... जर्मनीतला पुरा पत्रकारसंघच माझी पहिली मुलाखत घ्यायला तिथे उपस्थित झाला होता की काय न कळे ! म्यूनिक् मधल्या माझ्या अभ्यासानं, आणि फ्लॉरेन्समधल्या अनुभवानं माझी चित्तवृत्ती अबोलगूढ अन् काहीशी आध्यात्मिकतेकडे झुकल्यासारखी झाली होती ... त्यामुळे माझ्या अमेरिकन जर्मन भाषेत, माझी नृत्याबद्दलची अकृत्रिम आणि भव्यदिव्य कल्पना मी त्या पत्रकारांसमोर मांडून त्यांना चकितच करून सोडलं ! ' ग्रस्ते एरन्स्ते कुन्स्त '—' एक उदात्त-गंभीर कला ' अशा शब्दांत मी नृत्यकलेचं वर्णन केलं – आणि म्हटलं, की या आगळ्या नृत्यकल्पनेतूनच इतर कलाप्रकारांना देखील नवी जाग येणार आहे... नवी दृष्टी लाभणार आहे...

पुढे अमेरिकेत गेल्यावर याच माझ्या कल्पना मी तिथल्या पत्रकारांना ऐकवल्या होत्या, पण ह्या जर्मन पत्रकारांचं अवधान अमेरिकनांच्या पेक्षा किती वेगळं होतं ! हे सारेजण अत्यन्त आदराने आणि समरसतेने, विचारपूर्वक माझं वक्तव्य ऐकून घेत होते... अन् नृत्यकलेचा गंभीरपणे विचार करणारे, नि त्यातलं तांत्रिक अनुसंधान संभाळणारे मोठमोठे लेख आणि सदरं, दुसऱ्या दिवशी जर्मन वृत्तपत्रांत प्रसिद्ध झाली होती...

अलेक्झांडर ग्रॉस हा एक खरोखर मोठा धाडसीच कलाप्रवर्तक होता ... माझ्या बर्लिनच्या कार्यक्रमावर त्यानं त्याच्या साऱ्या मुद्दलानिशी बाजी लावली होती... जाहिरातीच्या खर्चात त्यानं मागेपुढे पाहिलं नाही ... ' ऑपेरा हाऊस ' हे आद्य संगीतमंदिरच कार्यक्रमासाठी मुक्रर केलं ... उत्तमात उत्तम अशाच वाद्यवृंद-निर्देशकाची योजना केली ... अशा साऱ्या सरंजामी खटाटोपानंतर, पडदा वर गेल्यावर नेत्रदीपक नेपथ्याऐवजी माझे साधे आकाशनिळे पडदे, आणि एवढ्या प्रशस्त रंगमंचावर माझी एक छोटीशी लहानखुरी आकृती—असं हे प्रथमदर्शन बर्लिनच्या प्रेक्षकवर्गाला कोड्यात टाकणारंच होतं ... तिथेच त्यांची

निराशा झाली असती, आणि त्यांचं पहिल्या क्षणाचं ते उत्स्फूर्त स्वागत माझ्या वाट्याला आलं नसतं, तर मला वाटतं, अलेक्झांडर ग्रॉस धुळीलाच मिळाला असता ...! ... पण तो द्रष्टाच होता म्हणायचा! ... त्यानं भविष्य वर्तवलं – अन् मी ते खरं करून दाखवलं ... बर्लिनमध्ये मी धमाल उडवून दिली! कार्यक्रमाचे दोन तास होऊन गेल्यावर सुद्धा लोक ऑपेरा हाऊस सोडून घरी जायचं नाव काढीनात ... उलट वन्समोअरचाच धोषा लावला त्यांनी ... आणि शेवटी हा प्रेक्षकसमुदाय उत्साहातिशयानं एका झेपेत फुटलाईटसूपाशी येऊन धडकला... शेकडो तरूण विद्यार्थी तर मंचावरच चढून आले ... म्हणजे लोकप्रियतेच्या या 'अति'प्रकारामुळे गर्दीत चेंगरून मरायचा धोकाच मुळी मला उत्पन्न झाला! तिथपासून पुढे कित्येक रात्री माझ्या गाडीचे घोडे सोडून मला रस्त्यातून कौतुकानं मिरवत मिरवत 'उंटर डेन लिंडेन' मधल्या होटेलपर्यंत पोचवायचा गोड प्रघात जर्मनीत पडला होता.

माझ्या पहिल्याच कार्यक्रमापासून जर्मन लोक मला 'इझाडोरा, दैवी, पवित्र इझाडोरा...' असल्यासारख्या नावांनी ओळखायला लागले होते...

...अन् अशाच एका संध्याकाळी रेमंड अमेरिकेहून परतला...त्याला म्हणे आमची फार म्हणजे फारच आठवण व्हायला लागली होती; आणि यापुढे त्याला आमच्याशिवाय राहणं शक्यच नव्हतं...मग झालं! आमचा एक जुना मनोमन जोपासलेला बेत पुन्हा वर डोकं काढू लागला...आमच्या त्या आवडत्या 'ॲथेन्स'ची—त्या सर्वांत पवित्र कलातीर्थाची – वारी करण्याची आमची इच्छा उफाळून वर आली!...अजून मी कलोपासनेच्या उंबरठ्यापाशीच जेमतेम पोहोचलेली आहे, असंच माझ्या मनानं घेतलं – आणि म्हणून बर्लिनमधले पहिले काही कार्यक्रम उरकल्यावर अलेक्झांडर ग्रॉसच्या केविलवाण्या विनंत्या आणि आर्जवं यांना न जुमानता, मी बर्लिन सोडण्याचा हट्टच धरला...पुन्हा एकदा इटलीला जाणाऱ्या गाडीत आम्ही बसलो.. लुकलुकत्या नजरेनं-धडधडत्या हृदयानं...कितीतरी दिवस पुढे पुढे ढकललेली आमची ॲथेन्सची वारी सर्वांनी मिळून पुरी करण्याच्या आनंदात...ॲथेन्स...! व्हेनिसमार्गे...ॲथेन्स!

काही आठवडे मग आम्ही व्हेनिसमध्येसुद्धा घालवले.. तिथली चर्चेस प्रार्थनामंदिरं आणि चित्रालयं मोठ्या आदरानं पहात ... पण त्यावेळेला साहजिकच व्हेनिसचं आकर्षण काही आम्हाला फार जाणवलं नाही...त्यापेक्षा फ्लॉरेन्सचं अधिक वरच्या दर्जाचं बौद्धिक नि आत्मिक सौन्दर्य आम्हाला शतपटीनं जास्त भावलं होतं...यावेळी व्हेनिसनं आपलं हृद्गत आणि आपल्या सौन्दर्याचं मर्मस्थान माझ्यापुढं उघडं केलंच नाही मुळी...ते गुपित मला उलगडलं, ते नंतर कितीतरी वर्षांनी...एका किरकोळ बांध्याच्या, ऑलिव्ह फळाच्या कांतीच्या, अन्

काळ्याभोर डोळ्यांच्या प्रियकराबरोबर मी तिथे गेलेली असताना!...त्यावेळी पहिल्याप्रथमच व्हेनिशियन सौन्दर्याची किमया मला जाणवली – नाहीतर या पहिल्या भेटीनं, मला कधी एकदा मी व्हेनिस सोडून, बोट पकडून एकाद्या याहून उच्च कलेच्या परिसरात जाऊन पोहोचते, असं झालं होतं.

रेमंडचं म्हणणं होतं, की आमची ही ग्रीसची सफर अगदी प्राचीन काळातल्याप्रमाणे व्हावी, शक्य तेवढी—म्हणून मग, मोठीमोठी आरामशीर प्रवासी जहाजं डावलून आम्ही, 'ब्रिंडिसी ते सॅन्टा मॉरा' अशी फेरी करणाऱ्या एका लहानशा डाकबोटीवर चढलो. सँटा मॉराला आम्ही उतरलो, त्याचं कारण पुरातन इथाकाची भूमी इथेच होती; नि सॅफोनं ज्या खडकावरून निराशेतिशयानं स्वतःला समुद्रात झोकून दिलं, तो खडकही इथेच होता!... त्या क्षणी बायरनच्या काव्याच्या ज्या ओळी माझ्या मनात जाग्या झाल्या होत्या, त्या आजही—स्मृतीच्या जगात आमच्या त्या सफरीचा अनुभव मी पुनः घेत असताना—मनात पिंगा घालत आहेत:

**The isles of Greece**

The isles of Greece, the isles of Greece,
Where burning Sappho loved and sung,
Where grew the arts of war and peace,
Where Delos rose and phœbus sprung!
Eternal summer gilds them yet,
But all, except their Sun, is set.

**'ग्रीक द्वीपं...**
ही ग्रीक द्वीपं...ग्रीक द्वीपं...
अंतर्यामी जळणाऱ्या सॅफोनं जिथे प्रीतिसुख अनुभवलं ... गाणी गायली...
युद्ध नि शांतता यांची तंत्रं जिथे वाढली—पोसली...
डेलॉसचा उदय झाला ... फीबसनं उभारी घेतली ...
तिथे आजही आहे शाश्वत ... सनातन ग्रीष्म... !
त्याचा चढतो आहे आज देखिल मुलामा...या द्वीपांना...पण...
पण मावळलं आहे बाकी सारं काही...
त्यांचा एक सूर्य सोडला तर ... !'

सँटा मॉराहून पहाटेच आम्ही एक शिडाची बोट पकडली. बोटीत दोन माणसं फक्त आमच्या...आणि तो जुलै महिन्यांतला एक तळपता दिवस!...तशातच निळ्या आयनियन समुद्रातून उन्हातान्हातून आम्ही मार्ग काढला...अन

अॅड्रेशियन आखातात शिरून आमची बोट 'कार्व्हासारस' नावाच्या छोट्या शहराला लागली.

ती मच्छीमार बोट जेव्हा आम्ही भाड्यानं घेतली, तेव्हा रेमंडनं खूप हातवारे करून आणि थोडेफार जुनेपुराणे ग्रीक शब्द वापरून आमची ती सफर शक्य तो 'युलिसिस'च्या सफरीप्रमाणे करायची इच्छा नावाड्याच्या कानावर घातली होती...पण त्या कोळ्याला युलिसिसचं काही सोयरसुतक नव्हतं...तेवढी वरीचशी ग्रीक 'ड्राक्मा' नाणी पुढे केल्यावर, तेवढ्यावर तो होडी हाकारायला तरी तयार झाला – फार दूरवर जायला मात्र तयार नव्हता, अन् आकाशाकडे वारंवार बोट दाखवून 'बुमबुम्' असं म्हणत होता...त्यानं हातवाऱ्यांनी सुचवलं, की हा समुद्र फसवा आहे...आणि आता मोठं वादळ होण्याची शक्यता आहे...इकडे आमच्या मनात आपल्या 'ओडिसी' मधल्या समुद्रवर्णनाच्या काव्यपंक्तीच तरळत होत्या :

'...असं म्हणत त्यानं आपला त्रिशूळ उचलला,
ते मेघ आणि तो समुद्र – खवळता...
यांची जणू एकच मोट बांधली ...घट्ट...
साऱ्या दशदिशांतल्या वादळांना गेली साद...
धरित्री नि सागर काजळू, काळवंडू लागलेले...अन् स्वर्गातून...
स्वर्गातून उतरणारी शर्वरीसुद्धा गर्द काळीभोर...
पूर्व, दक्षिण...अन् वाऱ्यांनी सुसाटलेली पश्चिम—
उत्तरेचा पारदर्शक थंडगार स्रोत,
साऱ्यांनी घेतलेली झेप—अचानक...अन् त्याचा तराफा...
त्याचा तराफा त्या हेलावत्या पुरावर उंच, – डोलत...
सारी आशा...सारं धैर्य...त्या क्षणाच्या पोटी विरलेलं...'

ओडिसी–५

या आयनियन समुद्राइतका चंचल समुद्रच नाही...आणि तिथेच आमच्या मूल्यवान् जीवनाची बाजी आम्ही लावून बसलो होतो...कदाचित् युलिसिसच्या सफरीशी नको इतकं या आमच्या सफरीचं साम्य जुळून आलं असतं, असला हा समुद्र...हे वर्णनच पहाना...

'... असं तो म्हणतोय् तोच...
एक प्रचंड लाट फुटली त्याच्याच माथ्यावर—उमाळ्यानं...
अन् तिनं भिरकावून दिलं ते होडकं आवर्तात...भोवळलेल्या...
हाताच्या पकडीतून निसटलेलं चाक आपल्या पावलीच गेलं दूर...
...सूर मारून नाहीसं झालं ... अन् एवढ्यात एकाएकी...

झंझावात,—वाऱ्यांच्या मिसळत्या झोतांची धारदार गुंफण वनत—
आला तसा लाटावर स्वार होऊन कुठच्या कुठे विरला सुद्धा...
शिडाचं काळीज मधोमध चिरून...!
शीड, डोलकाठी ... सारं काही पुरात समर्पण...
पाण्याच्या पांघरुणात किती तरी वेळ तो घुसमटलेला...
भीतीच्या धक्क्यानं उफाळलेलं अराजक...सहजासहजी न शमणारं...
पाणीभरला पोशाख—जड ओझं होऊन बसलेला—असा की,
माथं वर देखील येईना त्याचं, श्वासमोकळ्या हवेसाठी तडफडणारं...
तरीपण अखेरीस तो उठला...आणि ऊठताना भिवयांवरून
निथळणारं खारं पाणी त्यानं ओठातून थुंकून टाकलं...'

आणि पुढे देखील... युलिसिस आपली होडी फुटल्यानंतर 'नोसिका'ला भेटला तेव्हा...

'दुःखाचे पहाड पचवून आलो आहे मी ... उग्रउदास
सागरापासून माझी सुटका झाली, ती कालच ! (तो होता
सागरानं केलेल्या माझ्या छळणुकीचा विसावा दिवस ...)
'ओजिया' बेटाकडून येणाऱ्या लाटा नि ऊर्मिल गतिमान् वादळं...
त्या साऱ्या दिवसात मला वाहून नेत होती आपल्या अंकावर...
... पण स्वर्गीय इच्छाशक्तीनं देखील धरला उभा दावा...
अन् येऊन पडलो मी तुमच्या या किनाऱ्यावर ... दुःखाचे आणखी
पेले झोकायला ... ! ... विश्रांती ? ... विश्रांती हा संकेत माझ्यासाठी नाहीच !
... नाही ... तो विश्रांतीचा दिवस उगवण्यापूर्वी
कितीतरी उरकायचं आहे अजून देवगणांचं—अमरांचं !
...ते असो ... हे राणी, माझी तुला कणव येऊ दे...
कारण अपार संकटपरंपरा सहन करून, जीव धरून
राहाणाऱ्यांपैकी मीच एक प्रथम तुझ्या चरणाशी आलो आहे...
आणि या भूमीवरच्या कुणाही मर्त्याला ओळखत नाही मी
... माझ्या खेरीज ... !' ओडीसी—६

'प्रेव्हेसा' नावाच्या एपिरस किनाऱ्यावरच्या एका छोट्या तुर्की गावात आम्ही थांबलो, आणि पुढली तरतूद म्हणून काही जिन्नस घेतले – भली थोरली मेंढीच्या चीजची ढेप, खूपशी पिकलेली ऑलिव्ह फळं आणि सुके मासे.

आमच्या त्या शिडवाल्या होडक्याला माथ्यावर आवरण-झांकण काही नव्हतंच. त्यातच त्याची हळुवार असली तरी स्वाभाविक डोलती चाल...अन् साऱ्या दिवसभर तळपणारं प्रखर ऊन्ह...या सर्वांमुळे त्या चीज नि मच्छीला अशी भयंकर घमक सुटली होती...छे!...आपण तर मरेपर्यंत तो वास विसरणार नाही...पुष्कळदां वाराही थांबून जायचा...मग वल्ही हातात घेतल्याशिवाय भागायचंच नाही ... करता करता एकदा दिवस मावळता मावळता आम्ही कार्व्हासारसला पोहोचलो.

तिथले सगळे रहिवासी आमचं स्वागत करायला आपले पुळणीवर हजर झाले... कोलंबसानं प्रथम अमेरिकेच्या भूमीवर पाऊल ठेवलं, तेव्हा तिथल्या आदिवासींना वाटलं नसेल, इतकं आश्चर्य आम्हाला पाहून या लोकांना वाटलेलं दिसलं...अन् तेवढ्यात रेमंड न् मी गुडघे टेकून बसलो, आणि खाली वाकून आम्ही जमिनीचं चुंबन घेतलं... तेव्हा तर त्या आश्चर्याचं रूपान्तर अवाक् कुतूहलात झालं : इकडे रेमंडनं मंत्रोच्चाराच्या थाटात पठनाला सुरुवात केली...

‘सुंदर ग्रीस देशा,
तुझ्याकडे दृष्टि लावून बसलेलं
हे काळिज अंतर्यामी आहे बधिरशार
...जिच्यावर एकदा प्रेम केलं, ती माती हातात घेताना
प्रेमिकांना जाणवत असेल, तेवढी देखील ऊब नाही या काळजात !
ओरखडे गेलेल्या तुझ्या या कुरूप भिंती, नि
झुंजल्याझिजल्या पूजापीठांच्या रिकाम्या ओवऱ्या...सारं पाहूनही
एकही अश्रू न ढाळणारा हा डोळा...ही दृष्टि...
आज निस्तेज, निस्तेज आहे...!’

आनंदातिशयानं खरोखर वेड लागायचीच पाळी आली होती आम्हाला ...वाटत होतं की या सगळ्या खेडुतांना मिठीच मारावी...म्हणावं,

“खूप हिंडूनफिरून अखेर शेवटी आम्ही या ‘हेलास’च्या पवित्र भूमीत येऊन पोहोचलो आहोत...प्रणाम !...ऑलिंपियाच्या ‘झेऊस’ देवा, प्रणाम ! आणि हो; हे अपोलो, नि हे ॲफ्रडाईटी देवते...तुलाही आमचा प्रणाम !... कलांच्या अधिष्ठाच्या देवतांनो.. चला, पुन्हा एकदा सिद्ध व्हा नर्तनासाठी... आपल्या गायनानं ‘डायनिसस’ आणि त्याच्या सुप्त महंतिर्णींना-बॅकन्टेना जाग येईल कदाचित्...”

‘ऊठ, बॅकी, भार्ये, कुमारि
चल, ये मदिरोपासिके ये...
घेऊन ये त्या आनंदबनाला

आदिपुरुषाच्या ऐश्वर्यबीजाला – त्या
ब्रोमिओसला आण साऱ्या सत्तासामर्थ्यानिशी...
आण, आण त्याला ‘ क्रीजिया ’च्या पर्वतरूपी घुमटांतून
वीथींतून, वेशींतून, मनोऱ्यांखालून
घेऊन ये त्याला स्वगृही...त्याला ब्रोमिओसला, हे मदिरोपासिके!
...आणि तुझे ते गव्हाळी मृगाजिन
परिधान कर आमच्यासारखं...
मांगल्यांची शुभ्र फेसाळती किनार असलेलं...
मीहि शपथबद्ध – ! अर्धवट पिकलेले राखी केस
...नि हिमगौर केस...
या नव्या देवाचा मानदंड शृंगारण्यासाठी...
अन ते मृगाजिन लेवून आयव्हीच्या पर्णांचे मुकुट भिवयांवर
तोडून धरण्यासाठी...

कार्व्हासारसमध्ये ना लोहमार्ग होता, ना एखादं होटेल. त्या दिवशी आम्ही एका खानावळीच्या एकुलत्या एका खोलीतच झोपलो सारे...तेवढीच एक खोली होती तिथे; अन् झोपही जेमतेमच लागली म्हणा!...एकतर रेमंडनं सॉक्रेटिसच्या प्रज्ञानाचं आणि अशरीरिणी प्रीतीच्या दैवी साफल्याचं आख्यान लावलं होतं रात्रभर – अन् दुसरं म्हणजे निजायच्या खाटा होत्या एकेरी फळ्यांच्या...त्या कमालीच्या खडबडीत होत्या! या शिवाय ‘ हेलास ’ मध्ये हजारो सूक्ष्म रहिवासी होतेच की ...त्यांना तर आमच्याच रक्तामांसाची मेजवानी हवी होती...!

पहाटेच आम्ही त्या खेड्याचा निरोप घेतला...दोन घोड्यांच्या गाडीत आत-मध्ये आई अन् आमच्या सामानाचे चार डाग...आणि आम्ही लॉरेलच्या छोट्या खांद्या तोडून हातात वागवत तिच्या भोवतीनं...तिची स्वारी नेत असल्यासारखे...ते पुरं खेडं आमच्याबरोबर बरीच वाट चालून गेलं... जवळजवळ दोन हजार वर्षांपूर्वी मॅसेडॉनच्या ‘ फिलिप ’नं आपल्या सैन्यानिशी जो रस्ता तुडवला होता...त्याच त्या पुरातन रस्त्यानं आम्हीही निघालो...!

* * *

कार्व्हासारस ते ‘ ॲग्रिनिऑन ’ हा रस्ता खडकाळ उग्रभव्य पर्वतराजीतून वळणं घेत जातो...सकाळ प्रसन्न अन् हवाही स्वच्छ, पारदर्शी होती...आमची तरुण जोमदार पावलं, हलकेफुलके पंख लावावेत, तशी तरंगत चालली होती... मध्येच उड्या मारायच्या...मध्येच ढांगा टाकत धावायचं लांबलांब...गाडीच्या पुढेपुढे...आमच्या चालीला साथसंगत ऊर्मिल आरोळ्यांची नि आनंदगीतांची! ‘ अस्प्रोपोटॅमस ’ ( म्हणजे प्राचीन काळची ‘ ॲचेलॉस ’ नदी...) पार करताना

तर कमालच! एलिझबेथ अगदी डोळ्यात पाणी आणून आमच्या विनवण्या करत होती, तरी तिला न जुमानता रेमंडनं न् मी त्या निर्मळ पारदर्शी पाण्यात एक तरी बुडी घेण्याचा हट्टच धरला...आम्हाला एक प्रकारचा बाप्तिस्माच घ्यायचा होता तिथं...ती कल्पना ठीक होती, ते जाऊ दे...पण त्या प्रवाहाला कसली धार होती भयंकर, ते कुठे लक्षात आलं होतं?.. आम्ही जवळजवळ वाहूनच गेलो होतो दोघं!

प्रवासाच्या एका टप्प्यावर, दूरवरच्या शेतांतल्या दोन जंगली मेंढपाळी कुत्र्यांनी आम्ही पुरी दरी ओलांडेपर्यंत आमचा पाठलाग चालवला होता...बरं तर बरं... आमच्या शूर गाडीवानानं आपल्या भल्यामोठ्या चाबकानं त्यांना बाबरवून पळवून लावलं...नाहीतर त्यांनी लांडग्यांच्या क्रूरपणानं आमच्यावर सरळ हल्लाच केला असता ..

रस्त्यालगतच्या एका छोट्या खानावळीत आम्ही दुपारी जेवलो...तिथे आयुष्यात पहिल्यांदा एका 'अभिजात' मद्याची चव चाखली आम्ही...! डुकराच्या कातड्याचं बनवलेलं अस्सल मदिरापात्र...अन् गोंदासारखा झाडांतून झिरपणारा पदार्थ मिसळून मुरवलेलं मदिरासव! खरं सांगायचं तर ते रसायन फर्निचरला लकाकी आणणाऱ्या व्हॉर्निशसारखं लागत होतं...मात्र तोंड वेडी-वाकडी करतच, पण हट्टानं आम्ही म्हटलं, "वाः! काय स्वाद आहे!..."

अखेरशेवटी तीन टेकड्यांवर मिळून वसलेल्या प्राचीन 'स्ट्राटोस' शहरात आम्ही येऊन पोहोचलो...ग्रीक अवशेषांच्या परिसरात पडलेलं हे आमचं पहिलंच धाडसी पाऊल!.. डोरिक स्तम्भांच्या दर्शनानं आम्हाला हर्षवायूच व्हायचा तेवढा बाकी होता! आम्ही रेमंडच्या पाठोपाठ निघालो...त्यानं सरळ आम्हाला पश्चिम टेकडीवरच्या झेऊसच्या देवळाच्या रंगमंदिराच्या भूमीकडे नेलं...अन् तेवढ्यात आमच्या पारदर्शी धीट कल्पनेनं आपल्या भुलावणीनं त्या टेकड्यांना कवळून वेंगेत घेणाऱ्या त्या सुरम्यसुंदर नगरीचा सत्याभासदेखील आमच्या डोळ्यांना घडवला...खरंच!.. मावळत्या सूर्याची साक्ष होती...!

रात्रीच्या सुमाराला आम्ही ॲग्रिनिऑनला पोहोचलो, ते खूप थकले भागलेले खरेच ... पण सुखातिशयानं प्रसन्न अन् अगदी तृप्त होऊनच ... सर्वसाधारण-पणे मर्त्य जीवाला असला दैवी आनंद उपभोगायला क्वचितच मिळत असेल असंच वाटतं होतं!... दुसऱ्या दिवशी सकाळी 'मिसोलॉंघी' पर्यंत खाली जाणारी गाडी पकडून तिथे गेलो ... इथल्या मातीचा कण न् कण एका काळी हुतात्म्यांच्या रक्तानं भिजलेला आहे; अशा या पराक्रमी नगराच्या अवशेषांच्या अंकावर ज्याची प्रतिष्ठा-पना झालेली आहे, त्या बायरनच्या ज्वलन्त हृदयाला आम्ही आधी मानवंदना-दिली ... चितेच्या लाल निखाऱ्यातून शेलीचं हृदय खेचून आणलं, ते बायरननं,

हा विचार किती विस्मयकारक वाटतो नाही ? शेलीच्या त्या हृदयाला गाभारा लाभला आहे रोमचा ... एकेकाळची साक्षात् दीप्ती ठरावी, अशा ग्रीसपासून, मूर्तिमंत 'वैभव' म्हणावं अशा रोमपर्यंत, आजही ही हृदयं एकप्रकारचं गूढ अनुसंधान राखून एकमेकांशी संवाद करत असतील का ? कुणी सांगावं ?

... ह्या साऱ्या आठवणींनी आमच्या त्या उतू जाऊ पाहणाऱ्या मोकळ्या प्राकृतिक आनंदावर एकप्रकारची दुःखाची छाया पडली ... मनं किंचित् मारावून गेली आमची ... तुर्की सीमा पार करण्याच्या शेवटल्या निकराच्या प्रयत्नांत त्या शहरातल्या बायका, मुलं, पुरुष ... साऱ्यांच्या सारे रहिवासी पार कापून काढण्यात आले होते ... 'देलाक्रुवा'च्या 'ला सोर्ती दे मिसोलाँधी' या प्रसिद्ध कलाकृतीत जाणवणारं ते दुःखद वातावरण आजदेखील तिथे त्या शहरात रेंगाळत आहे...

बायरन सन अठराशे चोवीसच्या एप्रिलमध्ये मिसोलाँधीत मृत्यू पावला. ज्यांच्या स्वातंत्र्यासाठी बायरन सर्वस्वाचा होम करायला निघाला होता, त्या हुतात्म्यांनीही पुढे दोन वर्षांनी एप्रिलमध्येच बायरनच्या पाठोपाठ अज्ञाताची वाट धरली होती ... या शूर मिसोलाँधी नगराच्या इतिहासात बायरनच्या मृत्यूइतका हळवा टप्पा दुसरा कोणता असू शकेल का ? हेलासच्या या अमर सौंदर्यभूमीची ओळख पुनः एकदा साऱ्या जगताला व्हावी, म्हणून आपला जीव तिच्यावरून ओवाळून टाकणाऱ्या त्या हुतात्म्यांच्या मनात बायरनची प्रतिमा कायमची ठसली होती...तिची प्राणप्रतिष्ठा झाली होती. हौतात्म्य कधी वाया जात नसतं, हेच खरं!

...'पात्रास'ला जायला निघालेल्या बोटीच्या डेकवरून मागे मागे सरकणाऱ्या मिसोलाँधीचा आम्ही निरोप घेतला ... सरता प्रकाश ... भरलेलं काळीज ... ओले डोळे !!

पात्रासला आल्यावर मात्र 'ऑलिंपिया' आणि ॲथेन्स, यापैकी कुणाचं आकर्षण जास्त, हे ठरवताना आमच्या अगदी नाकीनऊ आले ... शेवटी 'पार्थेनॉन' पाहण्याच्या अधिर उत्कटतेचा जय झाला, आणि आम्ही ॲथेन्सची गाडी पकडली ... प्रसन्नप्रभ हेलास मधून गाडी धडाडत होती ... क्षणात हिमाच्छादित ऑलिंपस नजरेसमोरून तरळून गेला, तर दुसऱ्या क्षणी ऑलिव्हच्या रायांनी वळसेवेलांच्या वेत, वृक्ष–किन्नरी नि पऱ्यांच्या प्रमाणे नाचत नाचत आमच्या भोवती जणू फेर धरला ... आमच्या आनंदाला पारावारच उरला नाही ... कधी कधी भावनेचं असं तुफान उसळायचं, की आसूभरल्या डोळ्यांनी एकमेकांना मिठ्या मारूनच केवळ त्या भावनेला वाट मिळू शकायची ... अधल्यामधल्या छोट्या स्टेशनावरचे निर्विकार—स्थितप्रज्ञ खेडूत शेतकरी आमच्याकडे

आश्चर्यानं पहातच राहायचे ... आम्ही ‘ प्यायलेले ’ तरी असू, नाहीतर वेडपट तरी, असं त्यांना वाटत असावं !... पण खरं सांगायचं तर आम्हाला बाधा झाली होती, ती ‘ ॲथेना ’च्या निळयाशार डोळ्यांची ! ... त्यात प्रतिबिंबित झालेल्या सर्वोच्च नि स्वयंप्रकाशी प्रज्ञानाचा मागोवा घेताना जाणवणाऱ्या आनंदाची ... !

त्या दिवशी संध्येच्या साक्षीनं आम्ही जांभळया व्हायोलेट फुलांचा मुकुट धारण केलेल्या ॲथेन्सला पोहोचलो ... आणि दुसऱ्या दिवशी तांबडं फुटताना उषेनं आम्हाला देवळाच्या पायऱ्या चढताना पाहिलं ... ! साऱ्या गात्रांतून कंप होता एकप्रकारचा, नि भक्तीच्या उमाळ्यानं काळजाचे ठोके मंदावले होते ... वर वर चढायला लागलो, तसंतसं, त्यावेळेपर्यन्तचं जगलेलं ओळखीचं आयुष्य, एकादा विविधरंगी परिवेष अंगावरून ओघळून पडावा, तसं ढळायला लागल्यासारखं वाटलं...वाटलं की, यापूर्वी मी कधी जन्माला आलेच नव्हते ... मी जन्म पावले आहे, ती या क्षणी—एका दीर्घ श्वासोच्छ्वासाच्या या क्षणी ... त्या निखळ सौंदर्यावर माझी दृष्टी पडली नि खिळली, त्या या प्रथम क्षणी !

‘ पेंटेलिकस ’ पर्वताच्यामागून सूर्य उगवत होता...आणि त्या प्रकाशात, त्याचा तो अद्भुत आखीवरेखीव स्पष्टपणा, नि त्याच्या संगमरवरी कडांचं लख-लखतं वैभव उठून दिसत होतं...‘ प्रॉपीलिया ’ची शेवटची पायरी आम्ही चढलो, आणि सकाळच्या प्रकाशात चमकणाऱ्या त्या मंदिराकडे एकटक बघतच राहिलो... एकमेळानं अन् एकाच जाणिवेनं सारे स्तब्ध झाले...मूक झाले...एकमेकांपासून किंचित् दूर सरकले...कारण...कारण हे सौन्दर्य ‘ सत्यशिवां ’च्या पातळीवरचं... शब्दमायेच्या पार पलीकडचं...फार फार पवित्र होतं !...त्यानं कशी कोण जाणे अंतःकरणात एका अनामिक भयाची लाट फुटली...आता इथे कसले उद्गार—चीत्कार नाहीत, की आलिंगनं नाहीत...ज्यानं त्यानं मानसपूजेसाठी आपला कोण साधला...आणि एक प्रकारच्या समाधिस्थ अवस्थेत तासचेतास आम्ही आनंद-मग्न होऊन राहिलो...नंतर एक तऱ्हेची ग्लानीच आली...मनही हादरल्यासारखं, हिंदकळल्यासारखं होऊन गेलं...!

आता आम्ही सर्व पुन्हा एकत्र होतो...माझी आई आणि तिची आम्ही चार मुलं...मोठ्या समाधानानं आम्ही म्हटलं,—हे डंकन वर्तुळ आत्मसंतुष्ट आहे... संपूर्ण आहे...बाहेरच्या लोकांच्या सहवासाचा या आमच्या वर्तुळाला जेव्हाजेव्हा छेद गेला, तेव्हातेव्हा आम्ही आमच्या ध्येयापासून विचलित झालो होतो...आता पार्थेनॉन दृष्टिखालून घातल्यावर तर वाटलं की पूर्णतेचं शिखरच आपण गाठलं... ॲथेन्स सोडून इतरत्र कधी कुठे जायची आपल्याला गरजच काय, असा प्रश्न-सुद्धा आम्ही स्वतःला विचारला...! सौन्दर्यानुभवाची आमची तहान शमवणारं

सारं काही तर आम्हाला इथेच सापडलं होतं!! बुडापेस्टचं ते प्रेमप्रकरण आणि पुढे पदरी पडलेलं यशाचं एवढं मोठं माप — या सगळ्याचा माझ्या संदर्भात नीट विचार केला, तर मला त्या दोन्हीकडे परतायची इच्छाच कशी झाली नाही त्यावेळी, याचं एखाद्याला आश्चर्यच वाटेल...पण खरी वस्तुस्थिती अशी होती, की या श्रद्धास्थानाच्या यात्रेला, वारीला मी निघाले, ती ना पैशाखातर, ना प्रसिद्धीखातर...ही यात्रा होती एका आत्मिक कारणासाठी केवळ! माझ्या आत्म्याला ओढ लागली होती त्या अदृश्य ॲथेना देवतेची...पार्थेनॉनच्या अवशेषातून आज देखील जिचा संचार चालू आहे म्हणतात, त्या ॲथेनाची! मग ॲथेन्समध्येच अक्षय्य रहावं, आणि आपल्या व्यक्तिमत्त्वाला साजेलसं एक देवालय तिथे बांधावं, ही डंकन कुटुंबाची धारणा साहजिकच नव्हे का अगदी?

बर्लिनच्या माझ्या कार्यक्रमांतून बँकेत जमा झालेला पैसा म्हणजे मला अगदी कधी न संपणारी पुंजी आहे, असंच वाटत होतं; तेव्हा आमच्या त्या देवालयासाठी योग्य अशा जागेच्या शोधाला आम्ही लागलो...आमच्यापैकी एकच माणूस पूर्णपणे सुखी, तृप्त असं दिसत नव्हतं...ऑगस्टिन! तो आपला आतल्या आत कितीतरी दिवस झुरत राहायचा ...शेवटी एक दिवस त्यानं सरळ कबूलच केलं, की त्याच्या बायकोमुलांशिवाय त्याला फारच एकटं वाटत होतं... खरं म्हणजे हे असं काही वाटणं — म्हणजे मनाचा अगदी दुबळेपणा होता... पण आम्ही विचार केला की त्याचं लग्न झालं होतं...त्याला मूल होतं...तेव्हा त्याच्या कुटुंबालाही इथे घेऊन येण्याशिवाय दुसरी गतीच नव्हती...दिली मग साऱ्यांनी त्याला परवानगी तशी!

त्याच्या लहान मुलीसह त्याची बायको येऊन पोहोचली. तिचा पोशाख अगदी अद्ययावत् होता, अगदी 'पंधरावा-लुई-छाप पादत्राणांच्या टाचा' वगैरे सकट... तिच्या त्या उंच टाचांकडे आम्ही 'आ' वासून पहायलाच लागलो; कारण इकडे तर आम्ही बिनटाचांचे बंदांचे सॅन्डल्स् वापरायला सुरुवात केली होती... पार्थेनॉनच्या शुभ्र संगमरवरी भूमीला थोडी देखील इजा पोहोचू नये म्हणून!— पण तिनं सॅन्डल्स् वापरायला मुळीं सडकून विरोध केला...आमच्यापुरतं बोलायचं तर आम्हाला, मी घालायची तसले 'दीरेक्त्वार' (पॅरिसमधील सरकारी मंडळीं ज्या ग्रीकरोमन फॅशन्स प्रचारात आणत, त्या पद्धतीचे) पोशाख, आणि रेमंडचे 'निकरबॉकर्स' (सुरवारी सारखी पटलूण) उडते टाय, उघडे गळे, वगैरे कपडेसुद्धा अगदी कमअस्सल प्रतीचे वाटत होते...आणि आम्ही मनात पुरातन ग्रीक पद्धतीच्या 'ट्यूनिक्' (सैल कुडतं) चं पुनरुज्जीवन करायचं ठरवत होतो... ठरल्याप्रमाणं हा बेत आम्ही अंमलातसुद्धा आणला...प्रत्यक्ष ग्रीसमधला आधुनिक समाज तर आश्चर्यचकितच झाला ते पाहून...!

'स्यूनिक्', 'क्लासिस्' आणि 'पेप्लम'चा सारा सरंजाम चढवून आणि केसाभोवती ग्रीक पद्धतीची गोल पट्टी अडकवून आम्ही आमच्या मंदिराच्यासाठी जागा शोधायला बाहेर पडलो – 'कोलोनस,' धुंडाळलं, 'फालेरॉन' धुंडाळलं, आणि 'ॲटिकाची' सारी दऱ्याखोरी पालथी घातली – कुठेही आमच्या मंदिराच्या कल्पनेच्या योग्यतेची जागा सापडली नाही! शेवटी एक दिवस – तो प्रसिद्ध मध जिथून येतो, – त्या मधाच्या पोळ्यांच्या दिशेनं – 'हिमेटस'च्या रोखानं फिरायला निघालेलो असताना, मध्येच डोकं वर करणारा एक उंचवटा लागला...तो पार करून आम्ही पुढे जातो, तो रेमंडनं आपली काठी खाली जमिनीवर टेवली, अन् उद्गारला,

"पहा, पहा – आपण 'ॲक्रोपोलिस'च्या उंचीवर आहोत बरोबर या ठिकाणी!" आणि खरंच, पश्चिमेकडे बघतो तर ॲथेनाचं मंदिर...आश्चर्य वाटावं, इतकं जवळ दिसणारं...तसं म्हटलं तर प्रत्यक्षात त्यापासून आम्ही चांगले चार किलोमीटर्स दूर अंतरावर होतो.

... मात्र या जागेबाबत बऱ्याच अडचणी होत्या ... पहिली गोष्ट म्हणजे या जमिनीची मालकी कुणाकडे होती, याचाच कुणाला पत्ता नव्हता! शिवाय ॲथेन्सपासून हे ठिकाण चांगलंच दूर होतं ... मेंढपाळ आणि त्यांचे शेळ्यामेंढ्यांचे कळप यांचीच तेवढी इथे रहदारी होती ... या जमिनीची मालकी पाच शेतकरी कुटुंबांच्याकडे तहहयात शंभर वर्षे तरी चालत आली होती...एवढी माहिती कळायला देखील कितीतरी दिवस लागले. एखादा केकसारखा पदार्थ मध्ये कापायला सुरुवात करून तसेच खालपर्यंत त्याचे वेगवेगळे काप केले, तर ते जसे दिसतील, तशी या जमिनीची विभागणी केलेली होती ... बऱ्याच शोधानंतर या पाच कुटुंबातल्या कर्त्यासवरत्यांना भेटून जमीन विकण्याच्या इच्छेबाबत चौकशी केली ... यापूर्वी त्यांपैकी कुणा एकालाही त्या जमिनीबाबत उत्सुकता किंवा आपलेपणा वाटलेला नसल्यानं, त्यांचं त्यांनाच भारी आश्चर्य वाटलं आमचा बेत ऐकून.. तशी ती जागा ॲथेन्सपासून दूर होती, खडकाळ होती, एवढंच नव्हे तर काटेरी 'थिसल' झुडपां-शिवाय तिथे काही देखील उगवत नसे ... शिवाय या टेकडीच्या आसपास कुठे पाणीही नव्हतं.! त्यामुळे आजवर या जमिनीला कुणाच्याही लेखी काही किंमत नव्हती ... पण आमची, ती जमीन विकत घ्यायची इच्छा आम्ही त्यांच्या काना-वर घातली मात्र ... सर्व मालक एकत्र जमले, अन् त्यांनी त्या बैठकीत मुळी ठरवूनच टाकलं, की त्यांची जमीन अगदी किंमत करण्यापलीकडची आहे!! त्यांनी मागितलेली रक्कम कमाल प्रमाणाबाहेर होती!...पण डंकन परिवार तीच जमीन खरेदी करण्याच्या आपल्या निश्चयापासून मुळीच ढळणार नव्हता ... तेव्हा त्याच तऱ्हेनं बोलणी करायला सुरुवात झाली ... त्या पाचही कुटुंबातल्या मंडळींना

एका मोठ्या मेजवानीला बोलावलं...मेजवानी म्हणजे काय ? सळईवर भाजलेले चवदार मेंढे आणि कितीतरी तोंडाला पाणी आणणारे चवीढवीचे जिन्नस...! 'राकी' (म्हणजे देशी 'कोन्याक्' म्हणायला हरकत नाही) मद्यही भरपूर प्रमाणात ठेवलं होतं...त्याचवेळी एका किरकोळ बांध्याच्या ॲथेन्सच्या वकिलांच्या मदतीनं आम्ही ते खरेदीखतही तयार केलं...आणि ते शेतकरी सारेच अंगठे-बहादर असल्यानं त्यांचे शिक्के घेतले त्यावर...खरं म्हणजे आम्हाला ती जमीन चांगलीच महागात पडली होती...तरी पण तो मेजवानीचा रचलेला थाट सगळा फारच यशस्वी ठरला, असंच आम्ही धरलं !...आणि ॲक्रोपोलिसला समान्तर असलेली, प्राचीन काळापासून 'कोपानोस' या नावानं ओळखली जाणारी ती टेकडी आता डंकन कुटुंबाच्या मालकीची झाली ! !

पुढली पायरी होती इमारतीचे आराखडे ज्याच्यावर काढतात, ते कागद आणि ज्यांनी काढतात, ती वास्तुशिल्पाची साधनं आणवून, घराचा आराखडा तयार करण्याची. रेमंडनं 'ॲगामेम्नॉन'च्या राजवाड्याच्या वास्तुरचनेतून आम्हाला हवा होता तसा तंतोतंत नमुना शोधून काढला. आर्किटेक्ट किंवा इंजिनियर नेमण्याची कल्पना रेमंडनं धुडकावून लावली; अन् गवंडी आणि दगड वाहून आणणारे मजूर वगैरे कामाला लावण्याची सारी जबाबदारी देखील स्वतःच्याच अंगावर घेतली...आम्हाला मनोमन वाटत होतं, की आमच्या या मंदिराला योग्य असा दगड केवळ पेन्टेलिकस पर्वताच्या कुशीलाच होता !...त्याच्याच त्या संगमरवरी कुशीच्या चमकदार रंगाची जादू पार्थेनॉनच्या राजस स्तंभावर देखील खुलते आहे ! तरी पण पेन्टेलिकसच्या पायथ्याशीच सापडणाऱ्या लाल पाषाणा-वरच आम्ही समाधान मानायचं ठरवलं ! तेव्हापासून दररोज लाल दगड वाहून नेणाऱ्या बैलगाड्यांची एक लांबच लांब रांग, – पेन्टेलिकस ते कोपानोस – हा त्रासदायक वेडावाकडा रस्ता पार करताना दिसायची...एक एक गाडी येऊन आपलं लाल दगडाचं ओझं आमच्या जमिनीवर टाकून जायची, तसतशी आमच्या आनंदाला भरती येत होती...

शेवटी आमच्या मंदिराची कोनशिला बसवण्याचा तो महत्त्वाचा दिवस समोर येऊन ठेपला...मनात आलं, की असला हा मोठा प्रसंग त्याला साजेशाच समारंभानं नीट साजरा झाला पाहिजे;...आमच्यापैकी कुणाचीही वृत्ती फार धार्मिकतेकडे झुकलेली–'चर्च'वगैरे मानणारी–नव्हती...आधुनिक विज्ञान आणि विचारस्वातंत्र्य यांच्या वातावरणात वाढल्यानं, तसं म्हटलं तर आमच्यापैकी प्रत्येकजण मुक्तात्माच होता खऱ्या अर्थानं !...तरीपण कोनशिला बसवण्याचा हा समारंभ मात्र ग्रीक धर्मगुरूच्या हातून रूढाचारानुसारच घडवून आणणं जास्त साजेसं नि सुन्दर दिसेल असं साऱ्यांना वाटलं...तेव्हा तसंच करायचं ठरलं

सारं... अन् मग आजूबाजूच्या मैलोगणती टापूतल्या साऱ्या शेतकऱ्यांना या उत्सवात भाग घेण्यासाठी आम्ही बोलावणं केलं.

तो म्हातारा धर्मगुरू येऊन पोहोचला...काळा ढीला डगला...खूप घोळदारसा... आणि भल्या मोठ्या काळ्या हॅटच्या रुंद माथ्यावरून उडणारा ओढणीवजा पालव...आल्यावर त्यानं एका काळ्या कोंबड्याची मागणी केली...बळी देण्यासाठी...अपोलोच्या मंदिराच्या काळातल्यापासून 'बिझँटाईन' धर्मगुरूंच्या मार्फत पूर्वापार चालत आलेला विधी, तो हाच...! तेव्हा कसा तरी एकदाचा एक काळा कोंबडा शोधून काढून, बळीला मारायच्या सुऱ्यासकट त्या धर्मगुरूला अर्पण करून टाकला! दरम्यान शेतकऱ्यांचे थवेच्या थवे खेड्यापाड्यांच्या कानाकोपऱ्यातून गोळा झाले होते तिथे...अॅथेन्सची काही फॅशनेबल मंडळीही त्या भरीला येऊन ठेपली होती...सूर्यास्ताच्या सुमाराला कोपानोसवर ही गर्दी जमली!

...सर्वांवर अगदी छाप पडेल अशा गंभीरपणानं त्या वयस्क धर्मगुरूंनी विधी सुरू केले...इमारतीच्या पायाच्या आराखड्याची बाहेरची संबंध रेषा अगदी जशीच्या तशी दाखवायला त्यानं आम्हाला सांगितलं...मग आम्ही काय करावं...? रेमंडनं आधीच त्या जागेवर आखलेल्या एका रेखाकृतीच्या चौकोनी आधारानं नाचत नाचतच आम्ही धर्मगुरूंना साऱ्या सीमा दाखवल्या!...मग आराखड्याप्रमाणे घराच्या सर्वात जवळची कोनशिला धर्मगुरूंनी निवडली, अन् संधिकाळचं ते लाल सूर्यबिंब मावळण्याचा मुहूर्त साधून त्या काळ्या कोंबड्याची मान धडावेगळी केली...त्याच्या उसळत्या लालगडद रक्ताच्या धारेचा कोनशिलेला जणू अभिषेकच घडला! एका हातात सुरा आणि दुसऱ्या हातात मारलेल्या कोंबड्याचं धड घेऊन गुरुजींनी मग त्या पायाच्या चौकोनाच्या तीन प्रदक्षिणा केल्या...आणि नंतर प्रार्थना, मंत्रोच्चार वगैरेला सुरूवात झाली; त्या पाठोपाठ घराच्या बांधणीसाठी आणलेल्या सर्व दगडांवर आशिर्वचनाचं कवच टाकून, त्यांनी आमच्या सर्वांची नावं विचारून घेतली, आणि एका प्रार्थनेला आरंभ केला...इझाडोरा डंकन (माझी आई), ऑगस्टिन, रेमंड, एलिझबेथ आणि छोटी इझाडोरा (मी) अशी सारी नावं पुन्हा पुन्हा त्या प्रार्थनेतून आमच्या कानावर पडत होती. दरवेळी 'डंकन' या आमच्या आडनावाचा उच्चार गुरूजी 'ठंकन' असा करायचे-'ड' च्या जागी कर्कश 'ठ' वापरून! त्यातच अनेकदा, त्या घरात धार्मिकपणे आणि समाधानानं जीवनव्यवहार करण्याबद्दलचं आग्रहाचं आवाहन त्यांनी केलं आम्हांला...प्रार्थना वगैरे सर्व विधी आटपल्यानंतर आपापली प्राचीन काळापासून चालत आलेली जुनी वाद्यं घेऊन गायकवादक हजर झाले...'राकी' मद्याची पिंपंच्या पिंपं उघडली गेली...अन् मधोमध उघड्या टेकडीवर एक होळी कडाडत पेटली...अशा तऱ्हेनं आमच्या

त्या शेजारीपाजारी नि खेडूत मित्रांबरोबर मद्य पिण्यात अन् नाचण्यात सारी रात्र मौजमजेत गेली...

ग्रीसमध्येच कायम राहायचा आम्ही निश्चय केला... अन् एवढंच नाही, तर हॅम्लेटच्या चालीवर आम्हीही शपथा घेतल्या की—इतःपर या कुटुंबात एकही लग्न होणार नाही...ज्यांची लग्नं आधीच झाली आहेत...ते राहू देत तेवढे विवाहित ... वगैरे वगैरे...

ऑगस्टिनच्या बायकोला आम्ही आमच्या कळपात घेतलं खरं, पण ते हातचं राखूनच ... आमची नापसंती फारशी न लपवता ! आमच्याआमच्यात मात्र कोपानोसवरच्या जीवनक्रमाची एक नीट आखणी करून आम्ही एका वहीत लिहून काढली होती ... डंकन कुटुंबाशिवाय कुणाचाही समावेश यात व्हायचा नव्हता ... प्लेटोच्या ' रिपब्लिक ' मधल्या कल्पनेच्या धर्तीवर जवळजवळ हा आमचा बेत आधारलेला होता...सकाळीं सूर्योदयाबरोबरच उठायचं ... उगवत्या सूर्याचं, आनंदाची गाणी म्हणून आणि नाचून स्वागत करायचं ... नंतर एक छोटा वाडगाभरून मेंढीचं दूध पिऊन ताजतवानं व्हायचं आणि उरलेली सारी सकाळ तिथल्या लोकांना नाचायला नि गायला शिकवण्यात घालवायची ... त्यांना त्यांची भयानक, आधुनिक कपडे वापरायची सवय बदलायला लावून, ग्रीक देवांच्या उपासनेला लावायचं ... सकाळचे हे कार्यक्रम झाल्यावर हलकंफुलकं ताज्या हिरव्या भाज्यांचं दुपारचं जेवण ( मांसमच्छर खायचं सोडून देऊन पूर्ण शाका-हारी व्हायचं आम्ही ठरवलं होतं–) झालं, की सारी दुपार चिंतनात, ध्यान-धारणेत घालवायची; आणि संध्याकाळ प्राचीन विधिविधानात आणि त्याला साजेशा संगीताच्या आस्वादात घालवायची !

...एवढ्यात कोपानोसचं बांधकाम सुरू झालं ... ॲगामेम्नॉन राजवाड्याच्या भिंती चांगल्या दोन फूट रुंदीच्या होत्या, म्हणून आमच्या कोपानोसच्या पण तेवढ्याच रुंद असायला हव्या होत्या ! त्या भिंतींचं बांधकाम सुरू होऊन बरंच वर आलं, तेव्हा कुठे पेंटेलिकसचा लाल दगड एकंदर किती मोठ्या प्रमाणात लागणार आहे, आणि दगड वाहणाऱ्या बैलगाडीच्या एकेका खेपेचा खर्च किती येणार आहे, याची कल्पना अस्मादिकांना आली ! काही दिवसांनी आम्ही त्या जागेवरच छावणी टाकून रात्री राहायचं ठरवलं ... आणि तेव्हा एकाएकी आमची डोकी मोठ्या परिणामकारक रीतीनं ताळ्यावर आली ! कारण आजू-बाजूच्या मैलोगणती परिसरात टिपूसभर सुद्धा पाणी नव्हतं ... हिमेटस पर्वताकडे पाहिलं, ( याच हिमेटसच्या ठायी ती मधाची पोळी होती )—तर तिथे तेवढ्या उंचीवर अगदी नाकासमोरच कितीतरी झरे आणि वाहते ओढे दिसायचे ... बरं; पेंटेलिकसकडे दृष्टि टाकावी, तर तिथल्या बारमाही हिमराशींमुळे किती प्रवाह नि

प्रपात पर्वताच्या कुशीवर कोसळताना आढळायचे... अन् आमचा कोपानोस... अरेरे! फार उशिरा शहाणपण आलं आम्हाला एवढीशी गोष्ट समजायचं... की आमचा कोपानोस कमालीचा रूक्ष नि वैराण होता ... त्यातल्या त्यात जवळचा झरा सुद्धा इथून एक ना दोन ... चार किलोमीटर अंतरावर!!

पण रेमंडनं कच न खाता आणखी जास्त कामगार लावले आणि एक 'आर्टेशियन' (नलिका) विहीर खणायच्या कामाला त्यांना लावलं ... ते खोद-काम चालू असताना वेगवेगळे जुने अवशेष, प्रतिकं वगैरे हाताला लागत होती ...ती पाहिल्यावर रेमंडनं शोध लावला की, एक प्राचीन काळचं खेडं या टेकडीच्या उंचीवर वसलेलं असावं ... पण माझं मत विचाराल, तर काही कारणां-मुळे मला तिथे फक्त एक स्मशान असावं, असंच वाटत होतं! कारण विहिरीची नळी जो जो खोल रुतवावी, तो तो जमीन कोरडी कोरडीच होत होती...! शेवटी कितीतरी आठवडे कोपानोसवर पाण्याच्या शोधात वाया घालवल्यावर आम्ही ॲथेन्सला परतलो; ॲक्रोपोलिसच्या परिसरात द्रष्ट्या आत्म्यांचा वावर होता, अशी आमची श्रद्धा होती; तेव्हा त्यांचाच सल्ला घ्यायला आम्ही अथेन्सला आलो होतो! आम्ही शहरातून एक विशेष परवाना काढला—चांदण्यानं उजळलेल्या उत्तर संध्याकाळी तिथे ॲक्रोपोलिसवर जाता यावं म्हणून ... मग डायनिससच्या भव्य रंगमंदिरात जाऊन बसायचा आमचा नित्यनेमच झाला. ऑगस्टिन तिथे ग्रीक शोकांतिकांच्यामधले परिच्छेदच्या परिच्छेद पाठ म्हणून दाखवायचा, आणि कितीदा तर आम्ही सारे नाचायलाही लागत असू!

आमचं कुटुंब पूर्णपणे आत्मरत होतं... ॲथेन्सच्या रहिवाशांच्यामध्ये आम्ही जरासुद्धा मिसळलो नाही ... एवढंच काय प्रत्यक्ष ग्रीसच्या राजेसाहेबांनी आमचं मंदिर पहायला मुद्दाम कोपानोसपर्यन्त घोडदौड मारली, असं एक दिवस आमच्या कानावर आलं; तरी आम्हाला त्या गोष्टीचं काही अप्रूप वाटलं नाही! कारण आम्ही मुळी मनानं दुसऱ्याच राजांच्या राजवटीत जगत होतो ... 'ॲगा-मेम्नॉन, मेनेलॉस ... प्रियाम!'

# १२

एका चांदण्या रात्री आम्ही नेहमीप्रमाणे डायनिससच्या रंगमंदिरात बसलो असताना एका अल्पवयीन मुलाची उंच नि काहीशी कर्कश आवाजातली बांग, रात्र कापत जाताना कानावर आली...त्या आवाजातली ती कारुण्याची अपार्थिव झाक ! अशी झाक लहान मुलाच्याच आवाजात उमटू शकते !...एवढ्यात तशीच एक आरोळी उठून त्यात मिसळली...आणि मग आणखी एक...! दुसरं काही नाही...त्यांच्या देशाची जुनी ग्रीक गाणी काही मुलं गात होती...मात्र आम्ही मंत्रमुग्ध झाल्यासारखे बसून राहिलो...रेमंड मग म्हणतो..." जुन्या ग्रीक कोरसमधल्या किशोरांचे आवाज नक्की हे असेच असणार ! "

दुसऱ्या दिवशीही पुन्हा ती मैफल झडली, आणि आम्ही ड्राक्मा नाण्यांची सढळ हातानं खैरात केल्यानं तिसऱ्या दिवशी तर त्या 'कोरस'ची संख्याही वाढली...अन् हळूहळू अ‍ॅथेन्समधली सारीच मुलं चांदण्यारात्री संकेतस्थळी जावं तशी तिथे एकत्र जमून डायनिससच्या रंगमंदिरात आमच्यासाठी गाणी म्हणायला लागली...

ग्रीक चर्चमधल्या बीझँटाईन संगीतामध्ये आम्हाला या सुमाराला खूपच रस वाटत होता. तिथे 'मेत्र'चं करुणसुंदर ईशस्तवन ऐकायला आम्ही मुद्दाम गेलो. अ‍ॅथेन्स शहरालगतच्या तरुण ग्रीक धर्मगुरूंच्या मठालाही आम्ही भेट दिली होती. मध्ययुगाच्या आधीच्या काळावर दावा सांगणाऱ्या जुन्या हस्तलिखितांचा संग्रह असलेलं त्यांचं ग्रंथालय त्यांनी तिथे आम्हाला दाखवलं होतं...अपोलो, अ‍ॅफ्रडायटी, आदीकरून सर्व जुन्या देवमूर्तींची सूक्तं थोड्या फार कालसंगत बदलानंतर हलकेच ग्रीक चर्चमधल्या भक्तिसंगीतात शिरून एकजीव होऊन राहिली होती, असं

आमचं मत होतं...अन् 'हेलास'चे इतरही प्रथितयश अभ्यासक आमच्याशी या बाबतीत सहमत होते.

...नेहमीप्रमाणे मग डोक्यात एक कल्पना उगवली...त्या ग्रीक मुलांना घेऊन पुन्हा एकदा मूळ ग्रीक कोरसची निर्मिती करायची...! त्यासाठी डायनिमस रंगमंदिरात आम्ही दररोज स्पर्धा लावायला लागलो –सर्वांत जुन्यात जुनी गाणी म्हणणाऱ्यांना बक्षिसंसुद्धा दिली ! शिवाय बिझेंटाईन संगीताचा एक प्राध्यापकही आम्ही हाताशी धरला; अशा तऱ्हेनं पुऱ्या ॲथेन्समधले सर्वोत्कृष्ट आवाजाचे दहा किशोर निवडून त्यांचा एक कोरस आम्ही तयार केला – हा धर्मगुरूंच्या मठातला तरुण प्राध्यापक ग्रीक भाषेचाही अभ्यासक होता. त्यामुळे त्यानं 'ईस्किलस'च्या 'द सप्लायन्ट्स'ला तो कोरस रचण्यात आम्हाला मदत केली. हे सारे कोरस (समूहनृत्यगान) आजवर रचल्या–लिहिल्या गेलेल्या सर्वांपेक्षा बहुधा अत्यंत सुरस ठरतील...त्यातलं एक मला विशेषकरून नीट आठवतं; 'समुद्रापलीकडून येऊन पाठलाग करणाऱ्या तथाकथित भावांच्या ओंगळ वासनेपासून संरक्षण मिळावं, म्हणून झेऊसच्या पूजापीठाच्या तिथे गोळा झालेल्या भयभीत' मुग्धा, असा त्याचा विषय होता.

...ॲक्रोपोलिसचा अभ्यास, कोपानोसचं बांधकाम आणि ईस्किलसच्या समूह-गीतांच्या साथीवर नाचणं – या साऱ्या कार्यक्रमांत आम्ही अगदी पूर्णपणे दंग होऊन गेलो होतो – आसपासच्या खेड्यांतून कधी काही निमित्तानं सहल काढून फिरून येण्याव्यतिरिक्त, काहीही इच्छा उरली नव्हती...

'एल्युसिस'च्या रहस्यांचा आमच्यावर बराच प्रभाव पडला होता.

"जिव्हेला उच्चारता न येण्याजोगी ती रहस्यं! ज्याच्या दृष्टीला ती पडली, तो देवाचा कुणी लाडकाच म्हणायचा, त्या भाग्यवंताचं मरणोत्तर घटित इतर सर्वसाधारण माणसासारखं थोडंच असणार!"

...ॲथेन्सपासून साडेतेरा मैलांवर असलेल्या एल्युसिसला भेट द्यायचं आम्ही ठरवलं. उघडे पाय नि पावलं, पट्ट्याच्या सपाता...अशा वेषात नाचत नाचत आम्ही निघालो. रस्ता समुद्रावरच्या प्लेटोच्या प्राचीन रायांच्या भोवती वळणावळणानं गेलेला, नि धुळकट पांढरा होता. आमच्या मनात देवांना संतुष्ट करायचं होतं, अन् चालण्याऐवजी नाचणं हा त्याच भावनेचा आविष्कार होता! 'डॅफ्निस' खेडं आणि 'हागिया त्रियास'चं प्रार्थनामंदिर आम्हाला वाटेत लागलं. टेकड्यांच्या मधल्या उघडमिटीच्या दरम्यान एकदा समुद्रदर्शन झालं आणि 'सालामिस' बेटही दिसलं...याच सालामिसच्या प्रसिद्ध लढाईत ग्रीक लोकांनी 'झरक्सिस'च्या आधिपत्याखाली लढणाऱ्या पर्शियन सैन्याचा पुरा संहार केला होता...आम्ही किंचित् थांबलो...काळाचं बंधन तोडून इतिहासात बुडी

मारगाऱ्या मनापुढे ती लढाई साऱ्या पार्श्वभूमीसकट साकार होत होती... क्षणभराचा अवधी हवाच होता. ‘एगालेऑस’ पर्वताच्या समोरच्या एका टेकडीवर चांदीनं मढवलेल्या पायांच्या आपल्या खुर्चीत बसून म्हणे झरक्सिस लढाईचं निरीक्षण करत होता! इ. स. पू. चारशेऐंशीतली गोष्ट — आपल्या तीनशे लढाऊ जहाजांच्या आरमारानिशी ग्रीकांनी पर्शियन लोकांची धूळधाण करून आपलं गेलेलं स्वातंत्र्य परत मिळवलं. खरं म्हणजे ग्रीकांना आधीच थोपवून त्यांच्या आरमाराचा संपूर्ण बीमोड करून त्यांना किनाऱ्याला आणण्यासाठी एका छोट्याशा बेटावर सहाशे निवडक लढवय्यांचे मोर्चे लागले होते;...पण त्याच वेळेला ‘ॲरिसटायडीझ’ला त्याची हद्दपारी रद्द करून परत बोलावलेलं होतं — ग्रीक आरमार नष्ट करण्याचा झरक्सिसचा बेत त्याच्या कानावर गेल्याबरोबर त्यानं पर्शियनांचा डाव त्यांच्यावरच उलटवला!

‘एका ग्रीक जहाजाने आक्रमणाचे संचलन केले; आणि फिनिशियन जहाजाच्या पुढल्या टोकावरून समोरच्या दर्शनाकृतीवर हल्ला केला ... आता प्रत्येक जहाज आपल्या प्रतिद्वन्दीशी निकराने भिडले ... पकडीला पकड अडकली. प्रथम पर्शियन आरमाराची मुख्य फळी या अवचित क्रूर धक्क्यानेही डगमगली नाही ... परंतु हळुहळू, त्या अरुंद खाडीत, त्यांची अचाट संख्याच त्यांना मारक ठरली; कारण एकमेकांशीच झाली त्यांची खचाखच. आपल्या सामर्थ्याचा शत्रूविरुद्ध उपयोग करणे त्यांना अशक्य झाले, तेव्हा त्यांच्या त्या तांब्याच्या चोची एकमेकांचेच चावे घेऊ लागल्या ... आपलीच वल्ही त्यांनी तोडून मोडून टाकली. दरम्यान ग्रीकांचे घावामागून कुशल घाव अंगावर बसतच होते... अगदी अखेरीस आमची जहाजे उलटून त्यांच्या मुख्य शिवणी वर तरंगू लागल्या; असंख्य जहाजांच्या नि प्रेतांच्या आवरणाने निळा समुद्रही दिसेनासा होईपर्यंत हे संहारसत्र चालू होते ...’

...तो सारा रस्ता आम्ही प्रत्येक पावलाला नाचतच पार केला ... एका छोट्या ख्रिश्चन चर्चजवळ मात्र आम्ही थांबलो—तिथला एक धर्मगुरु दूरूनच आम्हाला न्याहाळत होता ... आणि आम्ही पुढे पुढे येत होतो, तसतशी त्याच्या आश्चर्यात भर पडत होती. त्याच्या चर्चला भेट द्यायचा अन् त्याच्या कडचं मद्य पिण्याचा त्यानं आम्हाला आग्रहच केला ... एल्युसिसमध्ये मात्र आम्ही दोन दिवस राहिलो—तिथल्या गूढ रहस्यांचं आकलन करून घेण्यासाठी! तिसऱ्या दिवशी आम्ही ॲथेन्सला परतलो खरे—पण एकटे नाही ... ईस्किलस युरिपिडिझ, सोफोक्लिझ आणि ॲरिस्टॉफेनेझ या दीक्षित द्रष्ट्यांच्या अशरीरिणी सोबतीनं ... !

भटकंतीला आणखी पुढे जाण्याची आमची इच्छा नव्हती...आमच्या मक्केलाच

जणु काही आम्ही पोहोचलो होतो. पूर्णावस्थेची तेजःप्रभा जिथे अविरत प्रकाशते, ते हेलास ... हेलासच आमची मक्का होती! ... पण त्यानंतर मात्र त्या प्रज्ञ अँथेन्सबद्दल वाटलेल्या पहिल्या निखळ कौतुकादरापासून मनानं मी जरा दूर गेले आहे. ... आणि अलीकडच्या शेवटच्या खेपेला मी अँथेन्सला गेले, तेव्हा तर तिच्या त्या पंथाचं मला काहीच आकर्षण वाटलं नाही, हे कबूल करायलाच हवं, उलट 'डॅफनीस'च्या छोट्या मंदिरातल्या ख्रिस्ताच्या व्यथित चेहऱ्यानंच माझं चित्त खेचून घेतलं ... ते काही असो ... त्यावेळी, आयुष्याच्या प्रभातकाळी, – अँक्रोपोलिस म्हणजे आमच्या लेखी एक आनंदाचं नि स्फूर्तीचं निधानच होतं, यात शंकाच नाही. ... शरीरात पूर्ण जोम, जोष, अन् वय आग्रही, उर्मट...'दया,' 'कणव,' यांचा अर्थ त्यावेळीं उमजला असता, तरच नवल!

दररोज पहाटे आम्ही प्रॉपिलॉन चढताना दिवस असू. त्या पवित्र टेकडीचा पुरा परंपरागत इतिहास त्याच्या टप्प्याटप्प्यानिशी आम्हाला माहीत झाला. बरोबर पुस्तकं घेऊन यायची, नि त्यांच्या मदतीनं प्रत्येक दगडाच्या, प्रत्येक शिळेच्या इतिहासाचा मागोवा घ्यायचा ... काही खुणांच्या आणि चिन्हांच्या अर्थाबद्दलची तर एकजात साऱ्या पुरातत्वज्ञांची मतमतान्तरं आम्ही पडताळून, अभ्यासून पाहिली.

रेमंडनं तर स्वतःच्याच हिंमतीवर काही अभिनव शोध लावले होते – अँक्रॉपोलिस बांधलं जायच्या आधी, खालून दगडाखडकांतून वर चढून, तिथल्या टेकडीवर चरायला येणाऱ्या बोकडांच्या खुरांचे ठसे न्याहाळत, शोधत त्यानं एलिझ्‌बेथसह अँक्रोपोलिसवर थोडा वेळ घालवला होता .. अन् तसे काही ठसे त्याला आढळले सुद्धा ... कारण सुरुवातीला म्हणे, मेंढपाळांच्या एका गटानं, अँक्रोपोलिस बांधायला काढलं होतं – आपल्या कळपाला रात्रीचा निवारा नि संरक्षणाची सोय असावी म्हणून – तेव्हा एकमेकांच्या पाऊलवाटांना उभे आडवे छेद देणारे बोकडांच्या खुरांचे स्पष्ट ठसे रेमंडला सहजच सापडले. ह्या ठशांचा काळ म्हणे अँक्रोपोलिसच्याही आधी जवळजवळ हजार वर्षांपूर्वीचा!

फाटक्या तुटक्या कपड्यांत हिंडणाऱ्या अँथेन्समधल्या शेकडो भटक्या पोराटोरांच्यातून, दहा पूर्णतया निकोप असे स्वर्गीय आवाज आम्ही त्या तरुण धर्मगुरुच्या मदतीनं निवडून काढले ... आणि मग त्याच महाशयांच्याकडून त्यांना समूह गीतं– 'कोरस' गाण्याचं शिक्षणही द्यायची व्यवस्था केली ... जुन्या ग्रीक कोरस गायनातले 'स्ट्रोफ' (कोरस गाताना उजवीकडून डावीकडे हेलावत गायच्या ओळी) आणि 'अँन्टीस्ट्रोफ' (डावीकडून उजवीकडे हेलावत गायच्या ओळी), या विधींचा कळत न कळत ग्रीक चर्चच्या धार्मिक विधानात

इतका योग्य स्वरसंवाद साधून समावेश झालेला दिसला की, आमचं अनुमान स्वयंसिद्धच ठरलं ... पिता, धाता, संहारकर्ता अशा झेऊसला गायलेलीच सूक्तं होती ही खास ! पहिल्या पहिल्या ख्रिस्चन लोकांनीही हीच सूक्तं अंगिकारून किंचित् फेरबदलानं 'जेहोवा'च्या संदर्भात वापरली असावीत– प्रार्थनागीतं म्हणून. ॲथेन्सच्या ग्रंथालयात प्राचीन ग्रीक संगीतावरच्या वेगवेगळ्या ग्रंथांतून स्वर-सप्तकांची बरोबर हीच व्याप्ती आणि अशीच श्रुतीव्यवस्था आढळून आली... हे सारे शोध लागल्यापासून आम्हाला आनंदानं जणू ताव चढला होता !... अखेर दोन हजार वर्षांनंतर ... कल्पना करा, दोन हजार वर्षांनंतर, हे हरवलेलं श्रेय – हे जुनं हरवलेलं वैभव पुन्हा एकदा आम्ही जगाला उपलब्ध करून दिलं होतं !!

आम्ही उतरलो होतो त्या ' ओतेल् दांग्लेतेअर ' नं एक चांगलं प्रशस्त दालन माझ्या स्वाधीन केलं होतं – दररोजच्या रियाज, प्रयोग–निर्मिती वगैरे कामा-साठी ... ग्रीक चर्चच्या संगीताच्या लयींतून स्फुरणारे आविर्भाव आणि अंगविक्षेप ' सप्लायन्ट्स 'च्या कोरसला कसे जुळवावे या विचारात त्या वेळी मी तासन् तास बालवले ... आमच्या सिद्धान्तांवर आमची इतकी ठाम श्रद्धा होती, की त्या धार्मिक भावाविष्कारातलं विनोदाचं मिश्रण मुळी आम्ही लक्षातच घेतलं नाही !...

नेहमीप्रमाणे ॲथेन्समध्ये कसली ना कसली क्रान्ती, बंडाची हवा, वगैरे होतीच ... सध्या हा वाद चालला होता ग्रीक भाषेच्या दोन स्वरूपांबद्दल – ' रंगभूमीवर प्राचीन ग्रीक भाषा वापरावी, की आधुनिक ? '– एका बाजूला राजघराणं, दुसऱ्या बाजूला विद्यार्थी वर्ग ! प्राचीन भाषेच्या बाजूनं झेंडे उभारून विद्यार्थ्यांच्या झुंडीच्या झुंडी रस्त्यांतून मिरवणुकीनं जात असताना दिसायच्या. आम्ही कोपानोसहून परतलो, त्या दिवशी विद्यार्थ्यांनी आमच्या गाडीला गराडा घातला. आमच्या ग्रीक संस्कृतिदर्शक ' ट्यूनिक् 'चं त्यांना भलतं कौतुक वाटल्यानं त्यांच्या मिरवणुकीत भाग घेण्याबद्दल त्यांनी आम्हाला विनंती केली ... प्राचीन हेलाससाठी हे सारं करायला आम्ही इथे एका पायावर तयार होतोच !... सभा वगैरे आटोपल्यावर विद्यार्थ्यांनी निदर्शनाच्या नावाखालीच नगरपालिकेच्या रंगमंदिरामध्ये एका कार्यक्रमाची योजना केली. त्यात ते दहा मुलगे आणि तो बिझंटिन धर्मोपदेशक, यांनी सर्वांनी ग्रीक पद्धतीचे रंगीबेरंगी झोळदार कुडते – ट्यूनिकस् घालून ' एस्किलस 'ची समूहगीतं जशीच्या तशी जुन्या अलंकारिक ग्रीक भाषेत म्हटली ... आणि मी नृत्य केलं ... विद्यार्थी तर आनंदानं बेहोष झाले जवळजवळ !

जॉर्ज राजाच्या कानावर या निदर्शनाची वार्ता गेल्यावर त्यानं देखील त्यांच्या

खास रंगायतनात तो कार्यक्रम पुन्हा एकदा व्हावा, अशी इच्छा प्रदर्शित केली; पण राजपरिवार, आणि ॲथेन्समधल्या सर्व परदेशी राजप्रमुखांच्या कचेऱ्यांतली सरकारी मंडळीं, यांच्यासमोर 'शाही'रंगमंदिरात झालेल्या ह्या कार्यक्रमाला, विद्यार्थ्यांनी योजलेल्या 'जनता'रंगमंचावरच्या कार्यक्रमाची सर बिलकूल नव्हती! तो उत्साह आणि ती रंग यांचा कुठे पत्ताच नव्हता! पांढऱ्या शुभ्र हातमोज्यांतल्या 'बंद' टाळ्यांनी स्फूर्ती कशी ती येतच नव्हती ... राजे जॉर्ज नंतर माझ्या रंगपटातल्या खोलीत आले, अन् त्यांच्या राणीसाहेबांना भेटायला त्यांनी मला बोलवलं– त्या त्यांच्या शाही बॉक्समध्ये बसलेल्या होत्या ... एकंदरीत ते उभयता अगदी खूष झालेले दिसले, तरी पण माझं काही समाधान झालं नाही ... कारण मी ओळखून चुकले होते की त्यांच्या खुषीत माझ्या कलेबद्दलचं खरंखुरं परात्पर प्रेम किंवा कलेची अंतस्थ जाण, यापैकी कशाचा लवलेशही नव्हता ... राजामहाराजांच्या लेखी 'बॅले' एवढा सर्वश्रेष्ठ नृत्याविष्कार दुसरा कोणताच नि कधीच नसणार, हाच याचा अर्थ!

हे इकडे सारं असं घडत असताना तिकडे बॅन्केतली आमची पूंजी संपुष्टात येत असल्याची गोष्ट माझ्या लक्षात आली...मला झोप कशी ती येईना कार्यक्रमानन्तर ... मग पहाटेच उठून मी एकटीनं ॲक्रोपोलिसची वाट धरली. डायनिससच्या रंगमंदिरातून जाऊन मी स्वतःशीच नाचले ... वाटलं की हे इथे असं नाचणं शेवटलंच आहे आता!... अन् तिथून निघाले, ती प्रॉपिलिया चढून जाऊन पार्थेनॉन समोर जाऊन उभी राहिले; त्या क्षणी मला असा भास झाला की आमची सारी स्वप्नं फुटताहेत, विरताहेत...एकदा सुंदर बुडबुडा फुटतो, नि क्षणर्धात विरतो, तशी...स्पष्ट जाणवलं की आम्ही आधुनिक युगातले, हेच खरं! त्याहून वेगळे आम्ही कधीच नव्हतो, पुढेही कधीच नसू... प्राचीन ग्रीक मनाशी एकतान – एकभान होणं आमच्या सामर्थ्यापलीकडचं आहे ... ज्याच्यासमोर या क्षणी मी उभी आहे, ते हे ॲथेनाचं मंदिर...ह्या मंदिरानं देखील वेगवेगळ्या कालखंडांत वेगवेगळेच रंग पाहिले आहेत! मी तर काय? ... माझं अस्तित्व म्हणजे स्कॉटिश – आयरिश – अमेरिकन रक्ताचं एक रसायन! जुळलाच लांबून कुठून तरी नात्याचा, जिव्हाळ्याचा लागाबांधा – तोही दूरान्वयानं – तरी तो जुळेल ग्रीकपेक्षा रेड इंडियन रक्ताशी!... हेलासमध्ये घालवलेल्या त्या एका वर्षाची ती सुंदर प्रतिमा जणू खळकन् फुटली ... ते मृगजळ विरलं!... बिझंटिन ग्रीक संगीताचे ते स्वर अंधुक, अस्पष्ट व्हायला लागले ... आणि त्याच वेळीं 'डेथ ऑफ् इसोल्डा'('इसोल्डा'चा मृत्यू)च्या साऱ्या महान् स्वरावली तरंगत तरंगत माझ्या कानावर येऊ लागल्या ...

तिसऱ्याच दिवशी आम्ही ॲथेन्सहून व्हिएन्नाला जाणारी गाडी पकडली ...

आमच्या भोवती उत्साही लोकांची ही गर्दी जमलेली आणि त्या दहा ग्रीक मुलांचे पालक हमसूनहुमसून रडत असलेले, असं ते दृश्य होतं ! स्टेशनवर शुभ्र नि निळ्या रंगाचा ग्रीक ध्वज मी स्वतःभोवती लपेटून घेतला, तेव्हा त्या दहा मुलांसकट, जमलेल्या साऱ्या जनसमुदायानं ' Op ta ... Elefteria ' हे सुंदर ग्रीक सूक्त म्हटलं...

...ग्रीसच्या सौंदर्याबद्दल ' रेनान ' लिहितो :

'हे सत्यशिवा, सहजसुंदरा,– विवेक आणि प्रज्ञा, या साधनांनी जिची मानसपूजा बांधली जाते,– अशा देवते, तुझे मंदिर शाश्वत आत्मज्ञानाचा आणि मूर्तिमंत सात्विकतेचा एक अध्यायच आहे !... तुझ्या संगूढ रहस्यांच्या देहलीशी येऊन पोहोचायला मला आधीच पराकोटीचा विलम्ब झाला आहे;...आणि तुझ्या पूजापीठाशी मी आलो, तेही पश्चात्तापाचे ओझे पाठीवर वागवीत ! अनन्तकाळच्या शोधानन्तर तुझे पाय मला गवसले आहेत...पण अॅथेन्सच्या प्रत्येक पुत्राला जी दीक्षा जन्मतःच प्राप्त होते, तिचा मात्र अधिकार मी ध्यानचिंतनांतून मोठ्या कष्टानं हस्तगत केला आहे...'

रेनाननं वर्णन केलेलं हे ग्रीसचं सौंदर्य कदाचित् आम्हाला आकळलं नसेल ... किंवा ते इतरांनाही अनाकलनीय वाटेल एकादेवेळी ... पण जेव्हा जेव्हा भूतकाळात डोकावून ग्रीसमध्ये घालवलेल्या त्या एका वर्षाकडे मी नजर टाकते, तेव्हा तेव्हा मधल्या दोन हजार वर्षांच्या कालखंडापलीकडे पोहोचून त्या सौंदर्याचा मागोवा घेण्याचा आमचा प्रयत्न, मला खरोखरच सुंदर वाटतो ... सार्थ वाटतो !

...ठरल्याप्रमाणे आमच्या त्या बिझंटिन धर्मगुरू – प्राध्यापक आणि दहा समूहगायक, यांच्या ताफ्यासह आम्ही हेलासला रामराम ठोकला, आणि सकाळीं व्हिएन्नाला येऊन पोहोचलो !

# १४

ग्रीक कोरस आणि प्राचीन शोकनृत्य यांचं पुनरुज्जीवन करण्याचा आमचा प्रयोग आणि प्रयत्न जितका स्तुत्य तितकाच कमालीचा अव्यवहारी होता; परंतु बुडापेस्ट आणि बर्लिन या शहरांतल्या भरघोस आर्थिक यशानंतर जगपर्यटनाची अशी काही इच्छा मला झाली नाही ...... त्या ऐवजी कमावलेला सारा पैसा मी एक ग्रीक देऊळ बांधण्यात आणि ग्रीक कोरसचं पुनरुत्थान करण्यात खर्च केला! तारुण्यातल्या आमच्या त्या इच्छाआकांक्षांची आता आठवण केली की, तो सारा मामला मला अतर्क्यच वाटतो!

...... तर ...... एका सकाळी आम्ही व्हिएन्नाला येऊन पोहोचलो...... अन् आमच्या त्या ग्रीक मुलांनी गायलेले एस्किलसच्या 'द सप्लायंटस्'मधले कोरस, अन् त्यावरच्या माझ्या नृत्यरचना, ऑस्ट्रियन प्रेक्षकांसमोर सादर करून त्याना जरासं गोंधळात टाकलं!!

'डानाऊस'च्या कन्यकाच मुळीं संख्येनं पन्नास असल्यानं माझ्या एकटीच्या किरकोळ अस्तित्वानिशी पन्नासएक मुग्धांच्या भावभावनांचा एकसमय आविष्कार होणं मोठं कठीण होतं ...... पण माझ्या सत्वातूनच हळूहळू अनेकविध एकतेची जाणीव उमलली ...... अन् सारं काही उत्तम रीतीनं निभावलं गेलं.

व्हिएन्ना बुडापेस्टपासून फक्त चार तासांच्या अंतरावर आहे खरं म्हणजे; पण मला भेटण्यासाठी रोमिओनं तेवढा चार तासांचा प्रवास करायचेही कष्ट घेतले नाहीत...नवल वाटतं, ते त्याचं नाही, तर मला त्यांत काहीच विचित्र किंवा अनपेक्षित वाटलं नाही, या गोष्टीचं! म्हणजे पार्थेनॉनच्या सान्निध्यात घालवलेल्या त्या एका वर्षानं बुडापेस्टपासून माझं मन किती दूर गेलं होतं पहा! रोमिओनं

व्हिएन्नाला यायला हवं होतं, असं माझ्या मनातच मुळी आलं नाही !
कोरसमध्ये मी अशी बुडून गेले होते, की त्या ओढीपायी माझी स
आणि भावुकता खर्ची पडत होती; अगदी खरं सांगायचं तर रोमिओचा
माझ्या मनात नव्हता...तिथे तर ऊहापोह चालला होता बौद्धिक
प्रश्नांचा...आणि केंद्रस्थानी होता, माझा त्यावेळी एका व्यक्तीशी जुळ
स्नेह...' हरमान बार !...' हरमान बार एक पक्का बुद्धिजीवी पुरुष
मुद्दाम सांगण्यासारखं...

काही वर्षांपूर्वी व्हिएन्नाच्या क्यून्स्लर हाऊसमध्ये कलावंतांच्या मेळ
नृत्य करतांना हरमान बारनं मला पाहिलं होतं; तेव्हा ग्रीक मुलांचा को
व्हिएन्नाला मी परतलेली पाहिल्यावर त्याला फारच कुतूहल वाटलं.
'न्यू प्रेस' मध्ये त्यानं अर्थात् फारच सुंदर समीक्षणं लिहिली
कार्यक्रमांची...

हरमान बार त्यावेळीं फार तर तीसएक वर्षांचा असेल...तपकिरी
विपुल केसांनी झाकलेलं सुभग सुंदर माथं, आणि तशीच तपकिरी दाढी ! ब
नंतर कितीदा तरी तो ब्रिस्टलमध्ये यायचा आणि पहाट होईपर्यंत
बोलत बसायचा; कित्येकदां मीच उठून ग्रीक कोरसचे लोम, अनुलोम
एकामागून एक नाचून दाखवायची – अर्थ स्पष्ट व्हावा म्हणून
आमच्या दोघातल्या नात्याला भावुकतेचा किंवा भावनाविवशतेचा
देखील स्पर्श झालेला नव्हता ... जात्या संशयी, शंकेखोर लोकांचा या
विश्वास बसणं कठीणच ... पण खरं सांगते, बुडापेस्टच्या त्या अनु
माझ्यातल्या भावनिक प्रतिक्रियांमध्ये झालेली क्रांती पुढे कितीतरी वर्षं टिकून
मला तर वाटायला लागलं होतं, की प्रीतिप्रकरणाची ती एक लाट ओस
ती गेलीच ...आता इथून पुढच्या साऱ्या जीवनभर मी कलेलाच व
असेन ... कसचं काय ! खरं म्हणजे 'व्हिनस द मिलो'च्या वळणाव
वृत्तीची जडणघडण झाली आहे, एवढंच लक्षात घेतलं असतं, तरी
प्रतिज्ञावजा विधानांचं आश्चर्य वाटायचं काही कारण उरलं नसतं !...
न केल्यानं आजसुद्धा ते आश्चर्य कायम आहेच !

... ती पाशवी जागृती, ... अन् पुन्हा साऱ्या जाग्या, भडकलेल्या
निद्रायोग ...असा गाढ की इंद्रियांकडून काही अपेक्षा करायची इच्छाच
उरू नये ... कलेभोवतीच धरावा फेर सबंध जीवनानं ... सारंच अ
वाटावं तसं ... अतर्क्य !

व्हिएन्नाच्या कार्ल थिएटरमध्ये मला पुन्हा एकदां चांगलंच यश
'द सप्लायंटस्'च्या दहा ग्रीक मुलांच्या कोरसच्या वेळीं अगदी थंडप

राहिलेला प्रेक्षकवर्ग, जेव्हा मी कार्यक्रमाच्या अखेरीला 'ब्लू डान्यूब' (नील सरिता डान्यूब) नाचले, तेव्हां मात्र उत्साहातिशयानं भारून गेला होता!... कार्यक्रमानंतर मग मी एक स्पष्टीकरणवजा भाषण केलं; म्हटलं, "या कौतुकाच्या अपेक्षेनं मी इथे आलेली नाही ... मला तुम्हांला दर्शन घडवायचंय् ग्रीक शोकांतिकेच्या आत्म्याचं!... पुन्हा एकदा जाग आणायचीय् ग्रीक कोरसमधल्या कलात्मक सौंदर्याला!"...पण प्रेक्षक आपल्या आरोळ्या ठोकत "नाही, नाही ... ते काही चालायचं नाही ... 'ब्लू डान्यूब 'नाच ... सुंदर ब्लू डान्यूब! आणखी एकदा ..." असं ओरडत आणखीनंच टाळ्या पिटत राहिले!

...तेव्हा पुन्हा एकदा सोन्यानाण्याची नवीन थैली बरोबर घेऊन आम्ही व्हिएन्नाहून म्युनिक्‌ला परतलो. म्युनिक्‌मध्ये मात्र माझ्या ग्रीक कोरसनं प्राध्यापकवर्गात आणि बुद्धिजीवी लोकांच्या वर्तुळात चांगलीच खळबळ उडवून दिली. 'फुर्तवांग्लेर' नावाच्या नाणावलेल्या प्राध्यापकानं तर एक व्याख्यान दिलं... अन् त्यांत ग्रीक चर्चच्या आमच्या बिझंटिन प्राध्यापक महाशयांनी दिग्दर्शित केलेल्या ग्रीक सूक्तांच्या संगीतावर भाष्यही केलं...

विद्यापीठातले विद्यार्थी विशेषकरून फारच हेलावून गेले होते...खरं म्हणजे आमच्या सुस्वरूप ग्रीक मुलांनी चांगलंच नाव केलं होतं... मात्र एकाच वेळी डानाऊसच्या पन्नास कन्यांच्या भावना व्यक्त करण्याच्या प्रयत्नातलं माझंच नृत्य मला अपुरंअधुरं वाटत होतं – त्यामुळे कार्यक्रम संपल्यावर कितीदातरी चार शब्द बोलून मला माझी भूमिका स्पष्ट करायला लागायची. "मी आता रंगमंचावर एकटीच वावरते आहे खरी, परंतु हे नृत्य, ह्या भावना, माझ्या एकटीच्या नाहीत – तर पन्नास तरुण कुमारिकांच्या आहेत... (म्हणून इथे मी एकटी एक नको असून खरं तर पन्नासजणी असायला हव्या आहेत...) या वस्तुस्थितीबद्दल मी दिलगीर आहे फार – आज मी एकच आहे...पण जरा धीर धरलात तर – तर...लवकरच मी एक नृत्यशाळा काढीन आणि पन्नास किशोरींच्या रूपांत परावर्तित होईन..."

बर्लिनमध्ये मात्र आमच्या ग्रीक कोरसचा एवढा काही उदोउदो झाला नाही... तसं पाहिलं तर श्री. कॉर्नेलिअस नावाचे म्यूनिक्‌चे एक नावाजलेले प्राध्यापक कोरसच्या सोबतची निवेदनं करायला मुद्दाम आले होते; पण व्हिएन्नाप्रमाणेच बर्लिनसुद्धा "'ब्लू डान्यूब 'नाचा...सुंदर ब्लू डान्यूब!... तुमचं ते ग्रीक कोरसचं पुनरुज्जीवन राहू दे बाजूला..." असा पुकारा करत राहिलं!

दरम्यान त्या लहान लहान ग्रीक मुलांनासुद्धा या अनोळखी वातावरणाचे परिणाम जाणवायला लागले होते ... अन् आमच्या सरळ सुस्वभावी होटेल मॅनेजरनं मुलांच्या वावग्या वर्तनाबद्दल आणि उसळत्या तापट स्वभावाबद्दल

आमच्याकडे कित्येक तक्रारी आणल्या होत्या ... ती मुलं म्हणे सारखी काळी ब्रेड, ऑलिव्हची काळी पिकलेली फळं, आणि कच्चे कांदे मागत राहायची ... आणि हे सारे जिन्नस त्यांच्या दररोजच्या जेवण्याखाण्यात नसले, की वेटर-लोकांच्यावर संताप निघायचा ... इतका, की गोमांसाचे भाजलेले काप वेटर्सच्या डोक्यावर फेकत, कधीकधी सुऱ्या घेऊन मुलं त्यांच्या अंगावर धावून जायची!... अशा वागण्यामुळे जेव्हा का अनेक उत्तम हॉटेल्समधून त्यांची हकालपट्टीच झाली, तेव्हा बर्लिनमधल्या माझ्या निवासातल्या, पुढच्या पडवीमधल्या खोल्या टाकठीक करून घेऊन त्यांत दहा खाटांची व्यवस्था करणं, आणि आमच्या बरोबरच त्यांना ठेवून घेणं मला भागच पडलं.

आम्ही आपले त्यांना लहान मुलंच समजत होतो; मग दररोज सकाळी मोठ्या गंभीरपणे ' टियरगार्टेन 'मध्ये ( प्राणीसंग्रहालयांत ) त्यांना फिरायला घेऊन जाणं ओघानं आलंच ! पायात बंदांच्या सॅन्डल्स्, आणि प्राचीन ग्रीक तऱ्हेचा वेष घातलेला हा मुलांचा ताफा, अन् अगदी पुढे मी आणि एलिझबेथ् ... अशी ही विलक्षण मिरवणूक रस्त्यानं एकदा चालली असताना आम्हाला घोड्यावर बसून चाललेली कैसरिन् दिसली ... तिला धक्काच बसला असावा आम्हाला पाहून ... कारण ती इतकी विस्मयचकित झाली, की पुढच्या वळणावर मुळी ती घोड्यावरून पडलीच खाली ! त्या उमद्या प्रशियन घोड्यानंदेखील असलं विचित्र दृष्य काही पाहिलं नसावं कधी – त्यामुळे तो बुजला आणि त्यानं कैसरिनला पाडलं ! !

... ही गोड मुलं फक्त सहा महिनेच आमच्याबरोबर राहिली ... मग मात्र हळूहळू आमच्याच लक्षात यायला लागलं, की त्यांचे ते स्वर्गीय आवाज फुटून बेसूर व्हायला लागले होते; आणि बर्लिनच्या प्रेक्षकांसारखा भक्तगण देखिल ' छे ! हे काय भयंकर ! ' अशा नजरेनं एकमेकाकडे पहायला लागला होता... मी मोठ्या धैर्यानं झेऊसच्या पूजापीठासमोर नम्र झालेल्या त्या पन्नास बालांची भूमिका वठवण्याचा प्रयत्न करत कार्यक्रम निभावून नेत होते ... पण ते सारं उत्तरोत्तर कठीणच होत होतं ... विशेषतः मर्यादेपलीकडे खोट्या आवाजात मुलं गायला लागली, तेव्हा तर ते बिझंटिन शिक्षकमहाशयसुद्धा जास्तजास्त बावरून जायला लागले...

त्या धर्मोपदिष्टाची बिझंटिन संगीताबद्दलची समजही आम्हाला जरा धूसरच वाटायला लागली ... अन् अॅथेन्समध्ये असतानाचा त्याचा तो उत्साह तर बहुधा तो तिथेच सोडून आला असावा ! बरेचदा, अन् कितीतरी वेळ तो मुळी गैर-हजरच असायचा !... पण या सर्वांवर एकदा कळस चढला; पोलिस अधिकाऱ्यांनी या ग्रीक मुलांच्याबद्दलची रात्रीबेरात्री संशयास्पद स्थितीत खिडकीतून बाहेर पसार होण्याची माहिती आम्हाला दिली, तेव्हा ! मुलं अगदी निर्धास्त

झोपलेली आहेत, असं आम्ही समजायचं – आणि ती तिकडे हलक्यासलक्या होटेल्समधून संचार करत, तिथे राहणाऱ्या आपल्या भाईबंदांपैकी नीचांत नीच नमुने धुंडाळून त्यांच्या ओळखी काढत बसायची !

...शिवाय बर्लिनमध्ये आल्यापासून यांपैकी प्रत्येकजण अर्ध्या फुटानं वाढला होता; आणि डायनिससच्या रंगमंदिरातल्या संध्याकाळच्या वेळी त्यांच्या चेहऱ्यावर प्रतीत होणारा तो निरागस ' मूल 'पणा, आणि तो स्वर्गीय भाव, तर कुठच्या कुठे लोपूनच गेला होता !... इथल्या रंगमंचावरचे ' सप्लायंटस् 'चे कोरस प्रत्येक रात्री अधिकाधिक बेसुरे व्हायला लागले होते ... ' ब्रिझंटिन 'या मोठ्या नावाखाली हा अत्याचार पचवगं आता अशक्यच होतं जवळजवळ ... कारण तो केवळ ' एक भयंकर रद्दी गोंगाट ' झाला होता ! शेवटी एक दिवस काळजीपूर्वक विचारविनिमय करून आम्ही एका निश्चयाप्रत आलो ... अन् आमच्या त्या ग्रीस कोरसला ' वेर्तहाइमर 'च्या मोठ्या डिपार्टमेंटस्टोअरमध्ये नेलं... त्यांच्यापैकी ठेंगण्या मुलांना छान निकरबॉकर्स ( =सुरवार छाप चोळणे ) आणि मोठ्या मुलांना लांब विजारी तयारच विकत घेऊन दिल्या ... अन् मग टॅक्सीतून साऱ्यांना स्टेशनवर नेलं, सेकंडक्लासची तिकिटं काढून देऊन अॅथेन्सच्या गाडीत बसवलं, अन् प्रेमानं कायमचा निरोप देऊन टाकला ! . . . मुलं गेल्यानंतर ग्रीक संगीताचं पुनरुज्जीवन करण्याचा आमचा बेतही आम्ही जरा पुढेच ढकलला... आणि त्या ऐवजी ख्रिस्तोफर ग्लूकच्या अभ्यासाकडे पुन्हा वळलो ... पुनश्च इफिजिनिया ... आणि ऑरफियस !

पहिल्यापासून मी समूहाच्या रूपातच नृत्याचा विचार करत आले . . . नृत्यात सामूहिक, सांधिक भावनांचा आविष्कार असावा, हीच माझी पहिल्यापासूनची धारणा . . . त्यामुळे डानाऊसच्या कन्यकांच्या व्यथेप्रमाणे इफिजिनिया मधल्या ' कालिसस 'च्या युवतींचा, सोन्याचा गेंद घेऊन पुळणीवरच्या मऊसूत वाळूतला खेळसुद्धा मी नृत्यांकित केला होता ...आणि पुढे पुढे तर ' ताउरिस 'ला हद्दपारी भोगणाऱ्या जीवांचा दुःखभोगही मी नृत्यांतून साकार केला ... त्यांच्या ग्रीक देशबांधवांचं नि हुतात्म्यांचं रक्तलांछित बलिदान एकतऱ्हेच्या किळसवाण्या भयाणपणे रंगवत...! नर्तकींचा पुरा वृंदच्या वृंद तयार करण्याची माझी इच्छा इतकी प्रबळ होती, की माझ्या कल्पनासृष्टीत असा वृंद कधीचा तयार झालेलाच होता ...एवढंच नव्हे तर रंगमंचावरच्या सोनेरी प्रकाशात माझ्या सख्या-सजणींच्या शुभ्र सडपातळ आकृत्या माझ्या डोळ्यांना स्पष्ट भासमान् होत होत्या ... काटक बाहू, झुलती मस्तकं, कंपकातर देह, गतीमान् अवयव ... साऱ्यांचा माझ्या भोवती अखंड झपूर्झा जणू चालायचा ! इफिजिनियाच्या शेवटी ' ताराऊस 'च्या युवती ' ओरेस्तेस 'च्या सुटकेच्या आनंदात अनिर्बन्ध

नृत्य करतात...ही, मुख्य कथेला स्पर्श करणाऱ्या ' रोंडो 'ह्या शेवटच्या संगीत-विभागावरची धुंद नृत्यं नाचताना तर त्यांचे ते नृत्येच्छुक हात माझ्या हातांत गुंफलेले आहेत, असा भास मला व्हायचा...जसजशी संगीताची लय आणि धुंदी वाढायची, तसतशी त्यांच्या सडसडीत देहांच्या संचलनानं लागणारी ओढ आणि मिळणारे झोकेही मला जाणवायचे . . .अन् अखेरीस आनंदाच्या निर्मुक्त उन्मादात मी जेव्हा कोसळून पडायची, तेव्हा तर. . .

' त्या कोसळून पडेपर्यंत...

यथेच्छ मदिरापानानं पडावं तसं ... पाव्यांच्या सुस्कारत्या नादात..रानावना-तल्या छायांतून वासनांचीच केवळ शिकार साधत. . .'

...ह्या ओळी देखताडोळा माझ्यासमोर मूर्तच व्हायच्या !

...आतां ' व्हिक्टोरिया स्ट्रास 'मधल्या आमच्या घरी आठवड्याच्या आठव-ड्याला बैठकी जमायच्या; अन् त्यांचं स्वरूप ' कला ' आणि ' साहित्य ' यांचं केंद्रस्थान असावं, तसंच समजलं जायचं ...' नृत्या'कडे एक ललितकला म्हणून पाहण्याच्या संदर्भात इथे खूप विचक्षण चर्चा होत असत...कारण जर्मन लोक कलाविषयक चर्चा, परिसंवाद वगैरे गोष्टींच्याकडे फार गंभीरपणे बघतात, आणि त्या विषयांचा खूप खोलवर जाऊन विचार करतात. माझं नृत्य हा विषय तर तिथे भयंकर कडाक्याचा वाद माजवणारा आणि चांगलाच ज्वलन्त ठरला. सर्व वृत्तपत्रांतून या विषयाला वाहिलेले स्तम्भच्या स्तम्भ वारंवार वाचायला मिळायचे ...' एका नवजात कलास्वरूपाची प्रतिभावंत उपासिका ' म्हणून कुणी माझं स्वागत केलेलं असे; तर कधी खऱ्या अभिजात कलेची म्हणजेच ' बॅले ' नृत्याची—' मारेकरीण ', म्हणून कुणी माझा धिक्कार करत असे ... कार्यक्रमाहून परतल्या-वर प्रेक्षकांना चढलेली आनंदाची धुंदी मनात आठवत रात्री कितीदातरी मी तशीच स्वस्थ बसून राहायची ... अंगात ते शुभ्र टयूनिक् – ग्रीक चुणीदार कुडतं –, जवळ एक दुधाचा पांढराफेक पेला ... आणि एकीकडे ' कान्ट 'च्या ' क्रिटिक ऑफ प्युअर रीझन 'ची पारायणं चाललेली ...! तसं कारण विचारलं तर काही सांगता यायचं नाही; पण कान्टच्या या ग्रंथातून ज्यांचा मी अविरत मागोवा घेत आले, त्या केवलसुंदर संचलनांच्या निर्मितीला स्फूर्ती लाभते, असं मला वाटायचं !

आमच्या घरी वारंवार येणाऱ्या कलावंतांच्या आणि लेखकांच्या मेळाव्यात एक तरुण होता...उंच कपाळ, चष्म्यापाठीमागचे भेदक डोळे ! त्यानं जणू काही ठरवून टाकलं होतं, की मला ' नित्शे 'च्या प्रतिभेचं दर्शन घडवणं हे त्याचं इतिकर्तव्य आहे ! " नृत्यातलं जे भावदर्शन तुला अभिप्रेत आहे, त्याची पूर्ण समज, पूर्ण ओळख-जाण, तुला नित्शेच्याच द्वारा होईल – " असं तो म्हणायचा !

दररोज दुपारी तो मला जर्मन भाषेतून ' झरतुष्ट्र ' वाचून दाखवायचा...समजत नसलेल्या साऱ्या शब्दांचं आणि वाक्प्रचारांचं स्पष्टीकरण करायचा...नित्शेच्या तत्त्वज्ञानाची भुलावण माझ्या अस्तित्वाला भारून टाकत होती; आणि ' कार्ल फेडर्न 'नं माझ्याखातर खर्च केलेल्या, प्रत्येक दिवसाकाठींच्या त्या काही तासांचं आकर्षण असं काही जबरदस्त होतं, की काय सांगू! माझ्या कार्यक्रमांच्या संयोजकाला हॅम्बुर्ग, हॅनोव्हर, लाइप्झीग, – वगैरे ठिकाणच्या छोट्या छोट्या दौऱ्यांवर मला पाठविण्यातसुद्धा किती मिनतवारी करायला लागायची; आणि मग मोठ्या नाईलाजानंच सारं जमायचं...खरं म्हणजे उत्साही अन् उत्सुक प्रेक्षक आणि हजारो मार्क्स तिथे माझी वाट पाहत असायचे...तरी सुद्धा...! ज्या शंभर टक्के यशस्वी नि झंझावाती जगपर्यटनाबद्दल माझा संयोजक नेहमी बोलायचा, त्याची तर मला बिलकूल ओढ नव्हती...मला अभ्यास करायचा होता, माझं संशोधन चालू ठेवायचं होतं...आणि त्या काळी कुणी कल्पनेतसुद्धा ज्याची कल्पना केली नव्हती, असं नृत्य – नि असे हावभाव मला निर्माण करायचे होते! शिवाय बालपणापासून माझ्या मनाला पछाडून टाकणारं ते ' नृत्यशाळे 'चं माझं स्वप्न! ते तर उत्तरोत्तर जास्त जास्तच स्पष्ट होत चाललं होतं. स्टुडिओमध्ये बसून केवळ अभ्यासात व्यग्र होऊन जायचं – या माझ्या दिनक्रमानं माझा तो ठेकेदार अगदी वैतागून गेला होता...त्यानं दौऱ्याबद्दलच्या विनंत्या – विनवण्यांचा तर माझ्यावर अगदी माराच केला एकसारखा – दुःखानं उसासतच जसा काही तो यायचा आणि मला वर्तमानपत्रं दाखवायचा...लंडनमध्ये – अन् इतरत्रसुद्धा माझ्या पडद्यांच्या, माझ्या वेषभूषेच्या...नि अगदी नृत्याच्यासुद्धा, नकलांना कशा तऱ्हेनं प्रतिसाद मिळत होता...त्यामुळे त्यांना यशाची ' गॅरंटी 'च कशी जणू लाभत होती...एवढंच नाही तर अगदी ' अभिनव ' कल्पना म्हणून त्या सर्व गोष्टींचं स्वागत कसं सगळीकडे होत होतं... हे सारं बिचारा तो वर्तमानपत्रांच्याद्वारा माझ्या नजरेला आणायची शिकस्त करायचा ! पण माझ्यावर कशाचा काय परिणाम होईल तर शपथ! इकडे उन्हाळा जवळ जवळ यायला लागला, तसा माझा एक बेत मी जाहीर केला...बेरुतला – ' रिचर्ड वागनरच्या संगीताच्या अगदी खऱ्या गंगोत्रीला – तो पुरा सीझन घालवायचा... त्या संगीतात बुडून जाऊन त्याचा मनमुराद आस्वाद घ्यायचा... झालं! आमच्या संयोजक महाशयांचा वैताग कळसाला जाऊन पोहोचला!... एक दिवस माझ्या भेटीला कोणी यावं? दुसरं तिसरं कुणी नाही, प्रत्यक्ष रिचर्ड वाग्नरची विधवा पत्नी...अन् त्या क्षणीच माझा पूर्वनियोजित बेत अगदी पक्का झाला...!

कॉसिमा वाग्नर ! उच्च प्रकारच्या बौद्धिक आकर्षणानं इतकी भारून टाकणारी

अशी स्त्री मला आजवर कधीच भेटलेली नाही—तिचा तो उंचापुरा बांधा...ती राजस चाल ... सुंदर डोळे...स्त्रीसौन्दर्याच्या साधारण कल्पनेत न बसणारी, अन् प्रथमक्षणीच कुणाच्याही लक्षात येणारी नाकाची ठोस ठेवण—बुद्धिमान् भालप्रदेश ! तत्त्वज्ञानाचा तिचा अभ्यास सम्यक् अन् गाढ होता, आणि त्या महान् संगीतिकांचा सूर न् सूर, आलाप न् आलाप, स्वरवाक्य न् वाक्य तिला पाठ होतं...माझ्या कलेबद्दल तिनं जे उद्गार काढले, ते उत्तेजनपर तर होतेच, अन् व्यक्त झाले, तेही किती सुंदर तऱ्हेनं! त्यानंतर, 'बॅले'नृत्यपद्धती आणि त्यातली वेषभूषा, यांबद्दलची रिचर्ड वाग्नरची नावडही तिनं बोलून दाखवली... 'बॅकस' नि त्याचं राज्य आणि फुलपऱ्या...याबद्दलचं त्याचं स्वप्न तिनं मला सांगितलं...नि शिवाय बेरूतच्या त्या सीझनसाठी निवडल्या गेलेल्या जर्मन बॅलेच्या प्रत्यक्ष प्रयोगाचं वाग्नरच्या संगीतस्वप्नाशी कधीही जुळू न शकणारं नातं ... — अशा कितीतरी विषयांवर ती माझ्याशी बोलली; नंतर 'तानहॉइझर'च्या प्रयोगात नृत्य करण्याबद्दल तिनं मला विचारलं ... पण तिथेच तर खरी मेख होती! कारण माझ्या डोळ्यासमोरचे आदर्श लक्षात घेता बॅलेशी मला काहीच कर्तव्य नव्हतं! बॅलेचे सर्व अंगविक्षेप माझ्या सौन्दर्यकल्पनेशी विसंगत ... सौन्दर्याच्या माझ्या जाणिवेला धक्का देणारे, असे वाटायचे ... त्यांतला भावाविष्कारही मला कृत्रिम नि क्षुद्र प्रकारचा वाटे.

"अरेरे! माझं नृत्यशाळेचं स्वप्न आज प्रत्यक्षात साकार झालेलं असतं, तर वाग्नरच्या स्वप्नातल्या त्या साऱ्या जलपऱ्या, मृगशावकं — बॅकसचे सारे साथीदार सॅटर्स आणि कलादैवतं इथे — बेरूतला अवतरले असते ... मी आणले असते!"...तिच्या त्या विनंतीला उत्तर म्हणून मी उद्गारले..."एकटी एक मी काय करू शकणार? ...पण का होईना, मी येईन...अन् माझ्या कल्पनाचक्षूंपुढे आत्तासुद्धा तरळणाऱ्या त्या तीन कलाधिदेवतांच्या सुंदर, मृदू आणि कामुक हालचाली 'चूष' म्हणून तरी रंगमंचावर सादर करण्याचा प्रयत्न करीन!"

# १५

मी बेरूतला येऊन पोहोचले, तो मे महिन्यांतला एक सुंदर दिवस होता... 'ब्लॅक ईगल' (श्वार्स ॲदलर) होटेलमध्ये मी खोल्या घेतल्या... त्यापैकी एक खोली काम करायला चांगली प्रशस्त होती, तेव्हा तिथे एक पियानोही आणून ठेवला. कॉसिमाबाईंच्याकडून मला नेहमीच रात्रीच्या किंवा दुपारच्या जेवणाचं बोलावणं, किंवा तिच्या 'व्हिला वानफ्रीड' वर संध्याकाळ घालवण्या-साठी निरोप यायचा... लहानशी चिठ्ठी यायची ... तिच्या त्या बंगल्यावरचं आतिथ्य म्हणजे अगदी राजेशाही थाट होता! तिथे दररोज पंधरा किंवा पंधराहून जास्त लोक दुपारच्या जेवणाला असत. या आमंत्रितांत जर्मनीतल्या महान् व्यक्ती, कलावंत, संगीतज्ञ – आणि अनेकदा तर मोठे सरदार दरकदार, त्यांच्या स्त्रिया, आणि निरनिराळ्या इतर देशांतली राजदरबारी मंडळीसुद्धा, – असा संमिश्र मेळावा असायचा ... पण कॉसिमाबाई टेबलाच्या एका अरुंद बाजूला मुख्य खुर्चीवर विराजमान व्हायच्या ... अन् आब राखून आणि पोच सांभाळून तितक्याच कुशलतेनं सारं काही निभावून न्यायच्या.

रिचर्ड वाग्नरची समाधी या व्हिला वानफ्रीडच्या बागेत आहे. ग्रंथालयाच्या खिडक्यातून कुठूनही ती दिसते ... जेवणानंतर दुपारी एक दिवस वाग्नरबाई माझा हात धरून मला बाहेर बागेत, त्या समाधीपाशी घेऊन गेल्या ... आम्ही आसपास फिरत होतो ... त्यांच्या उदासमधुर आवाजात गूढ आशेचे तरंग तरळत होते ... !

संध्याकाळीं कितीदातरी तिथे चार वादकांच्या चतुःसुत्री संगीतमैफली व्हायच्या ... अन् चारही वाद्यं वाजवणारे वादक म्हणजे अगदी नावाजलेले

संगीतज्ञ असायचे! सणसणीत बांध्याचा ‘ हान्स रिश्तर ’ – छायाकृतीत किर-कोळ दिसायचा तो ‘ कार्ल मुक् ’, आकर्षक ‘ मोट्ल हंपरडिंक ’, आणि ‘ हाई-नरिख् तोड ’ ... अशा सर्व त्या वेळच्या कलावंतांचं व्हिला वानफ्रीडमध्ये स्वागत व्हायचं, आणि सर्वांचं सारख्याच ममत्वानं आतिथ्यअगत्य केलं जायचं.

तसल्या त्या प्रतिष्ठितांच्या आणि प्रखर बुद्धिमंतांच्या ग्रहमालिकेत लहानशा म्यूनिक्मध्ये वावरणाऱ्या माझ्यासारख्या सामान्य व्यक्तीला प्रवेश मिळाला, याचा मला फार अभिमान वाटला. तानहॉईझरच्या संगीताचा अभ्यास करायला मी सुरुवात केली ... या संगीतात एका बुद्धिमंताच्या वासनेचं वैषयिक उधाण उफाळून व्यक्त झालेलं आहे ... कारण हा विषयोत्सव साजरा व्हायचा तो मुळी तानहॉईझरच्या मेंदूतच! सॅटर, जलपऱ्या आणि व्हीनस, यांची बंद गुहा, म्हणजे जणू वाग्नरच्या मनाचं बंद दालनच होतं! हे मन वैषयिक संवेदनांना वाटमोकळं करणाऱ्या आशेनं सतत पीडलेलं होतं ... अन् ती वाटही सापडली तर त्याच्या स्वतःच्या कल्पनाविश्वातच त्याला सापडणार होती!...

त्याच्या या विषयोन्मादाबद्दल त्यानं असं लिहून ठेवलं आहे ...

“ मी तर तुम्हाला केवळ एक चुटपुटती दिशा दाखवली आहे ... बहुतेक नर्तकनर्तकी पुढे जे साक्षात् साकार करतील, त्याचं अस्पष्टसं रेखाचित्र फक्त मी काढू शकलोय् ... हर्षोन्मादानं आणि विलक्षण, कल्पनातीत वैषयिकतेनं उफाळ-णाऱ्या या संगीताच्या वेड्या, बेहोष, उसळत्या उर्मींच्या लयस्रोतात सापडून नर्तकींचे समूहच्या समूह झंझावताप्रमाणे सुसाटणार आहेत ...माझ्या एक-ट्याच्या हिंमतीवरच या विषयाला हात घालण्याचं धैर्य मी दाखवलं असेल, तर त्याचं कारण, हे सारं अघटित, कल्पनेच्या ‘ केवल ’ भावविश्वातच घडायचंय् म्हणून ... व्हीनसच्या मिठीत निद्रिस्त असलेल्या तानहॉईझरच्या चक्षूंना पडलेली स्वप्नं आहेत ही फक्त!

ही स्वप्नं सत्यसृष्टीत उतरायची असतील, तर एकादाच आर्जवी भावक्षेप देखिल हजारो पसरलेल्या बाहूंचं आवाहन व्यक्त करू शकेल ... अभिमानानं ताठरलेलं एकादंच मस्तकसुद्धा तानहॉईझरच्या, पेटत्या वासनेनं उसळलेल्या रक्तातल्या वैषयिक वादळाचा साक्षात्कार घडवू शकेल!

मला वाटतं, या संगीतात अतृप्त कामवासना, वेडीपिशी ओढ, आणि वैष-यिक सुस्ती याचं रसायन अगदी ठासून भरलेलं आहे –! थोडक्यात सांगायचं तर साऱ्या जगातल्या कामप्रवृत्तीचं आर्त आव्हान या संगीतात सामावलेलं आहे ... !

हे सारं व्यक्त करणं शक्य आहे का? संगीतरचनाकाराच्या पेटत्या – धग-धगत्या कल्पनेतच केवळ या भावचित्रांना अस्तित्व लाभतं, असं नाही का वाटत?

दृग्गोचर रूपात लपेटून त्यांना प्रत्यक्षात साकार करणं, खरोखर शक्यतेच्या कोटीतलं आहे का?

मग या अशक्याला गवसणी घालायला जाच कशाला? पुन्हा एकदा सांगतो मीही ते काम पूर्णपणे करू शकलेलो नाही ... केलं आहे, ते केवळ दिशादर्शन!

... आणि जेव्हा या भयंकर वासना उफगणीच्या उंबरठ्यावर येऊन उभ्या राहतात, अन् तो एक बेभान क्षण येऊन ठेपतो ... की जेव्हा सारे बंध तोडून, बांध फोडून, उफाळून बाहेर पडताना एखाद्या बेलगाम प्रपाताचं स्वरूप या वासनावेगाला प्राप्त होतं, तेव्हा तेव्हा ती सारी दृश्यं मी धूसरशा स्वरमेळात लपेटून टाकतो ...! मग आपोआप, न पाहतान सवरता, ज्याच्या त्याच्या कल्पना-शक्तीनुसार, ज्याला त्याला स्वतःच्या धारणेच्या कक्षेत, त्या वासनाकल्लोळाच्या परिणतीचा प्रत्यय येतो ... अगदी साक्षात् दृष्यात्मकतेच्या पलीकडे जाता येतं...

या स्फोटानंतर, आणि संहारानंतर, 'साधने'च्या पायी 'साधका'लाच नष्ट करण्याचा गुण अंगी असलेल्या या 'सिद्धी'नंतर, या साऱ्या घडामोडींनंतर लाभते शांती! ... नांदते सामाधातता!

याच त्या तीन 'ललिता' ... शृंगारिक वैषयिकतेमुळे येणारी तृप्त सुस्ती, अन् शांती यांच्या ह्या मूर्तिमंत प्रतिमा! तानहॉईझरच्या स्वप्नसृष्टीत त्यांच्या व्यक्तित्वाचे धागे कधी एकमेकांत गुंतलेले तर कधी विलगही दिसतात ... त्या एकत्र येतात, एकरूप होतात, अन् आळीपाळीने अलग विलगही होतात ... त्यांच्या तोंडी झेऊसच्या प्रेमप्रकरणांची गीतं आहेत ...

त्याच्या – झेऊसच्या – धाडसीपणाच्या कथा त्या सांगतात ... समुद्राच्या लाटांच्यावरून अगदी अलगद उचलून आणलेली 'युरोपा,' त्यांचा कथाविषय बनते. प्रेमभरानं त्यांची मस्तकं लवलेली असतात ... त्या शुभ्र राजहंसाच्या प्रेमात पडलेल्या 'लिडा'च्या मनातल्या प्रीतीच्या पुरात या ललिताहि वाहून जातात – अगदी बुडून जातात! अर्थात व्हिनसच्या बाहूंच्या गौरकांतीमध्ये विश्रब्धपणे विसावायला त्याच तानहॉईझरला भाग पाडतात ...!

... या साऱ्या स्वप्नदृष्यांची टोकळ प्रतिकं – ठोक कलदार प्रतिमा डोळ्यापुढे उभ्या करण्याची खरोखर काही आवश्यकता आहे का? ... युरोपा! ... नदी-तीरावरून साद घालणाऱ्या आपल्या सख्यांना अखेरच्या निरोपाचा हात पालव-णारी ... झेऊसदेवाला जवळ ओढून घेता घेता, त्याच्या वृषभसदृश पुष्ट माने-भोवती कृश हातांची मिठी घालणारी – युरोपा! ... दूर धूसर आकाशात टक लावून पाहता पाहता तिथेच तसंच या युरोपाचं दर्शन घडणं, हेच तुम्हाला जास्त आवडणार नाही का? राजहंसाच्या पंखाच्या मिठीत अर्धवट लपलेली, आणि चुंबनाच्या अपेक्षेनं त्याला सामोरी होताना थरथरणारी लीडा – छाया-

लोकांत नजर रोवून कल्पनाचक्षूंनी पहाणं, तुम्हाला अधिक पसंत नाही का ?

एकादवेळी तुम्ही उत्तर द्याल, हो ......! पण मग तुम्ही कशाला आहात ? तुमचं काय इथे काम ?"...... मी पुन्हा म्हणेन, "माझं काम नुसतं दिग्दर्शन करणं ...... !"

......सकाळपासून संध्याकाळपर्यंत टेकडीवरच्या त्या लाल दगडाच्या मंदिरात होणाऱ्या एकजात साऱ्या तालमींना मी उपस्थित असे ...... पहिल्या शुभारंभाच्या प्रयोगाची प्रतीक्षा करत ...... 'तानहॉईझर', 'द रिंग' आणि 'पार्सिफाल'. शेवटी दिवसाचे चोवीस तास मला आपली संगीताची नशा चढलेली असायची, अशी माझी अवस्था होऊन गेली ...... चांगली समग्र समज असावी, म्हणून मी त्या सगळ्या संगीतिकांचं साहित्य पाठच करून टाकलं होतं ... परिणामी माझं मन त्यातल्या कथा-उपकथांनी शिगोशिग भरून गेलं ... आणि वाग्नरच्या मधुर संगीतलहरींच्या स्पंदनांनी माझं पुरं अस्तित्वच कंपकातर होऊन गेलं ! सारं बाह्य विश्व जिथे थंडगार, अंधारं आणि आभा-समय – मायिक वाटतं, त्या थराला माझी जाणीव पोहोचली होती ... आता उरलेलं माझ्यापुरतं 'सत्य' नि 'वास्तविक' म्हणजे रंगमंचावरची घटितंच फक्त ... इतर सर्व 'मिथ्या'... 'खोटं' !!

"वसंतागम ... प्रीतीचं लास्य ...
लास्य प्रीतीचं ..."

... या अर्थाचं ते सुंदर वसंतगीत आसमंतात तरळत आणि दरवळत – धुग-धुगत असताना एकाद्या दिवशी मी – आपला भाऊ 'झिगमुंड' याच्या बाहु-पाशात विसावणारी 'झेगेलिंद 'च बनून जायची ! तेवढ्यांत पुढे स्वतःचं देवत्व गमावल्याबद्दल पस्तावून शोक करणाऱ्या 'ब्रूनहिल्दे 'मध्ये माझा कायापालट व्हायचा ... आणि नंतर क्षणात 'क्लिंग्झर 'च्या चेटकाच्या असराखाली अद्वातद्वा शिव्याशाप बरळणारी 'कुंद्री 'सुद्धा ! पण 'ग्रेल 'च्या रक्तप्रभ पेल्यां-तून माझ्याच थरथरणाऱ्या आत्म्याचं उन्नयन मला जाणवलं, तो अनुभव मात्र असीम ... पराकोटीचा ... साऱ्या – साऱ्या पलिकडलाच होता ! त्याची जादू काय वर्णावी ! ... खरंच ! ॲथेन्सच्या टेकडीवरचं, ते सौन्दर्याची पूर्णाकृतीच भासणारं मंदिर, आणि तिथे वास करणारी ती सूज्ञ नीलनयना ॲथेना, यांचा मला पार विसर पडून गेला होता ... जादूच्या लहरी – प्रतिलहरी – कंपनं, यांनी भारून गेलेल्या बेरूतच्या टेकडीवरच्या या दुसऱ्या मंदिरानं ॲथेनाच्या मंदिराला पुरं झाकोळून टाकलं होतं !

...'ब्लॅक ईगल' हे होटेल भारीच गजबजलेलं आणि गैरसोयीचं होतं. एकदा भटकन्तीत सहज, बव्हेरियाच्या वेड्या लुड्विगनं बांधलेल्या आश्रमाच्या

बागेपाशी गेलेली असताना, शिल्पाचा उत्तम नमुना असलेला एक जुना दगडी बंगला मला आढळला. मार्ग्रेव्हची जुनी शिकारीसाठी बांधलेली इमारत होती ती. त्यांत एक प्रशस्त नि प्रमाणशीर आखणी केलेला सुरेख दिवाणखाना होता...अन् एका प्रणयरम्य बागेची वाट दाखवणाऱ्या जुन्या संगमरवरी पायऱ्या होत्या; पण एकंदर वास्तू मात्र भयंकर मोडकळीला आलेली दिसली...शेतकऱ्याचं एक मोठं कुटुंब तिथे जवळ जवळ वीस वर्षांपासून राहत होतं; त्यांनी ती जागा खाली करावी – निदान उन्हाळ्यापुरती तरी, – म्हणून त्यांना एक भली मोठी रक्कम मी देऊ केली...अन् मग लगेच सुतार आणि रंगारी कामाला लावले – आतल्या सगळ्या भिंतींना गिलावा करून घेतला...अन् एका हलक्या, हळुवार हिरव्या रंगानं भिंती रंगवून घेतल्या...त्यानंतर बर्लिनकडे धाव घेतली, आणि कोच, छोड्या, गिरद्या – वेताच्या खोल खुर्च्या आणि पुस्तकं इयादि सर्व गोष्टींची मागणी नोंदवून अखेर ' फिलिप्स रुए ' नावानं प्रसिद्ध असलेल्या त्या शिकारी बंगल्याचा ताबा घेतला... ' फिलिप्स रेस्ट ' – ' फिलिपचं विश्रांतिस्थान '... असं नाव होत त्याचं;...पण पुढे कधीही मला बंगल्याची आठवण झाली, तर ती व्हायची मात्र ' हाईनरिखस् हिमेल ' ( – ' हाईनरिखचा स्वर्ग ' ) याच नावानं...

बेरुतमध्ये मी एकटीच होते त्यावेळी...आई आणि एलिझबेथ स्वित्झरलंड-मध्ये उन्हाळ्याची मजा चाखत होत्या. रेमंडनं त्याच्या प्राणप्रिय ॲथेन्सला परतून कोपानोस बांधण्याचा आमचा प्रयोग पुढे चालू ठेवला होता! " आर्टेशियन विहिर खोदण्याच्या कामात प्रगती...पुढच्या आठवड्यात पाणी नक्की...पैसे पाठव." – अशा तारा वारंवार पाठवायचा तो मला. कोपानोसवरच्या एकंदर सर्व खर्चाची रक्कम शेवटी भयंकर प्रमाणात फुगून मी अक्षरशः हादरून जाईपर्यंत, हा रेमंडचा तारेचा कार्यक्रम चालूच होता!

बुडापेस्टनंतरची पुढील दोन वर्षे काहीही प्रकरण वगैरे न उद्‌भवता इतकी सात्त्विकपणानं गेली होती...मला जणू माझी हरपलेली कौमार्यावस्थाच पुन्हा एकदा परत मिळाली होती...आयुष्यातल्या टप्प्यांनी पुन्हा पलटी खाल्ली होती की काय, न कळे! माझ्या अस्तित्वाचा अणुरेणू, माझा मेंदू, माझं सारं शरीर प्रथम ग्रीसबद्दलच्या औत्सुक्यानं, अन् आतां रिचर्ड वाग्नरच्या संगीतानं, व्यक्तित्वानं भारून गेलं होतं...माझी झोप कमालीची हलकी झालेली होती... मी जागी व्हायची, ती आदल्या दिवशी अभ्यासलेले स्वरबंध गुणगुणतच!... पण जराशी वेगळ्या रूपानं कां होईना, माझ्या हृदयात पुन्हा एकदा प्रेमाला जाग यायची होती! की दुसरा मुखवटा चढवून त्याच त्या इरॉसने केलेली ही कारवाई होती? कुणास ठाऊक!

फिलिप्स रूएमध्ये मी आणि माझी मैत्रिण मेरी, अशा दोघीच राहात होतो; ... कारण तिथे नोकरांसाठी अशी खोलीच नव्हती; आमचा वरकामाचा गडी आणि स्वयंपाकी हे दोघे जवळच्या एका छोट्या खाणावळीत वस्तीला असायचे ... एकदा मेरीनं रात्री मला हाक मारली, अन् म्हणाली, " मला तुला घाबरवून सोडायचं नाहीयू, पण खिडकीशी ये तर खरी. दररोज मध्यरात्री तिथे समोर झाडाखाली उभं राहून तो मनुष्य वर तुझ्या खिडकीकडे बघत राहतो ... मला वाटतं, कुणी तरी दुष्ट हेतूनं आलेला चोर दरवडेखोरच असणार तो ! "

अन् खरंच, एक लहान किरकोळ मनुष्य माझ्या खिडकीकडे टक लावून एका झाडाखाली आपला उभा होता ! मी नसत्या शंकाकुशंकांनी नुसती थरथरायला लागले, एवढ्यात चंद्र ढगाबाहेर आला आणि त्या व्यक्तीच्या चेहऱ्यावर प्रकाश पडला ... एकाएकी मेरीनं मला घट्ट पकडलं. हाईनरिख् तोडचा वर उचललेला प्रफुल्लित चेहरा आम्हा दोघींना एकाच वेळी दिसला होता. आम्ही खिडकी-पासून दूर झालो ... एकादवेळी भीतीच्या त्या पहिल्या लहरीनंतरची प्रतिक्रिया म्हणून असेल, पण खरं सांगतें, आम्ही दोघी शाळकरी पोरींच्यासारखं खिदळायला लागलो एकदम !

" एक सबंध आठवडाभर दररोज तो आपला असा इथे उभा राहतोय्... " मेरी कुजबुजली.

मी मेरीला थांबायला सांगून माझा कोट नाईटड्रेसवर चढवला, आणि हलक्या पावलांनी घराबाहेर पडून सरळ हाईनरिख् तोड उभा होता तिथे गेले...

" प्रिय मित्रा, माझ्या विश्वासू मित्रा," मी जर्मन भाषेत म्हटलं, " खरंच तुझं माझ्यावर एवढं प्रेम आहे ? "

" हो हो," तो अडखळत म्हणाला, " तू तर माझं स्वप्न आहेस ... ' सान्ता क्लारा ' आहेस तू माझी ! "

तेव्हा मला माहीत नव्हतं – पुढे त्यानंच सांगितलं की त्याचा दुसरा मोठा ग्रंथ तो सेंट फ्रान्सिसच्या जीवनावर लिहीत होता. पहिला ग्रंथ त्यानं मायकेल अँजेलोवर लिहिला होता ... सर्व महान् कलावंतांच्याप्रमाणे हाईनरिख् सुद्धा त्याच्या चालू कामाबाबतच्या क्षणिक कल्पनाविश्वातच दंग असायचा ... आता या क्षणी तो स्वतःला ' सेंट फ्रान्सिस ' समजत होता अन् मला ' सान्ता क्लारा !

मी त्याचा हात हातात घेतला, आणि पायऱ्यांवरून अलगद त्याला बंगल्यात घेऊन आले ... पण तो आपला स्वप्नावस्थेतल्या माणसासारखा हरवलेलाच होता ... अन् माझ्यावर लागलेल्या त्याच्या दृष्टीतून प्रार्थनेचा भाव नि एक प्रकारचा प्रकाश ओसंडत होता ... माझी दृष्टी त्याच्या दृष्टीला भिडली मात्र,

जमिनीशी असलेलं माझं नातंच मला विसरल्यासारखं झालं. . .अन् ... त्याच्या समवेत ग्रहगोलांचं स्वर्गीय अंतरिक्ष किंवा त्यांचे लखलखते प्रकाशमार्गच जणू मी एकाएकी उल्लंघून आले ... प्रीतीचा असा अवर्णनीय धुंद आनंद मी आजवर कधीच अनुभवला नव्हता ... त्या आनंदानं माझा कायाकल्पच घडवून आणला ... मी तेजोमयी होऊन गेले जणू ! ... ती दृष्टीभेट तशीच काही वेळ टिकली असावी. प्रत्यक्षात किती क्षण गेले कोण जाणे ! – पण मला अगदी गळल्यासारखं नि गरगरल्यासारखं होऊन गेलं ... माझ्या सगळ्या इंद्रियांना जणू मूर्च्छा आली; अन् एका वर्णनातीत निर्विकल्प आनंदभरानं मी त्याच्या बाहुपाशात बेशुद्ध होऊन पडले ... त्यातून भानावर आल्यावेळी सुद्धा ते विलक्षण डोळे माझ्या डोळ्यांत रुतलेलेच होते ... मृदुपणानं तो पुन्हा पुन्हा म्हणत होता ...

"प्रेमाच्या आर्त आगीत मी बुडून गेलो आहे" ...

पुन्हा एकदा मला स्वर्गारोहणाच्या त्या तरल नि परात्पर जाणीवेचा स्पर्श झाला ! हाइनरिख् पुढे वाकला अन् त्यानं माझ्या डोळ्यांची, माझ्या कपाळाची चुंबनं घेतली ... पण त्या चुंबनांना ऐहिक वासनेचा गंध देखिल नव्हता ... शंकेखोर लोकांचा नेहमीप्रमाणे मी सांगते त्याच्यावर विश्वास बसणार नाही हे तर खरंच ... पण पहाटे आम्ही एकमेकांचा निरोप घेतला, त्यापूर्वी त्या पहिल्या रात्री किंवा त्यानंतर दररोज रात्री तो बंगल्यावर यायचा, तेव्हाही त्याच्या वागण्यात कधी बळजबरी करण्याचा सर्वसामान्य रोख औषधाला सुद्धा दिसला नाही ... नेहमी तीच ती तेजस्वी नजर ... अन् तिला सामोरे गेलेले माझे डोळे,–त्याच्या डोळ्यांशी भिडता भिडता विरायला लागलेलं भोवतालचं आसमंत ... आणि पुढे क्षणात माझ्या आत्म्यानं त्याच्या समवेत, ग्रहगोलांमधून – अंतरिक्षांतून मारलेली भरारी ! त्याचं एक राहू द्या ... पण मी सुद्धा त्याच्याकडून प्रेमाच्या ऐहिक आविष्काराची अपेक्षा करत नव्हते ! दोन वर्षं निद्रिस्त असलेली माझी विषयेन्द्रियं आता एका पारलौकिक तरल रूपात आनंदलीन झाली होती !...

... बेरुतला तालमी सुरू झाल्या ... 'पार्सिफाल'च्या उपोद्घाताच्या संगीतातले सुरवातीचे सूर ऐकत मी तोडबरोबर रंगमंदिरातल्या अंधारात बसले होते ... माझ्या नसांतसांतून स्रवणारा माझा आनंद इतका उमाळायला लागला, की त्याच्या बाहूंच्या पुसटत्या स्पर्शानं सुद्धा त्या हर्षोन्मादाच्या लहरी माझ्या सर्वांगातून थरथरायला लागल्या ... त्या मधुर, ऊर पोखरणाऱ्या सुखसंवेदनेनं मला एकप्रकारची ग्लानी अन् मूर्च्छा आल्यासारखंच वाटायला लागलं ...चित्रविचित्र दीपांची हजारो चक्राकार भ्रमणं चालावीत, तसाच त्या संवेदनांनी माझ्या मस्तकात फेर धरला होता ! माझ्या कंठात तेच सुख इतक्या आनंदानं

धुगधुगत होतं, की मला मोठ्यानं आक्रंदावंसं वाटत होतं ... कित्येकदा माझा स्वतःवरचा ताबा सुटल्यानं तोंडातून बाहेर पडणारे उमासे मूक व्हावेत, म्हणून माझे ओठ दाबून धरणाऱ्या त्याच्या हाताचा हलका स्पर्श मला जाणवत होता! जी स्थिती साधारणपणे एकादा क्षणच टिकते, त्या प्रेमाच्या उत्कर्षाच्या क्षणाच्या उंबरठ्याशी माझ्या शरीरातली प्रत्येक नस जणू येऊन थांबली होती,... अन् नादावलेपणानं अविरत हुंकारत होती ... माझं मलाच उमजेना, की हा परा-कोटीचा आनंद मानावा, की भयंकर व्यथा? मला तर दोन्हीचा अनुभव येत होता... अन् ॲम्फोरटासबरोबर आरोळ्या ठोकायला आणि कुंद्री बरोबर किंकाळ्या फोडायला मी अगदी अधीर झाले होते.

तोड दररोज रात्री फिलिप्स रूममध्ये यायचा ... पण प्रियकराच्या भावनेनं त्यानं मला कधी कुरवाळलं नाही; माझं ट्यूनिक् काढायचा प्रयत्न केला नाही... माझ्या स्तनांना किंवा एकंदर देहाला कुठे स्पर्श करण्याची धडपडही केली नाही.. खरं म्हणाल, तर त्यातली धमनी न् धमनी पूर्णपणे त्याच्याच स्वामित्वाखाली होती, हे तो ओळखून होता! त्याची एकटक माझ्याकडे लागली, की ज्यांचं अस्तित्व मला कधीसुद्धा जाणवलं नव्हतं, अशा भावना माझ्या मनात जाग्या व्हायच्या! संवेदना तर इतक्या परमानंदी नि तीव्रतर, की त्या सुखापायी मी मरून जाईन, असंच मला वाटे ... अन् त्यांतच माझी शुद्ध हरपून जायची ... शुद्ध हरपायची ती पुन्हा जाग येण्याकरता...त्या अद्‌भुत डोळ्यांतल्या प्रकाशाला पुन्हा सामोरं जाण्याकरता! माझ्या आत्म्यावरचं त्याचं स्वामित्व इतकं स्वयंपूर्ण होतं, की वाटायचं, त्याच्या डोळ्यात पहात राहाणं आणि मृत्यूला आळवणं एवढंच आपल्या हातात आहे! कारण इथे, सामान्य शारीर प्रेमात असतं, तसं समाधान, किंवा विश्रांती यांचं नावच नव्हतं ... त्याऐवजी होती एक तहान, तृषा – एक अखंड आस – एका बिंदूशी जाऊन अवश्य, अचूक भिडण्याची!

माझी तहानभूक हरपली ... झोप पूर्णपणे हरवली ... पार्सिफालचं संगीत हाच माझा एकमेव आधार होता – त्याच्या श्रवणानं माझी भावावस्था अशा एका टोकाला जाऊन पोहोचायची की माझं मन अश्रूंत विरघळायचं ... अगदी उसासून रडायची मी ... अन् त्यामुळे माझ्या त्या सुंदर – भयंकर प्रेमलीनते-तून माझी सुटवणूक व्हायची ... मला थोडासा दिलासा मिळायचा ... !

हाईनरिख् तोडची आध्यात्मिक इच्छाशक्ती इतकी प्रबळ होती की, हर्षोत्क-र्षाच्या त्या बेबंद भराऱ्या अन् ते बेहोषीचं वरदान ... या सर्वांतून त्याला वाटेल तेव्हा जागृतीच्या विश्वात परत येऊन निखळ प्रज्ञेला आवाहन करता येत होतं ... अन् मग त्या तशा प्रज्ञाप्रकाशात तळपणाऱ्या घटकापळात तो माझ्या-समोर जी 'कले'वरची निरुपणं करायचा – त्यावरून त्याची तुलना जगातल्या

दुसऱ्या एकाच व्यक्तीबरोबर फक्त मी करू शकते...गाब्रियेल दान्यूंझिओ! अन् खरंच, तोडचं दान्यूंझिओशी एकप्रकारचं साम्य होतं ... तो बांध्यानं लहानखुरा होता; जिवणी रुंद होती, अन् त्याच्या विलक्षण डोळ्यात हिरवी झाक होती!

प्रत्येक दिवशी त्याच्या 'सेंट फ्रान्सिस'च्या हस्तलिखितातले काही भाग तो माझ्याकडे घेऊन यायचा ... आणि जसा पहिल्यांदा लिहिला असेल, तसाच्या तसा प्रत्येक लेखांक मला वाचून दाखवायचा. त्याशिवाय डान्टेची 'डिव्हाईन कॉमेडी' त्यानं मला 'अथ' पासून 'इति'पर्यंत वाचून दाखवली. असं वाचन रात्रीतून तासन् तास चालायचं ... अगदी उजाडेपर्यंत! ... कितीदांतरी सूर्य उगवतानाच तो फिलिप्स रूएमधून जायला निघायचा...एकाद्या मद्यपी माणसासारखा भेलकांड्या खात तो चालायचा ...खरं म्हणजे लिहिलेलं वाचताना कोरडे पडलेले ओठ ओले करायला, साध्या पाण्यालाच तो जेमतेम तोंड लावत असे! आपल्या स्वतःच्या प्रखर बुद्धिमत्तेचीच दिव्य नशा त्याला अविरत चढलेली असायची! अशाच एका सकाळी बंगल्यातून जाताना त्यानं घाबरून माझा दंड पकडला – म्हणाला, "कॉसिमाबाई समोरून येताना मला दिसतायत!"

आणि खरंच पहाटेच्या संधिप्रकाशात कॉसिमाबाई माझ्या दृष्टीला पडल्या. चेहरा फिकटलेला, अन् मला वाटलं, थोडा रागेजलेला...पण तसं काहीच नव्हतं... तानहॉईझरच्या विषयोत्सवातल्या त्या तीन ललितांच्या नृत्यांतून जो भावार्थ मी व्यक्त केला होता, त्यावरून आदल्या दिवशीच आमचा थोडासा वाद झाला होता ... मग मुळीच झोप न लागल्याने, कॉसीमाबाईंनी जुने सर्व कागदपत्र आणि स्मरणिका वगैरे उलटसुलट चाळल्या; तेव्हा त्यांना रिचर्ड वाग्नरची एक छोटी नोंदवही सापडली... आजवर प्रसिद्ध झालेल्या सर्व वर्णनांपेक्षा जास्त अचूक असं, वाग्नरच्या मनातलं त्या विषयोत्सवाच्या नृत्याचं स्पष्टीकरण, त्यात टिपून ठेवलेलं आढळलं.

त्या गोड बाईला मग कुठलं राहवायला? पहाट फुटतां फुटतां तशीच तिनं माझ्याकडे धाव घेतली ... अन् माझंच म्हणणं बरोबर होतं हे कबूल केलं! एवढंच नव्हे, तर तशी मनात एकतऱ्हेनं हादरलेली, अन् अस्वस्थ असूनही ती मला म्हणाली, "मुली, बाळ, तो महान् कलावंत प्रत्यक्ष तुझा स्फूर्तिदाता असला पाहीजे...बघ त्यानं इथे काय लिहून ठेवलंय् ते. अंतप्रेरणेनं तुला जे सुचलं, त्याच्याशी हे स्पष्टीकरण पूर्णपणे जुळणारं आहे... इथून पुढे उगीचच तुझ्या मधेमध्ये मी करणार नाही ... इथे बेरूतमध्ये नृत्यकल्पनेबाबत अगदी पूर्ण स्वातंत्र्य देईन मी तुला!

मला वाटतं, त्यावेळी झिगफ्रीडशी मी कदाचित लग्न करीन, आणि त्या महान् कलाकाराची परंपरा त्याच्यासह चालू ठेवीन, अशी कॉसीमाबाईंची कल्पना

असावी . . . पण झिगफ्रीडचं खुद्द म्हणाल, तर तो माझा चांगला मित्र होता... अन् भावाप्रमाणे त्याचं माझ्यावर प्रेम होतं . . . माझा प्रेमिक वाटावा, अशा तऱ्हेचं त्याच्या वागण्यात चुटपुरतं देखिल वावगं काही नव्हतं, अन् इकडे मी हाईनरिख् तोडच्या अलौकिक प्रेमात माझं सारं अस्तित्व मुरवून टाकलं होतं... त्यामुळे झिगफ्रीडच्या बाबतीतला संबंध व्यवहारिक दृष्टीनं किती मौल्यवान् ठरू शकला असता, ह्या गोष्टीकडे माझं लक्षच गेलं नाही.

...माझा आत्मा म्हणजे एक रणमैदानच झाला होता...अपोलो, डायनिसस खिस्त, नित्शे आणि रिचर्ड वाग्नर यांचा त्याच्यावरच्या मालकी हक्काबद्दल झगडा चालला होता! बेरुतच्या या वास्तव्यात एकीकडून ' व्हीनसबर्ग ' अन् दुसरीकडून ' द ग्रेल ' यांचे धक्के मी खात होते...वाग्नरच्या संगीताच्या पुरात माझं मन वाहून, बुडून प्रवाहाबरोबर ओढून नेलं जात होतं...अन् तरीसुद्धा एकदा व्हिला वानफ्रीड-मधल्या दुपारच्या जेवणाच्या वेळी शान्तपणे मी जाहीर केलं... " खरं सांगायचं तर ह्या थोर कलावंताच्या हातून मोठीच चूक घडून आलीय्...त्याच्या अंगी एवढी प्रतिभा असताना देखील...! "

कॉसिमाबाईंनी आपली चकित नजर माझ्यावर रोखली...आजूबाजूला अगदी थंडगार स्तब्धता पसरली होती !

" हो ! " अगदी चरमसीमेवर उभं असलेल्या यौवनाच्या आगाऊ आत्म-विश्वासानं मी पुढे म्हणाले, " ह्या महान् आचार्यानं भयंकर मोठी चूक केलीय्... कारण ' म्युझिक – ड्रामा ' ( संगीत–नाट्य ) म्हणजे दुसरं तिसरं काही, तर एक नवा बाष्कळपणा आहे...एक निरर्थ प्रकार आहे ! "

आता त्या स्तब्धतेच्या पोटातली खळबळ जास्तजास्त वाढायला लागली होती !...मी आणखी स्पष्टीकरण करायला गेले, म्हटलं, " नाटक हा बोलका शब्द आहे... ह्या बोलक्या शब्दाचा जन्म माणसाच्या मेंदूत झाला आहे... त्याच्या उलट संगीत ही एक भावगर्भ आनंदावस्था !... ह्या दोन संकल्पनांचा मेळ घालण्याची शक्यताच मुळी अकल्पनीय आहे ! "

माझ्या या सनसनाटी नि धमाली वक्तव्यानंतर तर पुढच्या साऱ्या वाटा अगदी बंद झाल्या...आजूबाजूचे कमालीचे चकित, नि अवाक् चेहेरे मी आपली निरागसपणे न्याहाळत बसले होते ! न पचणारी, न रुचणारी विधानं तर मी केलीच होती ... तेव्हा तोच सूर पुन्हा लावायला आता बुजायचं कारणच नव्हतं ! मी मागल्या धाग्यावरून पुढे बोलायला सुरुवात केली..." हो; मनुष्यानं बोललं पाहिजे, त्यानंतर गायलं पाहिजे अन् त्यानंतरच नाचलं पाहिजे. . . ठीक आहे. . .पण मग ' बोलणं ' म्हणजे मेंदू...माणसाची विचारशक्ती...' गीत ' हे झालं काळीज.. भावना ! अन् ' नृत्य '. . .नृत्य ही डायनिशियन अत्यानन्दावस्था

आहे... मूळ कलाप्रेरणेतून उद्भवलेला ब्रह्मानंद आहे तो... त्याच्याचमुळे साफल्याचा पैलतीर साऱ्यांना दिसतो! तेव्हा या तिन्ही गोष्टींचा एकलग विचार करणं, त्यांचा एकजीव मेळ घालणं कुठल्याही तऱ्हेनं अशक्यच आहे. 'म्यूझिक – ड्रामा' नावाची चीज संभवतच नाही!"

...ज्या काळी लोक इतके आत्मरत नसत, त्या काळांत मी तरुण होते, याचा मला फार आनंद वाटतो. आताच्यासारखे त्या वेळचे लोक 'जीवन' आणि 'सुखचैन' या गोष्टीचा तिरस्कार करत नसत; उदाहरणार्थ पार्सिफालच्या मध्य-न्तरात लोक शांतपणे बियर प्यायचे...पण त्यामुळे त्यांच्या बौद्धिक किंवा आत्मिक जीवनाला कोणताही बाध येत नव्हता...हान्स रिक्टर सारख्या मोठ्या माग-साला कितीदातरी मी स्वस्थ मनानं बियर पितांना आणि सॉसेजिस् खाताना पाहिलेलं आहे...पण त्यामुळे नंतर एखाद्या यक्षगंधर्वासारखं वाद्यवृंदाचं निर्देशन करण्यातल्या आपल्या दिव्य कलात्मकतेपासून तो रतिभरही ढळलेला दिसला नाही! एवढंच नव्हे, तर त्याच्या तिथेच भोवती बसून अत्युच्च पातळीवरच्या बौद्धिक नि आध्यात्मिक संभाषणात मग्न झालेल्या इतर लोकांनाही त्यांच्या संपर्कापासून काही त्रास झाल्याचं आढळलं नाही!

हो, आणि त्या दिवसात 'कृशता' हे आध्यात्मिकतेचं व्यवच्छेदक लक्षणही मानलं जात नव्हतं! 'आत्मा' एक अशी वस्तु आहे, की जिची गती सदोदित ऊर्ध्व असते; आणि ती पराशक्ती नि चैतन्य यांच्या पाकळ्या-पाकळ्या उलगडूनच बाहेर पडत असते, अशी लोकांची त्या वेळीं धारणा होती. मेंदू म्हणजे तरी काय, शरीरातली विशेष अधिक शक्ति! हे शरीर ऑक्टोपससारखं असतं ... त्याच्या कक्षेत येईल, ते सारं ते स्वतःच पचवून रिचवून टाकतं, अन् मग अनावश्यक,– अधिक तेवढंच ते मेंदूसाठी हातचं सोडून देतं!

बेरूतच्या गायकांपैकी कितीतरी जण केवढे आडदांड नि मोठे धिप्पाड होते... पण त्यांनी गाण्यासाठी तोंड उघडलं की त्यांच्या आवाजाची फेक अमरपुरीच्या तरल, पारलौकिक सौन्दर्यविश्वाला स्पर्श करून यायची! ह्या लोकांना आपल्या शरीराचं भानच कसं ते नसायचं, असं मी म्हणते, त्याचं कारण हेच .. त्यांना त्यांचं शरीर म्हणजे – त्यांचं परम आंतरिक सामर्थ्य, आणि त्यांच्या दैवी संगी-ताची आविष्कारशक्ती, यांचं बाह्यकवच किंवा मुखवटा...असंच वाटत असावं बहुधा!

# १६

लंडनला असताना ब्रिटिश म्यूझियममध्ये 'अर्न्स्ट हेकेल'च्या लिखाणांची भाषांतरं मी वाचली होती. विश्वातल्या वेगवेगळ्या विस्मयकारक व्यापारांचं वर्णन करणाऱ्या त्याच्या ओघवती, प्रासादिक नि सुबोध शैलीनं मी विशेष भारावून गेले होते ... त्याच्या ग्रंथांनी ज्या जाणिवा मला दिल्या, जे संस्कार माझ्यावर केले, त्याबद्दल मी त्याला एक कृतज्ञ पत्र लिहिलं ... माझ्या पत्रात त्याचं लक्ष वेधून घेण्यासारखं काही तरी असणार बहुतेक—कारण पुढे बर्लिनमधल्या माझ्या नृत्यकार्यक्रमांच्या वेळी त्यानं त्या पत्राचं उत्तर पाठवलं....

त्यावेळी कैसरनं अर्न्स्ट हेकेलला हद्दपार केलेलं होतं ... अन् परखड भाषण करण्याच्या त्याच्या स्वभावामुळे बर्लिनला येणं त्याला शक्यच नव्हतं ... आमचा पत्रव्यवहार मात्र सुरूच होता ... तेव्हा मग बेरूतला असताना मी त्याला मला भेटायला आणि 'फेस्टस्पिल'ला हजर राहायला पत्र पाठवून बोलावलं....

त्यावेळी मोटरगाड्या नव्हत्या ... तेव्हा दोन घोड्यांची उघड्या टपाची गाडी करून, अशाच एका ओल्या-भिजल्या सकाळी मी अर्न्स्ट हेकेलला उतरवून घ्यायला गाडीवर गेले. तो बडा माणूस गाडीतून उतरला...साठी उलटलेली असूनसुद्धा त्याची अंगकाठी कसलेल्या खेळाडूसारखी कमावलेली अन् भव्य होती... पांढरी शुभ्र दाढी ... आणि तसेच पांढरेशुभ्र केस ... ढगळढगळसे विचित्रच कपडे त्यानं घातले होते ... अन् हातामध्ये होती एक सतरंजीवजा कापडाची बॅग ... आधी कधीच भेटलो नव्हतो, तरी पाहिल्याबरोबर आम्ही एकमेकांना ओळखलं ... अन् क्षणार्धात मी त्यांच्या विशाल बाहुपाशांत लपेटून गेले ... माझा चेहरा त्याच्या दाढीत लपून गेला ... 'प्रज्ञेचा सुवास' असा वाक्प्रचार

असेल, तर मी म्हणेन की त्याच्या साऱ्या अस्तित्वांतून आरोग्य, शक्ती आणि प्रज्ञा यांचा त्रिगुणात्मक सुवास मंदपणे दरवळत होता!

माझ्याबरोबर तो फिलिप्स रूएवर आला ... तिथे त्याच्यासाठी तयार केलेली खोली आम्ही फुलांनी शृंगारून ठेवली होती. आल्याआल्या मी वानफ्रीड बंगल्याकडे धाव घेतली...अर्न्स्ट हेकेलसारखा थोर माणूस बेरूतला आला होता; माझ्याकडे पाहुणा म्हणून उतरला होता, अन् 'पार्सिफाल' ऐकायला हजर राहणार होता, ही सुंदर बातमी मला कॉसिमाबाईला सांगायची होती...पण या बातमीचं स्वागत अगदी फारच थंडपणे झालं...मी चकितच झाले...म्हणजे कॉसिमाबाईच्या पलंगावरचा क्रॉस आणि जवळच्याच छोट्या मेजावरून लटकणारी स्मरणी, ही काही केवळ दिखाऊ अलंकरणं नव्हती, ही गोष्ट माझ्या लक्षातच आली नव्हती म्हणायची! ती खरोखर नियमानं चर्चला जाणारी कट्टर सश्रद्ध कॅथॉलिक बाई होती...पूर्णपणे आस्तिक होती, अन् अर्न्स्ट हेकेल हा डार्विनच्या पाठीमागं त्याची विचारधारा आत्मसात केलेला, डार्विनच्या खालोखाल मोठ्यात मोठा मूर्तिभंजक होता! 'द रिडल ऑफ दि युनिव्हर्स' हा ग्रंथ त्यानंच लिहिला होता. तेव्हा त्याचं वानफ्रीड बंगल्यात आपुलकीनं स्वागत झालं नाही, याचं नवल वाटू नये...पण मी आपलं भोळसरपणानं हेकेलच्या मोठेपणावर आणि मला त्याच्याविषयी वाटणाऱ्या कौतुकादराबद्दल, सविस्तर नि स्पष्ट वक्तव्य केलं तिथे...! शेवटी नाईलाजानं वाग्नरनिवासातली अत्यंत हवीहवीशी वाटणारी जागा कॉसिमाबाईनी हेकेलकरता माझ्या स्वाधीन केली...करणार काय बिचारी, मी तिची फार जिव्हाळ्याची मैत्रिण होते...मला 'नाही' म्हणणं तिला शक्यच नव्हतं!

त्या दिवशी दुपारी मध्यान्तरात, अंगांत ते ग्रीक ट्यूनिक् अन् अनावृत हातपाय ..अशाच वेषात अर्न्स्ट हेकेलच्या हातात हात घालून, मी चकित प्रेक्षकांसमोरून सगळीकडे हिंडले...हेकेलचं पांढरं शुभ्र माथं साऱ्या जनावाऱ्यावर प्रामुख्यानं उठून दिसत होतं...!

पार्सिफालच्या कथाविषयाचे धागे क्रमानं उलगडत असताना हेकेल भारीच शान्त – निर्विकार बसला होता...तिसऱ्या अंकापर्यन्त माझ्याही लक्षात आलं नाही, की ह्या तऱ्हेचा गूढ पारलौकिक भावोन्माद हेकेलच्या मनोधारणेत बसण्यासारखा नव्हता...त्याची दृष्टि आणि मन अगदी शुद्ध वैज्ञानिकाचं होतं... एखाद्या परिकथेचं संमोहन त्याच्या या मनोधारणेत कसं बसावं?

वानफ्रीड बंगल्यातून त्याला जेवण्याखाण्याचं किंवा खुद्द त्याच्या प्रीत्यर्थ होणाऱ्या काही समारंभाचं ... असं कुठल्याच प्रकारचं आमन्त्रण न आल्यानं मीच त्याच्या सत्कारादाखल एक 'अर्न्स्ट हेकेल – महोत्सव' घडवून आणायचं ठरवलं, आणि

अगदी विविध व्यक्तिमत्वांच्या लोकांचा आश्चर्यकारक मेळ जमवला ... अगदी
– बेरूतला त्यावेळी भेट द्यायला आलेले बल्गेरियाचे राजे फर्डिनंड, कैसर
भगिनी – कमालीचे प्रगत विचार असणारी राजकुमारी 'प्रिन्सेस ऑफ साक
माइनिनगेन' – यांच्यापासून ते राजकुमारी हेन्री रॉईस, हंपरडिंक आ
हाईनरिख् तोड यांच्यापर्यंत, सर्वजणांना मी एकत्र आणलं ..

मी आधी हेकेलच्या मोठेपणाबद्दल नि कर्तृत्वाबद्दल एक स्तुतिपर भाषण के
अन् मग त्याच्या सन्मानार्थ नाचले ... हेकेलची माझ्या नृत्यावरची टीकाटिप्प
ही अशी होती : विश्वातल्या सर्व प्राकृतिक नि निसर्गसिद्ध सत्यांत त्यानं माझ
नृत्याची गणना केली होती ... तो पुढे म्हणाला, "हे अद्वैताचं एकदेशी निरूप
आहे ... कारण याचं मूळ केन्द्र फक्त एक आहे ... आणि उत्क्रांतीची दिश
मार्गही एकच आहे!" माझ्या नृत्यानंतर 'फॉन बेरी' हा प्रसिद्ध टे
गायला ... मग थोडासा अल्पोपहार ... हेकेल आता लहान मुलासारखा रंग
आला होता ... आम्ही भरपूर खाल्लं ... मद्य प्यायलो ... सकाळ होईपर्
गाणी गायली. . .

तरी पण फिलिप्स रूग्ण असतानाच्या त्याच्या नित्याच्या वहिवाटीप्रमाणे
सूर्योदयाबरोबर उठला ... उठल्याउठल्या तो माझ्या खोलीत यायचा ... अ
त्याच्या बरोबर डोंगरमाथ्यावर चढून जायला मला बोलवायचा ... मी कबूल
करते, की त्याच्याइतकी मला या गोष्टीची आवड नव्हती ... पण ही भटकन
व्हायची मात्र फार मनोरंजक ... कारण वाटेतल्या प्रत्येक दगडावर, प्रत्ये
झाडपानावर आणि भूगर्भशास्त्राच्या दृष्टिकोणातून पाहिलेल्या भूमीच्या प्रत्ये
थरावर त्याचं वक्तव्य चालायचं!

शेवटी अगदी रवच्या टोकावर पोहोचलं की एखाद्या अवतारी पुरुषासार
हेकेल उभा राहायचा, अन् निसर्गाच्या कर्तृत्वावर आपली चिकित्सक नजर फिरव
त्यावर कौतुकाची, समाधानाची जणू मोहोर लावायचा ...! रंगफलक अन् रं
पेटी त्याच्या पाठीवर असायचीच ... मग जंगली वृक्षाची, आणि तिथल
टेकड्यांच्या कुशीतल्या खडकांच्या विविध आकारमानांची अनेक रेखाचित्रं
काढायचा ... खरं तर तो एक बऱ्यापैकी रंगशिल्पी होता, परंतु त्याच्या काम
कलावन्ताची सहज नजर आढळत नसे ... त्याऐवजी एखाद्या वैज्ञानिका
कुशल, अचूक निरीक्षणाचाच त्यातून प्रत्यय यायचा ... हेकेलला क
काहीच कौतुक नव्हतं, किंवा त्यात रस नव्हता, असा माझ्या म्हणण्याचा अ
नाही, परंतु त्याच्या लेखी 'कला' हा निसर्गाच्या उत्क्रान्तीचा आणखी
सहजाविष्कार होता, एवढंच! 'पार्थेनॉन' बद्दलच्या आमच्या ओढीबद्दल
त्याच्याशी जेव्हा तपशीलवार बोलायची, तेव्हा त्याचे उत्सुक प्रश्न असायचे

नेहमी त्या संगमरवराच्या जातीबद्दल ... "फायडिअस"च्या एखाद्या कलाकृतीची मी केलेली प्रशंसा ऐकण्यापेक्षा, पेंटेलिकसच्या कुठल्या कुशीकडून तो संगमरवर खोदून काढला होता, अन् तो भूगर्भाच्या कुठल्या थरातून ... हेच समजून घेण्याकडे त्याचा जास्त कल दिसायचा.

एका रात्री वानफ्रीड बंगल्यात राजे फर्डिनंड यांच्या आगमनाचा पुकारा झाला ... सारेजण ताबडतोब उठून उभे राहिले, आणि मला पण हलकेच उभं राहण्याबद्दल सुचवायला लागले ... पग माझा पिंड पडला कट्टर समाजवादी! तेव्हा उठायच्या ऐवजी 'मादाम रेकामियर'च्या थाटात मी मोठ्या डौलानं कोचावर होते तशीच रेलून बसले ...! थोड्याच वेळात मी कोण, कुठली, याची फर्डिनंडनं चौकशी केली अन् सरळ माझ्याकडेच आला ... झालं ...! तिथे उपस्थित असलेल्या साऱ्या प्रमुख प्रतिष्ठितांना कल्पनेच्या वावड्या उडवायला कारण मिळालं ... तो आपला आला तसा माझ्याशेजारी कोचावर बसला, आणि लगेच ग्रीक प्राचीन कलावस्तूंबाबत त्याला वाटणाऱ्या जिव्हाळ्यावर मोठ्या उत्सुकतेनं बोलायला लागला ... मीही त्याला माझ्या, नृत्यशाळा स्थापण्याच्या स्वप्नाबद्दल सांगितलं; अन् त्यातूनच ग्रीसच्या त्या पुरातन संस्कृतीचं पुनरुज्जीवन होणार असल्याची ग्वाही दिली! त्यावर प्रत्येकाला नीट ऐकायला जाईल, अशा आवाजात फर्डिनंड उद्गारला, "सुंदरच कल्पना आहे ही ... काळ्या समुद्रावरच्या तिथल्या माझ्या राजवाड्यात ही तुझी कल्पना तू आकाराला आणायला हवीस ... जातीनं तिथे येऊन ...!"

... पुढे मात्र कहरच झाला! ... जेवताना मी त्याला विचारलं की, एखाद्या दिवशी नृत्यप्रयोगानंतर थोडा काही फराळ करायला माझ्याकडे फिलिप्स रूएवर येणं त्याला जमेल का? म्हणजे माझ्या नृत्यादर्शाबद्दल मला अधिक स्पष्टीकरण करता येईल; तर त्यानं सहज गोडव्यानं ताबडतोब होकार दिला! एवढंच नाही, तर आपला शब्द खरंच पाळला! ... मग फिलिप्स रूए मधली एक मधुसंध्या फर्डिनंडच्या सहवासात कुठच्या कुठे गेली ... त्याच्या त्या वेधक व्यक्तिमत्त्वाचा तेव्हा कुठे मला उमज पडायला लागला... फर्डिनंड... कवी, कलाकार – स्वप्नाळू वृत्तीचा नि अभिजात, खऱ्याखुऱ्या राजेशाही प्रज्ञेचा माणूस!

माझ्याकडे कैसरसारख्या मिशा राखलेला एक बटलर होता – 'फर्डिनंड येणार' या वार्तेनं तो अगदी खूष झाला होता ... त्यानं एका तबकातून शँपेन आणि सॅण्डविचेस आणली, तेव्हा फर्डिनंड म्हणाला, "छे: ! शँपेन मी कधीच घेत नाही." एवढ्यात त्यानं लेबल पाहिलं अन् उद्गारला "ओहो! 'मोअे ए शाँदाँ' – हं! – फ्रेंच शँपेन ...! ... मग मोठ्या आनंदानं! ... खरं सांगायचं

म्हणजे जर्मन शँपेनमधून मला इथे विष घालण्याचा प्रयत्न केला गेलाय् एकदा !"

माझ्या बंगल्यावरच्या फर्डिनंडच्या भेटीच्या वेळीं आम्ही निःशंक निरागसतेनं नुसते बोलत असू ... किंवा कलाविषयावर काही वादसंवाद करत असू ... पण वेरूतमध्ये त्यामुळे चांगलीच खळबळ उडाली होती ... कारण या सगळ्या भेटी मध्यरात्री व्हायच्या ... अन् एरवीदेखील, काही जरी केलं, तरी जनसामान्यांपासून माझं कमालीचं वेगळेपण नेमकं उठून दिसायचंच दिसायचं; लोकांना वारंवार माझ्या पायी धक्के बसत, ते त्यामुळेच ... !

... बंगल्यात बरेचसे कोच, लहानमोठ्या गिरद्या, अन् गुलाबी रंगाचे दिवे होते ... खुर्च्या नव्हत्याच ... कुणी कुणी फिलिप्स रूएला 'दुर्वर्तनाचं मंदिर'च म्हणत ... विशेषतः फॉन बॅरी ह्या ख्यातनाम टेनरला वारंवार तिथे रात्रभर गायची स्फूर्ती यायची ... अन् मीही मग त्याच्या जोडीनं रात्रभर नाचायची. तेव्हापासून तिथल्या त्या खेडूतांना तर हा बंगला म्हणजे खरोखर डाकिणीचेटकिणींचाच तळ असावा, असं वाटायचं ! अन् आमची सरळसाधी मौजमजा म्हणजे 'भयंकर आचरट धिंगाणा'च समजला जायचा ... !

तिथे वेरूतला, कलावंतांची एक फ्रेंच खाणावळ – अड्डा होता. त्याचं नाव होतं, 'द आऊल' (-घुबड) ! तिथेही लोक रात्रभर गात अन पीत राहायची. पण ते सारं 'ठाकठीक' समजलं जात होतं ! . . . कारण त्यांचं वागणं सर्वांच्या समजेच्या कक्षेतलं होतं. . . कपडेही ते लोक नेहमीसारखे – सगळ्यांसारखे घालायचे . . . !

. . . वानफ्रीड बंगल्यात काही तरुण अधिकारी मला भेटले ... त्यांनी मला सकाळीं त्यांच्याबरोबर घोड्यावरून रपेटीला जाण्याचं आमंत्रण दिलं ... मी माझं ग्रीक ट्यूनिक् नि सॅन्डल्स् चढवूनच घोड्यावर मांड टाकली ... माथं उघडंच ... अन वाऱ्यामुळं उधळलेल्या केसांच्या कुरळ्या बटा . . . ब्र्यूनहिल्देच जशी ! फिलिप्स रूए हा बंगला 'फेस्टस्पिल हाऊस'पासून बराच दूर असल्यानं त्या ऑफिसर्सपैकी एकाकडून त्यांच्याकडल्यांपैकी एक घोडा मी विकतच घेतला, आणि तालमींना ब्र्यूनहिल्देच्या थाटातच हजर राहयला लागले ! घोडा मुळात ऑफिसरचा त्याला वर स्वार झालेल्याच्या त्यामुळे टाचेला लावलेल्या लोखंडी टोकानं केलेल्या इशाऱ्याची सवय होती . . . एरवी त्याला असंतसं कह्यात ठेवणं फार कठीण होतं ... मी एकटीच असले की तो घोडा अनेक गंमती करून पहायचा ... म्हणजे उदाहरणादाखल सांगते . . . वाटेतल्या प्रत्येक दारूच्या दुकानाशी तो थांबायचा ! अन् मग आपले चारही खूर जमिनीवर घट्ट रोवून जो उभा राहायचा ... मुळी तसूभर हलायला तयार नाही ! शेवटी त्याच्या पूर्वीच्या मालकाच्या एखाद्या मित्रानं मोठ्यानं हसत दुकानाच्या बाहेर यायचं, अन मला पुढेपर्यंत

पोहोचवून रस्त्याला लावायचं ! फेस्टस्पिल हाऊसशी गोळा झालेल्या एकजात साऱ्या प्रेक्षकांच्यापुढे अशा अवतारात शेवटी एकदा मी जाऊन पोहोचल्यानंतर काय धमाल व्हायची तुम्हीच कल्पना करा !

'तानहॉइझर' चा पहिला प्रयोग...त्यांतल्या माझ्या पारदर्शक नृत्यवेषामुळे माझ्या शरीराच्या साऱ्या नाचऱ्या अंगोपांगांचं प्रेक्षकांना आरपार दर्शन घडणार होतं. • .त्यामुळे तंग मोज्यांनी झाकलेल्या गुलाबी पायांच्या दुनियेत काहीशी खळबळ निर्माण झाली होती ! शेवटल्या क्षणी कॉसिमाबाईचा धीर सुटला ! तिनं आपल्या मुलींपैकी एकीला एक लांब पांढरं शेमिज ( ढीलं अंतर्वस्त्र ) देऊन माझ्या बंगल्याकडे पाठवलं...अन् मी जे एक नुसतं झिरझिरीत शेलेवजा वस्त्र नृत्यवेष म्हणून वापरणार होते, त्याच्या आंतून ते शेमिज चढवण्याची विनंती केली...पण माझा निर्धार अगदी पक्का होता...मी माझ्या अभिरुचीनुसार वेष घालणार, अन् माझ्याच मनोधारणेनुसार नाचणार होते...! नाहीतर रंगमंचावर उभीच राहणार नव्हते मी !

" बघाल तुम्ही, येत्या काही वर्षातच तुमच्या बॅकन्टेस–मदिराक्षी–विलासिनी ... अन् फुलराण्या, हे असेच वेष घालतील ! "... ही माझी भविष्यवाणी अक्षरशः खरी ठरली पुढे !

मात्र त्यावेळी माझ्या रेखीवबांधीव पायांच्या संदर्भात बरंच वादंग माजलं होतं...उलटसुलट चर्चा झाली होती...माझ्या अंगभूत रेशमी अंगकांतीचं दर्शन 'नैतिक' चौकटीत बसण्यासारखं आहे किंवा कसं ? की ती चौकट लाभावी, म्हणून ती अंगकांती सामन-माशाच्या गुलाबी रंगाच्या रद्दी, कृत्रिम-रेशमी, तंग मोज्यांत झाकून टाकणं आवश्यक होतं ? कितीदातरी या विषयावर भाष्य करकरून मी माझा घसा बसवून घेतला !..त्या घाणेरड्या गुलाबी मोज्यांमध्ये 'टाईटस्'मध्ये –गुंडाळलेले पाय खरोखरच किती गलिच्छ नि ओंगळ दिसायचे ! अन् त्या उलट अनावृत मानवी शरीर–विशेषतः ते सुंदर विचारांच्या स्फुरणांनी मोहरलेलं असतं तेव्हा–किती सुंदर नि किती निरागस दिसतं !

...तर मी अशी अहिरा !...सर्वांच्या लेखी संपूर्णतया जंगली गगली गेलेली निसर्गबाला !–साऱ्या असंस्कृत 'फिलिन्स्टाईन्स'शी भांडणारी–लढणारी !... सेंट फ्रान्सिसच्या पंथांतून निर्माण झालेल्या एका प्रेमभराचा असर या 'अहिरे'-वरच होणार, असंच विधिलिखित होतं !... अन् चांदीच्या तुतारीच्या त्या नित्याच्या विधीनुसार 'ग्रेल'च्या पुनरुत्थानाचं शिंग फुंकलं जाणार होतं !

सारा उन्हाळा अशा अद्‌भुत परिकथांनी मंतरलेल्या वातावरणात निवाला... सरते दिवस सामोरे आले...हाईनरिख् तोड व्याख्यानांच्या दौऱ्यावर निघून गेला...मी सुद्धा स्वतः जर्मनीच्या एका दौऱ्याची जुळवाजुळव केली...बेरूत

तर मी सोडलं. . . पण तिथे भिनलेलं एक प्रभावी विष माझ्या रक्तातून माझी संगत करत होतं!. . .धोक्याची सूचना देणाऱ्या भोंग्याचा पुकारा माझ्या कानां-मनानी ऐकला होता! जिवाला ओढ लावणारी ती व्यथा, पश्चात्तापाची ती बाधा. . .तो करुण त्याग. . .मृत्यूला साद घालणारा प्रीतीचा तो सनातन विषय . . .ह्या साऱ्यांनी माझ्या मनश्चक्षूंसमोर तरळणाऱ्या 'डोरिक' स्तंभांच्या त्या पारदर्शी प्रतिमा सदाकरता पुसून टाकल्या होत्या. . .सॉक्रेटिसच्या विचक्षण तत्त्वज्ञानाला ... शहाणपणाला आता इथे थारा नव्हता!

माझ्या दौऱ्यातला पहिला मुक्काम हायडेलबुर्गला होता. तिथे हाईनरिखला विद्यार्थ्यांपुढे भाषण करताना मी ऐकलं. . .कधी मृदू तर कधी स्पंदनशील आवाजांत तो त्यांच्यासमोर 'कला' या विषयावर निरूपण करत होता. . . व्याख्यानाच्या दरम्यान मधेच त्यानं माझं नाव घेतलं. . . 'एका अमेरिकन व्यक्तीनं युरोपपर्यंत पोहोचवलेल्या' एका अभिनव कलासौंदर्याचं तो विद्यार्थ्यांच्या-समोर वर्णन करायला लागला! त्याच्या तोंडची ती स्तुती ऐकून माझ्या अंगाला आनंदानं नि अभिमानानं एक प्रकारचा कंप सुटला. . .त्या रात्री त्या विद्यार्थ्यांच्या-समोर मी नृत्य केलं. . .अन त्यांनी तर माझी रस्त्यांतून मोठी मिरवणूक काढली. . . या सगळ्या धामधुमीतून परत भानावर आले, तेव्हा तोडबरोबर होटेलच्या पायऱ्यांवर मी उभी होते. . .त्याच्या यशाची चव त्याच्यासमवेत चाखत! — हायडेलबुर्गच्या साऱ्या युवकवर्गाचं माझ्याप्रमाणेच त्याच्यावर नितान्त प्रेम होतं. त्यांना त्यांच्याबद्दल आदर होता. . .कौतुक होतं! प्रत्येक दुकानाच्या खिडकीत त्याचा फोटो होता, अन आत माझ्या 'द डान्स ऑफ द फ्यूचर' या छोट्या पुस्तकाच्या अगणित प्रती होत्या. . .आमची नावं जिकडेतिकडे सतत जोडीनं उच्चारली जात होती. . .

तोडच्या पत्नीनं माझ्याप्रीत्यर्थ एक स्वागतसमारंभ घडवून आणला . . . ती बाई फार प्रेमळ वगैरे होती, हे जरी खरं असलं, तरी हाईनरिख् ज्या उच्च स्तरावरचं जीवन जगत होता, तिथे तिचे हात कधीच पोहोचणार नव्हते हे खास! त्याच्या आत्म्याशी संवाद साधायच्या दृष्टीनं ती फारच व्यवहारी वाटली मला . . .खरं सांगायचं म्हणजे आयुष्याच्या शेवटीशेवटी तो तिला सोडून एका व्हायोलिनवादिकेकडे गेलाच – ती एक 'पाईड पायपर' ची स्त्रीरूप आवृत्तीच म्हणायची! – अन् तिच्याच बरोबर 'गार्द झे' मध्ये एका बंगल्यात राहिला!..

तोडबाईंचा एक डोळा पिंगट–तपकिरी अन् एक राखी रंगाचा होता. त्यामुळे चेहऱ्यावरून ती सतत अस्वस्थ अस्वस्थ वाटायची. पुढे एकदा एका गाजलेल्या खटल्यात तिच्या संदर्भात एक घरगुती प्रश्नही उकरून काढला गेला होता . . . ती खरोखर रिचर्ड वाग्नरची मुलगी होती, की फॉन बुलोव्हची, याबद्दल! ते

काही का असेना, माझ्याशी ती फारच प्रेमानं वागायची ... अन् समजा, तिला माझा मत्सर वाटत असला, तर निदान वरवर तरी तिनं तसं कधी दाखवलं नाही.

बाकी तोडच्या हेवा करू जाणं, हा चिनी छळवणुकीला आपणहून सामोरं जाण्यापैकीच प्रकार झाला असता !... कारण प्रत्येकजणच त्याच्या भजनी असायचं... बायका काय नि किशोरवयांतली मुलं काय ! कोणत्याही समारंभात किंवा मेळाव्यात तो चुंबकीय क्षेत्राचा मध्यच ठरायचा ! ... मला वाटतं, 'मत्सर' या शब्दात कोणकोणत्या भावनांचा समावेश होतो, असा प्रश्न विचारणं इथे मनोरंजक ठरावं !

हाईनरिखच्या संगतीत मी कितीतरी रात्री घालवल्या होत्या. . .पण आमच्यामध्ये लैंगिक संबंध असे काहीच नव्हते; मात्र त्याच्या सहवासात माझं सारं अस्तित्व इतकं संवेदनाक्षम नि स्पर्शकातर झालेलं होतं, की त्याचा ओझरता स्पर्श, किंवा कधी कधी एकदा दृष्टिक्षेप देखिल मला अतीव सुखाचा नि प्रेमोद्रेकाचा तीव्र अनुभव द्यायला पुरेसा ठरे ! खऱ्याखुऱ्या सुखानुभवाचा स्वप्नातल्या सुखसंवेदनेशी जो संबंध असतो, त्यातलाच हा प्रकार ! हे प्रकरण खरं इतकं अनैसर्गिक होतं, की त्यामुळेच ते तसंच टिकणं अशक्य आहे, यांत शंका नव्हती. . .! अखेर माझी तहानभूकही लोपण्यापर्यन्त पाळी आली. . . अन् एकतऱ्हेच्या इतक्या विलक्षण बेभान विमनस्कपणाची सावट माझ्या व्यक्तिमत्त्वावर पडली, की माझं नृत्य जास्त जास्तच तरलविरल व्हायला लागलं !

या दौऱ्यावर असताना माझी काळजी घ्यायला – माझं दुखलंखुपलं पहायला–एका आयाखेरीज आणखी कुणीच नव्हतं; त्यामुळे मी अशा अवस्थेला येऊन पोहोचले, की रात्री एकसारखा मला हाईनरिख हाक मारतो आहे, साद घालतो आहे असा भास व्हायला लागला. . .! अन दुसऱ्या दिवशी त्याचं पत्र नक्की येणार, हे ठरल्यासारखंच झालं... माझा कृशपणा पाहून लोकांना त्याबद्दल काळजी वाटायला लागली; माझ्या अकारण ओसपाटलेल्या चेहऱ्याबद्दल नाना तऱ्हेच्या शंकाकुशंका यायला लागल्या सर्वांच्या मनात ! जेवणखाण नाही, झोप नाही... रात्रभर बहुधा मी जागीच असायची... माझं शरीर जणू हजारो भुताराक्षसांनी पछाडलं होतं... माझे चपळ, कणकणलेले हात माझ्या अंगावरून फिरत राहायचे... माझ्या त्या यातना कमी व्हाव्यात, निदान त्यांना एकादी सुटकेची वाट सापडावी, म्हणून धडपडायचे...इकडे माझ्या मनापुढून हाईनरिखचे डोळे काही केल्या हलत नव्हते... त्याचा आवाज कानांतून विरत नव्हता ! अशा रात्रीतून एकेकदा मी उठायची ती निराशेच्या यातना अनुभवतच ! मग भल्या पहाटेची दोन वाजतानाची गाडी पकडून मी जर्मनीचा अर्धा भाग पार करून जायची ! कशाकरता ? तर तोडच्या सहवासात एकादा तरी तास घालवायला मिळावा म्हणून...की पुन्हा एकटीनं दौऱ्यावर परतताना अधिकच

व्यथित व्हायला ? कुणास ठाऊक ! बेरूतमध्ये असताना ज्या पारलौकिक आनंदातिशयाचं स्फुरण त्यानं माझ्या जिवात निर्माण केलं होतं, त्याची जागा हळूहळू दुर्दम्य वासनावेगानं आलेल्या वैतागानं घेतली होती !

माझ्या अशा या संकटसूचक अवस्थेचा शेवट माझ्या संयोजकानं केला . . . कारण त्यानं मुळी माझ्यासाठी रशियाचा दौराच जमवून आणला ! बर्लिनहून सेंट पीटसबर्ग म्हणजे सारा दोन दिवसांचा रस्ता होता; पण सरहद्द पार केल्याच्या क्षणापासूनच वाटायला लागलं, की आपलं पाऊल एका अगदी अजिबात वेगळ्याच जगात पडलं आहे. . . तिथपासून पुढचा परिसर, भली मोठी हिमाच्छादित सपाटी आणि भरदार जंगलं, यांच्यात हळूहळू मिसळून गेला. . . ते थंडगार, चकाकतं चमकतं हिम . . . अन् केवढी तरी दूरवर झालेली त्याची पखरण... ह्या सगळ्यांमुळे माझं भडकलेलं माथं निवायला लागल्यासारखं वाटलं...

हाईनरिख् . . . हाईनरिख् ! . . . तो तिथे हाईडेलबुर्गला परतला होता . . . सुंदर, सुस्वरूप विद्यार्थ्यांना मायकेल ॲन्जेलोच्या ' नाईट'चं नि त्या अद्‌भुत ' मदर ऑफ गॉड 'चं रहस्य समजावून देत होता . . . आणि इथे मी त्याच्यापासून दूर दूर जात होते . . . साकळलेल्या हिमानं आच्छादलेल्या खिडक्यातून अंधुक प्रकाशकिरण सांडणाऱ्या, गरीबगुरीब खेड्यांनी अधूनमधून उसवलेल्या त्या थंडगार अफाट धावत्याकडे मी धाव घेतली होती . . . अजूनही त्याची . . . हाईनरिख्ची साद मला ऐकायला येत होती . . . पण आता काहीशी अस्पष्ट ! . . . शेवटी व्हीनसबर्गची मोहक गुंजनं, कुंद्रीचं विव्हळणं, आणि ॲम्फोरटास्ची मर्मभेदक किंकाळी, हे सारं थिजून त्याचं एकच एक आरस्पानी हिमवर्तुळ होऊन गेलं ! . . . फक्त एक हिमवर्तुळ !

त्या दिवशी त्या शयनयानांत मला एक स्वप्न पडलं . . . मी अनावृत अवस्थेत खिडकीतून बाहेर उडी घेतली होती . . . हिमाच्या ढिगाऱ्यात . . . अन त्याच थंडगार बर्फाच्या बाहूंनी घातलेल्या मिठीत घुसळत, लोळत, मी थिजून गेले होते . . . डॉ. फ्राईडनं या स्वप्नाचा अर्थ काय लावला असता ?

# १७

सकाळी सकाळी वर्तमानपत्र हातात पडावं, आणि ज्यांना आदल्या दिवशी मृत्यूचा विचार चुकूनसुद्धा शिवलेला नसतो,—अशी वीस-पंचवीस माणसं—आग-गाडीच्या अपघातात दगावल्याची बातमी वाचावी...किंवा एखादं गावच्या गाव पाण्याच्या प्रलयकारी लाटेनं किंवा प्रचंड पूर येऊन उद्‌ध्वस्त झाल्याची वार्ता कळावी...असं झालं की कुणी धाताविधाता किंवा साऱ्या जीवनाचं संचलन करणारी कुणी पाठराखी शक्ती—यांचं जगातलं अस्तित्व मान्य करणं अशक्यच वाटतं की नाही ?...आपल्यासारख्या क्षुद्र जिवांची पाठराखण करणारं देखिल कुणी आहे, अशी कल्पना करून घेण्याएवढा अहंकार तरी कशाला बाळगावा मग आपण फुकट ?

...तरी पण माझ्या आयुष्यात अशा अघटित घटना घडलेल्या आहेत, की ज्यामुळे जीवनाच्या पूर्वनियोजित आखणीत माझाही कधीकधी विश्वास बसतो. उदाहरणार्थ हेच पहा...पीटर्सबर्गला ठरल्याप्रमाणे दुपारी चार वाजता पोहोच-णारी ती गाडी, हिमाचे ढीग वाऱ्याने सुसाट फेकले जाण्यानं वारंवार थांबत होती; आणि त्यामुळे जवळजवळ बारा तास उशिरा, दुसऱ्या दिवशी पहाटे चार वाजता ती पीटर्सबर्गला पोहोचली ! स्टेशनवर मला भेटायला कुणीच आलं नव्हतं...आगगाडीतून मी उतरले, तर तपमान म्हणजे शून्याच्या खाली दहा अंशापर्यंत गेलेलं...अशी थंडी कधीच अनुभवली नव्हती मी...तिथले गिरद्यांचे कपडे घातलेले रशियन गाडीवान् आपल्या शिराधमन्यांतलं रक्ताभिसरण थांबू नये, म्हणून हातमोज्यांत दडलेल्या मुठींनी आपले दंड ठोकत होते !

मी माझ्या आयाला सामानाजवळ बसवलं—अन् एका घोड्याची बग्गी ठरवून

त्या गाडीवानाला 'होटेल युरोपा'चा पत्ता दिला...त्या अंधाऱ्या पहाटेला मी ही अशी एकटीच होटेलकडे निघालेली.. एवढ्यातच, एडगर ॲलन पो च्या कल्पना-सृष्टीत अगदी चपखल बसू शकेल, असं एक भयंकर दृश्य माझ्या नजरेला पडलं.

...दुरून एक लांबच लांब मिरवणूक चाललेली मला दिसली...काळ्या कपड्यांमुळे अंधारल्यासारखी अन् शोकमग्न! मिरवणुकीतली माणसं त्यांच्या डोक्यांवरच्या, खांद्यांवरच्या शवपेट्यांच्या वजनाखाली भारावून वाकलेली होती ...एक नाही दोन नाही एका पाठोपाठ एक चाललेली अशी कितीतरी! गाडी-वानानं धावत्या घोड्याचा लगाम खेचून गाडी सावकाश न्यायला सुरुवात केली, अन् वाकून हातानं छातीवर क्रूसाचा आकार दाखवला...त्या धूसर पहाटेच्या वेळी मी आपली नुसती भयग्रस्त होऊन ते दृश्य न्याहाळत राहिले...मग क्षणभरानं तो काय प्रकार होता, याची गाडीवानाजवळ चौकशी करण्याचं मला सुचलं...मला रशियन बिलकूलच येत नव्हतं...तरीपण गाडीवानाकडून त्या प्रकरणाचा बहुतेक उलगडा झाला...आदला दिवस होता पाच जानेवारी एकोणिसशे पाचचा तो दुर्दिन! विंटर पॅलेससमोर त्या दिवशी तिथे जमलेल्या एकजात साऱ्या कामगारांना गोळ्या घालून ठार करण्यात आलं होतं...का? तर आपल्या बायकामुलांना पोटभर भाकरी मिळावी, म्हणून झारकडे ते सारे मदत मागायला आले होते... असहाय्य आणि निःशस्त्र अवस्थेत...मी गाडीवानाला थांबायला सांगितलं ... ती, संपता न संपणारी मिरवणूक माझ्या अंगावरून पुढे निघून जाईपर्यंत, माझ्या डोळ्यांतून भरभरून वाहणाऱ्या आसवांचं माझ्या गालांवर थिजून बर्फ झालं होतं!... त्या साऱ्या मृतांना इतक्या पहाटेच मूठमाती देण्याचं कारण ?... कारण उघड होतं...दिवस उगवल्यानंतर ह्याच मिरवणुकीवरून आणखी बंड माजलं असतं! ते दृश्य मुळी दिवसाउजेडातल्या जागत्या शहरासाठी नव्हतंच! ...माझ्या अश्रूंनी माझा गळा रुद्ध होऊन गेला...आपल्या हुतात्म्यांची शरीरं वाहून नेणाऱ्या त्या गरीब बिचाऱ्या कामगारांचं दुःख पाहता पाहता माझ्या मनात त्वेषाचा असीम डोंब उसळला...गाडी जर यदृच्छेनं बारा तास उशिरा आली नसती, तर हे दृश्य मला दिसलंच नसतं!...

अंधारी शोकमग्न रात्र...उषेच्या चाहुलीचा मागमूस नसलेली ...
ठेचकळल्या दीन आकृत्यांची एक उदास मिरवणूक!
पछाडलेले गळते डोळे, अन् कामात रखडलेले गरीब हात...
ओबडधोबड!
त्या दीनवाण्या काळ्या शालीतील श्वासांची घुसमट...
मृतांची सोबत करणारे हुंदके, उसासे नि उमासे...
अन् दोन्ही बाजूच्या रखवालदारांची उसनी ताठ चाल!

...तें दृश्य मी पाहिलं नसतं, तर माझ्या जीवनाचा सारा बाट बदलला असता...त्या अनादि-अनंत भासणाऱ्या मिरवणुकीसमोर, त्या शोकांतिकेच्या साक्षीनं मी स्वतःला जनसेवेलाच वाहून घेण्याची शपथ घेतली...माझ्या साऱ्या शक्ती उपेक्षितांच्या साहाय्यार्थच वेचण्याचा मी निर्धार केला. खरंच, माझ्या व्यक्तिगत आकांक्षा, प्रीती–भोगेच्छा, अन् व्यथा-वेदना,–या नव्या जाणिवेमुळे, तुलनेनं किती क्षुल्लक नि निरर्थक वाटायला लागल्या! एवढंच नव्हे, तर या कार्याला हातभार लावणार नसेल, तर माझी कलासुद्धा निष्फळ, निरुपयोगीच म्हणायची, असं मला वाटलं!...एकदाचे मिरवणुकीतले शेवटले शेवटले हताश जीवही डोळ्यांसमोरून पुढे गेले...माझ्या डोळ्यांतून पाणी गळताना पाहून गाडीवानाला किंचित आश्चर्य वाटलं असावं...त्यानं पुन्हा एकदा छातीवर क्रूसाची खूण केली अन् एक संथ निःश्वास सोडून हॉटेलचा रस्ता धरला.

मी 'हॉटेल युरोपा'त जिना चढून वर माझ्या राजेशाही दालनाकडे गेले, ती सरळ तिथल्या स्तब्धमूक पलंगातच शिरले...रडता रडता कधी तरी मग माझी मला झोप लागली...! पण त्या पहाटे माझ्या काळजात उमललेली ती करुणा, ती हताश चीड मात्र जागी झाली, ती नेहमीकरताच...ती माझ्या इथून पुढल्या आयुष्यात रुजली...फळलीसुद्धा...!

होटेलमधली माझी खोली कमालीची प्रशस्त होती...छत तर चांगलंच उंचावर होतं खोलीचं; पण खिडक्या मात्र कायमच्याच बंद केलेल्या...त्या कधीच उघडायच्या नाहीत–हवा यायची ती उंचावरच्या भिंतीतल्या गवाक्षातूनच...मी खूप उशिरा उठले...उठल्या उठल्या माझा व्यवस्थापक फुलं वगैरे घेऊन हजर झाला...पाहता पाहता सबंध खोली फुलांनी भरून गेली...!

पुढे दोनच दिवसांनी सेंट पीटर्सबर्गच्या अगदी निवडक प्रतिष्ठित समाजासमोर 'साल दे नोब्ल'मध्ये रंगमंचावर माझं पदार्पण झालं...कल्पना करा...मी...एक तरुण मुलगी...कोळ्याच्या जाळ्यासारखं झिरझिरीत ट्यूनिक्, हा माझा नृत्याचा पोशाख...पाठीमागे एक साधा आकाशनिळा पडदा, हे नेपथ्य...आणि साथीला शोपांचं संगीत...शोपांच्या आत्म्याची मला झालेली जाणीव, माझ्या कलात्म आविष्कारांतून प्रकट करणारी अशी मी...अन् प्रेक्षकसमुदाय म्हणाल, तर अलिशान साजसज्जा आणि नेपथ्य, या पार्श्वभूमीवर मोठ्या दिमाखानं सादर केल्या जाणाऱ्या भपकेबाज 'बॅले' नृत्याचा प्रेमी! अशा प्रस्थापित रसिकवर्गाला, माझं रंगावतरण किती विचित्र नि अनपेक्षित वाटलं असेल?...तरी पण माझ्या अगदी पहिल्या नृत्यालासुद्धा टाळ्यांचं वादळ फुटलं!
...शोपांच्या 'प्रेल्यूड्स'मधल्या (–उपोद्घातातल्या) विषण्ण स्वरांनी आर्त अन् व्यथित झालेला; 'पोलोनेज'च्या गर्जनेबरोबर स्फुरणांनी दाटलेला, बंड करून

उठलेला;—पहाटेच्या त्या हुतात्म्यांच्या अंत्ययात्रेच्या आठवणींमुळे, सात्त्विक संतापानं आसवं गाळणारा माझा नृत्यात्मा...ह्या नृत्यात्म्यानं त्या गर्भश्रीमंत, उच्चभ्रू आणि लाडावलेल्या प्रेक्षकांकडून दिलदार दाद मिळविली !...आहे की नाही गंमत ?

दुसऱ्याच दिवशी माझ्या भेटीला एक अत्यंत आकर्षक, सुबक-ठेंगणी स्त्री आली...सेबलच्या लोकरीचं केसाळ वस्त्रप्रावरण...हिऱ्यांची लोंबती कर्णभूषणं... गळ्यांत मोत्यांच्या माळा...आपण 'क्रिन्स्की' आहोत असं सांगून तिनं मला गारच केलं ! ...क्रिन्स्की...ती थोर नर्तकी ! रशियन बॅलेच्यातर्फे माझं स्वागत करायला, आणि ऑपेरामधल्या त्या रात्री होणाऱ्या एका विशेष कार्यक्रमाचं आमन्त्रण मला द्यायला ती आली होती. बैरूतला असताना तिथल्या बॅलेच्या लोकांचा माझा अनुभव अगदी वेगळा होता...उपेक्षा अन् वैर...बस ! माझी पावलं सोलली जावीत, म्हणून माझ्या सतरंजीवर चुका पसरवून ठेवण्यापर्यंत मजल गेली होती बैरूतला !...त्यामुळे पीटर्सबर्गच्या या वेगळ्या अनुभवाचं मला आश्चर्य वाटलं, तसंच त्यानं समाधान देखिल झालं... !

त्या दिवशी संध्याकाळी मला ऑपेराला न्यायला एक शानदार घोडागाडी आली...गाडी आतून महाग फ़रनं पुरी मढवून उबदार केलेली होती...तिथे रंग-मंदिरातही पहिल्या श्रेणीच्या बॉक्समध्ये माझी बसण्याची व्यवस्था होती...फुलं, बॉनबॉन चॉकोलेटस् , अन् पीटर्सबर्गच्या उच्च समाजातल्या तीन सुंदर तरुणी— यांनी तो बॉक्स सुसज्ज होता ! मी आपलं माझं तेच पांढरं ट्यूनिक्, अन् ग्रीक सॅन्डल्स घातले होते !... तिथल्या त्या साऱ्या बरंदाज अन् श्रीमन्त मेळाव्यात मी किती विचित्र दिसले असेन !

बॅले नृत्याशी माझं वैर आहे, हे कबूल करायलाच हवं...बॅले म्हणजे मी एक नकली, खोटी-अन् अनुचित...निषिद्ध कला समजते...नव्हे बॅलेला कोणत्याही तऱ्हेच्या कलेच्या परिसराबाहेरचीच-उपरीच म्हणते मी ! पण क्रिन्स्कीची एखाद्या यक्षकिन्नरीसारखी आकृती रंगमंचावर,— माणसापेक्षा एखाद्या सुंदर पक्ष्यासारखी किंवा फुलपाखरासारखीच खरी म्हणजे-थिरकत वावरत असताना टाळ्या वाजवून तिला दाद न देणं अशक्यच होतं !

मध्यंतरात आजूबाजूला पाहिलं, अन् जगातल्या सुंदरतम अशा रमणी माझ्या दृष्टीला पडल्या...माणिकमोती जडवलेले, खोलवर वेतलेल्या गळ्याचे अपूर्व झगे—गाऊन्स त्यांच्या अंगावर झळकत होते...अन् सन्मान्य गणवेषातले पुरुष त्यांची संगतसोबत करत होते...आदल्याच दिवशी पहाटे पाहिलेल्या त्या शवयात्रेच्या पार्श्वभूमीवर विरोधानं उठून दिसणारा हा वैभवशाली मीनाबाजार, म्हणजे माझ्या समजेपलीकडचीच बाब होती ! ह्या साऱ्या हसऱ्या दैववंतांच्या

मेळाव्याचं त्या दुसऱ्या मेळ्याशी काय नातं होतं ? काही नातं होतं का ?

कार्यक्रमानंतर क्शिन्स्कीच्या राजेशाही वाड्यात मला सपरला (झोपण्यापूर्वीच्या अल्पोपाहारासाठी) बोलावलं होतं...तिथे ग्रॅन्ड ड्यूक मायकेलशी माझी गाठ पडली. सर्वसामान्य लोकांच्या मुलांसाठी एक नृत्यशाळा काढण्याच्या माझ्या कल्पनेचं स्पष्टीकरण मी करत असताना, ग्रँड ड्यूक किंचित आश्चर्यानं ऐकत होता सारं माझं बोलणं...मी अन् माझ्या सुसाट कल्पना म्हणजे तिथल्या सगळ्यांना एक गौडबंगालच वाटलं असावं...पण तरीसुद्धा त्यांनी मला फारच अगत्यानं वागवलं, आणि अगदी सढळ हातानं माझं आतिथ्य केलं...

काही दिवसांनंतर सौन्दर्यवती 'पावूलोव्हा' देखिल मला भेटायला आली ...अन् तिचं 'जीझेल' हे अप्रतिम बॅले पाहण्यासाठी पुन्हा एकदा बॉक्स-मधली जागा माझ्यासाठी राखून ठेवण्यात आली.

मगाशी म्हटलं, त्याप्रमाणे कलेच्या दृष्टीनं, तसंच माणसाच्या भावनिक प्रति-क्रियांच्या दृष्टीनं बॅले नृत्यामधली हालचाल अगदी विरुद्ध, नव्हे उलटच होती, असंच माझं मत होतं...तरीपण, त्या रात्री रंगमंचावरुन तरलपणे थिरकणाऱ्या पावूलोव्हाची ती उत्कृष्ट प्रतिमा पाहून, तिलाही क्शिन्स्कीप्रमाणेच मनापासून दाद दिल्याशिवाय मला रहावलंच नाही !

सपर पावूलोव्हाकडे होतं...पावूलोव्हाचा बंगला क्शिन्स्कीच्या राजेशाही निवासाएवढा भव्य नसूनही तितकाच सुंदर होता...'बाक्स्ट्' आणि 'बेनुवा' या दोन चित्रकारांच्या मध्ये मी बसले होते...तिथेच 'सेर्झ द्यागिलेव्ह' मला पहिल्यांदा भेटला—मग माझ्या नृत्यकलेबद्दलच्या कल्पनेवर (जी बॅले शैलीच्या अगदी विरुद्ध होती,)—आणि दृष्टिकोणावर आमची दोघांची खूप जिव्हाळ्याची चर्चा झाली.

त्याच रात्री चित्रकार बाक्स्ट यानं माझं एक छोटंसं रेखाचित्र काढलं होतं. माझा चेहरा अगदी भयंकर गंभीर...अन् केसांच्या कुरळ्या बटा अगदी भाव-विवशपणे जणू एका बाजूला रुळलेल्या... ! हे चित्र आता बाक्स्टच्या पुस्तकांत छापलेलं आहे... गंमत म्हणजे 'भविष्य' वगैरे वर्तवण्याची थोडी फार कला अंगात असलेल्या बाक्स्टनं त्या दिवशी माझा हात पाहिला...त्याला माझ्या हातावर दोन फुल्या दिसल्या...अन् तो म्हणाला, "तुझं भविष्य खूप उज्ज्वल आहे...तुला अमाप वैभव मिळेल.. पण तुझ्या सर्वांत प्रेमातल्या दोन प्रिय व्यक्तींना मात्र तू अंतरशील !" त्या वेळीं ते बोलणं ऐकून मी कोड्यात पडले होते....

...जेवणानंतर ती अथक पावूलोव्हा पुन्हा एकदा नाचली...तिच्या मित्र-मंडळींना तिनं अगदी खुष करून सोडलं...तिचा निरोप घेऊन आम्ही निघालो,

तेव्हा पहाटेचे पाच वाजले होते; तरी पावूलोव्हानं सकाळीं साडेआठ वाजता तिचा रियाज पाहायला म्हणून मला बोलावलं ! तीन तासांनंतर तिथे पुन्हा गेले, तेव्हा मला फारच थकल्यासारखं झालं होतं...अन् ती ? पावूलोव्हा ? ती तिच्या रेशमी जाळीदार कापडाच्या वेषात तिथल्या आडव्या बारशी भल्याच कठीण नि मेहनतीच्या व्यायामांची उजळणी-रियाज करत होती ! एका म्हाताऱ्या गृहस्थानं व्हायोलिनवर लय धरली होती; अन् अधूनमधून, जास्त नेट लावण्या-साठी पावूलोव्हाला तो रागवतसुद्धा होता...हाच तो प्रसिद्ध नृत्याचार्य 'पतीपा!'

पावूलोव्हाच्या त्या अतर्क्य कसरती पाहात मी तीन तास बसले होते ! माझ्या मनाचा गोंधळ उडून एक प्रकारचा ताण निर्माण झाला होता ...पावूलोव्हाचं शरीर पोलादाचं, अधिक लवचिक इलॅस्टिकचं घडलेलं असावं असा भास होत होता !...तिचा सुंदर चेहरा एखाद्या हुतात्म्याप्रमाणे उग्र रेषांनी झाकोळून गेला होता...एका क्षणाचादेखिल विसावा ती घेत नव्हती...माझ्या मनात आलं, ह्या शिक्षणपद्धतीचं आणि सरावाचं ध्येय एकच...शरीराच्या त्या कसरतवजा हालचालींपासून मनाचा नैसर्गिक संबंध पूर्णपणे तोडून टाकणं...मन अन् शरीर यांना वेगळं काढणं...! या वेगळं काढलेल्या मनाचा, स्नायूंच्या त्या कष्टकारक शिस्तवारीमुळे उलट छळच होत असतो, हें कोणी लक्षातच घेत नाही ! हे तत्त्व माझ्या नृत्यशाळेच्या कल्पनेतल्या मूळ सिद्धान्ताच्या अगदी पूर्णपणे विरुद्ध होतं; कारण...आत्म्याचं, नि मनाचं निर्वेध दर्शन घडवण्याचं, शरीर हे एक पारदर्शी माध्यम बनावं, हा तर माझ्या नृत्यतंत्राचा रोख होता !

...बारा वाजायला आले, तशी दुपारच्या जेवणाची तयारी सुरू झाली... पण टेबलाशी बसलेली पावूलोव्हा पांढरीफटक पडलेली दिसत होती...तिनं जेवणाला किंवा मद्याला...कशालाच मुळीं बोट लावलं नाही...अन् मला तर सपाटून भूक लागलेली ! 'पाजार्स्की' कटलेटसुवर मी आपला चांगलाच हात मारला...पावूलोव्हानं मग मला माझ्या होटेलवर सोडलं, आणि पुढे ती तिच्या त्या रॉयल थिएटरमध्ये अखंड चालणाऱ्या तालमींना हजर राहायला निघून गेली !...होटेलमध्ये गेल्यागेल्या मी माझ्या बिछान्यावर अंग टाकलं, अन् लगेच अगदी गाढ झोपून गेले, इतकी मी थकले होते !.. मनातल्या मनात मी माझ्या जन्मग्रहांना धन्यवादसुद्धा दिले...बॅले-नर्तकी होण्याच्या दैवदुर्विलासापासून मला वाचवल्याबद्दल !

पुन्हा दुसऱ्या दिवशीही मी अगदी कुणी कधी न ऐकलेल्या वेळीं—म्हणजे आठ वाजता— उठले ! कारण 'इम्पीरिअल बॅले' च्या नृत्यशाळेला मला भेट द्यायची होती...तिथे सगळे छोटे छोटे विद्यार्थी रांगेनं उभे राहून त्या अघोरी व्यायामांच्या दिव्यातून जात होते ! नसत्या अपराधाची चौकशी करायला गुन्हेगारांना

( विनाकारण– अन् ) निष्ठुरपणे उभं करावं, तशी आपल्या पायाच्या बोटांच्या अग्रांवर अंग तोलून तासन् तास उभी राहिलेली ती मुलं दिसत होती ! ती मोठी मोकळी नृत्यदालनं म्हणजे छळणुकीसाठी तयार केलेलं बंदीवरच होतं जणू ! तिथे ना कसलं सौन्दर्य... ना स्फूर्ती देणारी काही वस्तू !...भिंतीवर झारचं एकच एक भलं मोठं चित्र...भिंतीचा अखंड एकसुरीपणा किंचित मोडायला... बस् ! माझी तर पुरी खात्रीच झाली, की, ' इंपीरियल बॅले ' नृत्यशाळा म्हणजे निसर्गाशी नि कलेशी जाणूनबुजून पुकारलेलं मूर्तिमंत वैर आहे !

पीटर्सबर्गमध्ये एक आठवडाभर राहिल्यानंतर मी मॉस्कोला गेले. सुरुवातीला इथला प्रेक्षकसमुदाय सेंट पीटर्सबर्गच्या प्रेक्षकांच्या इतका उत्सुक अन् उत्साही वाटला नाही...पण पुढचं सारं मी स्टॅनिस्लावस्कीच्या– त्या थोर कलावंताच्या शब्दांतच सांगते ...

" या सुमाराला, म्हणजे एकोणिसशे आठ ते नऊच्या दरम्यान– मला नक्की तारीखवार सांगता येणार नाही,– दोन मोठ्या प्रतिभावान कलावंतांशी माझी गाठ पडली. दोघांनीही माझ्यावर जबरदस्त छाप पाडली होती...त्यांपैकी एक इझाडोरा डंकन, आणि दुसरा ' गॉर्डन क्रेग ' ! इझाडोरा डंकनच्या कार्यक्रमाला मी गेलो ते योगायोगानं...कारण त्या वेळेपर्यंत तिचं नाव माझ्या कानावर आलं नव्हतं; आणि तिच्या मॉस्कोतल्या आगमनाची बातमी फडकवणाऱ्या जाहिरातीही माझ्या वाचण्यात आल्या नव्हत्या...तेव्हा तिथे जमलेल्या त्या काहीशा छोट्या प्रेक्षकवृंदात, ' मॅमॉन्तोव्ह ' आदीकरून मोठमोठे चित्रकार, शिल्पकार वगैरे एवढ्या प्रचंड प्रमाणात उपस्थित असलेले पाहून मला फारच आश्चर्य वाटलं... बॅले कलावंतही बऱ्याच संख्येनं होते तिथे...शिवाय नेहमीचे शुभारंभप्रयोगाचे शौकिन, आणि रंगभूमीवर काहीही चाकोरीबाहेरचं घडणार म्हटलं, की अहम-हमिकेनं उपस्थित राहणारे कलाप्रेमी...वगैरे लोकांचीही गर्दी होतीच !

" प्रथमदर्शनी डंकनचा काही विशेष प्रभाव पडला नाही. जवळजवळ संपूर्ण नग्न, असं शरीर रंगमंचावर पाहायचा अजिबात सराव नसलेल्या माझ्या दृष्टीला त्या नृत्यातली कलात्मकता मुळी भावलीच नाही, तिचा उमजच पडला नाही ! डंकनच्या पहिल्या नृत्याचं स्वागत अगदी सुमार टाळ्यांनी आणि शिट्ट्या मारण्याच्या काहीशा बुजऱ्या प्रयत्नांनी साजरं झालं ! त्यानंतरच्या दोन-तीन नृत्यांनंतर मात्र ( –त्यांतलं एक तर विशेषच आकर्षक होतं !– ) मला राहवेना ...इकडे सर्वसामान्य प्रेक्षकांच्या नापसंतीच्या आरोळ्या वगैरे चालू असतानाच मी तिला उघड मोठ्यानं टाळ्या वाजवून दाद द्यायला सुरुवात केली !

" मध्यन्तर झालं–तोपर्यंत तर मनानं मी या महान कलावतीचं शिष्यत्वच पत्करलं होतं...अन् त्याच भावनेनं तिचं कौतुक करायला मी धावत पळत फूट-

लाईटस्पाशी गेलो. आनंदाची गोष्ट अशी, की माझ्याच शेजारी मॅमॉन्तोव्हदेखिल माझ्यासारखाच टाळ्या वाजवून दाद देताना मला आढळला...अन् त्याच्या पलीकडे एक प्रसिद्ध चित्रकार, एक शिल्पकार आणि एक लेखक हीही सारी मंडळी होती ! मॉस्कोतल्या ह्या नट, लेखक चित्रकारादी प्रतिष्ठित कलावंतांना इझाडोराला टाळ्या देताना जेव्हा सर्वसाधारण प्रेक्षकांनी पाहिलं, तेव्हा त्यांचा गोंधळच उडाला... एकाएकी सारे चीत्कार–फूत्कार थांबले...साऱ्याच प्रेक्षकांना मग आपणही टाळ्या वाजवू शकतो, याची जणू आठवण झाली...अन् मग सगळीकडूनच कडकडाट सुरू झाला टाळ्यांचा ! पुन्हा पुन्हा पडदा वर न्यायला सांगून इझाडोराला रंगमंचावर आणवावं लागलं...अन् कार्यक्रमाच्या अगदी शेवटी तर टाळ्यांचा कहरच झाला !

"त्यानंतर डंकनच्या कार्यक्रमांच्यापैकी एकही मी चुकवला नाही. तिचं नृत्य पाहायला जाण्याची ही गरज–आतूनच, माझ्यातल्या कलात्मकतेच्या आदेशानुसार जणू निर्माण झालेली होती...डंकनच्या कलेशी ह्या माझ्यातल्या कलात्मकतेची कसली आंतरिक जवळीक होती,...कसलं विशेष नातं होतं, कोण जाणे !...पुढे डंकनच्या कार्यपद्धतीची थोडीशी जाण आल्यानंतर, आणि तिचा प्रिय मित्र क्रेग याच्याही कल्पनांचा मागोवा घेतल्यानंतर एक गोष्ट माझ्या ध्यानात आली. जगाच्या निरनिराळ्या कानाकोपऱ्यांतून, का, कोणत्या परिस्थितीमुळे किंवा कारणांमुळे, कोणास ठाऊक, पण वेगवेगळे कलावंत, कलानिर्मितीच्या व्यापाराच्या निसर्गसिद्ध तत्त्वांचा मागोवा घेत घेत आपल्या धारणेनुसार आपले अडाखे मांडत असतात, अन् आमोरासमोर येतात, तेव्हा परस्परांच्या कल्पनांतलं साधर्म्य पाहून चकित होऊन जातात !–मी वर्णन करतोय् त्या भेटीच्या वेळी बरोबर असंच घडलं ! एकमेकांशी एकाही शब्दाची देवघेव करायच्या पूर्वीच मनात आमचं संधान जुळून गेलं होतं !...डंकन मॉस्कोला पहिल्यांदा आली, तेव्हा तिची माझी ओळख व्हायची संधीच आली नाही; पण तिच्या मॉस्कोच्या दुसऱ्या भेटीच्या वेळेला मात्र ती आमच्या थिएटरमध्येच आली...आणि मग मी मोठ्या सन्मानपूर्वक तिचं स्वागत केलं...हा स्वागताचा कार्यक्रम माझ्या एकट्यापुरता, व्यक्तिगत राहिलाच नाही; कारण आमच्या सबंध रंगमंडळींनी त्यात भाग घेतला...एक 'कलावती' या नात्यानं सारेच जण तिला आता ओळखत होते...अन् साऱ्यांना ती आवडायची पण !

"डंकनला स्वतःच्या कलेबद्दल सुसंगतपणे किंवा तर्कसंगत कसं बोलावं ते बिलकूल कळत नाही ! तिच्या डोक्यात कल्पना येतात, त्या अगदी कर्मधर्मसंयोगानं... योगायोगानं !...अन् त्यासुद्धा रोजच्या व्यवहारातल्या अगदी अवचित घटनांतून ! ...उदाहरणार्थ, तिला कुणी जेव्हा विचारलं, की तू नृत्य कुणाकडून शिकलीस ?

तेव्हा ती म्हणाली,

" 'टर्पसिकोरीकडून ! तसा तर माझ्या नृत्याचा ओनामा, मी माझ्या या दोन पायांवर उभी राहायला शिकल्याच्या क्षणीच झाला ! अन् जीवनभर मी नाचतच आले की !...माणसानं, मानव जातीनं...नव्हे साऱ्या विश्वानं—नाचलं पाहिजे ...नाचायलाच पाहिजे...असंच होतं पूर्वी ...हेच सनातन आहे...आणि हेच शाश्वत राहणार आहे! या निसर्गनियमाला अधेमधे करून माणसं बाध आणतात...त्याचा विघात करतात...अन् निसर्गानं निर्माण केलेली ही गरज, ही प्रेरणा मुळी समजूनच घेत नाहीत...बस्...'ए वाल्ला तू !' ' आपलं बोलणं संपवता संपवता तिनं आपल्या खास फ्रेंच अमेरिकन ढंगानं शेवटचा उद्गार काढला...

"दुसऱ्या एका प्रसंगी, तिचा कार्यक्रम नुकताच संपला होता, अन् कार्यक्रमाच्या मध्यंतरात वगैरे रंगपटात भेटायला येऊन तिच्या पुढच्या तयारीत व्यत्यय आणणाऱ्या लोकांबद्दल ती बोलत होती...'मला असं नाचताच येत नाही. रंगमंचावर जाण्यापूर्वी मला माझ्या आत्म्याच्या ठायी एका जित्याजागत्या यन्त्रणेची स्थापना करावी लागते...ती स्फुरण पावली म्हणजे माझे हातपाय, माझं शरीर, आपोआपच माझ्या इच्छाशक्तीच्या प्रेरणेशिवाय देखिल हलायला डोलायला लागतं; पण ती यंत्रणा जीवाच्या कुपीत ठेवायला अवसरच मिळाला नाही, तर मात्र सारं संपलं !...मी नाचू शकतच नाही'.

"त्या वेळी मी सुद्धा, नटानं रंगमंचावर जाण्याआधी, अंतरात्म्यात जिची स्थापना करायला शिकायला हवं, अशा या कळीच्याच, यन्त्रणेच्याच शोधात होतो... प्रश्न विचारून विचारून डंकनला मी सतावलं, हे उघडच होतं !...तिच्या कार्यक्रमाच्या वेळी अन् तालमीत सुद्धा अनेकदा मी तिला अगदी लक्षपूर्वक न्याहळत असे...भावजागृतीमुळे आधी तिच्या चेहऱ्यात फरक पडायचा...अन् मग तेजाळत्या नजरेनं-आपल्या अंतर्यामी, सत्त्वातून आकाराला येणाऱ्या भावविश्वाचं दर्शन घडवायला ती सिद्ध व्हायची !...डंकनशी योगायोगानं कलेबाबत चर्चा व्हायची...तेव्हा मनातल्या मनात तिच्या न् माझ्या कल्पनांची आणि कार्याची तुलना करताना मला आढळून आलं, की आम्ही दोघं वेगवेगळ्या कलामाध्यमातून, पण एकाच वस्तूच्या शोधात होतो ! आमच्या कलाविषयक वादविवादातून डंकनच्या बोलण्यात गॉर्डन क्रेगचा उल्लेख वारंवार यायचा... तिच्या मते तत्कालीन रंगभूमीच्या संदर्भात क्रेग हा एक सर्वश्रेष्ठ नि प्रतिभावान कलाकार होता...

"ती म्हणायची, 'तो काही एकटा त्याच्या देशाचा नाही.. साऱ्या जगाशी नातं आहे त्याचं...जिथे त्याच्या प्रतिभेच्या फुलत्या आविष्काराला सर्वोत्तम

संधी मिळेल, जिथे त्याच्या कल्पनेनुसार काम करायला सुविधा लाभेल अन् उत्साह वाटेल असं वातावरण असेल, तिथेच त्यानं राहिलं पाहिजे...खरं म्हटलं तर तुमचं हे कलामंदिरच त्याच्या योग्य असं स्थान आहे...!'

"मला माहीत आहे की तिनं क्रेगला माझ्याबद्दल, आणि आमच्या कलापीठाबद्दल खूपच लिहून कळवलं होतं, अन् रशियाला येण्यासाठी ती त्याचं मन वळवत होती. माझ्याकडून मीही आमच्या रंगपीठाशी संबंधित असलेल्या अधिकारी व्यक्तींची आर्जवं करत होतो—त्या श्रेष्ठ कलादिग्दर्शकाला इथे बोलावण्यासाठी...त्याच्या आगमनानं आम्हाला पुढे पुढे सरायला नवा उत्साह लाभेल, असं वाटत होतं...आत्ताच कुठे प्रथापरंपरांचे बंद दरवाजे फोडून आम्ही बाहेर पाऊल टाकत होतो...त्याच वेळी क्रेगच्या येण्यानं या सुक्या सुक्या कणकेत थोडं मोहन पडलं असतं!...या बाबतीत माझ्या सहकाऱ्यांचं पुरं श्रेय त्यांच्या पदरात टाकायला हवं...खऱ्या, सच्च्या कलावंतांप्रमाणे त्यांनी या प्रश्नाचा विचार केला, आणि आपल्या कलेच्या प्रगतीखातर बऱ्याच मोठ्या रकमेनं पैसा खर्च करण्याचा निर्णय घेतला"...इ....

बॅलेचा माझ्या मनानं जेवढा धसका घेतला, तेवढंच उलट स्टॅनिस्लाव्हस्कीच्या रंगपीठानं माझ्या उत्साहाला उधाण आणलं! माझा स्वतःचा कार्यक्रम नसला, की मी त्या रात्री हटकून तिथे जायची...आणि तो सारा नटसंच माझं अगदी जिव्हाळ्यानं स्वागत करायचा. स्टॅनिस्लावस्की मला अनेकदा भेटायला यायचा ...त्याला वाटायचं, की सतत प्रश्न, चर्चा नि वादसंवाद यांच्या मंथनातून, माझ्या नृत्याचं रूपांतर त्याला एका नव्या निश्चित शैलीत करता येईल.. आणि ती शैली तिथे त्याच्या रंगपीठात आकाराला येऊ शकेल...मी म्हटलं, हे सारं घडू शकेल, पण अगदी लहान मुलांच्या पासून सुरुवात केली तरच...पुन्हा मी मॉस्कोला गेले, तेव्हा– ( माझा सल्ला बाजूला सारून ! )– त्याच्या संचातल्या काही सुंदर तरुण मुली तो प्रयोग करताना मी पाहिल्या...तो प्रकार अगदी निराशाजनक होता !

स्टॅनिस्लावस्की त्याच्या रंगपीठात तालमी घेण्यात पुरा दिवसभर इतका व्यग्र असे, की कार्यक्रमानंतरच मला पुष्कळदा भेटायला यायचा त्याचा प्रघात पडला होता...त्या वेळच्या चर्चा वगैरेबाबत तो आपल्या पुस्तकात म्हणतो, "डंकनला प्रश्न विचारून विचारून मी अगदी बेजार केलं असावं..." छे ! तसं कधीच्च झालं नाही...अन् शिवाय माझ्या कल्पनांचं संक्रमण करायला मीदेखिल उतावीळ झालेली होतेच ना !

उलट तोडबद्दलच्या पारलौकिक ओढीनं–प्रेमानं निर्माण झालेलं माझं विकतच्चं निष्फळ दुखणं, तिथल्या हिमाकुल हवेनं, रशियन अन्नानं, आणि विशेषतः

'काव्हिआर 'नं (माशाच्या अंड्यांचा एक जिन्नस ) कुठच्या कुठे पळून गेलं होतं...आणि एखाद्या समर्थ व्यक्तिमत्त्वाला सामोरं जाण्यासाठी माझं सारं अस्तित्व भुकेजलं होतं...स्टॅनिस्लावस्कीला पाहताना अशाच एका व्यक्तिमत्त्वाचा मला त्याच्या ठायी साक्षात्कार झाला !

एक दिवस रात्री मी त्याच्याकडे नुसती पाहात होते...त्याची ती सुंदर सुडौल शरीरयष्टी, रुंद खांदे, कपाळाबाजूच्या उंचवट्यांशी किंचित पांढुरके झालेले, पण एरवी काळेभोर केस...सारं बघता बघता माझ्यातलं कोणीतरी एकदम बंड करून उठलं...दरवेळेला पुन्हापुन्हा ती 'एगेरिया 'ची भूमिका मला बिलकूल करायची नव्हती !...तो अगदी जायला निघाला, तेव्हा त्याच्या खांद्यावर हात ठेवून मी त्याच्या भरदार मानेभोवती मिठी घातली... अन् त्याचं माथं खाली ओढून त्याच्या मुखाचं चुंबन घेतलं...त्यानं माझ्या चुंबनाला हळुवार प्रतिसाद दिला खरा... पण त्याच्या चेहऱ्यावर अगदी कमालीचं आश्चर्य तरळत होतं...जणू काही असलं काही घडेल, अशी स्वप्नात देखिल त्यानं अपेक्षा केली नव्हती ! एवढ्यात पुन्हा मी त्याला आणखी जवळ घ्यायचा प्रयत्न करताक्षणी दचकून तो मागे सरला, अन् थक्क झाल्यासारख्या स्वरात म्हणतो, "पण मग आपण त्या मुलाचं काय करायचं ?"..."मूल ? कुणाचं मूल ?"...मी विचारलं... "कुणाचं म्हणजे ? आपलंच मूल ! आपण त्या मुलाची काय व्यवस्था करणार ? असं बघ,..." त्यानं पुढे अगदी गंभीरपणे बोलणं सुरू केलं, "...माझ्या कोणत्याही मुलाचं संवर्धन, माझ्या नजरेसमोर अन् माझ्याच विचारांनुसार झालं नाही तर मला अजिबात चालणार नाही ! अन् सध्याच्या माझ्या कुटुंबात हे जमणं कठीणच आहे..."

त्याचा तो त्या मुलासंबंधीचा, कमालीचा गंभीरपणे केलेला विचार माझ्या विनोदबुद्धीला अगदी न झेपणाराच ठरला ! मला अगदी खळखळून हसू फुटलं. त्यावर किंचित दुखावल्या चेहऱ्यानं त्यानं माझ्याकडे एकटक पाहिलं, अन् मग मला तसंच सोडून हॉटेलच्या त्या कॉरिडॉरमधून तो झपाझप निघून गेला !... त्या रात्रभर मला अधूनमधून हास्याचा उकळ्या फुटतच होत्या...पण तरीसुद्धा, म्हणजे हसू येत असूनसुद्धा मनातल्या मनात हताश वाटत होतं– अन् चीडही आली होती !...काही अगदी सुसंस्कृत लोकसुद्धा– अत्यंत कुशाग्र बुद्धीच्या व्यक्तींशी बैठक–गाठभेट वगैरे झाल्यावर, एकदम झाडविस्तारा आवरून 'हिरव्या माड्या ' का चढतात, त्याचा अंदाज मला वाटतं, मला त्या दिवशी आला ! पण मी पडले बाईमाणूस ! त्या वाटेला जाणं मला थोडंच शक्य होतं ? तेव्हा मी आपली 'ही कूस ती कूस ' करत तळमळत सारी रात्र काढली ! सकाळी उठल्या उठल्या सरळ एका रशियन सार्वजनिक स्नानगृहाचा रस्ता धरला....तिथे मग—

गरम वाफ, आणि थंड पाणी यांच्या आलटून–पालटून होणाऱ्या माऱ्यानं माझी शरीरयंत्रणा पुन्हा नीट रुळावर आली !

...अशी वावटळ मनात दडलेली होती, तरीसुद्धा क्शिन्स्कीच्या निवासात मला भेटले होते, त्या तऱ्हेच्या तरुण लोकांचा (त्यांच्या तोंडून बाहेर पडलेल्या पहिल्या चार-दोन शब्दांतच) मला उबग यायचा...त्यांच्यापैकी बहुतेक सगळ्यांनी खरं म्हणजे माझ्यावर प्रेम करायला मिळण्यासाठी जीव टाकला असता !...पण माझं काही विचित्रच...माझ्या मनातली वासना त्या तरुणांना पाहून जी बुजली, ती माझ्या इच्छाशक्तीच्या मुळाशी आपली गोगलगायीसारखी दडून थिजून बसली...! यालाच मला वाटतं ‘बुद्धिजीवी’ (सेरेब्रल) असं म्हणत असावेत ! चार्लस् हाले आणि हाईनरिख् तोड–सारख्यांचा स्फूर्तिप्रद आणि सुसंस्कृत सहवास लाभल्यानंतर या नटव्या तरुणांची संगत सहन करणं कसं शक्य होतं मला !

...नंतर खूप वर्षांनी स्टॅनिस्लावस्कीची ती गोष्ट मी त्याच्या पत्नीला सांगितली ...तिला इतकं हसू आलं...हसता हसताच ती उद्‌गारली, “घडलं ते अगदी त्याला शोभेसंच...आयुष्याकडे पाहण्याची त्याची दृष्टी एकंदरच इतकी गंभीर आहे, की काही विचारू नकोस !...”

...मी किती जरी चढाई केली, तरी एखाददुसऱ्या गोडशा चुंबनापलीकडे मला काहीही मिळायचं नाही...उलट एक प्रकारचा निःसंग अन् ठाम प्रतिकारच माझ्या वाट्याला यायचा ! स्टॅनिस्लावस्कीनं रंगमंदिरातल्या कार्यक्रमानंतर माझ्या खोलीवर यायचा धोका मुळी पुन्हा पत्करलाच नाही...पण एक दिवस बर्फात चालणाऱ्या उघड्या ‘स्ले’ गाडीतून शहराबाहेरच्या एका रेस्तराँमध्ये नेऊन त्यानं मला खूप केलं ! एका खोलीत खाजगीत आम्ही जेवलो...व्होडका आणि शँपेन प्यायलो...कलेबद्दल खूप खूप बोलल्लो . तेव्हा मात्र माझी खात्रीच झाली की, स्टॅनिस्लावस्कीच्या नीतिमत्तेचा बालेकिल्ला सर करायला प्रत्यक्ष ‘सर्स’नंच अवतार घ्यायला हवा...येरागबाळाचं ते कामच नव्हे !

रंगभूमीच्या क्षेत्रात तरुण मुलींनी पाऊल टाकण्यामध्ये त्यांना किती भयंकर धोका पत्करावा लागतो, वगैरे वगैरे सारं मी नेहमीच ऐकत आले होते...पण माझ्या आतापर्यंतच्या व्यावसायिक जीवनाकडे पाहिलं, तर इथे सारा उलटाच प्रकार होता, असंच माझ्या वाचकांना वाटेल ! माझ्या भगतगणांच्या मनात, माझ्यामुळे माझ्या न कळत जी अति आदराची भावना निर्माण होत होती, त्याचंच तर मला सर्वांत जास्त दुःख होत होतं ! !

मॉस्कोनंतर ‘कीयेव्ह’ला मी एक धावती भेट दिली, तेव्हा विद्यार्थ्यांच्या झुंडीच्या झुंडी रंगमंदिरासमोरच्या सार्वजनिक चौकात गोळा झाल्या होत्या... त्यांनी मला घेरलं, आणि त्यांना कार्यक्रम पाहता येईल, अशा ठिकाणी कार्यक्रम

देण्याचं अभिवचन माझ्याकडून घेतल्यावरच त्यांनी मला पुढे जाऊ दिलं... साहजिकच होतं... कारण माझ्या कार्यक्रमाच्या तिकिटांचे दर त्यांच्या कक्षेच्या फार पलीकडे होते !... मी थिएटरमधून कार्यक्रमानंतर बाहेर पडले, तेव्हाही त्यांची व्यवस्थापकांच्या विरुद्ध निदर्शनं चालूच होती. मग मी स्लेमध्ये उठून उभं राहून त्यांच्याशी थोडा वेळ बोलले... म्हटलं, "माझी कला रशियातल्या बुद्धिमान युवकवर्गाला स्फूर्तिप्रद वाटली, तर मला त्याचा फार अभिमान वाटेल.. मला अतिशय आनंद होईल त्यामुळे ! कारण रशियातल्यासारखा, आदर्शाची बूज राखणारा आणि कलेची कदर करणारा युवकवर्ग जगात इतर कुठेही आढळत नाही !"

बर्लिनमधले कार्यक्रम आधीच घेऊन ठेवलेले असल्यानं रशियाला दिलेली ही पहिली भेट मला आवरती घ्यावी लागली... पण बर्लिनला परत जाण्याआधीच मी वसंतात पुन्हा रशियाला येण्याचा करार केला होता... माझी ही भेट चुटपुटती होती, तरीही माझा प्रभाव चांगलाच पडला होता... माझ्या नृत्यकलेच्या आदर्शाच्या बाजूनं आणि विरुद्धही खूपच वादंग माजलं होतं... बॅलेचं आत्यंतिक प्रेम असलेल्या एका व्यक्तीत आणि एका डंकनभक्तात द्वन्द्वयुद्धसुद्धा झालं म्हणे... याच काळात रशियन बॅलेनं शोपां आणि शूमन यांच्या संगीताचा वापर सुरू केला, आणि ग्रीक वेषभूषाही उपयोगात आणली... काही काही बॅले नर्तकांनी तर त्यांचे 'शूज' आणि लांब पायमोजे यांना चाट देण्यापर्यंतची मजलदेखिल मारली ! !

# १८

मी बर्लिनला परतले, ती माझ्या नृत्यशाळेच्या स्थापनेचं ध्येय, मुळीच विलंब न लावता तत्काळ प्रत्यक्षात आणण्याचा निर्धार करूनच...कितीतरी दिवस मी ते स्वप्न नुसतं उराशी बाळगून होते! माझा हा बेत मी आईच्या नि एलिझबेथच्याही कानावर घातला...त्यांचाही उत्साह माझ्या बरोबरीनं होता या बाबतीत...एखादी गोष्ट करायचीच असं एकदा मनानं घेतलं, की ज्या घाईनं घेटून आम्ही तिच्यामागं लागत होतो,...त्याच घाईनं आमच्या शाळेसाठी एखादा बंगला शोधायच्या खटपटीला आम्ही लगेच लागलो...एका आठवड्याच्या आतच असा एक 'व्हिला' आम्हाला मिळालासुद्धा...ग्र्यूनवाल्द ('हिरवं जंगल') मध्ये 'त्राउडेन' रस्त्यावर अगदी नुकताच बांधून कामकऱ्यांच्या हातून मालकाकडे आलेला हा बंगला आम्ही विकत घेऊन टाकला!

आमचं वागणं आपलं 'ग्रिम्स फेअरी टेल्स' (ग्रिमच्या परिकथा) मध्ये शोभेलसं असे!...'वेर्तहाइमेर'मध्ये जाऊन आम्ही चाळीस छोट्या कॉट्स विकत घेऊन आलो...प्रत्येक कॉटवरचं पांढऱ्या शुभ्र मलमलीचं झुलीझालरीचं आवरण निळ्या फितींनी मागे सारून बांधून ठेवलेलं! आमच्या त्या बंगल्याचं एका स्वर्गीय बालभवनात रूपांतर करायलाच आम्ही निघालो होतो...मधल्या मुख्य हॉलमध्ये आम्ही शूर ॲमेझॉनची प्रतिकृती उभारली होती...ही आकृती मानवी आकृतिमानाच्या दुप्पट परिमाणामध्ये होती. मोठ्या नृत्यदालनात 'लुका देला रॉबिया'चे बास–रिलीफ्स आणि 'डॉनॅटेलो'ची नाचणारी मुलं... झोपण्याच्या खोलीत–'मॅडोना ॲण्ड चाईल्ड' (मॅडोना आणि येशू ख्रिस्त)... तेही निळ्या अन् पांढऱ्या रंगात...अन् नक्षीदार थरांनी घडवलेल्या त्यांच्या त्या

फळांच्या माळा...लुका देला रॉबियाचंच तेंही कलाकौशल्य !

ते 'बासरिलीफ्स '–अगदी लहानात लहान वयातल्या मुलांच्या शिल्पाकृती,–पुस्तकातली आणि एरवीची चित्रं,–असे बाल्याचे वेगवेगळे आदर्श आविष्कार यांची माझ्या नृत्यशाळेत योजना करण्यापाठीमागे कारण होतं एक...निरनिराळ्या कालखंडातल्या चित्रकारांनी अन् शिल्पकारांनी प्राकृतिक बाल्याची पाहिलेली सार्वकालिक स्वप्नं या कलाविष्कारात साकार झालेली होती ! ग्रीक फुलदाण्यांवर रंगवलेली नाचरी मुलं...'तानाग्रा' आणि 'बिओशिया' पासून घेतलेल्या चिमुकल्या चित्राकृती ... डॉनॅटेलोचा नाचऱ्या मुलांचा मेळावा...त्यात तर बाल्यातल्या प्रसन्न संगीताचा दरवळ कणाकणातून दाटलेला दिसतो...'गेन्सबरह् 'च्या नाचऱ्या-बागडत्या मुलांचीही तीच कथा !

त्या सगळ्या आकृतींतल्या आणि त्यांच्या हालचालींतल्या सर्वसाधारण निर्हेतुक नि नैसर्गिक लालित्यानं त्या अनेकविध कलाविष्कारांतसुद्धा एक तऱ्हेचा बंधुभाव– एक तऱ्हेचं नातं आहेसं वाटत होतं...जणू काही वेगवेगळ्या वयांची ती मुलं इथे आपआपसात भेटत होती; अन् शतकानुशतकांचे अडसर ओलांडून त्या पलीकडच्या मुलांशी स्नेहभरानं हातमिळवणी करत होती...वाटत होतं, की माझ्या शाळेतली खरीखुरी मुलं आपल्याच प्रतिकृतींच्या अवतीभोवती नाचता-बागडता त्यांच्याच आदर्शानं वाढतील – त्यांच्यासारखी होतील...या मुलांच्या जीवनात...चेहऱ्यामोहऱ्यात, वावरण्यात नकळतच त्या आविष्कारांचं प्रतिबिंब उमटेल...त्यांच्या आनंदाचा थोडा तरी वाटा, नि त्या बालसुलभ लालित्याची थोडी तरी जाण यांच्या वाट्याला येईल...! ' सुंदर मी होणार ' या प्रतिज्ञेच्या सोपानाची ही पहिली पायरी असेल...' नवनृत्या 'च्या दिशेनं उचललेलं हे पहिलं पाऊल असेल !

माझ्या शाळेत मी ' स्पार्टा 'च्या त्या नाचणाऱ्या, धावणाऱ्या उड्या मारणाऱ्या किशोरींच्या आकृतींचीही योजना केली होती...ह्या किशोरींना व्यायाम-शाळांतून म्हणे भलते अवघड व्यायाम शिकविले जायचे–, पुढे त्यांनी शूर योद्ध्यांना जन्म देणाऱ्या समर्थ माता बनावं म्हणून ! वार्षिक पारितोषिकं मिळविणाऱ्या त्या चपळचरणा,...ढळत्या शेमल्यांच्या आणि उडत्या प्रावरणांच्या मातीच्या अप्रतिम प्रतिमा, पॅनाथेन्सच्या तिथे हातात हात अडकवून नाचणाऱ्या छोकऱ्या...पुढे काय साधायला हवं, त्याचे हे आदर्श होते...माझ्या शाळेतले विद्यार्थी त्या चित्राकृतींवर हळूहळू जिव्हाळ्यानं प्रेम करायला शिकतील... त्यांच्याकडे पाहतापाहता त्यांच्या सारखेच घडतील...ह्या सुसंवादाचं रहस्य त्यांच्या अंतःकरणात हळूहळू उलगडायला लागेल...कारण सौन्दर्याचा लाभ व्हायला, प्रथम सौन्दर्यप्राप्तीच्या इच्छेला सजग करावं लागतं, अशीच माझ्या

उत्साही मनाची धारणा होती !

...कलेतला सुसंवाद साधायचा असेल, तर काही विशिष्ट व्यायाम मुलांनी दररोज केले पाहिजेत, असं मला वाटत होतं...मात्र याच्या मुळाशी अशी कल्पना होती, की या व्यायामांचा, मुलांच्या स्वाभाविक मूळ प्रवृत्तीशी–, नैसर्गिक इच्छा-ऊर्मीशी मेळ बसला पाहिजे...म्हणजेच मुलं आनंदानं अन् उत्सुकतेनं ही साधना करतील...यातला प्रत्येक व्यायाम हे अंतिम ' साध्य ' गाठायचं एक ' साधन 'च केवळ नव्हतं, तर ' साध्य 'च होतं...ध्येय होतं...आयुष्यातला प्रत्येक दिवस पूर्ण नि स्वानंदी बनवण्याचं ' ध्येय ' !

कोणत्याही तऱ्हेच्या शारीरिक शिक्षणाला व्यायामांचा पाया हा असलाच पाहिजे...शरीराला भरपूर हवा नि प्रकाश मिळणं फार जरुरीचं असतं. शरीराच्या वाढीला पद्धतशीर वळण लावण्याची आवश्यकता असते. शरीरातल्या साऱ्या मूलभूत शक्ती, जाग्या करून शरीर संपूर्णपणे फुलवण्यासाठी, उमलवण्यासाठी जुंपल्या गेल्या पाहिजेत. व्यायामशिक्षकांनी साधायचं ते हे...यानंतरच पुढे नृत्याचा विचार सुरू होतो...धारणपोषणाच्या सुसंवादातून फुलारलेल्या, आणि पूर्णतया जागृत अशा अंतःशक्तींनी स्पंदणाऱ्या देहात मग नृत्याचा आत्मा अलगद प्रवेश करतो...व्यायामासाठीच व्यायाम करणाऱ्यांचं, शारीरिक हालचाल आणि शारीरज्ञान, हेच साध्य असतं ...पण नृत्याच्या संदर्भात ही केवळ साधनं आहेत; कारण इथे प्रथम शरीराला विसरायचं असतं...शरीर हे एक सुसंवादी, सुविहित, सुचलित यंत्र आहे...अन् व्यायामक्षेत्रातल्याप्रमाणे त्याच्या हालचालींना केवळ ' अंगाचं संचलन ', एवढाच संदर्भ नसून, मनातल्या विचारांचं अन् भावनांचं,–फार काय आत्म्याचंच दर्शन घडवण्याचं तं एक माध्यम असतं, हे लक्षात घ्यायला हवं !

मनुष्याच्या मनातली भावसंगती संक्रमणाच्या वेगवेगळ्या अवस्थांतून पार होऊन, शेवटी ज्या चेतन माध्यमातून सहज खेळवली जायची असते, तं माध्यम म्हणजे शरीर ! हे शरीर,–हे भाववाही माध्यम, त्याच्या विकासाच्या प्रत्येक टप्प्यातून उत्तरोत्तर निकोप, अन् निर्दोष कसं बनत जाईल, यावरच मी निवडलेल्या नित्याच्या व्यायामांचा भर होता.

सुरुवातीचे व्यायाम अगदी साधे होते...हालचालीत लवचिकपणा आणि जोर यावा, या दृष्टीनं स्नायूंची पूर्वतयारी करणं हे त्यांचं स्वरूप होतं...सर्वसामान्य शारीरिक शिक्षणातल्याप्रमाणे हे पहिलेपहिले व्यायाम झाले, की नंतर मग नृत्याचे प्राथमिक पदक्षेप शिकवायचे. हे पदक्षेप म्हणजे साधं लयदार चालणं, पावलं उचलून टाकणं...सहज सोप्या आरामशीर लयीला अनुसरणं...त्यानंतर तंच चालणं, किंवा पावलं उचलून टाकणं, जलद लयप्रकारात करणं,...प्रारंभिक हाल-

चालींच्या अशा सरावामुळे, साथीच्या संगीतातल्या सप्तकातल्या सगळ्या स्वरांच्या ओळखीबरोबरच माझ्या शिष्यवर्गाला चलनवलनाच्या एकंदर आवर्तनातल्या सुप्त्या परिमाणांचाही परिचय झाला...हालचालींतल्या प्रत्येक परिमाणाच्या या वेगळ्या जाणिवेमुळेच पुढे विविध बंदिशींच्या अंतर्गत संवादांची सूक्ष्मतम नि अनेकरंगी समज विद्यार्थ्यांना येते...तसं म्हटलं तर हे व्यायाम म्हणजे त्यांच्या अध्ययनाचा फक्त एक भाग होता...सगळी मुलं नेहमी सैलसर नि सुटसुटीत पेहेरावात असायची; अगदी खेळताना, मैदानावर आणि रानावनात हिंडताफिरताना सुद्धा...! बोलण्यातून, किंवा गाण्यातून आपलं मन जितकं मोकळं करता येतं, तितक्याच सहजपणानं, मुलांना उड्या मारताना, धावतापळताना, सगळ्या सगळ्या हालचालींच्यामधून भाव व्यक्त करण्याचं भान यावं-येईल अशी माझी कल्पना होती...

निसर्गातल्या हालचालींतूनच त्यांच्या अध्ययनाला चालना मिळणं आणि निरीक्षणशक्तीला आवाहन होणं आवश्यक होतं...कलाक्षेत्रातल्या कोणत्याही प्रस्थापिताशी नातं जोडायचा संकुचित प्रयत्न त्यांनी करायचा नव्हता...वाऱ्यानं झपाटलेल्या ढगाची चाल, डोलती झाडं, पक्ष्याची एकादी भरारी, क्षणाक्षणाला कूस बदलणारी चंचल पानं...या साऱ्या निसर्गदृश्यांना त्यांच्या दृष्टीनं एक विशेष संदर्भ असणार होता...त्यातल्या प्रत्येक हालचालीच्या विशिष्ट लकबीचं, जातीचं निरीक्षण करायला मुलांनी शिकायचं होतं...निसर्गाच्या पोटातलं प्रत्येक गूज, प्रत्येक रहस्य समजावून घेण्याची एक गुप्तसुप्त ओढ इतरांच्या नकळत त्यांच्या मनात निर्माण झाल्याची जाण त्यांना येणार होती...योग्य संस्कार घडल्यानं त्यांच्या लवचिक शरीराची अंगोपांगंच काय, अणुरेणूदेखिल निसर्गसंगीताला दाद देणार होते...निसर्गाच्या सुरात आपला सूर मिळवू शकणार होते ...

आमच्या शाळेत विद्यार्थ्यांची भरती करण्यासाठी आम्ही प्रमुख वृत्तपत्रांतून एक निवेदन प्रसिद्ध केलं— "कलेचे उपजत अंग असलेल्या गुणी मुलांना इझाडोरा डंकन यांच्या नृत्यशाळेत प्रवेश मिळेल...त्यांची पुरी जबाबदारी रीतसर घेतली जाईल...सामान्य जनतेला तिच्या बालगोपाळांसाठी ज्या कलेचे दान द्यायला डंकन सिद्धहस्त आहेत, त्या कलेतले त्यांचे शिष्यत्व पत्करावयास तयार असलेल्यांना नृत्यशाळेचे द्वार खुले आहे"...खरं म्हणजे आधी नीट विचारविनिमय केलेला नाही...अन् त्यांत हाताशी पुरेसं भांडवल नाही की एखादी कार्यतत्पर संघटना नाही! अशा परिस्थितीत ही नृत्यशाळा उघडायची म्हणजे एक कल्पनातीत धाडसच नव्हतं का? माझ्या मॅनेजरचं तर माथंच भडकून गेलं!...तो माझ्यासाठी एकसारखे जगभरचे नृत्यदौरे आखत होता...अन् मी एकसारखी त्यात 'खो' घालत होते!...पहिल्यांदा एक वर्ष तर मी ग्रीसमध्येच

बाळवलं— त्याला तर तो सरळ 'कालापव्यय'च म्हणाला!— अन् आता तर माझा व्यवसायच मी कायमचा बाजूला ठेवायला निघाले होते...कशाला? तर नसत्या एकजात निरुपयोगी मुलांची सारी जबाबदारी अंगावर घेऊन त्यांना नृत्याचं शिक्षण द्यायला!!... पण जे काही करायला जाऊ, त्या प्रत्येक बाबतीतल्या आमच्या नेहमीच्या शिरस्त्यानुसारच हाही कारभार होता...एकाएकी सुचलेला, अवेळ साधून केलेला, नि अतिशय अव्यवहारी! त्याला उपाय नव्हता!

इकडे कोपानोसहून येणाऱ्या रेमंडकडच्या बातम्यांचे रंग दिवसानुदिवस जास्त गंभीर होत होते! ती विहीर म्हणजे एक भलतंच खर्चाचं काम होऊन बसलं... तिला पाणी लागायचा संभव प्रत्येक आठवड्याला कमी कमीच होत होता... ॲगासेम्नॉनच्या राजवाड्याचा खर्च तर अशा भयंकर प्रमाणात वाढला, की शेवटी कुठेतरी थांबणं अन् खर्चाला नकार देणं मला भाग पडलं...! तेव्हापासून 'कोपानोस' म्हणजे त्या टेकडीवरचा एक सुंदर भग्नावशेष बनून राहिला आहे! बंडखोर ग्रीक क्रांतिकारकांनी तर वेळोवेळी किल्ल्यासारखा त्याचा उपयोग करून घेतला...आजही उभा आहे तो कोपानोस तिथे...भविष्याबद्दल आशा बाळगून... भविष्यकालीन आशेचं एक प्रतीक म्हणून!...

मी ठरवलं, की सबंध जगातल्या तरुण मुलांमुलींसाठी नृत्यसंस्था स्थापन करण्याकडेच माझ्या साऱ्या शक्ती, एकवटून ओतायच्या...त्या दृष्टीनं जर्मनीचीच मी माझी 'कर्मभूमी' म्हणून निवड केली...त्या वेळी तरी ते राष्ट्र म्हणजे मला तत्त्वज्ञान नि संस्कृती, यांचं केंद्रच वाटायचं...

आमच्या जाहीर निवेदनाला खूपच मुलांच्याकडून प्रतिसाद मिळाला...एक दिवस तर मला आठवतं, की दुपारच्या कार्यक्रमानंतर मी परत येते, तो माझा रस्ता पालकांनी अन् त्यांच्या मुलांनी गच्च रोखलेला! माझा जर्मन गाडीवान माझ्याकडे वळून म्हणतो, "एका वेडपट बाईनं म्हणे वर्तमानपत्रात जाहिरात दिलीय्...मुलं हवी आहेत म्हणून!.. लगेच! इथेच कुठेशी राहते म्हणे ती..."

त्याची ती वेडपट बाई म्हणजे दुसरीतिसरी कोणीच नाही—मीच! त्याला काय त्याची कल्पना!...अजूनही मला आठवत नाही की आम्ही मुलांची निवड नक्की कशी केली! 'ग्रूनेवाल्द' बंगला आणि तिथले ते चाळीस छोटे बिछाने भरायला मी इतकी अधीर झाले होते, की मुलांची काळजीपूर्वक चाचणी घ्यायच्या भानगडीत मी मुळी पडलेच नाही...कधीकधी कुणाचं गोड हसू, तर कुणाचे सुरेख डोळे...एवढंच आकर्षणदेखिल मुलांना ठेवून घ्यायला पुरेसं पडलं!... पुढे 'नर्तक' बनायच्या लायकीची सुलक्षणी मुलं ही होती की नाही, हा प्रश्नच मुळी मी स्वतःला विचारला नाही!

आता हेच उदाहरण पाहा ना! एक दिवस हॅम्बुर्गमध्ये एक उंच हॅट नि झोळदार फ्रॉक-कोट घातलेला एक मनुष्य शालीत लपेटलेलं एक गुंडाळं घेऊन होटेलमधल्या माझ्या दिवाणखान्यात आला. त्यानं हातातलं तें गुंडाळं टेबलावर ठेवलं...मी तें उघडायला गेले तर दोन टप्पोरे सावध डोळे आपले माझ्या डोळ्यांना भिडलेले!...वय अवघं चार वर्षांच्या आसपासचं...पण असं शांत अबोल मूल मी क्वचितच पाहिलं असेल! तिच्या तोंडून एखादा उद्‌गार, आवाज की शब्द, काही म्हणता काही नाही!...अन् इकडे तो गृहस्थ तर अगदी घाई-गर्दीत दिसला—त्यानं मला त्या "मुलीला ठेवून घेता का?" एवढं जेमतेम विचारलं, पण माझ्या उत्तरासाठी थांबायचा काही धीर निबत नव्हता त्याला! त्या छोट्या चेहऱ्यावरची माझी नजर त्याच्याकडे गेली, तसं त्या दोन्ही चेहऱ्या-मोहऱ्यांतलं, काहीसं सूचक असं साम्य मला जाणवलं...त्याबरोबरच त्याची ती लपवाछपवी नि जायची घाई, यांच्यात काहीतरी कार्यकारण संबंध असणार, हे माझ्या लक्षात आलं!...माझ्या जन्मजात अदूरदर्शी स्वभावाला अनुसरून मी तें मूल ठेवून घ्यायचं कबूल केलं मात्र...तो तिथून निसटला, अन् जो नाहीसा झाला, तो आपला कायमचाच!

एखादं बाहुलंच असल्यासारखं तें मूल माझ्यावर टाकून जायची ही अगदी कमाल रहस्यमय तऱ्हा म्हणायची! हॅम्बुर्गहून बर्लिनला परतताना गाडीत पाहते तर त्या मुलीला चांगलाच ताप भरलेला...टॉन्सिलायटिसची केस म्हणजे ती एक गंभीर बाब होती! पुढे 'ग्रूनेवाल्द'मधला तीन आठवड्यांचा काळ सगळा तिच्या-वतीनं मृत्यूशी झुंजण्यातच गेला आमचा! मदतीला दोन परिचारिका आणि तो उत्तमातला उत्तम डॉक्टर...'हॉफा'!...चांगलाच प्रसिद्ध शस्त्रवैद्य होता तो... पण माझ्या या नृत्यशाळेच्या कल्पनेत त्याला इतका रस वाटत होता, की सारी वैद्यकीय मदत तो मोठ्या उत्साहानं अन् विनामोबदलाच द्यायचा आम्हाला!

हॉफा अनेकदा मला म्हणायचा, "ही शाळा आहे थोडीच — हे हॉस्पिटल आहे हॉस्पिटल...! त्या सर्व मुलांच्या रक्तात आपआपले आनुवंशिक दोष आहेत...तेव्हा ते टाळून त्यांना नुसतं जिवंत ठेवण्यासाठीच तुला केवढी काळजी घ्यावी लागेल...नृत्य वगैरे शिकवण्यातले कष्ट नि काळजी तर त्यापुढेच!"

डॉ. हॉफा म्हणजे मानवजातीचा मोठ्यात मोठा पाठीराखा होता—हितचिंतक होता...प्रथितयश शस्त्रवैद्य असल्यानं त्याला त्याच्या धंद्यात अमाप पैसा मिळाला ...पण त्या महाशयांनी ही सारीच्या सारी दौलत, गरीब मुलांच्यासाठी स्वतःच्या खर्चानं चालवलेल्या आपल्या एका हॉस्पिटलवरून ओवाळून टाकली...! हे हॉस्पिटल बर्लिनच्या लगतच होतं. माझ्या शाळेच्या स्थापनेच्या अगदी सुरुवाती-पासूनच ह्या सद्‌गृहस्थानं—हॉफानं—डॉक्टर आणि सर्जन, ह्या दोन्ही नात्यांनी,—

मुलांच्या आरोग्याचं आणि सर्वसामान्य स्वच्छतेचं खातं स्वतःकडे घेतलं होतं !... एवढंच नव्हे, तर या मुलांच्या विकासात, आरोग्य नि अन्तर्गत सुसंवाद, यांचा जो सुंदर परिणाम झालेला दिसू लागला, तो डॉक्टर–महाशयांच्या परिश्रमाविना मी घडवून अणू शकलेच नसते...! हॉफाचा तो थोराड भरदार बांधा, त्याचं देखणेपण...लाललाल गाल अन् स्नेहाळ हसू पाहून माझ्याइतकाच मुलांचाही त्याच्यावर जीव जडला होता !

मुलांची निवड, शाळेचा इतर सारा व्यावहारिक कारभार, पहिल्या पहिल्या धड्यांची सुरुवात, अन् मुलांच्या पुऱ्या दिनक्रमाची आखणी अन् देखरेख, यातच आमचा सबंध वेळ जायचा...माझा मॅनेजर मला पुन्हा पुन्हा धोक्याच्या सूचना देत होता...कारण माझ्या नृत्यशैलीच्या नकलासुद्धा आता लोकप्रिय ठरून लंडनमध्ये आणि इतरत्र खोऱ्यानं पैसे ओढत होत्या...तरीपण मी काही बर्लिन-मधून हलायला तयार नव्हते...दररोज पाच ते सात वाजेपर्यंत मी बाळगोपाळांना नृत्य शिकवायची...

मुलांची प्रगती अगदी अकल्पनीय नि आश्चर्यकारक होती ! मला वाटतं त्यांच्या सुंदर तब्बेतीचं सारं श्रेय त्यांच्या शाकाहारी आहाराला होतं...अर्थात ही व्यवस्थाही डॉक्टर हॉफाच्या सल्ल्यानुसारच केली होती.. त्याच्या मते निदान मुलांच्या शिक्षणाच्या वयात तरी, त्यांच्या आहारात ताज्या भाज्या अन् भरपूर फळं असावीत, अन् मांसमच्छराला त्यात अजिबात फाटा द्यावा !

* * *

ह्या सुमाराला बर्लिनमध्ये, कुणाचा विश्वास बसणं कठीण, इतकी मी लोकप्रिय होते ! सारे मला 'गौत्लिश इझाडोरा'च (= दैवी, दिव्य इझाडोरा...) म्हणायचे ... आजारी माणसं माझ्या तिथे थिएटरमध्ये आली की बरी होतात, अशीही माझी ख्याती पसरली होती ! त्यामुळे दुपारच्या प्रत्येक कार्यक्रमाच्या वेळी आजारी माणसं वाहून आत थिएटरमध्ये आणल्याची विचित्र दृश्यं दिसायला लागली... ते छोटं पांढरं ट्यूनिक्, अनावृत पाय आणि सपाता, याशिवाय माझी तर काहीही रंगभूषा नसेच...अन् माझा प्रेक्षकवर्ग माझ्या कार्यक्रमांना यायचा तोही पूर्णपणे पारलौकिक आनंदाच्या प्राप्तीची खात्री बाळगूनच !

एका रात्री मी एका नृत्यकार्यक्रमाहून परत येत असताना विद्यार्थ्यांनी माझ्या गाडीचे घोडे सोडले, आणि त्या प्रसिद्ध 'जिगेस आले' (ॲले ऑफ् ट्रायम्फ = यशमार्ग) तून माझी गाडी ओढत नेली...अगदी मध्यावर आल्यावर, त्यांनी मला एक भाषण करायची विनंती केली– मी त्या बग्गीतच उभी राहिले... त्या वेळी मोटरी नव्हत्याच मुळी...विद्यार्थ्यांना उद्देशून मी म्हटलं,

"शिल्पकाराच्या कलेएवढी महान कला कोणतीही नाही हे तर खरंच; पण

मग कलाप्रेमी म्हणवणारे तुम्ही लोक,– तुमच्या शहराच्या भर मध्यवस्तीतलं हे भयंकर विडम्बन कसं सहन होतं तुम्हाला? पाहा– पाहा या पुतळ्यांच्याकडे– तुम्ही म्हणे कलाविषयाचे विद्यार्थी आहात!– पण खरोखर तुम्ही तसे असता, तर हातात दगड घेऊन आज तुम्ही हे पुतळे फोडले असते...कला? हं! हे पुतळे आणि कला? छेः! ह्या तर कैसरच्या प्रतिमा...कैसरची स्वप्नं!"

विद्यार्थ्यांचं माझ्याशी एकमत होतं. त्यांनी आरोळ्या ठोकून मला प्रतिसाद दिला...अन् त्या दिवशी तिथे पोलीस येऊन टपकले नसते, तर मला वाटतं, माझी इच्छा आम्ही सर्वांनी मिळून अमलात आणलीच असती...अन् बर्लिन-मधले ते भयंकर पुतळे नामशेष झाले असते!

११

एकोणीसशेपाच सालच्या एका रात्री मी बर्लिनमध्ये नाचत होते... तसं म्हणजे नाचत असताना माझं प्रेक्षकांकडे कधीच लक्ष नसतं... प्रेक्षकवर्ग मला परमेश्वरासारखाच वाटतो... मात्र हा परमेश्वर मानवजातीचंच प्रतिनिधित्व करणारा असतो...!...तर मी काय सांगत होते, की प्रेक्षकांकडे सामान्यपणे माझं लक्षच नसतं...पण त्या रात्री पहिल्या रांगेत बसलेल्या एका व्यक्तीचं अस्तित्व मला जाणवलं! मी त्या व्यक्तीकडे मुद्दाम पाहिलंही नव्हतं, किंवा मला ती व्यक्ती सहज दिसली, असंही काही नव्हतं...पण तरीही त्या अस्तित्वाची भौतिक जाणीव मला झाली हे मात्र नक्की!...अन् मग कार्यक्रम संपल्यानंतर माझ्या निवासात एक मूर्तिमंत देखणेपण अवतरलं!...पण...पण तो फारच रागावलेला होता.

"तुझं नृत्य अद्भुत आहे..." तो उद्गारला, "अप्रतिम आहे...पण माझ्या कल्पना तू का चोरल्यास? मी तयार केलेलं नेपथ्य तुला कुठून मिळालं?"

"काय म्हणता काय तुम्ही? हे निळे पडदे तर माझेच आहेत स्वतःचे... मी पाच वर्षांची असल्यापासूनच त्यांचा शोध मला लागला होता... अन् तेव्हापासून आजवर मी त्याच पडद्यांसमोर नाचत आलेय्!"

"नाही, नाही–त्रिवार नाही... हे माझं नेपथ्य आहे, या माझ्या कल्पना आहेत...पण त्यांच्यापुढे वावरणारी माझ्या कल्पनेतली व्यक्ती मात्र तूच आहेस...माझ्या साऱ्या स्वप्नांचा तू एक हलताडोलता साक्षात्कार आहेस...!"

" पण तुम्ही कोण ? "

अन् मग त्याच्या तोंडून ते गोड शब्द कानावर पडले माझ्या... " मी एलन टेरीचा मुलगा आहे ! "

एलन टेरी ! स्त्रीत्वाच्या आदर्शाची माझी कल्पना जिच्या ठायी साकार झाली होती, ती एलन टेरी...!

" अरे, मग तुम्ही आता घरी येऊन आमच्या बरोबर ' सपर ' घेतलं पाहिजे बरं का..." माझी आई निर्धास्तपणे म्हणाली !... " इझाडोराच्या कलेमध्ये तुम्हाला एवढा रस वाटतो, तर तुम्हाला आमच्याबरोबर ' सपर 'साठी आलंच पाहिजे घरी ! "

...आणि क्रेग घरी आला !

उत्साहोन्मादानं चाळवलेल्या मनःस्थितीतच होता तो ! कलेबद्दलच्या त्याच्या स्वतःच्या कल्पना अन् आशा-आकांक्षा, यासंबंधी बोलायला तो अगदी आतुर झालेला होता...

आणि मी सुद्धा अतिशय उत्सुक होतेच होते !...

...पण एकेक करता करता माझ्या आईसकट इतर सर्वांनाच झोप यायला लागली ... मग प्रत्येकजण एकेक कारण पुढे करून तिथून निसटले...अन शेवटी आम्ही दोघेच उरलो...इकडे क्रेग नाट्यकलेवर बोलतच होता ... अन् हातवाऱ्यांनी प्रात्यक्षिकही करून दाखवत होता.

मध्येच एकाएकी तो म्हणाला, " पण तू इथे काय करतेयस ? तुझ्यासारख्या थोर कलावतीनं ... या ... या असल्या कुटुंबात राहायचं म्हणजे ... छेः ! शुद्ध वेडेपणा आहे हा ... मी तुला पाहिलं प्रथम ... तुझा शोध मीच लावला ... खरं म्हणजे तू माझ्या नेपथ्याचाच एक भाग आहेस ! ... "

क्रेग उंच, सडसडीत, लवचिक होता...त्याच्या चेहऱ्याच्या ठेवणीत त्याच्या सुंदर आईच्या चेहऱ्याची आठवण होती. मात्र आईच्यापेक्षा नाकीडोळी तो जास्त नाजूक होता...एवढा उंच असूनही त्याच्या व्यक्तिमत्त्वात कुठेतरी थोडा बायकीपणा होता...विशेषतः त्याच्या भावुक, पातळ ओठांच्या जीवणीच्या तिथे ! एलन टेरीचा ' कुरळ्या कुरळ्या सोनेरी बटांचा छोकरा ' म्हणून त्याच्या लहानपणी साऱ्या लंडनच्या प्रेक्षकवर्गाला एवढा माहिती असलेला हा मुलगा...आता त्याचे बालपणीच्या छायाचित्रातले सोनेरी केस काहीसे गडद्ले होते ... अन् त्याचे डोळे – लांबचं दिसत नव्हतं, असली अधू दृष्टी असूनही चष्म्यापाठीमागे एक प्रकारे ' कठीण ', अन् ज्वलंत भासायचे !... मघा म्हटल्याप्रमाणे त्याच्या व्यक्तिमत्त्वात काहीसा नाजूकपणा होता ... किंवा कुठेतरी स्त्रीसदृश दुर्बलतेचा भास होता ... फक्त त्याचे पंजे रुंद बोटांमुळे आणि

'गोरिला 'छाप चौकोनी आंगठ्यांच्यामुळे समर्थ दिसायचे... पुष्कळदा गमतीनं तो आपल्या आंगठ्यांना 'खुनी आंगठे'च' म्हणायचा!... म्हणायचा, "तुझा गळा दाबायला एकदम योग्य!..."

त्या वेळीं तर क्रेगच्या सान्निध्यात मी भारल्यासारखीच झाले... माझ्या छोट्या शुभ्र ट्यूनिक्वर त्याला माझा झुलवजा केप चढवून दिला... माझा हात त्यानं हातात घेतला, आणि जिन्यावरून धावतच आम्ही रस्त्यावर गेलो — त्यानं टॅक्सी थांबवली, अन् आपल्या उत्तम जर्मन भाषेत म्हणाला, "मी आणि माझी पत्नी — आम्हाला पॉट्सदामला जायचंय्..."

बऱ्याचशा टॅक्सी ड्रायव्हर्सनी आम्हाला नकारच दिला... शेवटी एकदाची एक मिळाली... अन् आम्ही पॉटस्‌दामच्या रोखाने निघालो... तिथे पोहोचलो तेव्हा पहाट झाली होती... एका छोट्या हॉटेलचं दार नुकतंच उघडत होतं. तिथेच थांबून आम्ही कॉफी घेतली... अन् मग दिवस मध्यान्हाकडे सरकायला लागला, तसे आम्ही बर्लिनकडे परत निघालो...

नऊ वाजायच्या सुमाराला बर्लिनमध्ये येऊन पोहोचलो, तेव्हा मनात आलं 'आता पुढे काय?' — आईकडे परत जाणं तर आम्हाला शक्य नव्हतंच, तेव्हा मग 'एल्झी दे ब्र्यूगेर' नावाच्या एका पक्क्या बोहिमियन (— अनिर्बंध स्वतंत्र वृत्तीच्या) मैत्रिणीकडे गेलो!... तिनं मोठ्या हळुवारपणे आणि सहानुभूतीनं आमचं स्वागत केलं... 'स्क्रॅंबल्ड' अंडी अन् कॉफीचा सकाळचा नाश्ता दिला... तिच्या बेडरूममध्ये तिनं मला झोपायला देखिल दिलं... मी जी झोपले, ती संध्याकाळ होईतो मला जागच झाली नाही...

तिथून मग क्रेगनं मला त्याच्या स्टुडिओत नेलं. स्टुडिओ बर्लिनमधल्या एका उंच इमारतीत अगदी वर होता... जमीन काळी — मेणवलेली होती... त्यावर गुलाबाची पानं — अर्थात कृत्रिमच — सगळीकडे लावली होती...

माझ्या समोर तो उभा राहिला... झळाळतं तारुण्य, सौन्दर्य अन् प्रतिभा! एकाएकी मनात उद्भवलेल्या प्रेमभरानं माझा जीव पेटल्यासारखा झाला... दोन वर्षं सुप्तावस्थेत गेली होती... तरी माझ्यासारखीच्या स्वभावातली अपरिहार्य उत्कटता, उचंबळून बाहेर झेपावण्यासाठी केवळ अशाच एखाद्या ज्वालाग्राही क्षणाची वाट पाहात थांबलेली असते जणू!... मी आवेगानं त्याच्या बाहूत शिरले... इथे मला माझ्या मनस्वी व्यक्तिमत्त्वाच्या तोलाचा प्रतिसाद मिळाला होता!... माझ्यातल्या पार्थिवाशी जुळणारं पार्थिव... माझ्या रक्ताशी जुळणारं रक्त!... कित्येकदा तो आवेगानं म्हणायचा..., "आः! तू माझी बहीणच आहेस की काय, कुणास ठाऊक!"

...इतर स्त्रिया आपल्या प्रियकरांच्या आठवणी कशा ठेवतात, ह्याची मला

कल्पना नाही...मला वाटतं, पुरुषाचं डोकं, खांदे, हात वगैरे तेवढा मुख्य तपशील देऊन मग त्याच्या कपड्याबिपड्यांच्या वर्णनाकडे वळायचं, हा नेहमीचा संकेत असावा...पण माझ्या डोळ्यांसमोर मात्र 'तो' त्या पहिल्या रात्री स्टुडिओत दिसला होता, तसाच उभा राहतो!...वस्त्रावरणांच्या कोशातून बाहेर पडलेला त्याचा तो लवचिक, गोरा नि ओजस्वी देह...आपल्या साऱ्या दिमाखानिशी, वैभवानिशी माझ्या दिपल्या डोळ्यांसमोर तळपत होता!

'डायना'च्या चमकत्या डोळ्यांनी ज्याचा प्रथम वेध घेतला, तो उंचनिंच, शेलाटा गौरकाय 'एन्डिमियन' असाच दिसला असणार...तसेच ते 'हायासिंथस', 'नार्सिसस', आणि तो हुशार अन् शूर 'पेर्स्यूस'सुद्धा... असाच दिसला असणार!...एखाद्या मर्त्य तरुणापेक्षा तो ब्लेकच्या एखाद्या देवदूतासारखाच भासला होता मला खरं म्हणजे...त्याच्या सौन्दर्याचं पान माझ्या डोळ्यांनी यथेच्छ केलं, त्या क्षणीच मी त्याच्याकडे ओढली गेले ... गुंतले मी... अगदी विरघळून गेले ...ज्योतीत ज्योत विलीन व्हावी, तसे आम्ही एकमेकात विरलो, नि एकाच ऊर्जस्वल अग्नीत जळू लागलो ...! अखेर शेवटी इथे मला माझा जीवनसाथी भेटला ... माझ्या प्रीतीचं निधान मला सापडलं ... मला 'मी' सापडले; कारण आता आम्ही 'दोन' उरलोच नव्हतो ... 'एक' – होतो आम्ही! प्लेटोनं 'फेड्रस'मध्ये वर्णन केलेल्या त्या एका अद्‌भुत जीवात्म्यासारखे. – एका आत्म्याचे दोन अर्ध – दोन रूपं ... !

'एखाद्या मुलीवर प्रेम करणारा कुणी एक सामान्य तरुण –' अशातला हा प्रकार नव्हता. दोन जुळ्या आत्म्यांची ती जीवभेट होती ... एकरूपता होती! वरचं हलकं देहावरण त्या आनंदोन्मेषानं सर्वथा विरून, त्या मूळच्या पार्थिव वासनेचं रूपांतर शुभ्र नि प्रखर ज्योतींच्या एका स्वर्गीय मीलनात झालं होतं!

... कधी कधी 'आनंद' हा इतका शिगोशिग, इतका सर्वसंपूर्ण असतो, की खरं तर तो अनुभवल्याक्षणी माणसानं संपावं ... पाठीमागं उरू नये ... अरेरे! माझ्या त्या पेटल्या आत्म्याला, ब्लेकच्या देवदूताप्रमाणे त्याच रात्री पृथ्वीच्या अवतीभोवतीच्या मेघमाला ओलांडून दुसऱ्याच अवकाशात भरारी घेण्याचं, अन् अनंतात विलीन होऊन जाण्याचं भाग्य का लाभलं नाही?

...त्याची प्रीती यौवनसुलभ, समर्थ नि रसरशीत होती ... ताजेपण होतं त्या प्रीतीत! एखाद्या विषयलोलुप माणसाची कामासक्त वृत्ती किंवा बेडरपणा त्याच्यात नव्हताच नव्हता ... तृप्तीची चव रेंगाळायच्या आतच शृंगारिक चेष्टांकडे पाठ फिरवणं त्याला आवडायचं...अन् त्या यौवनाच्या ज्वलन्त सामर्थ्यवेगाचा ओघ तो त्याच्या कलेतल्या किमयेकडे वळवायचा...

त्याच्या स्टुडिओत कोच, आरामखुर्ची किंवा जेवणाची व्यवस्था यांपैकी

काहीच नव्हतं ... त्या रात्री आम्ही आपले जमिनीवरच झोपलो ... त्याच्याकडे कपर्दिकही नव्हती ... अन् पैसे आणायला घरी जायचं धैर्य मला नव्हतं !... तेव्हा दोन आठवडे मी तिथेच राहिले – झोपले ! खाण्यापिण्याची जरूर वाटली, की तो उधारीवरच त्याचं जेवण मागवून घ्यायचा...ते वर येईपर्यंत मी वर सज्ज्यात लपून बसायचं, अन् मग हळूच आत येऊन त्याच्या बरोबर त्यातलंच काही खायचं ...

'कोणा दुष्टानं फूस लावून माझ्या पोरीला पळवून नेलंय्', असं सांगत, माझी आई विचारी झाडून साऱ्या पोलीस स्टेशनांवर आणि वकिलातीतून जाऊन आली ... अन् माझ्या ठेकेदाराचं तर, माझ्या त्या एकाएकी नाहीसं होण्याच्या काळजीनं डोकंच फिरलं ! असंख्य प्रेक्षकांना त्याला परत पाठवावं लागलं ... तेसुद्धा कारणाशिवायच ... काय घडलं होतं ते मुळी कुणालाच माहीत नव्हतं ! ... एक शहाणपणा मात्र त्यानं केला होता ... 'कु. डंकन टॉन्सिलायटिसनं एकाएकी चांगलीच आजारी झालेली आहे', अशा अर्थाचं निवेदन त्यानं वृत्तपत्रांतून प्रसिद्ध केलं होतं !

दोन आठवड्यांनंतर आम्ही माझ्या आईकडे परतलो ... खरं सांगायचं तर, प्रेमानं पागल झालेली असूनही त्या तिथल्या कठीण जमिनीवर झोपायला मी कंटाळून गेले होते ... शिवाय खालच्या 'केक्स-मिठाई-चॉकोलेटस्'च्या दुकानातून तो जे काय मागवू शकेल, त्यावरच भूक भागवणं अशक्यच होत चाललं होतं ... क्वचित एखादवेळीच, तेही अंधार पडल्यावरच आम्ही बाहेर जाऊन खाऊन येऊ शकत होतो ... !

गॉर्डन क्रेगला पाहिल्याबरोबर आई ओरडली ... "चालता हो या घरातून ... दुष्ट, फुसलाव्या कुठचा !"

तिला त्याचा भयंकर मत्सर वाटत होता.

... गॉर्डन क्रेग हा आमच्या युगातल्या अत्यंत प्रतिभावन्तांपैकी एक ... शेलीसारखा, 'आग' आणि 'वीज' यांच्यापासून घडलेला जीव ! आधुनिक रंगभूमीच्या सर्वांगीण विचारधारेचं स्फूर्तिस्थानच मुळी होता तो. रंगभूमीवरच्या प्रत्यक्ष, – व्यावहारिक जीवनात जरी त्यानं विशेष भाग घेतला नाही, तरी दूर राहून त्यानं स्वप्नं रंगवली; अन् आजच्या आधुनिक प्रगत रंगभूमीवर जे जे काही सुंदर आहे, त्याला क्रेगच्या स्वप्नातूनच स्फूर्ती नि प्रेरणा मिळाली, हे काही खोटं नाही. तो नसता तर, राइनहार्त, जाक्, कोपो, स्टॅनिस्लाव्हस्की आपल्याला लाभलेच नसते; तो नसता, तर आपण आजसुद्धा त्या वास्तववादी सीन-सीनरीतच रमलो असतो ... नेपथ्यातल्या झाडावरचं प्रत्येक पान खऱ्याखुऱ्या-प्रमाणे लकाकत राहिलं असतं ... साऱ्या घरांची सारी दारं उघडत मिटत

राहिली असती !

...फ्रेंगचा सहवास कमालीचा प्रसन्नप्रभ होता... दिवस उजाडल्यापासून मावळेपर्यंत, त्याच्यासारखे अगदी आनंदमग्नच असणारे जीव, माझ्या पाहण्यात तरी अगदी मोजकेच आले आजवर. सकाळच्या कॉफीच्या पहिल्या कपापासून त्याच्या कल्पनाविलासाचा निखारा फुलायला नि तेजाळायला लागायचा !... रस्त्यातून साधं त्याच्याबरोबर चालणंसुद्धा प्राचीन ईजिप्तच्या 'थीब्ज'मधे मुख्य धर्मगुरूंबरोबर सरंजामानं फिरल्यासारखं असायचं...

कधीकधी तो एकाएकी थांबायचा, अन् पेन्सिल अन् कागदाचं बाड काढून एखाद्या भयानक जर्मन आधुनिक वास्तुशिल्पाकडे—'नॉयर कुन्स्त प्राक्तिश अपार्टमेंट हाऊस'कडे बोट दाखवून, त्याच्या सौन्दर्याचं रहस्य समजवायला सुरुवात करायचा !...नंतर ताव चढल्याप्रमाणे एकदम त्याचं रेखाचित्र काढायचा; अन् चित्र पुरं झाल्यावर पाहावं तर ते इजिप्तच्या 'केन्सेराह्'च्या मंदिरासारखं दिसायचं !...त्याला दूरचं अजिबात दिसत नसे, म्हणून असा प्रकार व्हायचा की काय नकळे !

जाताजाता एखादं झाड, पक्षी किंवा एखादं मूल पाहूनसुद्धा त्याच्या उत्साहाला भलतं उधाण यायचं एकाएकी...त्याच्या बरोबरचा एकही क्षण कधी कंटाळवाणा म्हणून वाटायचाच नाही...तो एकतर त्या आनंदातिशयाच्या धारेत तरी न्हात असायचा, किंवा मग लंबक एकदम दुसऱ्या टोकाला जाऊन पोहोचायचा !...हा असा 'मूड'ही त्या आनंदाच्या अगदी पाठोपाठच यायचा नेहमी... मग आकाशाचे सारे रंग, पाहता पाहता काळवंडून गेल्यासारखे वाटायचे...अन् साऱ्या वातावरणात एक प्रकारची हुरहूर जाणवत राहायची...शरीरातला श्वास हळूहळू बाहेर शोषला जातो आहे असं वाटायचं...एका अनामिक व्यथेच्या अंधकाराखेरीज काही म्हटल्या काही कुठे उरायचं नाही !

आणखी काही दिवसांनी दुर्दैवानं हे अंधारे 'मूड' वारंवार यायला लागले. का ?...त्याचं बहुधा असं व्हायचं : "माझं काम, माझं कार्य"—असा त्याचा जप सुरू झाला—अन् तसा तो सारखाच व्हायचा—की मी हळूच म्हणायची, "हो हो, तुझं काम, तुझं 'जीवितकार्य' !... ते अपूर्वसुंदर आहे, यात मुळी शंकाच नाही...तू प्रतिभाशाली आहेस... सारं खरं... पण असं बघ, माझीही कुठेतरी एक शाळा आहे—" एवढ्यात त्याची मूठ दणकन् टेबलावर आदळलीच म्हणून समजावं...अन् लगेच पुढे..."हो—पण माझं जीवितकार्य -" वगैरे वगैरे... मग माझं त्याला उत्तर..."खरंच, खरंच—ते फारच महत्त्वाचं...तुझं काम म्हणजे 'नेपथ्य'—पण चेतन अस्तित्व, 'जीवात्मा'

हाच काही झालं तरी 'आदि' – (तेव्हा त्याचा विचार प्रथम करायला हवा –) ह्या आत्म्यातूनच्च नंतर सारं काही प्रकाशतं ... एवंच, पहिल्यांदा विचार माझ्या नृत्यशाळेचा ... एका प्रसन्न मानवी जीवाची सौन्दर्यपूर्ण हालचाल, ह्याला अग्रक्रम—अन् मग पुढे तुझं काम – या मंतरलेल्या जीवासाठी साजेशी पार्श्वभूमी निर्माण करणं ... !"

या वादातून पुष्कळदा निष्पन्न काय व्हायचं, तर आरडाओरडा किंवा उदास अबोला ... मग माझ्यातली 'स्त्री' एकदम खडबडून जागी व्हायची : " ए, फार अपमान केला का रे मी तुझा ?" अन् त्यानं म्हणायचं, "अपमान, अपमान कसला ... ? ... स्त्री जात म्हणजेच मुळी वैताग – त्रास – ताप आहे सारा ... ! अन् अर्थात तूही त्यातलीच्च एक ... माझ्या कामात व्यत्यय आणणारी ... वैताग, वैताग आहे सारा ... छे छे छे ! माझं काम, माझं काम !"

... धाडकन् दरवाजा लावून तो बाहेर पडायचा ... अन् त्या धडाडत्या दरवाज्याच्या आवाजानंच घडलेल्या भयंकर घटनेचा प्रकाश शेवटी माझ्या डोक्यात पडायचा ! मी त्याची वाट पाहापाहा पाहायची, अन् तो आला नाही की सबंध रात्र हमसूनहुमसून रडण्यात, दुःखाच्या वादळात सापडल्यासारखी घालवायची ! एकंदरीत अशी ही सारी शोकांतिका होती ! असले हे देखावे वारंवार व्हायचे ... शेवटी त्यामुळे आयुष्यात इतका विसंवाद शिरला, की जगणंच अशक्य वाटायला लागलं ...

ह्या महान प्रतिभावन्ताच्या हृदयातल्या प्रीतीला जागं करणं माझ्या दैवात होतं, तसंच ती प्रीती निभावण्यासाठी, माझ्या स्वतःच्या श्रेयाध्येयावर पाणी सोडण्याची तडजोड स्वीकारणंही माझ्या ललाटलेखात लिहिलं होतं की काय, नकळे ! ... आवळ्याभोपळ्याची मोट ! ... पहिले काही आठवडे तर अनिर्बंध आवेगानं प्रेम देण्याघेण्यात भुर्रकन् उडाले ... पण नंतर आजवर कधी घडलं नसेल, असं भयंकर आणीबाणीचं युद्ध आमच्यात पेटलं ... एका बाजूला क्रेगची प्रतिभा अन् दुसऱ्या बाजूला माझ्या कलाप्रेरणा !

"तू हे सारं काही एकदा थांबवत का नाहीस ?" तो म्हणायचा. – "रंग-मंचावर जाऊन हवेत हातवारे करण्यापेक्षा, घरी बसून तू माझ्या शिसपेन्सिली का तासत नाहीस ?" ...

... असं जरी असलं तरी गॉर्डन क्रेगनं माझ्या कलेचा रसास्वाद जसा घेतला, तसा आजपर्यंत कुणीच घेऊ शकलेला नाही, हेही तितकंच खरं ! मात्र त्याचा अहंकार, अन् कलावंताच्या तत्रियतीला साजेसा त्याच्या मनातला मत्सर, – या– पायी, एखादी 'स्त्री' खरोखरची कलावंत असेल, हे मान्य करायलाच मुळी तो

तयार नव्हता ...!

*                    *                    *

एलिझबेथनं आमच्या ' ग्र्यूनेवाल्द 'च्या नृत्यशाळेच्या कमिटीवर बर्लिन-मधल्या प्रमुख अन् गर्भश्रीमंत स्त्रियांना घेतलं होतं ... त्यांच्या कानावर आमचं 'क्रेग–प्रकरण ' गेलंच ... लगेच त्यांनी नसती अधिकारी भाषा वापरून माझ्यावर दोषारोप करणारं एक लांबलचक पत्र मला पाठवलं! – म्हणे, चांगल्या उच्च समाजातल्या, त्यांच्यासारख्या स्त्रियांचा या नृत्यशाळेला मिळालेला आश्रय तसाच टिकायचा असेल, तर शाळेच्या मुख्य संचालिकेनं नीतिअनीतीच्या इतक्या अनिर्बंध कल्पना बाळगून चालणार नाही!

हे पत्र माझ्यापर्यंत पोहोचवायचं काम त्या बड्या बँकरच्या श्रीमतीजींच्या-कडे – मेंडेलसोन बाईकडे – सोपवलं होतं ... असा महत्त्वपूर्ण ' खलिता ' घेऊन ती माझ्याकडे आली, अन् प्रथम जरा अनिश्चिततेनं पाहात राहिली माझ्याकडे – तेवढ्यात एकाएकी तिच्या डोळ्यांतून जे पाणी उसळलं, त्या भरात पत्र जमिनीवर फेकून देत तिनं मला जवळ घेतलं, अन् म्हणाली, " मी या भेकड पत्रावर सही केलीय् – किंवा या सगळ्या प्रकाराला माझी संमती आहे, असं बिलकूल समजू नकोस ... पण त्या इतर बायकांचं म्हणशील, तर त्यांच्यापुढे देवाला देखिल हात टेकावे लागतील! ' आश्रयदात्यां 'च्या यादीत याउपर त्यांची नावं नसणार हे खास ... नाही म्हणायला – तुझ्या बहिणीवर, एलिझबेथवर त्यांचा विश्वास अजून आहे, असं दिसतं ... "

तसं म्हटलं तर एलिझबेथचीसुद्धा काही स्वतःची मतं होती, कल्पना होत्या ... त्या ती जगजाहीर करत नसे एवढंच! ... तेव्हा माझ्या एक लक्षात आलं : तुम्ही तुमची कोणतीही मतं उघड उघड बोलून दाखवण्याचा आगाऊपणा–स्पष्टवक्तेपणा केला नाहीत, तर सारं काही ठीक असतं ... बरोबरच ठरतं! ... त्या बायकांनी मला असा संताप आणला होता की मी ' फिलार्मोनिक साल ' भाड्यानं घेऊन मुद्दाम एक व्याख्यानच दिलं ... ' नृत्य ' एक मुक्त, – माणसाच्या मनाला बंधमुक्त करणारी कला! ... हा विषय होता, पण शेवटी मी स्त्रीच्या प्रेम करण्याच्या नि स्वेच्छेनं मूलबाळ होऊ देण्या न देण्याच्या मूलभूत हक्कावर बोलून व्याख्यान संपवलं! ..

अर्थात् लोकांचा पुढचा प्रश्न, ' पण पुढे मुलांचं काय ? ' हाच असणार ... हं! ज्यांचा जन्म लग्नबाह्य संबंधातून झालेला आहे, अशा कितीतरी प्रसिद्ध व्यक्तींची नावं मी सांगू शकले असते त्याच क्षणी – कीर्ती अन् पैसा मिळवताना त्यांच्या जन्मरहस्याचा हा अडसर त्यांना बिलकूल आड आलेला नाही, ... हा विचारही क्षणभर बाजूला ठेवू ... पण मी म्हणते, भांडणच उद्भवलं, तर जो

स्वतःच्या मुलांची जबाबदारीसुद्धा सहज धुडकावून देईल, अशा नीच माणसा-बरोबर लग्नविधीतून जायला एखादी बाई तयारच कशी होते? हा माणूस असा आहे, म्हटल्यावर त्याच्याशी लग्न करायला जायचंच कशाला? ... मला वाटतं वागण्यातला सच्चेपणा नि परस्परांवर असलेला विश्वास, हाच प्रीतीचा खरा पाया आहे ... एक ' कमावणारी, स्वतंत्र कर्ती स्त्री ' या नात्यानं माझे काही ठाम निर्धार आहेत ... मूल व्हायचं, म्हणजे जीवावरचा प्रसंग – भयंकर शक्तिपात – आरोग्याची नासाडी! ... अशा सगळ्या त्या त्यागाला तयार व्हायचं तर त्या प्रीतीची खात्री हवी की नको? पुढे प्रसंगवशात् जर तो नवरा नावाचा पुरुष, – " मूल कायद्यानं सर्वस्वी माझं आहे – ते मी तुझ्यापासून नेणार, म्हणजे नेणार! ... तुला हवं तर तू त्याला वर्षातून तीनदा भेटायला येऊ शकतेस ... " – असली भाषा वापरायचा संभव असेल, तर त्या लग्नाच्या भानगडीत मी बिलकूलच पडणार नाही!

" आपण लग्न केलं नाही, तर आपलं मूल आपल्याला काय म्हणेल? " ह्या आपल्या प्रेयसीच्या प्रश्नाला एका अत्यंत विनोदी अमेरिकन लेखकानं काय उत्तर दिलं असेल? तो म्हणाला, " तुझं नि माझं मूल – आपल्याला असा प्रश्न विचारणारं निघालं, तर मग त्याला आपल्याबद्दल काय वाटतं, ह्याचा विचार करायची जरुरीच नसेल! "

विवाहाच्या ' करारनाम्या 'चा सारा तपशील वाचल्यानंतरही जी बुद्धिमती ते बंधन उघड्या डोळ्यांनी स्वीकारते, तिला त्याचे परिणाम भोगायला लागावेत हे ठीकच आहे, सुसंगतच आहे अगदी!

माझ्या त्या व्याख्यानानं बरंच वादळ उठलं ... अर्ध्याअधिक श्रोत्यांनी मला सहानुभूती दाखवली, नि उरलेल्या निम्म्याशिम्म्यांनी चीत्कार काढत, हाताला लागेल ते रंगमंचावर फेकायला सुरवात केली ... शेवटी विरोधी मताचे लोक हॉलमधून निघूनच गेले ... अन् उरलेल्यांच्या बरोबर स्त्रियांच्या हक्कांच्या नि त्यांच्या बाबतीतल्या अन्यायांच्या प्रश्नांवर माझी बरीच सुरस चर्चा झाली ... विचार केला, तर कळून येतं की, त्या वेळी देखिल आमचं पाऊल, स्त्रियांच्या आज गाजणाऱ्या चळवळींच्या कितीतरी पुढेच होतं!

' व्हिक्टोरिया स्ट्रास 'मधल्या आमच्या जागेतच मी राहात होते ... एलिझबेथ मात्र शाळेच्या परिसरात राहायला गेली होती ... या दोन बिऱ्हाडांत माझ्या आईच्या इकडून तिकडे खेपा चालत. पूर्वीच्या संकटांच्या नि अडी-अडचणींच्या काळात आईनं किती असामान्य धैर्यानं सारा त्रास पचवला होता ... पण आताशा तिचं आयुष्य तिला अगदी निरस – कंटाळवाणं वाटायला लागलं होतं ... कदाचित तिच्या आयरिश स्वभावाचा हा परिणाम असेल ... अशा

स्वभावाला वैभव पेलवत नाही; संकटाचा भार सोसतो! आता तिच्या ‘ मूड ’चा अंदाज बांधणं कठीण झालं होतं... कधीकधी तिला काहीच पटायचं नाही... आम्ही परदेशात पाऊल टाकल्याच्या क्षणापासूनच्या इतक्या वर्षात, प्रथमच तिला – अमेरिकेची ओढ लागायला लागल्याचं तिच्या बोलण्यात आलं... अन् “ तिथलं अन्न... तिथलं सगळंच – इथल्यापेक्षा किती चांगलं आहेय् ” वगैरे सारखं काही काही ती म्हणायला लागली.

...आईला बरं वाटावं, म्हणून बर्लिनमधल्या अलिशान रेस्तराँमध्ये घेऊन जात होतो आम्ही तिला कधीकधी...पण तिला विचारलं, “काय घेशील?” की ती म्हणायची, “ श्रिम्प्स ( = करंदी ), ” अन् तो करंदीचा मोसम नसला, की मग त्यावरून जर्मनीचाच उद्धार व्हायचा... “ जिथे साधे झिंगे मिळत नाहीत – तो हा असला दरिद्री देश ”...वगैरे वगैरे...दुसरं काहीही दिलं तरी मग खायची नाही आई!...समजा करंदी असलीच तर, “ सॅनफ्रान्सिस्कोमध्ये याहून कितीतरी छान करंदी मिळते, ” वगैरे भाष्य, अन् तक्रार चालायची...

आईचा सारा जन्म तिच्या मुलांच्या तैनातीतच गेला...नीतीची अन नेकीची जाचक बंधनंनं सवयी तिनं जन्मभर पाळली... याच वस्तुस्थितीत तिच्या स्वभावातल्या या बदलाचं कारण सापडेल, मला वाटतं! इकडे आम्हाला आता आपापले अनेक व्याप नि छंद होते; त्यात आम्ही सारीजणं आपापल्या परीनं इतकी बुडून गेलो होतो, की त्या निमित्तानं आईपासून दूरदूर जाणं अपरिहार्यच होतं सारखं...तिच्या आयुष्यातली ऐन उमेदीतली वर्षं तिनं आमच्यासाठी फुकट घालवली...अन् शेवटी तिच्यासाठीच तिच्याकडे काही उरलं नाही, तिनं ठेवलं नाही, याची जाणीव तिला आता झाली... मला वाटतं माझ्या आईचं हे काही पहिलंच उदाहरण नाही...अमेरिकेतल्या कितीतरी ‘ आई ’ना असंच वाटत असणार!...तिचे हे बदलते ‘ मूड ’ उत्तरोत्तर वारंवार दिसायला लागले ... आणि तिच्या मूळ गावाला परत जाण्याची इच्छा ती एकसारखी बोलून दाखवायला लागली...एवढंच नव्हे तर नंतर थोड्याच दिवसांत म्हटल्याप्रमाणे ती परत गेलीसुद्धा!

* * *

‘ ग्र्यूनेवाल्द ’चा तो व्हिला आणि तिथल्या चाळीस कॉटस् यांच्यातच माझं मन नेहमी गुंतलेलं असायचं...दैवगती किती विलक्षण असते पाहा! हा क्रेग मला याच्या आधी काही महिन्यांपूर्वी भेटला असता तर तो बंगला, ती शाळा... हे काहीही झालं नसतं...त्याच्या सहवासात माझ्या व्यक्तिमत्त्वाला जी पूर्णता लाभली होती, त्यामुळे या शाळेची स्थापना करण्याची जरूरच मला भासली नसती...पण माझं बालपणचं स्वप्न खरोखरीचा आकार धरायला

लागलेलं दिसत असताना, त्याचाच एक ध्यास, एक वेड मला लागून राहिलं, तर त्यात नवल काय ?

अन् तेवढ्यात मला समजलं, – शंका नव्हतीच काही – की मी गरोदर राहिले होते... मला स्वप्न पडायचं एलन टेरीचं... 'इमोजिन' मध्ये घालायची तसलाच एक झगमगणारा गाऊन अंगात घातलेली एलन टेरी... तिच्या हातात सोनसळी केसांच्या एका चिमुकल्या छोकरीचा हात असायचा... छोकरी हुबेहूब तिचीच प्रतिमा...! आपल्या नादमधुर आवाजात एलन टेरी मला साद घालून म्हणायची, "इझाडोरा, प्रेम करावं... प्रीती द्यावी..."

अस्तित्वापलीकडल्या छायालोकांतून माझ्याकडे झेप घेणाऱ्या कुणाची तरी जन्मपूर्व चाहूल मला त्या क्षणी लागली!... असंच एक छोटं बाळ येईल... आपल्या बाळमुठीत माझं सुखदुःख लपवून...!... 'सुख' अन् 'दुःख' 'जन्म' आणि 'मृत्यू'! जीवननृत्यातले साक्षात् 'सम' – 'काल'!

त्या स्वर्गीय संदेशाची धून माझ्या नसानसांतून गुंजत होती... माझे कार्यक्रम, माझी शाळा अन् माझ्या 'एंडिमियन'वरचा प्रेमाचा वर्षाव... सारं नेहमी-सारखं चाललंच होतं...!

बिचारा क्रेग मात्र अस्वस्थ होता, अधीर होता... बेचैन होता... वैतागानं आपली नखं जिव्हाळीं निघेपर्यंत खात, "माझं काम, माझं काम"... असा जप करत बसला होता...

... निसर्गानं दबा धरून बसायचं, अन् नेहमीप्रमाणे कलेवर क्रूरपणे आक्रमण करायचं... दुसरं काय...!... तरीही एलनच्या त्या स्वप्नाचा एकीकडे कुठेतरी दिलासा वाटत होता... ते स्वप्न मला पुन्हा आणखी दोन वेळा पडलं!...

... वसंत ऋतू आला... डेन्मार्क, स्वीडन आणि जर्मनीसाठी माझा करार झाला होता... कोपनहेगनमध्ये एका गोष्टीचं मला सर्वांत आश्चर्य वाटलं : तरुण स्त्रियांचे असामान्य बुद्धिमत्तेने उजळलेले प्रसन्न चेहरे... त्यांचं मुलांसारखं रस्त्यातून बंधमुक्त नि मनमोकळं एकटं फिरणं – काळ्याकुरळ्या बटांवर अडकव-लेल्या त्यांच्या त्या विद्यार्थिपेशाच्या टोप्या... मी चकितच झाले... इतक्या छान मुली मी कधीच पाहिल्या नव्हत्या... नंतर मग माझ्या कानावर आलं, की स्त्रियांनी मतदानाचा हक्क मिळवला, तो प्रथम याच देशात!

...मला हा दौरा स्वीकारायला लागला, कारण शाळेच्या खर्चानं पैशाला चांगलीच ओहोटी लागली होती... माझी शिल्लक सगळीच कामाला आली होती अन् खेळता पैसा असा उरलाच नव्हता...

स्टॉकहोमला प्रेक्षक चांगलेच उत्साही होते... कार्यक्रमानंतर तिथल्या व्यायामशाळेतल्या मुलींनी हॉटेलपर्यंत मला सोबत केली... वाटभर माझ्या

गाडीच्या बाजूंनी उड्या मारत, ढांगा टाकत त्या आपला आनंद व्यक्त करत होत्या. मी त्यांच्या व्यायामशाळेला मग भेटही दिली; मात्र त्या भेटीनं त्या प्रकारच्या शिक्षणाबद्दल माझ्या मनात आस्था अशी काही निर्माण झालीच नाही. स्विडिश व्यायाम माझ्या मते नुसत्या स्थावर – अचल शरीरासाठीच असावा! माणसाच्या हालत्याचालत्या चेतन शरीराचा मुळीं त्यात विचार केलेलाच नाही. ...'स्नायूंचा विकास' – म्हणजेच त्यांचं महत्त्वाचं साध्य! खरं म्हणजे शरीराला सामावून ठेवणारी ती एक यंत्रणा आहे; अन् सतत होणाऱ्या वाढीचा न सुकणारा झरा त्या यंत्रणेच्या ठायी असतो, हे नि एवढंच स्नायूंचं महत्त्व! स्विडिश व्यायाम म्हणजे चुकीच्या तंत्रावर आधारलेलं शरीरविकासाचं शास्त्र आहे, असं मी म्हणेन; कारण कल्पनाशक्तीचा त्यात वापरच नाही केलेला; अन् माणसाच्या शरीराकडे इथे एक 'वस्तू' म्हणून पाहिलं जातं... एक चेतन, गतिगर्भ 'शक्ती' म्हणून नाहीच नाही!

मी त्या साऱ्या शाळांतून हिंडले – अन् सगळ्या विद्यार्थ्यांना माझे हे विचार शक्य तेवढ्या उत्तम तऱ्हेनं समजावून देण्याचा प्रयत्न केला. माझ्या अपेक्षे-प्रमाणेच झालं ... कुणालाच विशेष काही समजलं नाही!

स्टॉकहोमला असताना मी 'स्ट्राईन्डबर्ग'ला माझं नृत्य पाहायला येण्याचं आमंत्रण दिलं... त्याच्याबद्दल मला फार कौतुकादर होता. त्याचं उत्तर काय यावं? "मी कुठे जातयेत नसतो... मनुष्यमात्राचा मी तिरस्कार करतो!" मी त्याला रंगमंचावरच जागा देऊ केली बसायला, पण तो पठ्ठ्या काही आला नाही.

स्टॉकहोममधला यशस्वी मोसम आटोपून आम्ही बोटीनं जर्मनीला परतलो ... बोटीवर मी चांगलीच आजारी पडले; अन् मग सध्यातरी आणखी दौरे करणं वगैरे थांबवायलाच हवं, हे माझ्या लक्षात आलं... शिवाय निवांत एकटेपणाची मला फारच ओढ लागली होती ... लोकांच्या नजरांच्या टप्प्याआड दूर काही दिवस घालवावे, अशी इच्छा झाली होती ...

जून महिन्यात माझ्या शाळेला एक चुकमुकती भेट दिल्यानंतर तर, समुद्राच्या सान्निध्यात राहायला जायचंच माझ्या मनानं घेतलं. प्रथम मी हेगला गेले – आणि मग तिथून उत्तरेकडच्या समुद्रकिनारी वसलेल्या 'नॉर्डविक्' नावाच्या एका छोट्या खेड्यात जाऊन पोहोचले...... तिथे पुळणीवरच बांधलेला 'व्हिला मारिया' नावाचा एक छोटा बंगला मी भाड्यानं घेतला.

बाळंतपण म्हणजे एक अगदी स्वाभाविक, निसर्गसुलभ घटना असते, असं समजण्याएवढी मी त्या वेळीं अननुभवी होते!...... म्हणून तर जिथून शंभर मैलांच्या आत एकही शहर असं नव्हतं, अशा त्या खेड्यातल्या बंगल्यात मी

जाऊन राहिले ... अन् तिथलाच एक खेडवळ डॉक्टर ठरवून ठेवला ... त्याला खेडूत नायकांचाच अनुभव असणार येऊनजाऊनं, पण मी आपली माझ्या अज्ञानामुळे त्याच्यावर खुशाल विसंबून होते !

'कॅडविक्' हे त्यातल्या त्यात जवळचं खेडं देखील जवळजवळ तीन किलोमीटर दूर होतं ! अन् तिथे मी राहत होते ... एकटीच ! नॉर्डविक् ते कॅडविक्, एवढं अंतर मी दररोज चालून जायची अन् परतायची ... सागराच्या जवळिकीची ओढ तर माझी पहिल्यापासूनची ... तसंच इथे नॉर्डविक्मध्ये एकटीनं राहण्याचंही ... या सुंदर प्रदेशात, दुतर्फा मैलमैल पसरलेल्या, वाळूच्या टेकड्यांनी भरलेल्या पुळणीत बांधलेल्या, त्या सर्वस्वी एकाकी अशा पांढऱ्या छोट्या बंगल्यात – व्हिला मारियात – मी तीन महिने राहिले ... जून, जुलै अन ऑगस्ट ...

दरम्यान 'ग्यूनवाल्द' शाळा मी माझ्या गैरहजेरीत एलिझबेथवर सोपवली होती; तिच्या बरोबर माझा नियमित पत्रव्यवहार चालायचा ... जुलैमध्ये माझ्या रोजनिशीत मी माझ्या नृत्यशैलीच्या शिक्षणाला आधारभूत अशा काही मूलतत्त्वांची नोंद करून ठेवली. जवळजवळ पाचशे एक व्यायामाचे ... अंगक्षेपांच्या पलट्यांचे प्रकार मी शोधून काढले ... अगदी सोप्या साध्या हालचालींपासून विद्यार्थ्यांना अत्यंत संमिश्र नि कठिण आविर्भावांकडे नेणारा एक सर्वांगीण – सारूप असा अभ्यासक्रमच मी तयार केला म्हणायला हरकत नाही ...

'ग्यूनवाल्द' शाळेत शिकत असलेली माझी छोटी भाची 'टेंपल' माझ्याकडे तीन आठवड्यांसाठी रहायला आली होती ... ती देखील माझ्यासारखी समुद्राच्या किनाऱ्यावर नाचत असायची ...

क्रेग मात्र अस्वस्थच होता. तो यायचा जायचा ... पण मी आता 'एकटी' नव्हते ! तो लहानगा जीव आपलं अस्तित्व दिवसानुदिवस ठासून पटवून द्यायला लागला होता ... माझ्या सुंदर देहाचा संगमरवर वितळताना, भंग पावताना – ताणला जाताना – बेडौल होताना पहाणं ... एक विलक्षण अनुभव होता तो ! ... मनाच्या शक्ती जसजश्या प्रगल्भ व्हायला लागतात –, सुसंस्कृत होतात, मेंदू जसजसा जास्त जास्त संवेदनशील बनायला लागतो, तसतसा त्याच्या जाणिवेचा ओघ दुःखाच्या दिशेनं वळायला लागावा – हा एक प्रकारे निसर्गानं मानवावर उगवलेला अकल्पनीय सूडच नव्हे का ? जागत्या रात्री ... व्यथित बटकापळं ... अन् सोबतीला आनंदसुद्धा ! असीम ... अपार आनंद ... ! नॉर्डविक् ते कॅडविक् पसरलेल्या पुळणीतून दररोज पावलं टाकताना संगतीला दर्या असायचाच ... एका बाजूनं फेसाळत्या, नागाच्या फण्यासारख्या झेपावणाऱ्या उत्तुंग लाटा, अन् दुसऱ्या बाजूला वाळूच्या फुगऱ्या सुजऱ्या

टेकड्यांचा विजनवास ! ... या समुद्रकिनाऱ्याला वारं नेहमीच असतं; कधीकधी हळव्या हळुवार पश्चिमवाऱ्यासारखं, तर कधी असा जोरदार झोत की नुसती वाट काढण्यासाठी झगडताना नाकीनऊ यायचे माझ्या ... एखादवेळी वादळांनी उग्र रूप धारण केलं, की व्हिला मारिया समुद्रात सापडलेल्या जहाजासारखा झोके खायचा, ... धडकला जायचा ... ठोकला जायचा शुद्ध !

... आता मला कुठे बाहेर माणसात जायला नको वाटायला लागलं ... लोकं काय वाटेल ते घाणेरडं बोलायची ... कूसभरल्या स्त्रीचा आदर करणं लोकांच्या अगदी कसं गावी नसतं ! अशीच एक गर्भवती रस्त्यानं एकटीच जाताना मी पाहिली होती ... जाणाऱ्या येणाऱ्यांनी कुणी तिच्याकडे आदरानं तर पाहिलं नाहीच; उलट सारेजण एकमेकांना इशारे करत कुत्सितपणे हसले मात्र ! जीविताला फुटणारा कोवळा कोंब आपल्या उदरात जोपासणारी ही स्त्री, म्हणजे जणू एक उत्तम विनोदी चुटकाच होता ! ...

... मी सगळ्यांना माझं दार बंदच केलं होतं – एक सुस्वभावी नि विश्वासू मित्र सोडून इतर साऱ्यांना – हा माझा मित्र हेगहून सायकलवरून यायचा – माझ्यासाठी पुस्तकं नि मासिकं आणायचा; आधुनिक चित्रकला, संगीत आणि साहित्य, यावरचे आपले विचार, आपली मतं – वगैरेबद्दल माझ्याशी वादसंवाद करत मला रिझवायचा. त्याची पत्नी एक मोठी कवियत्री होती ... तिच्याबद्दल वारंवार बोलायचा तो ... अन् तसं बोलतांना त्याच्या स्वरांत एकप्रकारचा भक्तिभाव ... नि हळुवारपणा उतरायचा ! ... त्याचं सारं करणंसवरणं व्यवस्थित – पद्धतशीर असे. तो ठराविक दिवशी यायचा; एकादेदिवशी मोठ्ठं वादळ वगैरे झालं तरी त्याचं हे वेळापत्रक चुकायचं म्हणून नाही ... तो एक सोडला तर एरवी मी एकटीच असायची बहुधा ... समुद्र, ते वाळूचे ढिगारे, अन् माझं बाळ, यांच्या सोबतीनं. बाळाला जणू बाहेरच्या जगात प्रवेश करायची भलतीच घीट घाई झालेली होती !

कधी कधी समुद्रकाठानं फिरताना मला माझ्यात दुप्पट तिप्पट बळ नि शक्ती आल्यासारखं वाटायचं ... वाटायचं की हा पोटातला जीव तरी माझाच असणार ... केवळ माझ्या एकटीचाच ... ! ... पण मग कधीतरी आकाश राखी नि विटक्या रंगाचं दिसायला लागलं, – उत्तरसमुद्राच्या त्या गारगार लाटा रागेजल्यासारख्या भासल्या, म्हणजे एकाएकी मला अगदी विषण्णविषण्ण वाटायचं ... मनात यायचं, मी जणू काही एकादा असहाय्य प्राणी आहे – एका भल्यामोठ्या मजबूत पिंजऱ्यात बंद केलेला ... अन् मग एकच एक इच्छा मनाला घेरून टाकायची ... त्या पिंजऱ्यातून सुटायची ! ... अन् त्या सुटकेसाठी धडपड तडफड व्हायची मनाची ... सुटका ... निसटायचं ... पण कुठं जायचं मग ? ...

त्या उदास अबोल लाटांच्या कुशीत विसावा शोधायला ?...हो तिथेच एकादवेळी!...असल्या या ' मनोवस्थेशी मी खूप झुंजायची आतल्या आत...अन् शेवटी धैर्यानं तिच्यावर मात पण करायची...एवढंच काय, मला काय वाटत होतं, काय होत होतं, याची कल्पना किंवा शंकासुद्धा कुणाला येऊ दिली नव्हती मी...पण कितीही केलं, तरी ते खिन्न उदास भाव दबा धरून बसलेले असायचेच मनाच्या तळाशी... अन् भलत्यासलत्या वेळीं ते माझ्यावर स्वार व्हायचे...ही गोष्ट मात्र अटळच झाली होती माझ्या लेखी...शिवाय, सारी लोकं माझ्यापासून दूर पळायला पाहत असतात, अशीही माझी भावना झाली होती...आई तर हजारो मैल दूर असल्यासारखी वाटायची...क्रेगसुद्धा अगदी दुरावल्यासारखा, अनोळखी वाटे...त्याच्या कलाविश्वांत तो रंगलाबुडलेला असायचा...आणि इकडे दिवसानुदिवस माझ्या मनातून मात्र कलेचे विचार विरत विरळ व्हायला लागलेले...माझं ध्यान सारं माझ्यावर सोपवल्या गेलेल्या एका भयाण नि अतिमानवी कर्तव्याच्या ठायी एकाग्र झालं होतं... हे भयाण ... अतिमानवी कर्तव्य! ... नव्हे वेड लावणारं, वेडपिसं, आनंददायी ... दुःखद ... गूढ रहस्य!

...तास, घटका अन् मिनिटं सुद्धां छळवाद केल्यासारखीं किती रेंगाळत राहायची...दिवस, आठवडे आणि महिने जाता जायचे नाहीत! आलटून-पालटून मनात पिंगा घालणाऱ्या आशानिराशेच्या भरात पुष्कळदा मी विचार करत राहायची आगमागचा...माझ्या बाळपणातल्या नि तरुणपणीच्या माझ्या ध्येयवेड्या यात्रा...दूरदूरच्या देशांतून केलेली भटकन्ती...कलेच्या प्रांतात मला उलगडलेली रहस्यं...अन् मग हे सारं मला अगदी धूसर, अस्पष्ट वाटायचं...एका बाळाला जन्म देण्यापूर्वीच्या या स्थितिप्रत पोहोचलेल्या माझ्या जीवनाचा—कुठे तरी दूर—सुरुवातीला जोडलेला उपोद्घात असावा, तसं...! तसं पाहिलं तर एखाद्या शेतकरी बाईच्या वाट्याला देखील सहज येऊ शकणारं हे भाग्य! पण तीच माझ्यासारखीच्या साऱ्या महत्त्वाकांक्षांची परिणती ठरावी ना!...दैवगती म्हणतात ती यालाच का?

माझी लाडकी आई का इथे यावेळीं माझ्याबरोबर नव्हती?...तर तिचा एक वेडगळ पूर्वग्रह होता...माझं लग्न झालं नव्हतं ना?...ते व्हायला हवं होतं!... तसं म्हणाल तर, तर तिनं स्वतः लग्न केलं होतं, पण ते विवाहित आयुष्य असह्य होऊन, तिनं तिच्या यजमानांपासून घटस्फोटही घेतला होता... ज्या सापळ्यात सापडल्यानं तिच्या आयुष्याला चावे घेतले गेले, त्याच सापळ्यात मी शिरावं, असं तिला वाटूच नये, खरं म्हणजे! मी तर माझ्या साऱ्या जागृत बुद्धिसामर्थ्यानिशी विवाहबंधनाला विरोध करत होते. त्यावेळेला माझी जी

धारणा होती, तीच आजही आहे... की विवाहसंस्था ही एक बाष्कळ कल्पना आहे–गुलामगिरी आहे ती साक्षात्... कलावंतांच्या बाबत तर विशेषकरून!... विवाहाचा अटळ रोख शेवटी घटस्फोटाच्या दिशेनं कोर्टकचेरीकडे खेचणारा नि लाजिरवाण्या अकल्पित खटल्यांची खटली विकत घेणाराच ठरतो! कुणाला माझ्या या म्हणण्याच्या खरेपणाबद्दल शंका असेल तर त्यानं एक करावं; आतापर्यंतच्या घटस्फोटित कलावंतांची एक यादी करावी, अन् गेल्या दहा वर्षांत अमेरिकन वृत्तपत्रात छापून आलेल्या अफवा नि वदंता, यांची छोटीशी खानेसुमारी करून पहावी... इतकं असून सर्वसाधारण जनता आपल्या आवडत्या कलावंतावर प्रेम करायची राहते, असंही नाही... जनतेला मुळीं मला वाटतं, कलावन्तांच्या-वाचून करमायचंच नाही!

ऑगस्ट महिन्यात 'मारी किस्ट' नावाची एक बाई परिचारिका म्हणून माझ्याबरोबर राहायला आली... अन् पुढे ती माझी एक अत्यंत जिवलग मैत्रीणच होऊन गेली... तिच्याहून अधिक धीराची, गोड आणि प्रेमळ सखी मला कधीच भेटली नाही कुणी... ती आल्यापासून तिचाच मला मोठा दिलासा झाला एक... कारण खरं सांगायचं तर माझ्या मनात आता हरतऱ्हेच्या शंका उफाळून यायच्या, भीती वाटायची... कितीदा माझी मी समजूत घालायची की प्रत्येकच बाईला मुलं होतात... झाली आहेत... माझ्या आजीला आठ मुलं होती... आईला चार... आयुष्यातला एक नैसर्गिक टप्पाच होता तो... वगैरे वगैरे... तरी देखील आत कुठे तरी भीतीची एक जाणीव होतीच होती... भीती तरी कसली? मृत्यूची, किंवा कळा, वेदना यांची खासच नाही!... कसली तरी अज्ञात अनोळखी भीती... कशाची... समजत नव्हतं, उमज पडत नव्हता!

ऑगस्ट संपून सप्टेंबर उजाडला... गर्भाचं ओझं चांगलंच जाणवायला लागलं होतं... व्हिला मारिया, त्या वाळूच्या टेकड्यांवर अवधान सांभाळून उभा केलेला... जवळजवळ शंभरएक पायऱ्या चढाव्या लागायच्या... कित्येकदा नृत्याबद्दलचे विचार मनात यायचे, अन् मन फार खंतावून जायचं–पण तेवढ्यात दोनतीन लत्ताप्रहार करून आतल्या आत कूस बदलणारा चळवळा जीव आपली जाग द्यायचा, अन् मला हसू फुटायचं... वाटायचं, कला म्हणजे तरी दुसरं काय आहे? जीवनाचं रहस्य नि त्यातला आनंद, यांची स्पष्टास्पष्ट प्रतिबिंबं रेखणारा तो एक आरसाच नाही का?

माझं देखणं शरीर पाहता पाहता ओथंबून वाढताना मी चकित होत होते... माझी छोटी घट्ट वक्षस्थळं चांगली फुलून येऊन मृदु झाली होती... पोटा-सारखीच ओथंबली होती... मूळची चंचल पावलं माझी... आता भारावून

मंदावली होती ... घोटे सुजरेफुगरे, अन् नितंबात काहीसा ठणका होता ......
कुठे गेला तो जलपरीसारखा यौवनसुलभ बांधा माझा ? ... माझी महत्त्वाकांक्षा, कीर्ती, यश, माझं नांव ... कुठे गेलं, कुठे लोपलं ते सारं वैभव ? ... किती प्रयत्न केला, तरी माझं मन खिन्न झाल्याशिवाय राहत नसे...हरल्यासारखं, जीवनाच्या लढाईत चहूबाजूनं हार खाल्ल्यासारखं हताश वाटायचं ... विराट जीवनानं माझ्याशी चालवलेला हा खेळ आता बिलकूल सोसवेना ... ! एवढ्यात पुन्हा एकदा जन्माला येणाऱ्या बाळाची आठवण यायची, अन् सारे असले दुःखद विचार कुठल्या कुठे पळून जायचे ...

...रात्रीच्या वेळचे प्रतीक्षेचे ताटकळलेले प्रहर ... अन् मी असहाय्य !... डाव्या कुशीवर व्हावं, तर काळजात घुसमटल्यासारखं व्हायचं ... उजव्या कुशीवर झालं, म्हणून बरं वाटायचं, असंही नाही ... शेवटी उताणं पडून राहायचं ... गर्भातल्या बाळाच्या उत्साहाचं लक्ष्य होऊन बसायचं ! ... मग आपले हात आपल्या उसवत्या शरीरावर दाबून बाळाला मायेचा संदेश पोहोचवायचा प्रयत्न करायचा ... ते छळवादी तास ... रात्रीचे ... हळुवारपणे वाट पाहण्याचे ... ! ... अन् अशा रात्रींमागून रात्री ... अनंत ... अगणित ... मातृत्वाचं एक बिरुद मिळवायला हे केवढं मोठं मूल्य मोजतो आपण !

एक दिवस मात्र एक अवचित् आनंदाची नि विस्मयाची गोष्ट घडली ... ! पॅरिसमध्ये असताना ओळख झालेली कॅथलीन नावाची माझी एक गोड मैत्रीण पॅरिसहून माझ्याकडे आली, अन् माझ्या बरोबर राहण्याचा तिचा बेत तिनं माझ्या कानावर घातला ... तिचं व्यक्तिमत्व आकर्षक होतं ... जीवनरसानं रसरसलेली, आरोग्यसुंदर नि धीराची स्त्री होती ती ... पुढे तिनं कॅप्टन स्कॉट या धाडसी शोधकाशी लग्न केलं ...

एकदा अशाच आम्ही सर्व चहा घेत बसलो असताना मला एकाएकी धडक बसल्यासारखं झालं ... जणू काही कुणीतरी पाठीच्या मधोमध धरून मला ठोकत होतं ... पिटत होतं ... मग एक भयंकर कळ आली – कण्यांतून गिरमिट फिरवून कुणीतरी पाठच उकलायला निघावं, तशी ! एकाद्या सर्वशक्तिमान् नि निर्दय मारेकऱ्याच्या हातात सापडलेल्या गरीब बापड्या जिवाचे व्हावे, तसे हाल त्या क्षणापासून सुरूच झाले माझे ! एक कळ येऊन जाऊन त्यातून मी जिवानिशी सुटते, तोच पुन्हा चढाई सुरू व्हायची... ' स्पॅनिश इन्क्विझिशन 'बद्दल सारेजण एवढं तावानं बोलतात ... पण बाळाला जन्म दिल्याचा अनुभव घेतलेल्या कुणाही बाईला त्या ' इन्क्विझिशन 'च्या छळाला बावरण्याचं कारण नाही. प्रसूतीच्या दिव्याच्या तुलनेनं तो एक साधासुधा खेळच ठरेल ! ... इथे कुण्या भयंकर नि अज्ञात राक्षसानं माझा जणू ताबा घेतला होता, अन् एकसारखे

झटके देऊन त्यानं माझी हाडं नि स्नायू यांची चिरफाड करण्याचा चंग बांधला होता ... त्याला थांबगं ठाऊक नव्हतं ... दयामाया नव्हती ... कीव नव्हती... अन् त्याच्या तावडीतून सुटायला काही मार्गही नव्हता!... सारे म्हणतात असल्या या वेदना तितक्याच लवकर विसरल्याही जातात ... म्हणोत बिचारे... मी त्यावर एवढंच सांगेन की, मी नुसते डोळे मिटून घेण्याचा अवकाश... माझ्याविगळं होऊन, माझ्याभोवतीच फेऱ्या मारणाऱ्या एकाद्या श्वापदाच्या तोंडून बाहेर पडल्यासारख्या – माझ्या किंकाळ्या नि उरापोटी ओरडणं कण्हणं, आतासुद्धा जसंच्या तसं मला पुन्हा ऐकू यायला लागतं !!

स्त्रीला असल्या भयंकर यातना आजही सहन कराव्या लागाव्यात, ही गोष्ट म्हणजे अगदी कमालीचा, अतर्क्य रानटीपणा वाटतो मला! याला काहीतरी उपाय निघालाच पाहिजे. हे सारं थांबवलंच पाहिजे. एवढं आधुनिक विज्ञान हाताशी असताना 'विनासायास प्रसूति' सहजसाध्य नाही, याला काही अर्थ आहे का? अपेंडिक्ससारखी शस्त्रक्रिया एखाद्या डॉक्टरानं रोग्याला भूल न देता केली, तर तो प्रकार जेवढा अक्षम्य ठरेल, तेवढाच हा यातनामय बाळंतपणाचा प्रकारही अक्षम्य आहे! सामान्यतः स्वतःची चिरफाड देखतां डोळा पाहण्याचा, नि हा अधिक्षेप सहन करण्याचा क्षणभराचा का होईना – हा कसला निर्बुद्धपणा बायकांच्या ठायी असतो, कुणास ठाऊक!......कसली बाष्कळ स्थितप्रज्ञता ही!......

......दोन दिवस नि दोन रात्री या अवर्णनीय यातना चालू होत्या...... त्यानंतर तिसऱ्या दिवशी सकाळीं आमच्या त्या बावळट डॉक्टरानं आपल्या पोतडीतून एक भला मोठा फॉरसेप्स – चिमटा – काढला. अन् गुंगीचं औषध वगैरे काहीही न देता खाटकासारखं आपलं काम उरकलं! मला वाटतं, की आगगाडीखाली चिरडून निघण्याच्या अनुभवाचा एक अपवाद केला, तर इतर कशाचीही, मला जे सहन करावं लागलं, त्याच्याशी तुलना होऊ शकणार नाही! ह्या निरर्थक हालअपेष्टांना जोपर्यंत पूर्णविराम मिळालेला नाही, तोपर्यंत स्त्रियांच्या कोणत्याही चळवळीबाबत किंवा मतदानाच्या हक्काच्या झगड्याबाबतचं कौतुक ऐकून घ्यायला मी तयार नाही! इतर शस्त्रक्रियांप्रमाणे 'प्रसूति' सुद्धा सह्य नि विनासायास झाली पाहिजे, म्हणून स्त्रियांनी खरं तर सत्याग्रह करायला हवा!

कोणती वेडपट अंधश्रद्धा ह्या वाजवी हट्टाच्या आड येते कोण जाणे!...... कसली उपरी भावनाप्रधानता नि कोणतं विघातक कारण याच्या पाठीमागे आहे? अर्थात् कुणी म्हणेल, की सर्वच बायकांना काही एवढा त्रास होत नाही – हो, नाहीच होत; रेड इंडियन बायकांना, शेतकरी-कामकरणींना आणि आफ्रिके-तल्या निग्रो बायकांना तर नाहीच होत बाळंतपणाचा त्रास; स्त्री जेवढी सुसंस्कृत,

जेवढी नागर तेवढ्या त्या यातना (विनाकारण भोगायच्या यातना!) अधिक भयंकर......! पण मग केवळ या नागरी स्त्रीसाठी का होईना, असल्या या जीवघेण्या प्रकारावर एखादा नागरी इलाज शोधून काढलाच पाहिजे!......

......ठीक आहे, प्रसूतीमुळे मी काही जीवाला मुकले नाही......मेले नाही खरीच; पण तसं काय – हालहाल करायच्या फळीवरून वेळेवरच बाजूला घेतलं गेलं, तर मरू घातलेला एकदा बंदीसुद्धा जगू शकतोच की! पुन्हा तुम्ही म्हणाल, की स्वतःच्या पोटचं बाळ डोळ्यांना दिसलं, तेव्हाच सारे कष्ट तुला भरून पावले – हो......खरंच, त्यावेळचा माझा आनंद पूर्ण होता...... शिगोशिग होता......निखळ होता......तरीसुद्धा, सहज उपाय होऊ शकणाऱ्या या भयंकर प्रकाराला अनुमती देणाऱ्या वैज्ञानिकांचा असीम अहंकार नि आंधळेपणा पाहून माझा संताप, संताप होतो! मला जे काही सोसावं लागलं, आणि इतरही बायकांना जे काही प्रत्यही सोसावं लागतं, त्याचा विचार मनात आला की आजही मी अधिक्षेपाच्या रागानं थरथरा कापायला लागते!

......पण माझं ते बाळ! माझं मन आश्चर्यानं भरून येत होतं...... मदनासारखं रूप......निळे निळे डोळे......अन् भुऱ्या लांब केसांचं रेशमी जावळ... हेच जावळ पुढे रुळण्याएवढं वाढलं, अन् हळूहळू सोनसळी कुरळ्या बटांमध्ये त्याचं रूपांतर झालं... तर काय सांगत होते, ते मदनाचं रूप... अन् मग?... ते अद्‌भुतातलं अद्‌भुत रहस्य! ते बाळमुख माझ्या स्तनाग्राला लागून आपल्या बिनदातांच्या हिरड्यांनी चावू, चोखू लागलं... अन् एकाएकी उसळून फुटलेला पान्हा चुटुचुटु प्यायला लागलं... बाळाचं तोंड स्तनाग्राशी झोंबल्याक्षणी आवेगानं उसळणाऱ्या पान्ह्याला वाट देताना मनात जे काही सुख उफाळतं त्याचं वर्णन कोणती तरी 'आई' आजवर करू शकली आहे का? ते चावे घेणारं धिटुकलं निर्दय बाळमुख... प्रियकराच्या मुखासारखं... अन् त्या उलट आपल्या प्रियकराचं मुख... बाळाची आठवण करून देणारं...! स्त्रियांनो हे अद्‌भुत रहस्य आपल्या भाग्यात असतानां आपण शिकून वकील, चित्रकार किंवा शिल्पकार होणं, या गोष्टी किती निरर्थक आहेत, नाही?... पुरुषाबद्दलच्या प्रीतीलाही मागं टाकणारं हे प्रेम... ह्या अपार प्रेमाची चव मी आज चाखली! ... ताणली – खेचली गेलेली, रक्तस्रावानं भरलेली मी... चिरफाड झालेली, असहाय मी ... अन् तो छोटा जीव, आक्रोश करणारा, लुचणारा! ... जीवन ... जीवन ... जीवन! मला जीवन हवं ... अन् माझी कला? कुठे होती माझी कला? माझी, किंवा कुणाचीही ... कोणतीही कला ... कुठे होत्या त्या कला या क्षणी? कलेचं मला काही सोयरसुतक होतं का तरी? या क्षणी मीच ईश्वर होते, हीच होती माझी धारणा ... साऱ्या कलावंतांहून श्रेष्ठ मी ... मी

परमेश्वर ...!

पहिले काही आठवडे मी तासन् तास माझ्या बेबीला कुशीत घेऊन तिचं निद्रिस्त रूप न्याहाळत राहायची ... कधी कधी तिची नजर माझ्याशी भिडायची ... मग वाटायचं, की जीवनरहस्याच्या अगदी उंबरठ्यावर, अगदी दाराशी उभे आहोत आपण ... कदाचित् जीवनाचं कोडं उलगडायच्या अगदी सीमेवरच असू आपण ! त्या नवजात देहांतला आत्मा माझ्या एकटक दृष्टीला देत असलेला दृष्टीचा प्रतिसाद तसं म्हटलं तर किती सनातन होता...शाश्वताला डोळे फुटावेत तसा ... प्रेमानं ओथंबलेला ... कदाचित् 'प्रेम' हेच साऱ्या कोड्याचं उत्तर असेल ... त्या क्षणीच्या आनंदाचं कोणत्या शब्दांनी यथोचित वर्णन होऊ शकेल ...! त्यातून मी काही लेखिका नाही, शब्द गवसले नाहीत, तर काही नवल आहे का ?

मी आणि माझी गोड मैत्रिण मारी किस्ट, बेबीसह 'ग्र्यूनवाल्द'ला परतलो ... सर्व मुलांना बाळाला पाहून फारच आनंद झाला ... एलिझबेथला मी म्हटलं, "आपली सर्वांत छोटुकली शिष्या बघ तरी !" "नाव काय ठेवायचं ?" प्रत्येकजण विचारायला लागला ... क्रेगनं एक सुंदर आयरिश नाव सुचवलं 'देईद्रे' – आयर्लण्डची लाडकी देईद्रे; मग त्याच नावानं आम्ही तिला हाक मारायला लागलो !

हळूहळू माझी गेलेली ताकद परत यायला लागली ... कित्येकदा त्या ॲमेझॉनच्या सुरेख पुतळ्यासमोर मी उभी राहायची – समर्पणाचं प्रतिक होतं ते एक – माझ्या मनात एक प्रकारचा सहानुभाव होता तिच्याबद्दल ... ॲमेझॉनबद्दल ... कारण सागरात उडी घेण्याएवढी ऊर्जस्वल क्षमता तिच्या ठायीहि इथून पुढे कधी दिसणार नव्हती !

# २०

आपल्या श्रीमंत बँकर नवऱ्यासह आपल्या अलिशान बंगल्यात राहणारी ज्युलिएट मेंडलसन आमच्या अगदी शेजारीच रहात होती. खरं म्हणजे तिचं मित्रमंडळ लब्धप्रतिष्ठित शिष्टांचंच असूनही ती आमच्या शाळेच्या कार्यात मोठ्या उत्साहानं मन घालत असे. एके दिवशी तिनं आम्हा सर्वांना एलीनोरा ड्यूज समोर नृत्य करून दाखवायला बोलावलं ... एलीनोरा ड्यूज ! ... माझं लाडकं दैवत !

मी क्रेगची ड्यूजशी ओळख करून दिली. त्याच्या रंगमंच, नाट्य, यांबद्दलच्या कल्पना ऐकताक्षणी तिला खूप आकर्षक वाटल्या. ... तिनं त्या विषयात खूपच उत्सुकता दाखवली ... अशाच उत्साहात मग आणखी काही गाठीभेटी-नंतर तिनं आम्हाला फ्लॉरेन्सला येण्याचं आमंत्रण दिलं — अन् क्रेगनं तिथे आपल्या कल्पनांवर प्रात्यक्षिकांसह एकादं भाष्य करावं अशी इच्छा तिनं प्रदर्शित केली ... अन् शेवटी एलीनोरा ड्यूजसाठी क्रेगनं फ्लॉरेन्सला जाऊन इब्सेनच्या 'रोसूमेरशोम'च्या नेपथ्याची सारी जबाबदारी स्वीकारावी, असं ठरलं. फ्लॉरेन्सची 'डी लक्स' ट्रेन आम्ही पकडली — एलीनोरा ड्यूज, क्रेग, मारी किस्ट, बेबी, आणि मी —

वाटेत बेबीला मी अंगावर घेतलं, तर दूध निवळ नव्हतं ... मग बाहेरच्या दुधाची भर द्यावी लागली बाटली देऊन ... काही का असेना, आज मी अगदी आनंदाच्या शिखरावर होते — कारण माझ्या दृष्टीनं, जगातल्या सर्वांत आदरणीय अन् प्रिय अशा दोन व्यक्ती एकत्र आल्या होत्या ! — क्रेगला त्याचं आवडतं काम करायला मिळणार होतं, अन् एलीनोराला लाभणार होतं, तिच्या प्रतिभेल

साजेसं नेपथ्य !

फ्लॉरेन्सला आल्यावर ‘ ग्रॅन्ड ’ जवळच्या एका छोट्या हॉटेलमध्ये आम्ही उतरलो ... ‘ ग्रँड ’ हॉटेलच्या एका राजेशाही ‘ स्वीट ’ मध्ये एलीनोराची व्यवस्था होती.

मग पहिलं चर्चासत्र सुरू झालं...त्यांत मीच क्रेगच्या दुभाष्याचं काम करत होते...कारण त्याला ना फ्रेंच भाषा येत होती, ना इटालियन समजत होतं; अन् इकडे एलीनोराला इंग्लिशचा एक शब्दसुद्धा कळत नव्हता ! या दोन प्रति-भावंतांच्यामध्ये मी सापडले होते...अन् आश्चर्य म्हणजे त्यांनी पहिल्यापासूनच अगदी परस्परविरोधी पवित्रे घेतले होते ! का, देव जाणे ! मी एकच आशा बाळगून होते : दोघांनाही खूष ठेवायचं. दोघांचंही समाधान संभाळायचं !... माझी आशा थोडीफार सफल झाली खरी, पण ती काहीशा युक्ति-चातुर्यामुळे... गैरस्पष्टीकरणामुळे !...दुभाष्याची कामगिरी करताना ज्या थोड्या थापा मला माराव्या लागल्या, खोटं बोलावं लागलं, त्याबद्दल मला खरं म्हणजे कुणीही क्षमाच केली पाहिजे...कारण एका चांगल्या कारणासाठी ही सारी गफलत मी केली होती !...त्या भव्य नाट्यनिर्मितीला खंड पडायला नको होता...ते कार्य पुरं व्हायलाच हवं होतं; अन् क्रेग खरोखरी तिला काय म्हणाला, हे मी एली-नोराला जसंच्या तसं सांगितलं असतं, किंवा एलीनोरा ज्या शब्दांत क्रेगला हुकूम सोडत होती, त्याच तऱ्हेनं मी त्यांचा पुनरूच्चार करून, क्रेगला समज दिली असती, तर काय तुफान झालं असतं, कोण जाणे !

‘ रोस्मेरशोम ’च्या पहिल्या अंकात, इब्सेननं बैठकीच्या खोलीचं दिलेलं वर्णन ‘ जुन्या पद्धतीनं सजवलेली, आरामशीर– ’ असं आहे, मला वाटतं; पण क्रेगच्या डोळ्यांसमोर एका भव्य इजिप्शियन मंदिराचं आतलं आवार साकार झालेलं होतं !...छत अगदी कमालीचं उंच...आकाशाकडे झेपावणारं अन् भिंती दूरदूर जात दिगंतरांत विलीन झालेल्या...इजिप्शियन मंदिराहून वेगळी एकच गोष्ट इथे होती...ती म्हणजे अगदी दूर शेवटी एक चौकोनी मोठीच मोठी खिडकी होती इथे. इब्सेनच्या वर्णनाप्रमाणे ह्या खिडकीतून, एका मोठ्या चौकाकडे नेणारा, वृक्षांनी दुतर्फा वेढलेला एक रस्ता दिसायला हवा. क्रेगनं आपली कल्पना वापरून खिडकी दहा–गुणिले–बारा मीटर्सच्या मापाची केली होती–अन् त्यातून पिवळ्या, लाल आणि हिरव्या रंगांनी रेखलेलं एक पेटतं निसर्गदृश्य दिसत होतं !...हा देखावा तर मोरोक्कोतलाही असू शकला असता ! एखाद्या जुन्या पुराण्या चौका-सारखं वाटेल, असं त्यांत नावाला देखील काही नव्हतं !

एलीनोरा काहीशी अस्वस्थ झालेली दिसली...म्हणाली, “ माझ्या मते ही खिडकी छोटी पाहिजे...ती मोठी असणं बरोबरच नाही...अशक्यच आहे ”...

यावर क्रेग इंग्लिशमध्ये कडाडला, "तिला सांग,...कुठल्याही आलतूफालतू बाईनं माझ्या कामात ढवळाढवळ केलेली चालणार नाही मला, सांगून ठेवतो!"

मी आपलं सावधगिरीनं एलीनोराला त्याचं भाषांतर असं करून दिलं– क्रेग म्हणतो, "त्याच्या लेखी तुमच्या मताचं मोल फार मोठं आहे...तुम्हाला ज्यामुळे समाधान वाटेल असं काहीही तो अगदी खुषीनं करेल... !"

मग मी क्रेगकडे वळले; अन् एलीनोरानं घेतलेल्या हरकती त्याच्या कानावर घालताना, जरासा हिकमती डाव टाकला नि त्याला सांगितलं, एलीनोरा म्हणते, की "तू प्रतिभावंत आहेस, तेव्हा तुझ्या रेखाटनांच्यावर कसलीही सूचना किंवा टीकाटिप्पणी करायला मी जाणार नाही– आहेत त्याच स्वरूपात ती रेखाटनं स्वीकारली जातील– !"

कधीकधी हे असले वादसंवाद तासन्तास चालायचे...कितीदा तर बेबीला अंगावर घ्यायच्या वेळातच हा प्रकार चालायचा; तरी पण ती शांतिदूताची अन् दुभाष्याची दुहेरी भूमिका वठवायला मी केव्हाही आसपास रहायचीच !... ह्या कलावंतांनी एकमेकांना न म्हटलेल्या गोष्टींचं अशा तऱ्हेनं स्पष्टीकरण करण्याच्या फंदात, कधीकधी बेबीच्या दुधाची वेळ टळून गेल्यानं मला अतिशय त्रास सहन करावा लागायचा. त्या वेळी माझ्या शरीरात एक प्रकारचा थकवाच भरून राहिला होता खरं म्हणजे. माझी अवस्था वाईट झालीच होती... त्यात प्रकृती सुधारण्याचा विश्रान्तीचा माझा हा काळ, या तनमनाला झिजवणाऱ्या मुलाखतींनी अगदी तापदायक होऊन गेला ! पण 'रोसुमेरशोम'ची निर्मिती, ही केवढी मोठी कलात्मक घटना होती माझ्या लेखी–एलीनोरा ड्यूजसाठी क्रेगचं नेपथ्य !...मी केलेला कोणताही त्याग थिटाच वाटत होता मला त्यापुढे !

त्यानंतर क्रेगनं आपल्याला रंगमंदिरात बंदच करून घेतलं...समोर डझनावारी रंगांचे डबे, आणि एक मोठा ब्रश घेऊन त्यानं स्वतःच ते देखावे रंगवायला सुरुवात केली; कारण ज्याला तो स्वतःचं म्हणणं तंतोतंत समजावू शकेल, असा इटालियन रंगारीच मुळीं त्याला मिळेना ! पाहिजे होतं, तसलं कॅनव्हास देखील मिळालं नाही, तेव्हा त्यानं गोणपाट घेऊन ते एकत्र शिवून घेतलं...इटालियन वायकांचा एक जथाच्या जथा रंगमंचावर बसून कितीतरी दिवस ते गोणपाट शिवत होता ! पोरगेलेसे तरुण इटालियन रंगारी मंचाच्या आसपास धावधावून क्रेगनं दिलेले हुकूम आणि सूचना–सांगितलेली कामं, पार पाडण्याचा प्रयत्न करत असायचे...अन् आपल्या लांब केसांची विखुरलेली झुलपं सावरत क्रेग त्यांच्यावर ओरडताना आणि रंगाच्या डब्यात ब्रश बुचकळून घेऊन शिड्यावरून कसल्या कसल्या अवघड जागी चढताना दिसायचा ! सारा दिवस आणि

जवळ जवळ रात्रभर तो तिथे रंगमंदिरात असायचा...खाण्यापिण्यासाठीसुद्धा बाहेर यायचा नाही! दुपारी जेवणाच्या वेळेला मी त्याच्यासाठी एक छोटासा डबा नेला नसता तर मला वाटतं, त्यानं काहीही खायची फिकिर केली नसती!

एक ताकीद त्यानं देऊन ठेवली होती!..." ड्यूजला रंगमंदिराबाहेर ठेवा— तिला इथे येऊ द्यायचं नाही; ती जर का आली, तर मिळेल ती गाडी पकडून मी इथून निघून जाईन..."

इकडे आत काय चाललं आहे, ते पहायला ड्यूज अगदी उत्सुक झालेली! तेव्हा तिचा अपमान होऊ न देता तिला रंगमंदिरापासून दूर ठेवण्याचं काम अर्थातच माझ्यावर येऊन पडलं होतं! मी तिला लांबलांब फिरायला घेऊन जायची बागेत ...तिथल्या सुरेख पुतळ्यांच्याकडे नि सुंदर सुंदर फुलांच्याकडे पाहून मग तिचं मन शांत व्हायचं...

ड्यूजची तिथल्या बागेत फिरतानाची ती प्रतिमा, ते रूप मी कधीही विसरणार नाही...इहलोकीच्या कुणा सामान्य स्त्रीसारखी ती कधी दिसलीच नाही...ती दिसायची डान्टेच्या किंवा पेट्रार्कच्या चक्षूंनी पाहिलेल्या कोणा दिव्य व्यक्तिमत्त्वा-सारखी!...दुर्दैवानंच केवळ या ग्रहावर अवतरलेली! रस्त्यातले सारे लोक तिला वाट करून द्यायचे, अन् आदरानं पण काहीशा कुतूहलानं-आमच्याकडे एकटक पहात राहायचे; ड्यूजला लोकांनी तिला तसं न्याहाळलेलं अजिबात आवडायचं नाही...त्यांची ती उवडउवड नजर टाळण्यासाठी ती नेहमी बिनरह-दारीच्या वाटांनी छोट्या गल्ल्यांतूनच जायची, अन् शिवाय माझ्यासारखं गरीब जनतेचं तेवढं प्रेम तिला नव्हतंच...सामान्य जनता तिला आपल्यापेक्षा अत्यंत नीच दर्जाची वाटायची...त्याच तऱ्हेनं या लोकांचा उल्लेखसुद्धा ती करत असे...

हे सारं मला वाटतं, दुसऱ्या काही कारणांपेक्षाही, तिच्या अति संवेदनशील मनामुळेच असावं... तिला वाटायचं, लोक तिच्याकडे दोषैकदृष्टीनंच पाहतात ...खरं पहाता ड्यूज जेव्हा जेव्हा लोकांच्या प्रत्यक्ष सान्निध्यात आली, तेव्हा ती वागली, त्याहून अधिक सहानुभूतीनं आणि जास्त प्रेमानं वागणं कुणालाही अशक्यच होतं, असंच म्हणावं लागेल!

... बागेतलं आमचं ते हिंडणंफिरणं मी कधीच विसरणार नाही... तिथले ते पॉपलर वृक्ष ... एलीनोरा ड्यूजचं मस्तक ... कारण आम्ही अगदी एकट्या आहोत, अशी खात्री झाली, की ड्यूज हॅट काढून, आपले किंचित् रूपेरी झाक दाखवायला लागलेले किरमिजी रंगाचे केस वाऱ्यावर मोकळे सोडायची... तिचं ते असीम बुद्धिमत्ता प्रकट करणारं कपाळ... आणि ते अप्रतिम डोळे ... कधीच माझ्या स्मरणातून जाणार नाहीत! खरं म्हणजे एकप्रकारचे उदासखिन्न

डोळे ... पण जेव्हा चेहराच उत्साहानं तेजाळायचा, तेव्हा त्यात उमटलेला अतिसुंदर आनंदोन्मेष आजवर कोणत्याही दुसऱ्या मानवी चेहऱ्यावर किंवा कोणत्याही कलाविष्कारात मला उमटलेला आढळलेला नाही, असंच मी म्हणेन!

...'रोसुमेरझोम'च्या नेपथ्याच्या कामात प्रगती होत होती ... क्रेगचं दुपारचं किंवा रात्रीचं जेवण घेऊन मी रंगमंदिरात जायची, तेव्हा प्रत्येक खेपेला तो मला, रागाच्या नि अत्युत्कट आनंदाच्या सीमेवर झोके घेत असल्यासारखा वाटायचा ... एकदा त्याला वाटायचं, – "कलात्मक विश्वानं पाहिलेलं हे सर्वात महान् दृश्य ठरेल –!" तासाभरानंच तो विव्हळायला लागायचा ... "या देशात मला काहीही मिळू शकत नाही ... रंग मिळत नाहीत, चांगले रंगारी मिळत नाहीत ... सारं काही माझं मला करावं लागतंय्!"

... एलीनोरा ड्यूजनं पूर्ण देखावा – संपूर्ण नेपथ्य पहायलाच हवं, अशी वेळ येऊन ठेपली! ... मला सुचली ती कारणं काढून विशेषतः तिला मी दूर ठेवलं होतं ... तो दिवस उगवला, तेव्हा ठरल्यावेळीं तिला बोलवायला जाऊन, तिच्यासह मी रंगमंदिरावर गेले. ड्यूज कमालीची अस्वस्थ नि चाळवलेल्या मनःस्थितीत होती. एकादा वादळी दिवस जसा एकदम झंझावाती सुसाट तांडवाचंच रूप धारण करतो, तसं कुठल्याही क्षणी तिच्याबाबत घडेल, अशी भीती मला वाटत होती. तिच्या हॉटेलच्या लॉबीतच ती मला भेटली. तिनं अंगावर एक मोठा केसाळ तपकीरी रंगाचा कोट नि डोक्यावर एखाद्या रशियन कोसॅकची असावी, तशी टोपी घातली होती. टोपी किंचित् तिरप्या कोनानं डोळ्यावर आली होती. तिच्या प्रेमळ मित्रमंडळींच्या सल्ल्यानुसार ती अधूनमधून कपड्याच्या अगदी अत्याधुनिक दुकानांना भेटी देत असायची, तरी सामान्यतः तिचा पोशाख फारसा फॅशनेबल नसायचा – अन् चुटपुटीत अन् 'स्टायलिश' दिसायची अशी हौस तिला नव्हतीच. तिच्या फ्रॉकची एक बाजू वर नि एक बाजू खाली असे ... हॅट नेहमी तिरप्या अवधानानंच घातलेली असायची ... किती मौल्यवान् वस्त्रं असली, तरी ती तिनं परिधान केली आहेत, असं वाटत नसे – वाटायचं की ही वस्त्रं अंगावर वाहून नेण्याइतपत कमीपणा तिनं मोठ्या मनानं स्वीकारला आहे!

...रंगमंदिराकडे जाताना मी इतकी अस्वस्थ झालेली होते मनातून, की काही बोलायला असं मला सुचत नव्हतं! ड्यूजला रंगमंचाच्या दाराकडे धाव न घेऊ देता, मोठ्या धोरणीपणानं मी थिएटरचा मुख्य दरवाजाच मुळीं मुद्दाम उघडवला; आणि तिला एका बॉक्सकडे घेऊन गेले. आम्हाला खूप वेळ नुसतंच ताटकळावं लागलं...अन् त्या अवधीत ड्यूजच्या, "माझी खिडकी

मला मनापुढं दिसते तशीच असेल ना ? कुठं आहे तो सीन ? " अशा प्रश्नांना उत्तरं देता देता माझे जे काय हाल झाले, ते माझे मला ठाऊक !

तिचा हात मी घट्ट धरून ठेवला होता...अन् हलके हलके थोपटत "आता थोडीच कळ काढायची...एवढ्यात सारं काही दिसेल...जरा धीर धरायला हवा..." असं काही तरी म्हणत होते...मनात मात्र त्या 'छोट्या' खिडकीच्या विचारानं मी अगदी कमालीची घाबरून गेले होते...कारण प्रत्यक्षात त्या खिडकीनं कल्पनेच्या पलीकडची भव्य परिमाणं धारण केली होती !

मधूनमधून क्रेगचा आवाज, अन् त्यातला संत्रस्त सूर कानावर येत होताच... मध्येच इटालियन बोलायची धडपड...मध्ये..." वैताग, वैताग अगदी ! हे फलाणं का इथे ठेवलं नाही – मी सांगतो तसं करायला तुम्ही काय व्याज ? " ...वगैरे आरडाओरड...अन् मग पुन्हा सारं शान्त !

शेवटी एक वेळ अशी आली, की वाटलं तासन्तास वाट पहाणं चाललं आहे आपलं...अन् इकडे एलीनोराच्या रागाचा चढता पारा तर आवरण फोडून आता कोणत्या क्षणी बाहेर उसळून येईल, त्याचा काही नेम राहिला नव्हता... एवढ्यात पडदा हळूहळू वर गेला...

अहाहा !...त्या क्षणी आमच्या स्तिमित, हर्षोत्फुल्ल डोळ्यांसमोर जे काही उलगडलं, त्याचं वर्णन करणं तरी शक्य आहे का ? इजिप्शियन मंदिराचा उल्लेख केला होता नाही मी आधी ? पण कुठल्याही इजिप्शियन मंदिरातून असं अपार सौन्दर्य दृष्टीला पडणार नाही ! – गोथिक प्रार्थनामंदिरातून नाही, ॲथेनियन राजवाड्यातून तर नाहीच नाही...! सुंदरतेचं असं दुसरं दर्शनच मुळीं मला घडलेलं नाही कधी...निळाईनं भरलेल्या अथांग अवकाशातून, स्वर्गीय संगतीतून, अंतर्मेळातून, ऊर्ध्वगामी, चढत्या रेषांतून...नि अमित उत्तुंगतेतून...आपला आत्मा जणू काही खेचला जात होता...त्या पलीकडल्या भव्य खिडकीतल्या प्रकाशाकडे...ती खिडकी !...ती खिडकी पलीकडचा वृक्षराजींच्या दुहेरी गुंफणीनं किनारलेला रस्ताच दाखवत नव्हती केवळ, तर बाहेर आकारलेलं अनन्ताकार विश्व !...त्या साऱ्या निळ्या अवकाशात मानवाचा सारा विचार, त्याचं चिन्तन आणि त्याचा ऐहिक दुःखभोग भरून राहिला होता !...अन् खिडकीपलिकडे ओसंडून चालला होता अपरिमित आनंद ...सुख...क्रेगच्या कल्पनाशक्तीची किमया ! हा 'रोस्मेरशोम 'चा दिवाणखाना होता का ? इब्सेनला काय वाटलं असतं, मला माहीत नाही...पण एकादवेळी तोही आमच्यासारखा अवाक् झाला असता...हरखून गेला असता !

एलीनोरानं माझा हात पकडला...हातांचा विळखा माझ्याभोवती घालून तिनं मला घट्ट मिठी मारली ... तिच्या देखण्या चेहऱ्यावरून आसवांच्या धारा

वाहताना मी पाहिल्या...एकमेकींच्या मिठीत तशाच स्तब्धमूक होऊन बसून राहिलो आम्ही काही क्षण...एलीनोरा तिच्या कलेवरच्या प्रेमामुळे अन् त्यातून भावलेल्या आनंदामुळे...अन् मी? हायसं वाटल्यामुळे!...आधी नाना शंका-कुशंकांनी घेरलेल्या माझ्या मनाला ड्यूजचं समाधान पाहून कमालीचं हायसं वाटल्यामुळे!...अशाच बसून राहिलो होतो आम्ही...मग माझा हात धरून तिनं मला बॉक्सच्या बाहेर ओढून नेलं – मधल्या अंधाऱ्या कॉरिडॉरमधून नेहमीप्रमाणे लांब ढांगा टाकत ती रंगमंचाकडे गेली...रंगमंचावर उभं राहून तिच्या त्या विशिष्ट 'ड्यूज' आवाजात क्रेगला साद घालत तिनं म्हटलं, "क्रेग, गॉर्डन क्रेग, इकडे ये!"

क्रेग बाजूच्या विंगमधून बाहेर आला, तो मुळी एखाद्या लाजऱ्या मुलासारखा! ड्यूजनं त्याला आपल्या बाहूत सामावून घेतलं...अन् मग तिच्या ओठांतून इटालियन स्तुतिसुमनांची जी माळ ओघळली म्हणता, मला काही तिच्या वेगानं त्याचं भाषान्तर क्रेगसमोर करता येईना! एखाद्या कारंजांतून पाण्याच्या धारा उसळाव्या, तसाच तो शब्दावेग होता!

भावनेच्या ऊर्मींमुळे आमच्या डोळ्यांना जसं पाणी आलं, तसं काही क्रेगला झालं नाही, तरी तो कितीतरी वेळ अगदी, अगदी मूक होता...त्याच्यापरी त्यालाही खूप दाटून आल्यासारखं झालं होतं, याचंच ते प्रत्यन्तर होतं.

ड्यूजनं मग साऱ्या कंपनीलाच तिथे बोलावून घेतलं...ही इतर सारीजणं अगदी निर्लिप्तपणे रंगमंचाच्या पाठीमागे उभी होती– त्यांना बोलावून चार शब्द सांगतांना ती अगदी भारावून गेलेली दिसली...म्हणाली, "हा महान् प्रतिभावंत माझ्या आयुष्यात आला, हे मी माझं भाग्यच समजते– आता या कलावंताच्या उत्तुंग कलेचा साक्षात्कार साऱ्या जगाला घडवण्याच्या कारणीच माझा कला-व्यवसाय, लावायचा माझा मानस आहे."

...नंतर तिनं रंगालयासंबंधीच्या सगळ्या आधुनिक विचारधारणेवर, आधुनिक नेपथ्यावर आणि नटवर्गाचं जीवन आणि व्यवसाय यांबद्दलच्या आधुनिक दृष्टिकोणावर ताशेरे झाडायला जेव्हा सुरुवात केली, तेव्हा तिच्या वाणीला पुन्हा एकदा असं ओज चढलं होतं म्हणतां!

हे सारं बोलणं चालू असताना क्रेगचा हात तिनं तसाच धरून ठेवला होता, आणि त्याच्याकडे पुन्हापुन्हा वळून ती त्याच्या प्रतिभेचं, आणि त्या ओघानंच सुरू झालेल्या रंगभूमीच्या नव्या, महान् पुनरुत्थानाचं कौतुक करत होती. "आजचं रंगमंदिर मृतावस्थेत आहे; नव्हे शवागार आहे ते– या साऱ्या भयंकर अनवड अवस्थेतून आम्हा गरीब बिचाऱ्या नटवर्गाची सुटका होणार असेल, तर ती केवळ गॉर्डन क्रेगच्या हातांतून"...ती वारंवार म्हणत होती...

अशावेळी माझ्या आनंदाची तुम्हीच कल्पना करा...त्यावेळी मी तरुण होते... कोवळ्या वयात होते...अननुभवी होते...मन श्रद्धाळू होतं...उत्साहाच्या अतिशय भरांत लोक जे काय सारं बोलतात, ते खरंच असतं, मनापासूनचं असतं, असा विश्वास मला वाटायचा...माझ्या कैवसारख्यच्या एवढ्या मोठ्या कलेच्या ठायी एलीनोरा ड्यूज आपल्या असीम प्रतिभेचं समर्पण करतानाची स्वप्नं मी पाहायला लागले होते...उरलेला सारा भविष्यकाळ म्हणजे, आधी जाहीर न केलेला—पण क्रेगच्या कलाप्रांतातल्या यशाचा चढता आलेख...पर्यायानं रंगकलेचीच सतत विस्फारणारी प्रभा, अशी दृश्यं माझ्या डोळ्यांपुढे तरळत होती! अरेरे!... माणसाच्या उत्साहाची, उमेदीची—अन् त्यांतही विशेषकरून स्त्री जातीच्या उत्साहभराची—क्षणिकता आणि अशाश्वती मी मुळी ध्यानातच घेतली नव्हती! अन् शेवटी सारं सिद्ध झालंच की!...की एलीनोरा एवढी प्रतिभावान् खरी पण अखेरीस एक बाई—एक स्त्रीच होती केवळ!

'रोस्मेरशोम'च्या शुभारंभाच्या रात्री फ्लॉरेन्सच्या उत्सुक जनतेनं मोठ्या संख्येनं उपस्थित राहून रंगमंदिर फुलवून टाकलं होतं. पडदा उघडल्याक्षणी कौतुकाची नि आश्चर्याची एक लहरच साऱ्या प्रेक्षकवर्गातून तरंगत गेली... दुसरा काही परिणाम होणं शक्यच नव्हतं. 'रोस्मेरशोम' चा तो पहिला प्रयोग आजही फ्लॉरेन्समधल्या कलाप्रेमी रसिकांच्या स्मरणात आहे!

ड्यूजनं आपल्या स्वभावातल्या उपजत भानानुसार बाजूला रूळणाऱ्या मोठ्या रुंद बाह्यांचा एक पांढराशुभ्र वेष परिधान केला होता — तिनं प्रवेश केला तेव्हा 'रेबेका वेस्ट' दिसण्याऐवजी ती ज्योतिष वर्तवणाऱ्या एखाद्या पुरातन ग्रीक देव-दूतीसारखीच जास्त दिसत होती. तिच्या प्रतिभेच्या अचूक प्रेरणेनुसार, महत्त्वाच्या प्रत्येक ओळींचा भावार्थ लीलया उचलून धरत, स्वतःला पांघरणाऱ्या प्रकाशाच्या प्रत्येक शलाकेच्या अपेक्षित परिणामाचा अंदाज घेऊन ती रंगभूमीवर वावरत होती! सारे हावभाव, साऱ्या हालचाली तिनं बदलून टाकल्या...त्या सबंध प्रवेशांत, कोणत्या तरी मोठ्या भविष्यकालीन घटनांची पूर्वसूचना देणाऱ्या एखाद्या दिव्यदृष्टि साधिकेसारखाच तिचा वावर होता!

...मात्र जेव्हा इतर नटांनी मंचावर प्रवेश केला, (विशेषतः खिशात हात अडकवलेला 'रोस्मेर'!) तेव्हा पडद्यामागचे मदतनीस नोकर चुकून मंचावर फिरकले की काय, असं वाटलं! ते पहाणं, म्हणजे शुद्ध वैताग होता!

...पण,

"माझ्या मनोभूमीवर उतरणाऱ्या स्वप्नांच्या सोनेरी धुक्यात मी जेव्हा गुरफटून जातो; माझ्याच मनात उद्भवलेल्या अभिनव, नि महत्त्वपूर्ण विचारांची मदिरा जेव्हा मला चढू लागते; आणि त्या विचारांवर आरूढ होऊन उंच उंच

भरारी घेत असताना त्यांच्या पंखांच्या विंझणवाऱ्यानं माझा जीव जेव्हा सुखावतो, तेव्हा तेव्हा त्यांचं रूपांतर मी काव्यात, स्वप्नदृष्यात, प्रतिमासृष्टीत, चित्ररेखातून करत आलो आहे..." ...ही शब्दकळा पेलणारा, 'ब्रेन्डेल'ची भूमिका करणारा नट मात्र त्या अतर्क्यसुंदर नेपथ्यात, देखाव्यात सहज चपखल सामावून गेल्यासारखा वाटला....

...हा प्रयोग पाहून आम्ही परतलो ते भलत्याच खुषीत! क्रेग तर आनंदानं अगदी फुलून गेला होता. तो भविष्याची स्वप्नं पहात होता...मोठमोठ्या नेपथ्य-प्रकल्पांची एक लांबच लांब माळ.. एलीनोरा ड्यूजलाच अर्पण केलेली...त्याच्या स्वप्नाळू डोळ्यांपुढे तरळत होती! ज्या अतिरेकानं तो ड्यूजवर संतापत असे, त्याच अतिरेकानं तो आता तिचे स्तुतिपाठ गात होता...अरेरे!...मनुष्याच्या चंचलतेला काय म्हणावं! कारण क्रेगनं बडवलेल्या नेपथ्याच्या कोंदणात ड्यूजची प्रतिभा जडवली गेल्याची साक्ष नोंदवणारी हीच एकुलती एक रात्र ठरली!... तिची नाटकं अनेक होती...प्रत्येक रात्री एक वेगळा प्रयोग लागायचा...

ही सगळी धावपळ आटोपल्यानंतर मी माझ्या बॅन्केत गेले, तर खात्यात जमा म्हणून काही नव्हतंच. बेबीचा जन्म, 'ग्रूनवाल्ड' शाळेच्या गरजा, फ्लॉरेन्सला जाऊन राहण्याचा खर्च...या सर्वांमुळे माझी सारी शिल्लक संपून गेली होती! आता ही रिकामी तिजोरी भरून काढायची काहीतरी व्यवस्था करणं अगदी भागच होतं...एवढ्यात अगदी वेळेवरच सेंट पीटर्सबर्गच्या एका ठेकेदारानं, मी पुन्हा नृत्यकार्यक्रमांना सुरुवात केली किंवा नाही, याबद्दल विचारणा करून, रशियात नृत्यदौरा आखण्यासंबंधीचं आमंत्रण देखिल पाठवलं.

मी बेबीला मारी क्रिस्टच्या देखरेखीखाली सोपवून क्रेगला ड्यूजच्या स्वाधीन केलं; आणि फ्लॉरेन्स सोडून स्वित्झरलंड नि बर्लिनमधून जाणाऱ्या एक्सप्रेस गाडीनं सेंट पीटर्सबर्गला निघाले...तो प्रवास मला किती दुःखदायक वाटला असेल, याची कल्पना तुम्हाला सहज करता येईल...बेबीपासून मी पहिल्यांदाच दूर जात होते, अन् क्रेग आणि ड्यूज यांचा विरहही मला असह्य वाटत होता. माझी प्रकृति तशी तोळामासाच होती...त्यात बेबी अजूनही अंगावरच्या दुधावर अवलंबून असे...त्यामुळे छोट्या यंत्रानं स्तनातलं दूध मुद्दाम काढून टाकावं लागायचं...हा अनुभव भयानक होता...अश्रू ढाळायला लावणारा...

गाडी वेगानं उत्तरेकडे दूरदूर धावत होती ... पुढेपुढे जात होती ... पुन्हा एकदा त्या हिमाच्छादित जंगली सपाटीच्या, अफाट परिसरानं मला वेढून टाकलं ... पण आता तो परिसर आणखीच एकाकी नि उदास भासत होता... शिवाय ड्यूज आणि क्रेग यांच्यात माझं मन मी इतकं गुंतू दिलं होतं, की माझ्या कलेकडे लक्ष द्यायला मला फुरसतच झाली नव्हती ... अर्थात् आता हे नृत्य-

दौऱ्याचं दिव्य निभावण्याच्या दृष्टीनं माझी काहीच तयारी नव्हती; तरी देखिल माझ्या नृत्यप्रयोगातल्या शक्याशक्य न्यूनांकडे दुर्लक्ष करून त्या प्रेमळ रशियन प्रेक्षकांनी पुन्हा पूर्वीच्याच उत्साहानं माझं स्वागत केलं ... एक गोष्ट मला आठवते मात्र ... की अनेक वेळा नाचता नाचता मला पान्हा फुटायचा ... आणि माझ्या ट्यूनिकमधून धारा वाहायच्या दुधाच्या ... मला खूप संकोच वाटायचा ... कसनुसं व्हायचं — खरंच, स्त्रीला स्वतःचा म्हणून एक जीवितव्यवसाय पत्करून तो तडीला नेणं किती अवघड असतं नाही !

रशियातला हा दौरा मला फारसा नीट आठवतच नाही ... माझं हृदय आपल्या साऱ्या बळानिशी मला फ्लॉरेन्सकडे खेचत होतं, हे काही सांगायला हवं का ?... साहजिकच मी हा दौरा शक्य तेवढ्या लवकर गुंडाळून हॉलंडचा दौरा स्वीकारला ... कारण त्यामुळे मी माझ्या शाळेच्या, अन् ज्यांना ज्यांना कधी पाहीनसं मला झालं होतं, त्या माणसांच्या जराशी का होईना जवळ जाणार होते ...

ॲमस्टरडॅमच्या कार्यक्रमाच्या पहिल्या रात्री एक कसलासा विचित्र आजार झाला मला. मला वाटतं, अंगावरच्या दुधाशीच त्याचा काहीतरी संबंध असावा. 'दुधाचा ताप' की काय म्हणतात तसा ... कार्यक्रम संपताक्षणी मी धाडकन् पालथी पडले बेशुद्ध होऊन ... होटेलमध्ये मला उचलून न्यावं लागलं. तिथे कित्येक दिवस ... दिवस का, कितीतरी आठवडे ... बर्फाच्या पिशव्यांनी भरलेल्या, अंधार केलेल्या एका खोलीत निजूनच होते मी ! सारे म्हणायचे हा 'न्युरायटीस' आहे...या रोगावर कोणताही डॉक्टर रामबाण इलाज शोधून काढू शकलेला नाही ! ... आठवडेच्या आठवडे माझ्या पोटात काही गेलं नाही ... जातच नव्हतं... थोडीशी अफू घातलेलं दूधच मला देत असत...आणि एका वातातून दुसऱ्या वातावस्थेत संचार करत करत कशीतरी मी बेशुद्धीवजा झोपेत विलीन व्हायची...

क्रेगनं फ्लॉरेन्सहून धाव घेतली...अन् मूर्तिमन्त प्रेमभावच जणू, असा वागला ...तीनचार आठवडे माझ्याबरोबर राहिलासुद्धा तो...माझ्या शुश्रूषेत देखिल त्याचा वाटा असे...पण मग एक दिवस त्याला एलीनोराची तार आली -, " नाइस्मध्ये ' रोस्मेरशोम 'चा प्रयोग लावला आहे...नेपथ्याला रया नाही — तावडतोब निघून ये ! "

मी आता जवळजवळ बरी होण्याच्या मार्गाला लागलेच होते — तेव्हा क्रेग लागलीच नाईसला गेला, पण तार पाहताक्षणीच माझ्या मनात एक भयंकर शंका तरळून गेली होती...दुभाषीपणाचं काम करून त्यांचे मतभेद निस्तरायला आसपास मी नसताना त्या दोघांचं कसं काय जमणार होतं, देवच जाणे !

जुन्यापुराण्या ‘ नाईस कॅसिनो ’ मध्ये एक दिवस क्रेग सकाळीच जाऊन पोहोचला, तर त्याला धक्काच बसला मोठा ! क्रेगचे देखावे कुणीतरी दोन भागात सरळ कापून ठेवले होते !...सारं काही एलीनोराच्या अपरोक्षच झालं होतं...क्रेगची ती सर्वोत्कृष्ट कलाकृती...फ्लॉरेन्समध्ये स्वतःची शक्ती जीवापाड वेचून ज्याला साकार करायला तो धडपडला होता, ते हे त्याचं देखणं कलापत्य – त्याची ही अशी हत्या, चिरफाड झालेली स्वतःच्या डोळ्यांनी पाहिल्यावर क्रेग अर्थातच चवताळला...अन् एवढ्यानं काय झालं आहे !... त्याच्यावर कधीकधी स्वार होणारं ते अनावर संतापाचं भूत, रंगमंचावर त्या क्षणी उभ्या असलेल्या ड्यूजच्या आकृतीकडे पाहत ओरडलं, “ काय, काय केलंस हे तू ? ”...हा पहिला वादळी प्रश्न ! “ माझं कार्य तू धुळीला मिळवलंस... माझ्या कलेची धूळधाण केलीस...तू...तू केलंस हे सारं...तू...तुझ्याकडून केवढ्या तरी मोठ्या अपेक्षा मी केल्या होत्या ! ”

...तो निष्ठूरपणे बोलतच राहिला होता ...शेवटी एलीनोराही खवळली... तिला हे असलं काही ऐकून घेण्याची सवय नव्हती...प्रसंग पडला नव्हता !... पुढे तिनं मला तो सारा प्रकार सांगितला...म्हणाली, “ माणसाचा असा नमुनाच मी मुळीं कधी पाहिला नाही. अशा तऱ्हेनं आजवर कुणीही मला बोलू धजलेलं नाही. सहा फुटी उंचीचा प्राणी...एखाद्या मनोऱ्यासारखा उभा राहिलेला होता...( ब्रिटनीच्या लोकांच्या जन्मजात रागीट स्वभावानुसार हातांची घडी घातलेली...आणि तोंडात भयंकर भाषा ! ) कुणी कुणीसुद्धा मला असं वागवलेलं नाही आजपर्यंत...अर्थात ते सारं मला सहन झालं नाही...दाराकडे बोट दाखवून मी त्याला म्हटलं – “ जा...चालता हो...पुन्हा म्हणून तुझं तोंड पहायची माझी इच्छा नाही ! ”

ड्यूजच्या उर्वरित कलोपासनेचं समर्पण एकेकाळी ठरल्याप्रमाणे क्रेगच्या प्रतिभेच्या ठायी व्हायचं होतं ( ! ) – त्या संकल्पाची सांगता ही अशी झाली !

* * *

नाईसला मी येऊन पोहोचले, ती इतकी अशक्त, की मला उचलून न्यावं लागलं...तिथल्या कार्निव्हलची –जत्रेसारख्या महोत्सवाची– ती पहिली रात्र होती ...त्यामुळे होटेलकडे जाताना माझ्या उघड्या गाडीभोवती ‘ पीअरो ’ या फ्रेंच पात्राप्रमाणे दिसणाऱ्या तऱ्हेतऱ्हेच्या सरमिसळ मुखवट्यांचा गराडा पडला... अन् त्यांचं ते भेसूर हसू पाहून ‘ डान्स मॅकेबर ’ ( = मृत्यूला अखेरची शरणागती देण्यापूर्वीचं विलयनृत्य ) चीच मला आठवण झाली !

माझ्या होटेलच्या जवळच्याच एका होटेलमध्ये राहिलेली एलीनोरा ड्यूजसुद्धा आजारीच होती; तिनं बऱ्याचदा माझी प्रेमळपणानं विचारपूस केली अन्

स्वतःच्या, ‘ एमिल ब्रॉसन ’ नावाच्या डॉक्टरला माझ्याकडे पाठवलं...त्यानं मोठ्या निरलसपणे औषधयोजना वगैरे केली, एवढंच नव्हे, तर तेव्हापासून तो आयुष्यभरच्या माझ्या काही जिवलग मित्रांपैकीच एक बनून गेला...माझी प्रकृती पूर्णपणे ताळ्यावर यायला बराच अवधी लागला...दुःख नि वेदना यांच्या जाळ्यातच जणू मी अडकले होते !

माझी आई मग माझ्याकडे आली...आणि पाठोपाठ माझी ती विश्वासू मैत्रीण मारी किस्ट देखिल बेबीसह येऊन पोहोचली. बेबी छान, सशक्त दिसत होती...दिवसेदिवस तिची रूपकळा वाढत होती !...आम्ही ‘ माँ बॉरो ’ मध्ये राहायला गेलो. तिथे एका बाजूला समुद्र नि दुसऱ्या बाजूला ते पर्वतशिखर दिसत होतं...झारातुष्ट्रनं तिथे आपल्या साप नि गरुड यांच्यासहित ध्यानधारणा केली होती...आम्ही राहत होतो, तिथल्या त्या सूर्यप्रकाशात नहाणाऱ्या गच्चीत वावरता, हिंडताफिरता माझं हरवलेलं चैतन्य हळूहळू परत यायला लागलं; पण आता पुन्हा रसरसू पाहणाऱ्या या जीवावर व्यावहारिक अडचणींचा कधी नव्हे, एवढा बोजा होता; तो हलका करण्यासाठी, थोडं बरं वाटायला लागल्याक्षणीच मी माझ्या हॉलंडच्या दौऱ्यावर पुन्हा रुजू झाले...अशक्तपणा तर अजून गेला नव्हताच, पण मनही माझं निराश-उदासच होतं फार...

...क्रेगवर माझा फार जीव होता...माझ्या कलावंत आत्म्याच्या सर्वंकष ओढीनं मी त्याच्यावर प्रेम करत होते.. पण एक गोष्ट माझ्या पुरतेपणी ध्यानात आली होती, की आमच्याबाबतीत विरह हा अटळ होता...एवढं सारं समजून-उमजूनसुद्धा, त्याच्याबरोबर राहणं अशक्य, नि त्याच्यावाचून राहणंही अशक्य, अशा या अतर्क्य अन् तापदायक स्थितीला मी येऊन पोहोचले होते ! त्याच्या बरोबर राहायचं, याचा अर्थ : माझी कला, माझं व्यक्तिमत्त्व, नव्हे कदाचित् माझं जीवन किंवा माझी विवेकशक्तीसुद्धा,...या सर्वांना मुकायचं...अन् त्याच्या-विना राहायचं म्हणजे सतत खचलेल्या मनस्थितीत दिवस काढायचे !...मत्सरानं जळत राहायचं...या मत्सराला आता सबळ कारण मिळाल्यासारखं दिसतच होतं...इतर बायकांच्या मिठीत रंगलेल्या देखण्या क्रेगची चित्रं रात्रीच्या वेळी मला झपाटायची...इतकी, की झोप कशी ती मला लागेनाशीच झाली !... स्वतःच्या कलेचं निरूपण करणारा क्रेग...आणि त्याच्याकडे भावुक डोळ्यांनी एकटक पाहत राहणाऱ्या स्त्रिया !...दुसऱ्या कोणत्याहि स्त्रियांच्यावर खूष होणारा क्रेग—कुणालाही क्षणार्धात आपलंसं करणारं, ते ‘ एलन टेरी ’ – स्मित चेहऱ्यावर खेळवत त्यांच्याकडे बघणारा...त्यांच्या विषयात रस घेणारा...त्यांना कुरवाळणारा ...जवळ घेणारा...“ ही स्त्री माझ्या मनाजोगती आहे, मला खूष ठेवणारी आहे...इझाडोरा... इझाडोराचं काय, सारंच अतर्क्य... ’ अशी स्वतःची

सोयीस्कर समजूत काढणारा...क्रेग !

...त्या साऱ्या प्रकारामुळे मला आलटून पालटून रागाचे नि निराशेचे झटके यायचे...काही काम सुचायचं नाही...कामात मन रमायचं नाही...नृत्य करायला सुधरायचं नाही...मी करत होते, ते लोकांना आवडत होतं की नव्हतं, याची दखलच मुळी मला नव्हती !

...होतां होतां एवढं भान आलं, की हे सारं थांबलंच पाहिजे...क्रेगची कला किंवा माझं स्वतःचं कलानिष्ठ जीवन...यापैकी दुसऱ्या गोष्टीचा त्याग करणं माझ्याच्यानं शक्य नव्हतं, हे मी पक्कं जाणून होते...तसं केलं असतं, तर मनांतल्या मनांत झुरून मेले असते मी...आतून पोखरणारी खंत माझा जीव घेऊनच मग निवळी असती!...पण काहीतरी इलाज शोधायला हवाच होता...होमिओपॅथीच्या तत्त्वज्ञानाचा आधार घेतला मी शेवटी...अन् फार प्रबल इच्छा बहुतेक करून सफळ होतेच, या न्यायानं मला तो इलाज सापडला...

एक दिवस दुपारी क्रेग आला...गोरा, ऐटबाज, तरुण...पिंगट केसांचा... एकदम टिपटॉप कपडे केलेला...तो म्हणाला,

"माझे मित्र मला 'पिम्' म्हणतात—"

"पिम्?' वा, सुंदर आहे हं नाव ...तू काय कुणी कलावंत वगैरे आहेस की काय ?"

"छेः छे !" मी त्याच्यावर केलेला एखादा आरोप नाकारावा, अशा थाटात तो उद्गारला.

"मग काय आहे काय तुझ्याकडे ? एकादी महान् कल्पना ?"

"छे बुवा– तसंही काही नाही...माझ्यापाशी एकसुद्धा कल्पनाबिल्पना नाही...' तो म्हणाला...

"पण जीवनाला आधार म्हणून काही ध्येय, काही हेतू तरी असेलच..."

"तसलीही काही भानगड नाही !"

"मग तू करतोस तरी काय ?"

"काही नाही !"

"पण तू काही तरी करायला हे हवंच की..."

विचार केल्यासारखं दाखवून तो उत्तरला, "अठराव्या शतकातल्या तपकिरीच्या डब्यांचा माझ्याकडे एक सुरेख संग्रह आहे..."

...इथे माझा इलाज मला सापडला ! रशियाच्या दौऱ्याच्या एका करारावर मी सही केलेलीच होती...तो एक लांबलचक, तापदायक दौरा होता – उत्तर रशियाचाच केवळ नाही, तर दक्षिण रशिया आणि कॉकेशसपर्यंतचा...अन् एवढ्या लांब प्रवासाला एकट्यानं जायचं मला अगदी नको नको वाटत होतं...

" तू माझ्याबरोबर रशियाला चलशील पिम् ? "

"हो अगदी आनंदानं!"...तो झट्‌दिशी उत्तरला..." पण माझ्या आईचाही काही विचार केला पाहिजे...म्हणा, तिचं मन मी वळवू शकेनसुद्धा...नाही असं नाही...पण शिवाय आणखी कुणीतरी असं आहे..." बोलता बोलता पिम् लाजला..." ...कुणीतरी माझ्यावर फार प्रेम करणारं...अन् ते कुणीतरी कदाचित् मला जायला परवानगी देणार नाही!"

" पण मग आपण गुपचूप जाऊ;"...अन् शेवटी मग असं सारं ठरलं : ॲम्स्टरडॅममधल्या माझ्या शेवटल्या कार्यक्रमानंतर एक मोटर रंगपटाच्या दाराशी उभी असेल, आणि त्यातून आम्ही सरळ गावाबाहेर पडू...माझ्या आयानं सारं सामान घेऊन एक्स्प्रेसनं रवाना व्हायचं, आणि ॲम्स्टरडॅमच्या पुढल्या स्टेशनवर आम्ही ते आमच्या ताब्यात घ्यायचं...

फारच थंडी होती त्या रात्री...जिकडेतिकडे धुकंच धुकं पसरलेलं...शेताशेतां-वर ओठंगून राहिलेलं...रस्ता एका कालव्याच्या कडेकडेनं जात असल्यानं ड्रायव्हरच्या मनात गाडी जोरानं न्यायची नव्हती...

" गाडी जोरात नेणं फार धोक्याचं आहे..." असं म्हणत तो गोगलगायीच्या गतीनं गाडी चालवत होता...

पण हा धोका कुणी आपला पाठलाग करण्यापेक्षा कमीच होता...कारण 'पिम्'नं एकाएकी पाठीमागं वळून पाहिलं अन् तो ओरडला,

" बाप रे, पाठलागच करतेय् ती आपला!"

...मला सारं काही समजून चुकलं होतं...

" तिच्याकडे एखादवेळेस पिस्तुलबिस्तुलसुद्धा असेल." पिम् म्हणाला.

" चल...जोरात हाक गाडी ...आणखी जोरात..." मी ड्रायव्हरला म्हणत होते,...पण तो आपला धुक्यातून मध्येच चमकून उठणाऱ्या कालव्याच्या पाण्या-कडे बोट दाखवण्यापलीकडे काही माझी दखल घेत नव्हता!...सारा प्रकार जरासा अद्‌भुतरम्यच होता खरा...पण शेवटी त्यानं पाठलाग करणाऱ्या गाडीला चकवलं, आणि आम्ही एकदाचे स्टेशनपर्यंत पोहोचून एका होटेलमध्ये जाऊन उतरलो...

पहाटेचे दोन वाजले होते ... रात्रीच्या म्हाताऱ्या पहारेकऱ्यानं आपला कंदिल अगदी आमच्या चेहऱ्यांपुढेच धरला ...

" एक खोली हवी आहे " ... आम्ही दोघं एकदम म्हणालो ...

" एक खोली? ... पाहू या ... पण तुमचं लग्न झालंय् का?"

" अर्थात्!" आम्ही उत्तरलो.

" नाही ... नाही " ... तो गुरगुरला ... " तुमचं लग्न झालेलं दिसत नाही

...मला माहितंय् ना... तुम्ही मजा करायला आलेली कुणी पाखरं दिसता !"

... आणि आमच्या कुरकुरण्याला न जुमानता त्यानं एका लांब कॉरिडॉरच्या दोन्ही टोकांच्या दोन खोल्यांतून आम्हाला वेगवेगळं उतरवलं ... अन एवढ्यानं काय झालं आहे... आपल्या गुडघ्यावर आपला कंदील धरून दोन्ही खोल्यांच्या मधोमध तो रात्रभर जागत बसून राहिला...कसली दुष्टखाष्ट मजा त्यात त्याला वाटत होती कोण जाणे ! प्रत्येकवेळी मी किंवा पिम्नं दरवाजाबाहेर डोकं काढलं की कंदील उंचावून तो म्हणायचा,

"नाही नाही, लग्न नाही झालेलं तुमचं...असला प्रकार नाही चालायचा इथे..."

असा लपंडाव रात्रभर मांडल्यानंतर थोड्याफार थकल्याभागल्या स्थितीतच सकाळी आम्ही पीटर्सबर्गची बेदम धावणारी गाडी पकडली...ह्या प्रवासाइतका सुखद प्रवास मी कधीच्च केलेला नाही !

पीटर्सबर्ग येथे येऊन पोहोचलो, तेव्हा हमालानं 'पिम्'च्या नावाची आद्याक्षरं असलेल्या अठरा ट्रंका गाडीतून काढण्याबद्दल काही म्हटलं, तेव्हा मी गोंधळूनच गेले...

"आहे काय हे ?" मी चकित होऊन विचारलं.

"काय असायचं ? माझं सामानच आहे !" पिम् म्हणाला..."ही ट्रंक माझ्या नेकटाईज्‌ची...ह्या दोन, माझ्या आतल्या कपड्यांच्या...ह्या सूटस्‌साठी ...आणि या बूटस् वगैरेंच्या...नंतर ह्यात म्हणशील, तर माझी मुद्दाम जास्त फर लावून बनवलेली जाकिटं आहेत...रशियात शोभून दिसतील अशी..."

..."ओतेल दे ल्यूरोप'मध्ये एक रुंद जिना होता...ह्या जिन्यावरून पिम् थोड्याथोड्या वेळानं वाऱ्यावर तरंगल्यासारखा यायचा...दरवेळी वेगळ्याच रंगाचा सूट – वेगळी टाय् !...बघ्या लोकांच्या डोळ्यातून कौतुक अगदी ऊतू चाललेलं दिसायचं...तो नेहमी अद्ययावत् नि सुंदर पोशाखात असायचा—खरं तर 'द हेग'च्या चालू फॅशनची दिशा 'पिम्'च्या पोशाखावरून सहज ठरवता आली असती ! 'व्हान् व्हूले' नावाचा एक मोठा डच चित्रकार त्याचा पोर्ट्रेट काढत होता...त्याची पार्श्वभूमी सारी 'ट्यूलिप्' फुलांची होती...सोनेरी ट्यूलिप्स्, जांभळी ट्यूलिप्स्, गुलाबाच्या रंगाची ट्यूलिप्स् ,-अन् खरोखर त्याचं संपूर्ण दर्शनच वसंतऋतूतल्या फुललेल्या ट्यूलिप्स्‌च्या ताटव्यासारखं ताजं – प्रसन्न नि आकर्षक होतं...सोनेरी ट्यूलिप्स्‌च्या कुंजासारखे सोनेरी केस, गुलाबी ट्यूलिप्स्‌सारखे ओठ – त्याच्या आलिंगनात असताना मलाही वाटायचं, की हॉलंडमधल्या वसंतऋतूत फुललेल्या हजारो ट्यूलिप्स्‌च्या गालिच्यावर पहुडलेल्या स्थितीत मी हवेवर तरंगत विहार करते आहे !

‘पिम्’ देखणा होता...फिकट भुरे केस...निळे डोळे...बुद्धिमत्तेबद्दल त्याच्या मनात कसलाही गंड निर्माण झालेला नव्हता...त्याच्या प्रेमामुळे ऑस्कर वाईल्डच्या एका सुभाषिताचा अर्थ मला लागला होता ...पटला होता...वाईल्ड म्हणतो : “क्षणापुरतं टिकणारं अत्युत्कट सुख जन्मोजन्मी पुरून उरणाऱ्या दुःखापेक्षा फार परवडलं !” पिम्च्या प्रीतिसुखाची जात हीच होती...क्षण दोन क्षण टिकणारी...आतापर्यंतच्या प्रेमप्रकरणांनी मला प्रणयाचा, नि व्यथेचा अनुभव दिला होता ...पिम्नं आपल्या ओंजळीत भरून निखळ ‘सुख’ आणलं होतं माझ्यासाठी...सुख ...निखळ आनंद, मजा...अन् ते सुद्धा अशा अचूक क्षणी की जेव्हा मला केवळ त्याचीच जरूर होती ! कारण पिम्चं प्रियाराधन त्यावेळी चालू नसतं, तर मी मानसिक अनारोग्याच्या गर्तेतच खोल कुठे तरी जाऊन आदळले असते नक्की !

पिम्च्या जवळ असण्यानं मला नवजीवन, नवचैतन्य लाभलं...कदाचित आयुष्यात प्रथमच केवळ ‘तरुण असण्याच्या’ जाणिवेचा...निष्काळजी हलक्या फुलक्या यौवनभानाचा आनंद मी चाखला...त्याला सगळ्याच गोष्टींचं हसू यायचं...तो नाचायचा, इकडे तिकडे उड्या मारत फिरायचा...त्यामुळे मी माझी खंत विसरले...त्या त्या क्षणापुरतंच वेगळं एक जीवन जगायला शिकले... निष्काळजी झाले...सुख अनुभवलं...त्यामुळे माझे नृत्यकार्यक्रम देखील पुन्हा एकदा चैतन्यानं शिगोशिग ओसंडत असल्यासारखे प्रसन्न झाले...

याचवेळी मी ‘मोमाँ म्यूझिकाल’ची रचना केली. या नृत्यानं रशियात अशी काही लोकप्रियता मिळवली होती की, प्रत्येक संध्याकाळी मला ते नृत्य पाचपाच सहासहा वेळां पुन्हा करावं लागायचं...‘मोमाँ म्यूझिकाल’ हे पिम्चं नृत्य होतं क्षणसुखाचं, ‘नादलुब्ध क्षणा’चं लास्य होतं ते !

नृत्याकडे, एक पूर्णतया वैयक्तिक कलाविष्कार म्हणून मी पाहत ः माझा मार्ग कितीतरी सुकर झाला असता. कीर्ती तर एव्हाना प्राः होती; देशोदेशींच्या आमंत्रणांना काही तोटा नव्हता... त्या भरघो चव चाखत माझा झगमगता व्यवसाय चालू ठेवणं...एवढ्यावर मला मानता आलं असतं खचित्!...पण नाही... माझ्या त्या नृत्यशाळेः माझा पुरता कब्जा घेतला होता ... माझ्या डोळ्यासमोर तर विथोव्हनच्या नवव्या सिंफनीवर आधारलेला एक भव्य नृत्यमेळावा! डोळे मिटायचाच अवकाश, त्या मेळाव्यातल्या आकृती धीरगंः पेहेरावात नाचत थिरकत माझ्या संज्ञाविश्वातून संचार करायला ला प्रत्यक्षात साकार होण्यासाठी जिवाच्या आकान्तानं मला साद घाला "बघ, आम्ही इथे आहोत तुझ्यासमोर; पण तुझ्याच स्पर्शानं चैतन्याचं, जीवनाचं दान मिळणार आहे!" (नववी सिंफनी : उम्ङ्लिगेन)

मी स्वप्न पाहत होते प्रॉमिथिअसनं निर्माण केलेल्या प्रतिसृष्टीसाः स्वप्नानं मला जणू पछाडलेलंच होतं...मला वाटायचं की, मी साद भूगर्भातून...स्वर्गातून, अशा नृत्याकृती अवतरतील, की ज्या दृष्टील भाग्य आजवर जगाला लाभलंच नव्हतं...हं! कसलं गर्विष्ट, मोहक स्व स्वप्नानंच मला एका संकटाच्या खाईतून दुसऱ्या संकटाच्या खाईत आजपर्यन्त!...का...का असं मला पछाडलंस बापड्या? 'तानः दिव्यासारखी का दाखवलीस मला चुकीची वाट?...का खे

अंधाराकडे ?...केवळ निराशेकडे? ...पण नाही...अजूनही लवलवणारी ती दीपज्योत, कवीतरी या अंधारातून अचूक मला त्या सोनेरी स्वप्नाचा साक्षात्कार घडवीलच...चिमुकली फडफडणारी, लवलवती ज्योत ! माझ्या अडखळत्या पावलांच्या पुढेच कुठेतरी...कुठेतरी जवळच...सखे, माझी श्रद्धा मी अजूनही गमावलेली नाही...अजून मी तुलाच अनुसरते आहे...सारं विश्व ज्याची उत्कण्ठेनं वाट पाहत आहे, त्या दिव्य नर्तकमेळाचा मागोवा घेताना मी तुलाच अनुसरते आहे...विश्वातल्या भव्यदिव्य सौंदर्याचा साक्षात्कार घडवणारा हा मेळावा, प्रेमाची, प्रीतीची सुसंवादी लय पकडून, रचणार आहे एक सौन्दर्याची प्रतिसृष्टी !

...अशा साऱ्या स्वप्निल आकांक्षा उराशी बाळगून मी 'ग्र्यूनवाल्द'ला परतले– तिथल्या माझ्या छोट्या संचाला तालीम देण्यासाठी...ही सारी मंडळी इतकी छान नाचायला लागली होती, की कुशल नर्तकांचा एक पुरा वृंद तयार करण्याबाबतच्या माझ्या कल्पनेतला माझा विश्वास दुणावला होता. नाद-संवेदनांच्या संदर्भात विचार करताना वेगवेगळया महान् सिंफनींचं जे स्थान असतं तेच दृक्संवेदनांच्या विचारात माझ्या या नृत्यवृंदाला लाभणार होतं !

...कधी पॉंपेयन चित्र-शिल्पबंधांतल्या श्रृंगाराला साकार करत, कधी 'दोनोतेलो'च्या तरुण सौन्दर्यदेवतांचा साक्षात्कार घडवत, किंवा 'तितानिया'च्या अनुयायांच्या आकाशातल्या उड्डाणाचं अनुकरण करत, मी त्यांना तऱ्हेतऱ्हेचे नृत्यबंध विणायला, एकमेकात गुंफायला शिकवत होते...अनंत वर्तुळांतून भ्रमरांतून, सामूहिक चाली, गती आणि नृत्यकरणं यांच्या आवर्तातून बाहेर पडायला नि पुन्हा त्यात सामावून जायला शिकवत होते...

ही नर्तक मंडळी दर दिवशी जास्तजास्त लवचिक नि सशक्त बनत चाललेली दिसायची...त्यांच्या यौवनोन्मुख शरीरांवर नि चेहऱ्यांवर एकप्रकारच्या आंतरिक स्फूर्तीची प्रभा पसरल्यासारखं भासायचं...संगीताचं दैवी भान त्यांच्या ठायी जागं होताना प्रत्यही अनुभवाला यायचं...नाचणाऱ्या बाळगोपाळांचं ते दृश्य इतकं मनोज्ञ होतं की साऱ्या कलावंतांच्या नि कविजनांच्या मनात बघता बघता कौतुक उचंबळून यायचं...

...तरी पण या शाळेच्या खर्चाची तोंडमिळवणी करणं दिवसानुदिवस फारच कठिण व्हायला लागलं होतं; मग माझ्या डोक्यात एक कल्पना आली...देशोदेशी या मुलांना घेऊन फिरायचं...अन् एखाद्या समर्थ शासनसत्तेचा शोध घ्यायचा... मुलांना इथं मिळणाऱ्या या शिक्षणातलं सौंदर्य नि त्याचं महत्त्व ओळखून त्याला मान्यता देणारी एखादी शासनसत्ता...आताच्याहूनही मोठ्या प्रमाणावर माझ्या योजना प्रत्यक्षात आणण्याची संधी नि सुविधा मला देईल, अशी शासनसत्ता...

प्रत्येक कार्यक्रमाच्या शेवटी मी जनतेला एक आवाहन करत असे : 'माझ्या

स्वतःच्या जीवनातून मला आकळलेल्या नवनृत्याच्या प्रकाशानं इतरांची जीवनंही उजळून निघावीत अन् हजारो पूर्वग्रहांचे अडसर निखळून पडावेत, अशी माझी इच्छा आहे, ती पुरी करण्याचा मार्ग शोधून काढायला लोकांनी मला मदत करावी...'

जर्मनीत काही अशी मदत किंवा आधार माझ्या शाळेला मिळणार नाही, याची मला जास्तजास्त जाणीव व्हायला लागली होती...कैसरची बायको (कायझरिन) इतकी सनातनी विचारांची होती, की एखाद्या शिल्पकाराच्या स्टुडिओत जरी जायचं म्हटलं तरी ती आपल्या 'मेजर डोमो'ला आधी पुढे पाठवायची...सगळ्या नग्न पुतळ्यांवर आधीच चादरींचे बुरखे चढवायला! असल्या जडबुद्धी प्रशियन राजवटीत जर्मनीलाच माझी कर्मभूमी समजून त्या स्वप्नरंजनात गढून जाणं, यापुढे मला अशक्यप्रायच वाटत होतं...मग रशियाचे विचार माझ्या मनात घोळायला लागले, कारण तिथे मला असा काही उत्साह-पूर्ण प्रतिसाद मिळाला होता, की मी चांगली गबर होऊन गेले होते!...तेव्हा सेंट पीटर्सबर्गमध्ये नृत्यशाळेच्या स्थापनेचा संभव मनात बाळगून जानेवारी एकोणिसशे सातमध्ये एलिझबेथ आणि माझ्या छोट्या विद्यार्थ्यांच्यापैकी वीसजण, यांच्यासह मी पुन्हा रशियाचा प्रवास केला...याही खटाटोपाला काही म्हणावं तसं यश आलं नाही. नृत्यकलेचं खरंखुरं पुनरुज्जीवन झालं पाहिजे, या माझ्या कळकळीच्या आवाहनाचं सामान्य प्रेक्षकांनी उत्सुकतेनं स्वागत केलं खरं, पण 'इंपीरियल बॅले'नं रशियामध्ये असं काही घट्ट मूळ धरलं होतं की तिथे काहीही बदल घडून येण्याची, किंवा घडवून आणण्याची शक्यताच उरली नव्हती.

बॅलेच्या शाळेत मुलांचं शिक्षण कसं चालतं, ते पहायला मी माझ्या छोट्या विद्यार्थ्यांना घेऊन गेले. तिथल्या मुलांची नजर, पिंजऱ्यातल्या पोपटमैनांनी हवेत भराऱ्यांची वर्तुळं रेखणाऱ्या चिमण्यांकडे पहावं, तशी आसुसलेली होती! पण मुक्त, अनिर्बंध, नि निसर्गरम्य हालचालींना प्राधान्य देणाऱ्या नृत्यशाळेला थारा मिळण्याचा दिवस उगवायची वेळ रशियात अजून आली नव्हती! झारशाहीच्या आचारविचारांचंच प्रतिबिंब पडलेलं बॅले नृत्य अजूनही इथे पाय रोवून उभं असावं, म्हणजे काय म्हणायचं! आता एकच आशेचा किरण मला दिसत होता... स्टॅनिस्लॅव्स्कीचा पाठिंबा! माणसाच्या मनातल्या भावभावनांना अधिक मोकळे-पणानं, निर्बंधरहित नि सर्वस्पर्शी हालचालीतून वाट मिळावी, या तत्त्वावर आधारलेल्या माझ्या नृत्यशैलीचं महत्त्व स्टॅनिस्लॅव्स्कीलाच पटलं असतं...त्यानं त्याला शक्य होतं, तेवढे प्रयत्न माझ्यासाठी केले देखिल, पण त्याच्या त्या मोठ्या कलालयात आम्हाला सामावून घेण्याइतपत सत्ता किंवा साधन त्याच्या हातात नव्हतं...खरं म्हणजे ते मला फार आवडलं असतं...

...तेव्हा जर्मनीत किंवा रशियातही मला काही मदत मिळणार नाही, अशी खात्री पटल्यावर मी इंग्लंडला प्रयत्न करून पाहायचं ठरवलं. एकोणिसशे आठच्या उन्हाळ्यात माझा सारा 'काफ़ुला' घेऊन मी लंडनला गेले. 'जोसेफ शूमान', आणि 'चार्लस् फ्रॉमान', या प्रसिद्ध कलापुरस्कर्त्यांच्या व्यवस्थेखाली 'ड्यूक ऑफ यॉर्क' या थिएटरात कित्येक आठवडे आमचे कार्यक्रम चालले होते. लंडनच्या प्रेक्षकांनी मी आणि माझा संच...माझी नृत्यमंडळी, यांच्याकडे एक आकर्षक मनोरंजन म्हणूनच केवळ पाहिलं . अन् नृत्यशाळेच्या संभाव्य स्थापने-साठी हवा तसा खराखुरा पाठिंबा किंवा मदत इथेही मला मिळाली नाही...

'न्यू गॅलरी'त मी प्रथम नाचले, त्याला आता सात वर्षं होऊन गेली होती... त्यामुळे चार्लस् हाले नि कवि डग्लस एन्स्ले, यांच्या जुन्या स्नेहाला पुन्हा उजळा मिळाला याचा खूप आनंद वाटला मला ... सौंन्दर्यखनी एलन टेरीही रंगमंदिरात खूपवेळा यायची. तिला माझी बालमंडळी फार आवडायची. त्यांना एकदा ती प्राणिसंग्रहालयात देखिल घेऊन गेली...मुलांच्या आनंदाला पारावारच राहिला नाही...माननीय राणी अलेक्झांड्रानंही दोनदा कार्यक्रमाला येऊन बॉक्समध्ये बसून आपल्या उपस्थितीचा मान आम्हाला दिला ... इंग्लंडच्या बरंदाज, उच्च घराण्यातल्या इतर स्त्रियाही पुष्कळदा यायच्या...त्यातच पुढे लेडी रिपन झालेली त्या काळची 'लेडी द ग्रे' सुद्धा होती...ती अगदी साधेपणानं वागायची... सरळ पडद्यामागे आत येऊन गोड शब्दांनी माझं स्वागत अन् कौतुक करायची.

...पण लंडनमध्येच माझी नृत्यशाळेची कल्पना मूळ धरू शकेल, अन् तसं साहाय्यही तिथेच मिळू शकेल, असं अस्पष्ट सुचवलं, ते मँचेस्टरच्या डचेसनं .. त्यासाठी टेम्सच्या तीरावरच्या आपल्या गावाबाहेरच्या बंगल्यात आम्हाला आवर्जून बोलावून, अलेक्झांड्रा आणि एडवर्ड या राजदांपत्यासमोर आमचा नृत्य-प्रयोग तिनं घडवून आणला...मग काही दिवस मी इंग्लंडमध्ये स्थापन होणाऱ्या नृत्यशाळेच्या स्वप्नात रंगून अंतराळात तरंगत राहिले...पण शेवटी ?... पुन्हा एकदा स्वप्नभंग, दिशाभूल !...इमारत कुठे होती, – तेवढी जमीन तरी कुणाकडे होती, आणि मोठ्या प्रमाणावर कार्य करण्याची जी स्वप्नदृश्यं मी चितारत होते, ती प्रत्यक्षात आणायला लागणारी मिळकत, पैसा तरी कुठे होता ?...

माझ्या त्या छोट्या काफल्याचा खर्च नेहमीप्रमाणे अचाट होता...माझी बँकेतली पुंजी पुन्हा शून्यावर येऊन ठेपली...तेव्हा मग माझ्या फिरत्या नृत्यशाळेला 'ग्र्यूनवाल्द'ला परतण्याखेरीज गत्यंतरच उरलं नाही...अन् इकडे मला चार्ल्स फ्रॉमानशी अमेरिकेच्या दौऱ्याचा करार करावा लागला.

...आता माझ्या नृत्यशाळेचा, एलिझबेथचा, क्रेगचा विरह पुन्हा एकदा सहन करावा लागणार, या कल्पनेनं माझ्या मनात कढ येत होतेच, परंतु मुख्य प्रश्न

होता माझ्या बेबीचा...ती आता जवळजवळ एक वर्षाची होत आली होती... त्या सोनेरी केसांच्या, गुलाबगालांच्या, निळ्या निळ्या डोळ्यांच्या देईर्द्रेचा नव्यानं निर्माण झालेला एक दृढ प्रेमपाश बाजूला सारतांना झालेली अंतर्यामीची वालमेल सांगण्यासवरण्यापलीकडची होती !

...शेवटी असा एक दिवस उगवला की जेव्हा न्यूयॉर्कला जाणाऱ्या एका भल्या मोठ्या जहाजावर मी माझ्याशी एकटीच उरले !...फक्त आठ वर्षांपूर्वीच मी एका गुरंवाहू बोटीत बसून न्यूयॉर्कचा किनारा सोडला होता ...युरोपमध्ये माझं नाव चांगलंच गाजलं होतं...तेवढ्या अवधीत मी एका कलेला, एका शाळेला नि एका अपत्याला जन्म दिला होता...फार काही वाईट नाही !...पण पैशाचा विचार केला तर मात्र पूर्वीपेक्षा काही फार चांगल्या स्थितीत नव्हते मी !

चार्ल्स फ्रॉमान हा खरोखर एक मोठा कलाप्रवर्तक होता—उत्तम व्यवस्थापक होता; पण माझी कला म्हणजे काही रंगभूमीच्या परिसरातला हमखास लोकप्रिय प्रयोग नव्हे, हे त्यानं ओळखलं नव्हतं. माझ्या कलेचं आवाहन एका मर्यादित रसिकवर्गाला भावणारं भिडणारं होतं, हे विसरून ऑगस्टच्या त्या उकाड्यात 'ब्रॉडवेचं एक आकर्षण ' म्हणून त्यानं मला रंगभूमीवर आणलं ! साथीला, ग्ल्यूकची ' इफिजिनिया ' आणि बीथोवनची सातवी सिंफनी कशीबशी वाजवू पाहाणारा एक छोटा अपुरा वाद्यवृंद !...परिणाम अपेक्षेप्रमाणेच झाला,–ठार अपयश !...नव्वद अंश, किंवा त्याहून जास्त उष्णतामान असतानाही जे काही थोडे लोक त्या तापत्या-पेटत्या उष्ण रात्री सहज रंगमंदिरात शिरले, ते मुळी गोंधळूनच गेले होते...त्या-पैकी बहुतेकांना काही आवडलंही नाही... सारे नाखुषच होते...कलासमी-क्षक बोटावर मोजण्यासारखे होते, आणि होते, त्यांनीही मला न्याय दिला नाही ...त्यांचा अभिप्राय निराशाजनकच होता...तेव्हा सारासार विचार करताना, माझ्या मायदेशाला परतणं, ही मी एक घोडचूकच केली, असं मला वाटल्या-वाचून राहिलं नाही !

एक दिवस मी रंगपटातल्या माझ्या खोलीत बसले होते...मन त्या दिवशी विशेष विषण्ण होतं...एवढ्यात कुणी तरी छान आवाजात साद घातली मला... कुणीतरी उल्हासानं मला अभिवादन करत होतं...दरवाज्यात उभं राहून... फार उंच नाही, पण सुरेख बांध्याचं; तपकिरी कुरळ्या केसांची झुलपं नि मोहक हसू असलेलं एक माणूस !–एक व्यक्ती ! त्या व्यक्तीनं एक प्रकारच्या उत्स्फूर्त आन्तरिक जिव्हाळ्यानं आपला हात पुढे केला...आणि माझ्या कलादर्शनाच्या त्याच्यावर झालेल्या परिणामाचं त्यानं इतक्या सुंदर शब्दांतून तऱ्हतऱ्हेनं वर्णन केलं !...न्यूयॉर्कमध्ये पाऊल ठेवल्या दिवसापासून वाट्याला आलेल्या साऱ्या अपमानाची नि उपेक्षेची पुरी भरपाई झाल्यासारखं मला वाटलं ! ही व्यक्ती म्हणजे-

थोर अमेरिकन शिल्पकार ' जॉर्ज ग्रे बर्नार्ड ' होता...त्यानंतर दररोज रात्री तो कार्यक्रमाला यायचा, अन् कितीतरी कलावंतांना, कवींना आणि इतर मित्रमंडळींना वारंवार आपल्याबरोबर आणायचा. त्यात तो मनमिळाऊ स्वभावाचा नाट्यनिर्माता ' डेव्हिड बेलास्को ', ' रॉबर्ट हेन्री ', ' जॉर्ज बेलोज् ', ' पर्सी मॅक् के ', ' मॅक्स ईस्टमन ' हे चित्रकार...आणि खरं म्हणजे ग्रीनिच खेड्यातले क्रान्तिकारक विचारांचे सारेच तरुण असत...वॉशिंग्टन चौकात खाली एका मनोऱ्यासारख्या इमारतीत नेहमी एकत्र राहणारं, ' ई. ए. रॉबिन्सन ', ' रिजले टॉरेन्स ', अन् ' वुईल्यम वॉन मूडी ' या कवींचं त्रिकूटही त्याच मेळाव्यात असायचं, हेही मला आठवतं...

ह्या कवि-कलाकार मंडळींचा उल्हास, उत्साह अन् स्नेह, यांमुळे मला खूपच दिलासा मिळाला, आणि न्यूयॉर्कच्या प्रेक्षकवर्गाच्या त्या थंड नि कूपमंडूकी कोत्या वृत्तीचं शल्य मनातून काहीसं निघून गेलं...

त्याच वेळी जॉर्ज ग्रे बर्नार्डच्या डोक्यात एक कल्पना आली...नृत्यपवित्र्यातला माझ्या एक पुतळा घडवायचा, अन् त्याला ' अमेरिका डान्सिंग ' (-नृत्यमग्न अमेरिका) असं नाव द्यायचं !...वॉल्ट व्हिटमन्नं म्हटलं होतं- ' I hear America singing '—' अमेरिकेचं गीत माझ्या कानावर येतंय् !' ...तेव्हा एका सुंदर दिवशी, शिशिर ऋतूतली ती न्यूयॉर्कचीच विशिष्ट हवा पडली असताना, आम्ही निघालो,...' वॉशिंग्टन हाईटस् ' वरच्या त्याच्या स्टुडिओच्या तिथे, आजूबाजूचा परिसर न्याहाळत मी अन् जॉर्ज मग टेकडीवर उभे राहिलो, अन् माझे बाहू पसरून मी म्हटलं, " अमेरिकेचं नृत्य माझ्या डोळ्यांसमोर साकारलंय् "...यातूनच बर्नार्डच्या मनात माझ्या पुतळ्याची ती कल्पना उद्भवली.

मी सकाळी सकाळीच त्याच्या स्टुडिओमध्ये न्याहारीची एक परडी घेऊन जाऊन पोहोचायची, आणि मग अमेरिकेत कलात्मक जागृती नि स्फूर्ती निर्माण व्हावी, म्हणून काय काय करता येईल, याची चर्चा करण्याच्या आनंदात आमचे तासन्तास जायचे !

त्याच्या स्टुडिओत एक अत्यंत मोहक टॉर्सो होता-शिर नाही-हातपायही नाहीत असा, एका तरुण मुलीचा पुतळा. ' ईव्हलीन नेसाबिट 'नं म्हणे त्यासाठी ' पोज ' केलं होतं. अर्थात तो काळ, ईव्हलीनला ' हॅरी के. थॉ ' भेटायच्या आधीचा होता, असं बर्नार्ड म्हणाला ! त्यावेळी ती अगदी निरागस होती... साधीसुधी... तिच्या सौन्दर्याची मोहिनी एकजात साऱ्या कलावंतांवर पडलेली होती.

...स्टुडिओतल्या या निरनिराळ्या विषयांवरच्या गप्पांचा, अन् सौंदर्यास्वादाचा ब्रह्मानंद सहानुभावानं चाखण्याचा व्हायचा तो नैसर्गिक परिणाम झालाच ! माझ्यापुरतं म्हणायचं तर, त्या ' नृत्यमग्न अमेरिके 'च्या ( अमेरिका डान्सिंग )

महान् शिल्पाकृतीच्या कार्याला स्फूर्ती मिळावी, म्हणून मी माझं तनमनसुद्धा पणाला लावायला तयार होते! पण जॉर्ज ग्रे बर्नार्डचं काही विचारायला नको... नीतिअनीतीच्या कल्पनांना अगदी तत्त्वनिष्ठेचं अतिरेकी स्वरूप देणाऱ्यांपैकीच एक वल्ली ती! त्याच्या धर्मनिष्ठ नेकीला माझा एकही यौवनसहज हळुवार विभ्रम स्पर्श करू शकला नाही! त्याच्या त्या पुतळ्यांचा संगमरवर काही त्याच्या स्वतःच्या पेक्षा जास्त 'थंड' किंवा 'कठिण' नसेल!...मी होते ती क्षणजीवी चंचला... तरला...तो शाश्वत होता, सनातन होता!...मग त्याच्या प्रतिभेच्या स्पर्शानं पुन्हा एकदा ही कुडी नव्यानं घडावी, अन् तिनं शाश्वत–अमर व्हावं, असं माझ्या मनानं घेतलं, यात नवल कसलं?...माझ्या शरीराचा कणन् कण या शिल्पकाराच्या हाती आकार घेणारी वळीव माती बनून जाण्यासाठी आसुसला होता...

...हं! जॉर्ज ग्रे बर्नार्ड, आपण म्हातारे होऊ...मरूनही जाऊ...पण ते जादुभरले, एकत्र घालवलेले क्षण?...मी, एक नर्तकी...तू, तो जादुगार... तुला हवं असतं, तुझ्या मनात असतं, तर तू माझं नृत्य त्याच्या अनेक तरळत्या प्रतिबिंबांतूनसुद्धा पकडून ठेवू शकला असतास...विजेच्या वज्राघातासारख्या त्या झळाळत्या नृत्यक्षणाला किंचित्शा अवकाशात अनंताला नेऊन भिडवणारी अनादि शक्तीच होतास तू...मग, मग कुठे आहे ते माझं साफल्य? कुठे आहे तो माझा उच्चतम कलाविष्कार? कुठे साकार झाली आहे मी स्वीकारलेल्या कलात्मक आव्हानाची ती साक्ष? ती 'नृत्यात्मिका अमेरिका'?...मी वर बघते, अन् मला काय दिसतं? मानवी दयनीयतेनं ओसंडून जाणारी ती नजर! अमेरिकेला वाहून घेतलेल्या अब्राहम लिंकनचा बर्नार्डनं घडवलेला भव्य पुतळा! ती भारदस्त भिवई,—पराकोटीचं हौतात्म्य आणि मानवी दयाशीलता यांच्या सतत स्रवणाऱ्या आसवांनी नांगरून काढलेले गाल...! आणि...मी ही अशी...ह्या अलौकिक श्रद्धेच्या नि नीतिमत्तेच्या आदर्शासमोर नृत्य करणारी एक कृश, निरर्थ आकृती!

...पण निदान मी 'सलोमी' तरी नव्हते...मला कुणाचं 'शिर' नको होतं...रक्तपिपासू 'व्हॅम्पायर' नव्हते मी...मी स्फूर्तीवर जगत होते...प्रतिभाविष्काराला कारण होणाऱ्या स्फूर्तीसाठी जिवाची बाजी लावणाऱ्यांपैकी एक होते मी ..."तुझे ओठ–तुझं मुख, जॉन," नि तुझं प्रेम तू मला नाकारलंस, तरी माझ्यापाशी अमेरिकेच्या तरुण रक्तातली बुद्धिप्रधान दिलदारी होतीच ना!...नीतिमत्तेच्या तुझ्या निरंतर प्रवासाला, 'शुभास्ते पंथानः सन्तु' असं म्हणून मी तुला शकूनच केला होता!...शुभास्ते...असं शुभेच्छा–वचन बरं!...एकदम अखेरचा निरोप नाही...कारण,...कारण तुझी मैत्री, तुझा स्नेह, ही माझ्या आयुष्यातली एक सुंदरातली सुंदर आणि मंगल ठेव आहे...!...पाश्चिमात्य संस्कृती ही तिच्या पौर्वात्य भगिनीपेक्षा याबाबतीत अधिक शहाणी...सूज्ञ म्हणावी का? "मला

तुझं सुख हवं जॉन, तुझं सुख हवं." तुझं 'शिर' नको तबकात मांडून आणलेलं ...कारण ती तर व्हॅम्पायरची वृत्ती झाली...स्फूर्तीनं पेटणाऱ्या जीवाची नव्हे! "घे माझं दान...घे मला...हं! नाही घेणार? ठीक आहे...मग माझा निरोप घे... अन् कधीमधी माझी आठवण काढ... कदाचित् माझ्याविषयीच्या विचारांच्या प्रेरणेतून उद्याच्या काही महान् कलाकृती जन्म पावतील!"

'नृत्यात्मिका अमेरिका' ह्या शिल्पाची सुरुवात तरी कल्पनातीत सुंदर झाली ...पण पुढे मात्र शून्य...कारण नंतर थोडक्याच दिवसांत बर्नार्डची पत्नी आजारी पडल्यानं, ते 'पोज' करणं वगैरे सोडूनच द्यावं लागलं...माझी प्रतिमा त्याची सर्वश्रेष्ठ कलाकृती ठरेल, ही आशा मी मारे मनाशी बाळगून होते...पण तसं घडायचं नव्हतं...बर्नार्डच्या श्रेष्ठतम कलाकृतीचा स्फूर्तिदाता अब्राहम लिंकन ठरला...त्याचा तो पुतळा आज वेस्टमिन्स्टर ॲबेच्या समोरच्या प्रशान्त बागेमध्ये विराजतो आहे...

...चार्ल्स फ्रॉमानला कळून चुकलं की या उपर ब्रॉडवेला तळ ठोकून राहणं म्हणजे सपशेल नुकसानच...तेव्हा त्यानं छोट्या छोट्या शहरांतून दौरा करायचा प्रयत्न केला...पण याही दौऱ्याची आखणी इतकी चुकीची झाली होती की न्यूयॉर्कमधल्या कार्यक्रमांपेक्षाही ढळढळीत अपयश या दौऱ्याला लाभलं! माझ्याच्यानं जास्त धीर निघे ना...मी फ्रॉमानला भेटायला गेले...तो झालेल्या नुकसानाचा विचार करत वैतागानं डोक्याला हात लावून बसला होता! "अमेरिकेला तुझ्या कलेची काही किंमत नाही—काही जाण नाही." तो म्हणाला—"तुझी कला आता तर अमेरिकन प्रेक्षकांच्या डोक्यावरूनच जातेय्—आणि पुढेही कधी त्यांना ती समज येईल, असा संभव दिसत नाही...तेव्हा तू आपलं युरोपलाच परतावंस हे बरं!"

फ्रॉमानच्या बरोबर झालेला माझा करार सहा महिन्यांचा होता; अन् दौरा यशस्वी होवो न होवो किमान बिदागी—मानधन याची कबुलीही त्याबरोबर होती; तरीदेखील दुखावलेल्या स्वाभिमानामुळे म्हणा, किंवा फ्रॉमानच्या स्वभावातला खिलाडूपणाचा अभाव पाहून त्याचा तिटकारा आल्यामुळे म्हणा, मी तो करार त्याच्या डोळ्यादेखत फाडून टाकला अन् म्हटलं, "तुझ्यावरच्या जबाबदारीतून तरी निदान यामुळे तू मोकळा होशील..."

जॉर्ज बर्नार्ड मला पुन्हा पुन्हा सांगायचा, की अमेरिकन मातीनं जन्माला घातलेली एक कलावती, म्हणून त्याला माझ्याविषयी अभिमान वाटत होता...अमेरिकन जनतेनं माझ्या कलेचं कौतुक केलं नाही, तर त्याचं त्याला मनस्वी दुःख होईल हेही मला दिसत होतं...तेव्हा त्याच्या सल्ल्यानुसार मी न्यूयॉर्कमध्ये राहायचं ठरवलं; मग 'बो आर्टस्' इमारतीत मी एक स्टुडिओ घेतला, आणि माझ्या निळ्या

पडद्यांनी आणि गालिचांनी तो सजवून टाकला...प्रत्येक दिवशी संध्याकाळी कवि नि कलाकारांच्या मेळाव्यासमोर नृत्य करण्याच्या माझ्या शिरस्त्यामुळे नवीन रचनांच्या निर्मितीला सुद्धा चालना मिळाली...

एकोणिसशे आठसालच्या पंधरा नोव्हेंबरच्या, रविवारच्या 'सन' (सूर्य) च्या आवृत्तीत त्यापैकी एका संध्याकाळचं असं वर्णन आलं होतं :

"ती...(इझाडोरा डंकन) कटिभागापासून खाली सुंदर चिनी कशिदाकारीत लपेटलेली असते...तिचे आखूड, गडद केस वळून सैलशा अंबाड्यासारखे मानेच्या पट्टीवर विसावलेले असतात ... साधा भांग नि केसांची वळणे चेहऱ्याच्या दोन्ही बाजूंनी सरळ...मॅडोनासारखी...किंचित अपरे नाक, अन् राखी-निळाईवाले डोळे...बहुतेक वृत्तपत्रांतून येणाऱ्या तिच्या वर्णनात इसाडोरा चांगली उंचनिंच आणि एखाद्या शिल्पासारख्या रेखीव-कोरीव बांध्याची आहे, असे म्हटलेले असते...तो तिच्या कलेच्या श्रेष्ठतेचाच एक पुरावा म्हणता येईल, कारण प्रत्यक्षात ती केवळ साडेपाच फूट उंच आहे; आणि तिचे वजन एकशेवीस पौंडांपेक्षा जास्त नाही.

"कडेनं नारिंगी- पिवळया रंगच्छटेचे दिवे लागतात- आणि पिवळ्या प्रकाशाची एक गोल चकती छताच्या मध्यावरून किरण टाकत प्रकाशयोजनेला पूर्णता आणत असते. कुमारी डंकन पियानोच्या संगीताच्या विशोभित साथी-बद्दल प्रथम दिलगिरी व्यक्त करते...

"ती म्हणते, 'अशा तऱ्हेच्या या नृत्याला खरं म्हणजे संगीताच्या साथीची आवश्यकताच नाही...अपवाद करायचा तर तो, नदीकिनारीचा वेळू तासून त्यातून पॅननं फुलवलेल्या संगीताचा...तो पावा, किंवा एखाद्या धनगराची सनई—सुंद्री...यातून झरणाऱ्या स्वरमाधुरीचाच करता येईल...बस्!...चित्र, शिल्प, संगीत, काव्य या कलांनी नृत्याला पार मागं टाकलं आहे... 'नृत्य' ही कला या बाकीच्यांच्या मानानं तर पार स्मरणातून गेल्यासारखी, अस्तित्व हरवल्यासारखीच आहे; असं असूनही संगीतासारख्या अत्यन्त विकसित कलेशी तिचा मेळ घालू पाहणं, हे जसं कठीण आहे, तसंच विसंगतही ! त्या विस्मृत नृत्यकलेचं पुनरुज्जीवन करण्याच्या कार्यालाच तर मी स्वतःला वाहून घेतलं आहे...

"बोलायला सुरुवात करताना, वाद्यवृंदापाठीमागेच कविमंडळ बसलेले असते, त्याच्या तिथेच ती उभी असते; आणि तिचे वक्तव्य संपताना पाहावे, तो प्रेक्षा-दालनाच्या दुसऱ्या टोकाला जाऊन पोहोचलेली...!...तिथवर ती कधी नि कशी आली, याचे पुसटते देखिल भान तुम्हाला नसते...डोळ्यासमोरून तिची आकृती तरळत जात असताना तुम्हाला आठवण होते ती तिच्या मैत्रिणीची—एलन टेरीची ...अवकाशाची किंचितही दखल न घेणाऱ्या त्या आत्मधुंद जिवाची...

" आता ती थकलेली, श्रान्त, उदास चेहऱ्याची यजमानीण राहिलेली नसते... ती असते एक मूर्तिपूजक सश्रद्ध मुक्तात्मा...एखाद्या तुटक्या-फुटक्या संगमरवरातून हलक्या पावलाने उठून आलेला...अशा सहजभावाने, की हे जणू जगातले एक नित्याचेच घटित होते !...एखादी 'गालातिआ' कदाचित् !... कारण सुटकेच्या तिच्या त्या पहिल्या क्षणात ती निर्भर नाचलीच असणार... किंवा 'डॅफ्नी' असू शकेल...मोकळ्या केसांची...डेल्फीच्या राईत अपोलोच्या आलिंगनातून सुटण्याच्या धांदलीतली...आणि आश्चर्य म्हणजे, अशी ही उपमा तुमच्या मनात आकारते, तो इकडे तिचे स्वतःचे केससुद्धा मोकळे होऊन रुळायला लागतात पाठीवर...

" त्या पुरातन एल्गिन संगमरवरावर ब्रिटिश चष्म्याच्या खुषीखातर ताटकळत उभे राहायला, आणि त्या चष्म्याच्या भिंगांपाठीमागच्या त्या किंचित् नाखुषीच्या नजरेचं लक्ष्य होऊन बसायला ती कंटाळली असेल, तर नवल नाही !...'तानाग्रा'-च्या छोट्या शिल्पाकृतींची रांगच्या रांग-पार्थेनॉनच्या उभ्या शिल्पखंडांत रेखलेले मेळावे-मिरवणुकी-रक्षाकुंभांवरच्या नि मृत्यूलेख कोरलेल्या शिला-खंडांवरच्या फुलमाळांच्या कातीव वलयातून उसासणारा शोक-मदिराक्षींचा अनिर्बन्ध स्वैराचार-...हे असे सारे काही सरकत असते, तरळत असते तिच्यावर रोखलेल्या तुमच्या डोळ्यांसमोरून...पण प्रत्यक्षात त्या डोळ्यांसमोर उलगडत असतो मानवी स्वभावाचा एक शबल, स्वयंपूर्ण पट...कृत्रिमतेचा राजवर्खी हात त्यावरून फिरण्याआधीचा !

" माणसाच्या अनेक पिढ्यांच्या जंजाळात हरवून गेलेली सहजता नि नैसर्गिकता यांचा मागोवा घेत घेत, संस्कृतीची वाट उगमापर्यंत उलटी पार करण्याचा प्रयत्न, हाच तिच्या आजवरच्या आयुष्याचा अर्थ होता, असे कुमारी डंकन स्वतःच कबूल करते.

" ' त्या फार फार पूर्वीच्या काळात – ज्या काळाला आम्ही मोठ्या शिष्टपणानं मूर्तिपूजकांचा-'पेगन' काळ मानतो – प्रत्येक भावनेशी तिचं वाहन बनणारी एखादी हालचाल निगडित होती...आत्मा, देह नि मन यांचा आंतरिक मेळ होता...संपूर्ण सुसंवाद होता...ग्रीक शिल्पात साकारलेल्या पुरुषांचं नि युवतींचंच उदाहरण घ्या...समोरचा संगमरवर जणू काही आपला कट्टर शत्रू आहे, असं समजून त्याला फोडून, खोदून, छिनून ह्या शिल्पाकृती घडवलेल्या नाहीत शिल्पकारांनी...त्यांच्याकडं आकृष्ट झालेल्या या रमणींना, या युवकांना, कलेच्या किमयेचीच मोहक भुलावण पडलीय्...पाहा तर त्यांच्या ओठाच्या पाकळ्या विलगता क्षणी, तुमच्याशी कोणतं हितगुज ते करतील, हे देखील तुम्ही सांगू शकाल, असं वाटतं ना तुम्हाला ?...आणि समजा नाहीच उघडले त्यांनी ओठ, तरी

त्यांचं हद्गत् तुम्ही जाणत असताच, होय ना ?'

"आणि एवढ्यात ती थांबते, आणि पुन्हा एकदा बनते एक नृत्यपर नारिंगी रंगाच्या अंगकांतीची एक छोटी शिल्पाकृती...वर उचलून धर प्याल्यातून मद्य पुढे करणारी...ॲथेनाच्या पूजापीठावर गुलाबफुले उधळणा उसळत्या लाटांच्या निळ्याजांभळ्या माथ्यावर आरूढ होऊन एजियन स मनसोक्त विहरणारी...इकडे कविजन पाहत राहतात...आणि द्रष्टा द्रष्टेप आव आणून आपली दाढी थोपटत राहतो...त्यांच्याचपैकी एक मग हळुव गुणगुणतो कीट्सच्या काही काव्यपंक्ती...' ओड ऑन अ ग्रिशीयन अ ( — ग्रीक रक्षाकुंभाला उद्देशून गायलेले गीत ) मधल्या...विचारतो,

"यज्ञासाठी येणारे हे कोण आहेत बरे ?"

* * *

'सौन्दर्य हेच सत्य आहे...नि सत्य, म्हणजेच सौन्द
बस्, हेच आहे
तुमच्या पार्थिव ज्ञानाचे ... अन् तेवढेच आहे जाणण्य
पुरेसे आहे तेवढेच'

"कलासमीक्षेला वाहिलेल्या एका मासिकाच्या संपादिकेने (मेरी फँटन रॉ कुमारी इसाडोरा डंकन हिच्या संदर्भात ' किती लिहू आणि किती नको', अनिवार उमाळ्याने लिहिले आहे. आणि कुमारी डंकनलाही वाटते, की अ तिने वाचलेल्या स्वतःबद्दलच्या वृत्तांतात ह्या संपादिकेने घेतलेला कार्याचा आढावा नि सारांश डंकनला सर्वांत अधिक दिलासा देणारा आहे

'इसाडोरा डंकनचे नृत्य पाहत असताना आपला आत्मा शतकानुशत दऱ्या उल्लंघित मागे मागे भरारी घेत जातो...मागे मागे...अगदी निर्मितीच्या उषःकाळापर्यंत मागे...जेव्हा आत्म्याची महत्ता आपल्या मुक्त विष्काराला देहसौन्दर्यातून मोकळी वाट देत असे...जेव्हा चलनवलनाच्या नादाच्या लयीशी होणारा संवाद सहजसिद्ध होता...जेव्हा मानवी श हालचाल म्हणजेच वाहता वारा होता...हिंदकळता सागर होता...जेव्हा बाहूंच्या हेलकोलातून गुलाबाच्या पाकळ्या अलगद उलगडत होत्या...हिर माळरानावर हलकेच पडणाऱ्या तिच्या पावलांच्या स्पर्शातून जमिनीवर उ झाडाचे एखादे तरळते पान भिरभिरत होते...जेव्हा धर्माचरणातली, प्रीत देशप्रेमातली, त्यागातली किंवा भोगातली भावुकता 'सितारा' चे, स्वरमंड किंवा खंजिरीचे लयबंधन पाळत होती...जेव्हा स्त्री-पुरुष आपल्या धर्म परमोच्च आनंदात गढून आपल्या घरातल्या शेकोटीसमोर आणि इष्ट दैवत नाचायचे ... किंवा रानावनात नाहीतर समुद्रकिनारी जाऊन आपल्या जीवनानं

उमाळ्याला नृत्यातून वाट करून द्यायचे...मानवी जीवात्म्याच्या ठायीची तेवढी ती समर्थ, महान् आणि सद्वृत्त प्रेरणा, आत्म्यातून उफाळून देहात संक्रमित होत असताना, पुऱ्या विश्वातल्या सर्वंकष लयीचे अनुसंधान ठेवू शकत होती'...''

जॉर्ज ग्रे बर्नार्डनं मला अमेरिकेत राहण्याचा सल्ला दिला होता, तो मी ऐकला, याचं मला समाधान झालं; कारण अमेरिकन जनतेचं लक्ष माझ्याकडे वेधायला कारणीभूत झालेला एक गृहस्थ एक दिवस माझ्या स्टुडिओमध्ये आला. वॉल्टर डॅमरॉश त्याचं नाव...त्यानं मला 'क्रायटेरियन' थिएटरमध्ये एका रद्दी वाद्य-वृंदाच्या साथीवर बिथोव्हनच्या सातव्या सिंफनीचा नृत्याविष्कार करताना पाहिलं होतं...पण तो चांगला जाणकार, समजदार संगीतज्ञ होता...तेव्हा त्याच्या कुशल वाद्यवृंदाच्या संगतीत आणि त्याच्या स्वतःच्या वृंदनिर्देशनाच्या समवेत तोच नृत्य-कार्यक्रम किती परिणामकारक होऊ शकेल याची कल्पना तो सहज करू शकत होता...

लहानपणचा पियानोचा प्रत्यक्ष आणि वाद्यवृंदसंगीताच्या रचनेच्या बाबतीतला तात्त्विक अभ्यास माझ्या सुप्त मनात कुठेतरी मूळ धरून होता म्हणायचा...कारण मी डोळे मिटून स्वस्थ पडते, तेव्हा तेव्हा मला साऱ्या वाद्यांसहित पुरं वृंदवादन समोरच चालू असावं तसं स्पष्ट ऐकू येतं!...एवढंच नव्हे, तर त्यातल्या प्रत्येक वाद्याचा संपूर्ण भावाविष्कार आपल्या हालचालीतून व्यक्त करणाऱ्या दिव्य नृत्याकृती हरेक वाद्यागणिक माझ्या डोळ्यांसमोरून तरळत जातात...असा हा छायालोक वाद्यवृंद माझ्या अंतःपटावर आपला नर्तनरंग सदाच जमवत असतो!

डॅमरॉशनं डिसेंबरात 'मेट्रोपॉलिटन ऑपेरा हाऊस' मध्ये ओळीनं माझे कार्यक्रम लावायचं ठरवलं...मी तर काय, आनंदानं होकार दिला त्याला...त्याचा होरा होता, तसंच घडलं...पहिल्याच प्रयोगाला एक बॉक्स राखून ठेवण्यासाठी चौकशी करताना, थिएटरमध्ये एकही जागा शिल्लक नव्हती, हे पाहून चार्लस फ्रॉमान इतका चकित झाला! त्या अनुभवानं एक गोष्ट सिद्ध झाली...कलावंत आपल्या परीनं कितीका मोठा असेना, योग्य ती पार्श्वभूमी किंवा योजनाचातुर्य यांच्या अभावी अगदी उच्चतम कला देखिल कुणावर प्रभाव पाडू शकत नाही... एलिनोरा ड्यूजच्या बाबतीत हेच झालं. अमेरिकेच्या तिच्या पहिल्या दौऱ्याच्या वेळी व्यवस्थेबाबतच्या अशा गैरयोजनेमुळे तिला जवळ जवळ रिकाम्या थिएट-रातच रंगमंचावर उभं राहावं लागलं; अन् त्यामुळे वाटलं की, अमेरिकेच्या नशिबात ड्यूजच्या कलेचा आस्वाद घेण्याचं लिहिलेलंच नसावं...पण तेच ती एकोणिसशे चोवीसमध्ये जेव्हा परत आली अमेरिकेला, तेव्हा तिच्या स्वागतासाठी न्यूयॉर्क ते सॅनफ्रॅन्सिस्कोपर्यंत अव्याहत टाळ्यांचा गजर चालू होता...का? कारण या वेळच्या व्यवस्थापकाकडे—'मॉरिस गेस्ट'कडे—ड्यूजला समजून घेण्याचं

कलात्म बुद्धिचातुर्य होतं!

...ऐशी वादकांच्या वृंदासह प्रवास करण्याचा मला खूपच अभिमान वाटला... अन् वृंदनिर्देशक कोण, वॉल्टर डॅमरॉश! तो थोर कलाकार! हा दौरा विशेषच यशस्वी ठरला...त्याला कारण होतं.. एकजात सर्व वादकांच्या मनात त्यांच्या निर्देशकाबद्दल नि माझ्याबद्दल सुद्धा कितीतरी जिव्हाळा होता, आपुलकी होती. वॉल्टर डॅमरॉशविषयी माझ्या मनात असा एक सहानुभाव निर्माण झालेला होता, की रंगमंचाच्या मध्यावर मी नृत्य करायला उभी राहिले की माझ्या शरीरांतली नस न् नस वाद्यवृंदाशी आणि त्या महान् सूत्रधाराशी जोडली गेली आहे, असा भास मला व्हायचा!

त्या वाद्यवृंदाच्या साथीबरोबर नृत्य करण्यातल्या माझ्या आनंदाचं वर्णन तरी कसं करू?...सारं कसं माझ्या डोळ्यासमोरून आजही तरळत आहे...वॉल्टर डॅमरॉश आपली बॅटन उंचावतो...मी एकटक पहाते... एवढ्यात त्या पहिल्याच संघाताक्षणी सर्व वाद्यांतून उफाळणाऱ्या सिंफनीचे सुरसंवाद एकजीव होऊन माझ्या अंतर्मनातून उमाळू लागतात.. झरायला लागतात...ध्वनिप्रतिध्वनींच्या त्या धारात न्हाऊन निथळलेली मी, मग 'सीग्फ्रीड'नं जाग आणलेल्या 'ब्रूनहील्ड'च्या आनंदाच्या, किंवा मरणात आपली मुक्ती शोधणाऱ्या 'ईझोल्ड'च्या आत्म्याच्या नानापरींच्या भावच्छटांचं एकजीव प्रत्यंतर आणून देणारं एक माध्यमच बनून जाते जणू...माझे सुदूर, विशाल नृत्यक्षेप,...माझ्या भरत्या, स्फुरणात्मक हालचाली, वाऱ्यानं फुगून ताठरलेल्या शिडाप्रमाणे मला पुढे पुढे नेतात...पुढे पुढे नि वर वर सुद्धा!... आणि मग आतल्या आत एका प्रचंड शक्तीचं भान जागं होतं. ही शक्ती ते सारं संगीत ग्रहण करते, आत्मसात करते, नि मग माझ्या देहातून तिचा संचार चालू असतानाच त्या 'ऐकलेपणा'ला बाहेरची वाट गवसते!

...कधीकधी ही शक्ती अगदी रौद्ररूप धारण करायची...कधीकधी माझं काळीज तिच्या त्या रागोन्मादाच्या भावभरानं एकाएकी उसवून फाटून जायच्या बेताला यायचं; वाटायचं ह्या जगतातले आपले शेवटले क्षण सामोरे आले जणू आता!...थरारून जायची मी आपादमस्तक...अन् कधीतरी असंही व्हायचं: तिनं कुढत राहायचं आतल्या आत, आणि मी व्यथित होऊन जायचं अतिशय... मग माझे बाहू अगदी स्वर्गापर्यंत उंचाऊन मी धावा करायची मदतीसाठी... कुठूनही ती मदत यायची नाही, तो दिलासा मिळायचा नाही...कित्येकदा मी स्वतःशीच विचार करायची: मला 'नर्तकी' म्हणणं खरं तर किती चुकीचं आहे ...मी तर तो चुंबकीय क्षेत्राचा केंद्रबिंदू आहे—वाद्यवृंदाचा भावाविष्कार प्रक्षेपित करणारा—माझ्याच सत्वातून बाहेर पडणारे तेजाचे स्फुल्लिंग, माझ्या थरथरत्या कंपकातर वाद्यवृंदाशी माझा दुवा जुळवत आहेत!

त्या वृंदात एक बासरीवादक होता. 'ऑरफियस 'मधला 'हॅपी स्पिरिट्स 'चा त्याचा वैयक्तिक स्वरविभाग तो अशा दैवी तऱ्हेनं वाजवायचा की अनेकदा रंगमंचावर मी एका जागी खिळून जायची...त्याचं वादन ऐकण्याच्या आनंदातिशयानं, त्या व्हॉयोलिन्समधून झरणाऱ्या सुरलहरींनी, आणि त्या विलक्षण सुंदर संचलनाच्या प्रेरणेनं—उभारी घेत स्वरोत्कर्ष साधणाऱ्या त्या सबंध वृंदवादनानं माझ्या डोळ्यांना आसवांच्या धारा लागायच्या...

बव्हेरियाचा लुई बेरूतला एकटाच वृन्दवादन ऐकत राहायचा...माझ्या मनात आलं, त्यानं या साथीवर नृत्य केलं असतं, तर त्याला त्याहून कितीतरी अधिक प्रतीचा आनंदास्वाद मिळाला असता...

...मी आणि डॅमरॉश यांच्यामध्ये एक आश्चर्यकारक सहानुभाव नांदत होता ...त्यामुळे त्याच्या प्रत्येक आविर्भावागणिक माझ्या ठायी मला एक प्रतिसादात्मक सहकंपन जाणवायचं. स्वरावलींच्या आरोहणाला उत्कर्षबिन्दूपर्यन्त पोहोचवताना तो स्वरांची गाज वाढवायला लागला, की त्याच प्रमाणात माझ्यातलं चैतन्य प्रकाशमय होत, हावभावांच्या रूपानं झरायला लागायचं; कारण त्याचं प्रत्येक स्वरविधान त्याला समांतर अशा स्वरलीन हालचालींत रूपांतरित होत असताना माझा जीव त्याच्या आत्म्याशी सुसंवाद साधत, हेलावत, आंदोलत राहायचा...

कधीकधी रंगमंचावरून खाली पाहताना डॅमरॉशची ती भारदस्त भिवई छापील स्वरालेखावर झुकलेली दिसायची, नि वाटायचं, की माझं नृत्य म्हणजे खरोखर 'झेऊस 'च्या माथ्यातून झालेला शस्त्रधारी 'ॲथेना 'चा जन्मोत्सवच आहे जणू...साग्रसंगीत...!

अमेरिकेचा हा दौरा म्हणजे माझ्या आयुष्यातला एक खूपच आनंदाचा काळ ठरला; मात्र मला घरची ओढ लागली होती एवढंच काय ते ! सातवी सिंफनी नाचताना माझं शिष्यमंडळ, माझी मुलं माझ्या डोळ्यांपुढे उभी राहायची... माझ्याबरोबर या संगीताचं नृत्यांकन करू शकतील, अशा समजदार वयाला पोहोचलेली...तेव्हा हा आनंद काही निर्लेप, पूर्ण नव्हता...मात्र त्याच्या पोटात एका अधिक पूर्ण भविष्यकालीन आनंदाची अपेक्षा लपलेली होती...नाहीतर इझोल्डच्या प्रेमगीताचे शेवटचे सूर अगदी पूर्ण वाटतात, पण त्याचा भावार्थ 'मृत्यू ' हा असतो !

वॉशिंग्टनमध्ये मला एका वादळालाच तोंड द्यावं लागलं...काही धर्मोपदेशकांनी कडक शब्दांत माझ्या नृत्याचा निषेध केला होता.

.. अन् मग एके दिवशी दुपारच्या कार्यक्रमाच्या वेळी एक साऱ्यांना बुचकळ्यात टाकणारी गोष्ट घडली ! रंगभूमीलगतच्या बॉक्समध्ये एका व्यक्तीचं

आगमन झालं...कुणाचं? प्रत्यक्ष रुझवेल्ट महाशयांचं! त्यांना बहुधा का
पसंत पडला असावा...कारण प्रत्येक नृत्य संपता संपता टाळ्या वाजायला सु
व्हायची ती त्यांच्याचकडून...त्यांनी पुढे एका मित्राला लिहिलं होतं : "धर्मोपदे
लोकांना इसाडोराच्या नृत्यात निषेधार्ह अशी काय गोष्ट दिसली कुणास ठा
मला तर ती सकाळच्या कोवळ्या उन्हात बागेत बागडणाऱ्या अन् अ
कल्पनाविश्वातली सुंदर सुंदर फुलं खुडणाऱ्या किशोरीसारखी निरागसच भासली

रुझवेल्टचे हे उद्गार वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाल्यानं एकजात सारे धर्मोपदे
कमालीचे शरमून गेले, अन् आमच्या दौऱ्याच्या यशाला तर ह्या घ
हातभारच लावला! खरं म्हणजे हा संपूर्ण दौरा फारच सुखाचा आणि सर्व त
शकुनाचाच ठरला. खरीखुरी, अगदी थोर कलावंताचीच तबियत असलेल्या
डॅमरॉशहून स्नेहशील दिग्दर्शक, आणि मित्र तर मागून मिळाला नसता
फुरसतीच्या विश्रांतवेळी त्याचं जेवणखाण देखील मोठं चवीढवीनं चालायचं
तासन् तास तो पियानो वाजवण्यातही रमून जायचा...जेव्हा पाहावा,
ताजातवाना, हसतमुख, खेळकर आणि प्रसन्न असायचा...!

न्यूयॉर्कला आम्ही परतलो, तेव्हा एक समाधानकारक वार्ताही कानावर आ
बँकेत माझ्या नांवावर चांगली मोठीच म्हणावी, अशी रक्कम जमा झाली ह
माझ्या काळजात माझ्या बेबीची नि शाळेची आठवण सारखी ठुसठुसत न
तर मी अमेरिका सोडून कुठे गेलेच नसते खरं तर...पण एका सकाळी धक्क
वर उभ्या असलेल्या माझ्या चार मित्रमंडळींचा– त्यांत मेरी अन् 'बिली रॉबर्ट
काही कवी आणि कलावंत, हेच लोक होते नेहमीप्रमाणे–निरोप घेऊन मी युरो
वाट धरली परत...

२२

एलिझबेथ माझ्या वीस शिष्यांना आणि बेबीला घेऊन मला पॅरिसला भेटायला आली...माझ्या आनंदाची तुम्हीच कल्पना करा – माझ्या बेबीला, सहा महिने होऊन गेले, मी पाहिलंसुद्धा नव्हतं. तिनं माझ्याकडे कसंतरीच बघितलं, अन् रडायलाच सुरुवात केली एकदम! झालं, माझीही तीच झाली गत...मलाही रडू कोसळलं. पुन्हा एकदा बेबीला हाताच्या कवेत सामावून घ्यायचा तो अनुभव किती विलक्षण, वेगळा होता...आत आत किती गोड वाटत होतं...अन् तिकडे ते माझं दुसरं अपत्य – माझी शाळा...सारी जण किती उंचनिंच वाढली होती ...खरंच! ती पुनर्भेट इतकी अद्‌भुत होती, हृद्य होती...साऱ्या दुपारभर आम्ही नाचत होतो, गात होतो सर्व मिळून!

...'ल्यून्ये पो' नावाच्या त्या बड्या कलाकारानं पॅरिसमधल्या माझ्या नृत्य-प्रयोगांची जबाबदारी घेतली होती. एलीनोरा ड्यूज, 'सूझान देप्रे' आणि 'इब्सेन' यांनाही त्यानंच पॅरिसला नेलं होतं. माझ्या नृत्याला एका विशेषप्रकारच्या पार्श्व-भूमीची, वातावरणाची गरज होती, हे ओळखून त्यानं 'गेते लीरिक्' आणि 'कोलोन' वाद्यवृन्दच माझ्यासाठी ठरवून ठेवले होते – कोलोन स्वतःच निर्देशन करणार होता...ही सारी व्यवस्था इतकी परिणामकारक ठरली, की पॅरिसला आम्ही धमालच उडवून दिली, म्हणायला हरकत नाही... 'ऑरी लाव्हदां', 'पिअर मिल्', 'ऑरी र्द रेनिये' यांसारख्या कवींनी माझ्याबद्दल खूपच उत्साहानं लिहिलं होतं...

एकंदरीत पाहता पॅरिसनं माझं सहर्ष स्वागत केलं होतं!

माझ्या प्रत्येक नृत्यप्रदर्शनाला एकजात सारा बुद्धिमन्तांचा नि कलावंतांचा मेळा

उपस्थित असायचा...तेव्हा आता काय माझं स्वप्न साकार व्हायचा, नि माझं विद्यालय – माझी शाळा – प्रत्यक्षात उभी राहण्याचा तो सोनेरी क्षण अगदी समोरच येऊन ठेपला, असं मला वाटायला लागलं...

'र्‍यू दांतों '–नंबर पाच, इथे मी दोन मोठी अपार्टमेन्टस् घेतली होती. मी पहिल्या मजल्यावर राहायची, अन् सारा विद्यार्थीवर्ग नि त्यांच्या गव्हर्नेसेस वगैरे दुसऱ्या मजल्यावर राहायचे...

एक दिवस दुपारच्या कार्यक्रमापूर्वी मला भयंकर घाबरायला झालं...माझ्या बेबीचा जीव अगदी एकाएकी, आधी काहीही तशी कल्पना न येता, बावरा झाला, घुसमटायला लागला.. ती खोकायला, ठसकायला लागली. मला वाटलं, तो लहान मुलांना होतो, तो 'क्रूप' नावाचा रोगच झाला असणार बेबीला—डांग्या खोकल्या-सारखा; आणि टॅक्सी करून मी डॉक्टरच्या शोधात पॅरिसभर फिरले, शेवटी एक प्रसिद्ध बालचिकित्सातज्ज्ञ सापडला...तो प्रेमानं आलाही माझ्याबरोबर घरी ...त्यानं लगेच सांगितलं की खात्रीनं की 'क्रूप' वगैरे काही नव्हतं, तो आपला साधा खोकला होता...

मी अर्थातच दुपारच्या माझ्या कार्यक्रमाला अर्धा तास उशिरा जाऊन पोहोचले. कोलोननं तो मधला वेळ संगीतानं भरून काढला होता...त्या साऱ्या दुपारभर नाचताना एकप्रकारच्या हुरहुरीनं मी थरथरत होते...माझ्या छकुलीवर माझी अतिशय माया होती...राहून राहून मनात विचार यायचा, की तिला काही झालं, तर मी जिवंतच राहू शकायची नाही !

आईचं आपल्या बाळाबद्दलचं प्रेम, किती प्रबळ, अहंकारी नि भयंकर हट्टा-ग्रही असतं ! मला स्वतःला ही वस्तुस्थिती काही फारशी चांगली वाटत नाही. सगळ्याच मुलांवर माया करता येणं ही खरं म्हटलं तर जास्त स्तुत्य गोष्ट ठरेल !

देईद्रे आता इकडेतिकडे धावायला आणि नाचायला सुद्धा लागली होती... दिसायला ती विशेषच छान होती...अगदी एलन टेरीचीच हुबेहूब प्रतिकृती, पण छोटी—असं म्हटलं तरी चालेल. माझ्या मनात अविरत चाललेलं एलनचं कौतुक आणि चिन्तनच याला कारण झालं असणार खास. माणसाच्या संस्कृतीनं प्रगतीची आणखी पायरी गाठली, की तेव्हा सगळ्या गर्भवती स्त्रिया प्रसूतीच्या आधी एका सुरक्षित जागी वेगळ्या ठेवल्या जातील, अन् त्यांच्या अवतीभोवती शिल्पा-कृती, चित्रं नि संगीत या कलांच्या वातावरणाचा दरवळ असेल...

त्या सबंध मोसमांत, 'ब्रीसॉं बॉल' खूप गाजला...एकजात साऱ्या कलावंतांना अन् पॅरिसमधल्या साहित्यसम्राटांना तिथे आमंत्रण होतं...प्रत्येकानं एकेका कलाकृतीच्या शीर्षकाच्या रूपानं तिथे यायचं होतं...मी 'युरिपिडिस'ची मदिरोपासिका– विलासिनी 'बॅकान्ट' म्हणून गेले होते, अन् मदिरोपासिका

बनले म्हटल्यावर, ग्रीक पायघोळ वेषातल्या मूने स्यूलीच्या तिथे मी गेले...तो साक्षात् 'डायनिसस'च म्हणता आला असता. ती सारी उरली सुरली संध्याकाळ मी मूने स्युलीच्या बरोबरच नाचण्यात घालवली...बाकी मूने स्यूलीच्या बरोबर म्हणावं, किंवा आजूबाजूला म्हणावं कोण जाणे–कारण त्याला आधुनिक नृत्याचा अगदी भयंकर तिटकारा होता...ते असो...पण त्या दिवशीच्या आमच्या वागण्यानं अफवा–कुचाळक्यांना फारच वाव मिळाला म्हणे; खरं तर त्या म्हणण्याला काही अर्थ नव्हता. त्या थोर कलावन्ताला माझ्यामुळे काहीतरी चार-दोन तासांची मानसिक विश्रांती–थोडी निरागस करमणूक लाभली एवढंच... त्याच्यासारख्याला तेवढी तरी सवलत हवी की नको? माझ्या उपजत अमेरिकन साध्याभोळ्या स्वभावानं साऱ्या पॅरिसला धक्का बसण्याची पाळी यावी, म्हणजे किती नवलाची गोष्ट आहे नाही?

...मनानं पाठवता येणाऱ्या बिनतारी संदेशाच्या क्षेत्रात जे आता नवनवे शोध लागले आहेत, त्यामुळे एक गोष्ट तर सिद्धच झाली आहे: मेंदूतून निघणाऱ्या विचारलहरी, जिथे सहानुभाव आहे, सहकंपन आहे, अशा वातावरणातून प्रवास करून आपल्या साध्यापर्यन्त पोहोचतात अन् कितीदातरी ही गोष्ट संदेश पाठवणाऱ्याच्या नकळतसुद्धा घडू शकते!

...आता माझ्यावरचा मानसिक ताण अशा स्थितीला आला होता की, कोणत्या क्षणी माझ्या मनावरचा ताबा सुटून जाईल, हे सांगणं कठीण झालं असतं. शाळेचा वाढता खर्च माझ्या मिळकतीतून सगळाच्या सगळा भागणं अशक्यच दिसत होतं...माझ्या पैशाच्या बळावर आतापर्यंत चाळीस मुलांना दत्तक घेऊन, त्यांची काळजी नीट वाहून, त्यांना शिकवणसवरण्याची व्यवस्थाही मी केली होती. त्यांपैकी वीस मुलं होती जर्मनीत नि वीस पॅरिसला! याशिवाय इतर लोकांनाही होईल तशी मदत मी करतच होते, ती गोष्ट वेगळीच! एक दिवस थट्टेथट्टेत मी एलिझबेथला म्हटलं,

"हे असं नाही चालायचं...माझ्या बॅंकेतल्या शिलकीपेक्षा जास्तच खर्च करून बसलेय् मी; आता यापुढे ही शाळा चालवायची असेल तर आपल्याला कुणीतरी लक्षाधीशच गाठावा लागेल!"

एकदा हे शब्द तोंडातून बाहेर पडले मात्र, त्या क्षणापासून या कल्पनेनं मला पछाडून टाकलं पुरं. 'लक्षाधीश–लक्षाधीश शोधून काढायला हवा'–दिवसातून शंभर वेळा मी घोकायला लागले...पहिल्यांदा सारं थट्टेवारी चाललं होतं...पण शेवटी 'कुए'च्या स्वयंप्रेरणेच्या तत्त्वाप्रमाणे अगदी ध्यासच लागला माझ्या मनाला त्याचा!

एके दिवशी 'गेते लीरिक्' मधल्या विशेष चांगल्या जमलेल्या कार्यक्रमानंतर

मी माझा ड्रेसिंगगाऊन घालून आरशासमोर बसले होते. मला आठवतं, त्या दिवशी दुपारच्या कार्यक्रमाची तयारी म्हणून मी माझे केस कुरळे करायच्या त्या कागदात गुंडाळले होते – अन् वर एक छोटी लेसवाली टोपी घातली होती; एवढ्यात माझी आया एक भेटकार्ड घेऊन आली माझ्याकडे. त्यावरचं ते प्रसिद्ध नाव मी वाचलं, अन् कळ दाबताक्षणी सुरू व्हावी तशी माझ्या डोक्यात ती रेकॉर्ड वाजायला लागली : 'आला माझा लक्षाधीश...लक्षाधीशाची स्वारी आली माझ्या दारी!'

"त्यांना आत पाठवून दे."

तो आत आला – उंचनिंच...कुरळे पिंगट केस...दाढीही तशीच...मी लगेच ओळखलं : लोएन्ग्रीन! 'माझा भावी सरदार – लक्षाधीश!' बोलण्याचा आवाज गोड होता त्याचा...लाजराच वाटला मला तो जरा....मी मनात म्हटलं, दाढी-पाठीमागं लपलेला हा एक जरा मोठा मुलगा आहे, झालं!

"तुम्ही मला ओळखत नसाल, पण अनेकदा तुमच्या अद्भुत कलेला दाद देण्याचं भाग्य मला लाभलं आहे." त्यानं सांगितलं.

...अन् मग एकाएकी माझ्या मनात एक अबोध भाव निर्माण झाला ...याला मी कुठेतरी पाहिलं आहे...कुठे? स्वप्नातल्या घटनेसारखी प्रिन्स पॉलिन्याकची प्रेतयात्रा माझ्या मनश्चक्षूसमोरून सरकायला लागली...मी वयानं लहान...फ्रेंच मृत्युयात्रेच्या रीतिरिवाजात जरासुद्धा न रुळलेली...हमसाहुमशी ओक्साबोक्शी रडणारी, भेकणारी...चर्चमध्ये एका बाजूला नातेवाइकांची लांबच लांब रांग... एवढ्यात कुणी तरी मला पुढे ढकलतं...'अशा वेळी हस्तांदोलन करायचं असतं,' कुणी कुजबुजतात...अन् माझ्या जिवलग मित्राच्या विरहानं व्याकुळ झालेली मी, एका पाठोपाठ त्याच्या एकेका नातलगाशी हस्तांदोलन करते...मग एकाएकी वर पाहते तो कुणाच्या तरी डोळ्यांशीच माझे डोळे भिडतात...हेच ते डोळे...हाच तो उंचनिंच बांधा!

आमची पहिली भेट चर्चमध्ये एका शवपेटिकेसमोर व्हावी...हा काही भविष्यातल्या सुखाची ग्वाही देणारा शकून नव्हता! ते कसं का घडेना, त्याला भेटताक्षणीच माझी खात्री झाली, की 'हाच तो माझा लक्षाधीश!' याच्याच मागावर मी माझ्या संज्ञालहरींना पाठवलं होतं...परिणामांची काहीही क्षिती न बाळगता...ती अखेर नशिबाची परीक्षाच होती एक!

"तुझ्या कलेचं नि नृत्यशाळा चालविण्याच्या ध्येयवेडाचं, धैर्याचं मला कौतुक वाटतं...तुला काही मदत हवी असली, तर त्यासाठीच मी आलोय्... काय करता येईल मला? रिव्हिएराला समुद्रकाठी हा बालगोपालांचा नर्तकमेळा घेऊन तू एका बंगल्यात राहायचं, आणि तिथे नवनवीन नृत्यरचना करायच्या—

असं आवडेल तुला ? खर्चाची काळजी करायचं तुला काहीच कारण नाही... ते माझ्याकडे लागलं सगळं...तू एवढं महान् कार्य केलं आहेस...साऱ्या कट-कटींनी थकून गेली असशील तू खास...आता ती सारी जबाबदारी तू माझ्या शिरावर टाक..."

...एका आठवड्याच्या आत माझा पुरा छोटा काफिला पहिल्या वर्गाच्या डब्यातून प्रवास करत सागराच्या नि सूर्यप्रकाशाच्या रोखानं निघाला...लोएन्-ग्रीन स्टेशनवर आलाच होता...पांढरेशुभ्र कपडे...प्रसन्न दिसत होता अगदी. तो आम्हाला समुद्रकाठच्या एका सुंदर बंगल्यात घेऊन गेला अन् तिथल्या गच्ची-वरून त्याची पांढऱ्या शिडाची बोट त्यानं आम्हाला दाखवली.

"'लेडी ॲलिशिया' नाव आहे माझ्या यॉटचं खरं म्हणजे; पण एखादे वेळी आता ते बदलून 'इरिस' नाव द्यावं लागेल तिला."--तो म्हणाला.

हातात फळं, तुरे-मोहोर वगैरे गोळा करत सगळी मुलं आपली संत्र्यांच्या झाडांच्याखाली नाचत बागडत होती--अंगात फिकट निळ्या रंगाचे कुडते--ट्यूनिक्स घातलेली. मुलांच्याशी लोएन्ग्रीनचं वागणं भारी प्रेमळ नि गोड असे... साऱ्यांच्या सुखसोयींकडे, दुखण्याखुपण्याकडे त्याचं लक्ष असायचं. मला त्याच्याबद्दल आधी कृतज्ञेची भावना होतीच, पण त्याचं मुलांवरचं प्रेम पाहून त्यात विश्वासाची भर पडली...अन् जसजसा दररोजच्या सहवासानं त्याच्या आकर्षक व्यक्तिमत्त्वाचा प्रत्यय यायला लागला, तसतशी या सर्वांहूनही खोल आणि प्रबल अशी एक अनामिक भावना माझ्या मनात मूळ धरायला लागली. त्या वेळी खरं सांगायचं, तर मला सर्वतोपरी साहाय्य करणारा एक शूर सरदार--शिलेदार, याच भावानं त्याच्याकडे मी पाहत होते...दुरून आपली त्याची मानसपूजा करायची. जवळ-जवळ अपार्थिव असंच नातं होतं ते आमचं...

मुलं आणि मी 'बोलिय्'ला एका बंगल्यात राहत होतो, पण लोएन्ग्रीनचा मुक्काम मात्र नाईसमधल्या एका अद्ययावत् हॉटेलमध्ये असायचा–कधीकधी मला तो तिथे जेवायला बोलवायचा...मला आठवतं, एकदा मी तिथे माझ्या आपल्या साध्यासुध्या ग्रीक कुडत्यातच गेले...अन् पाहते तो, हिरे अन् मोती जडवलेला एक सुंदर रंगीत गाऊन घातलेली एक बाईसुद्धा तिथे आलेली...मी जी काय लाजले, गोंधळून गेले ! त्या क्षणीच माझ्या लक्षात आलं, की ती बाई माझी प्रतिस्पर्धी होती !...तिला पाहून मला अगदी भीती वाटली, अस्वस्थ वाटलं...अन् हे सारं 'वाटणं' काही उगाचच नव्हतं, हे पुढे सिद्ध झालंच म्हणा...

एका रात्री लोएनग्रीननं आपल्या नेहमीच्या दिलदारपणाला अनुसरून खूप लोकांना कॅसिनोमध्ये एका 'कार्निव्हल बॉल'चं आमंत्रण दिलं होतं. त्यानं झाडून

साऱ्यांना ' पीरो ' पोशाखही पुरवले होते – झुळझुळीत लिबर्टी सॅटीनचे... 'पीरो' वेष अंगावर घालण्याची माझी तर पहिलीच वेळ होती...अन् मुखवटे घालूनच जिथे जायचं असतं, असल्या जाहीर नृत्यसमारंभाला हजर राहण्याची देखिल माझी पहिलीच खेप ही...समारंभ खूपच आनंदाचा नि मौजमजेचा होता... माझ्यापुरतं सांगायचं, तर माझा आनंद एका बारीकशा रुखरुखीनं किंचितसा झाकोळलेला होता...ती ' हिरेजडित ' बाईसुद्धा माझ्यासारखीच ' पीरो ' वेष घालून तिथे आली होती...तिच्याकडे नजर गेली, अन् इकडे माझ्या जिवाला कळाच लागल्या जशू; पण नंतर मोठ्या जोषात मी तिच्या बरोबर नाचत होते, हेही माझ्या लक्षात आहे...प्रेम आणि तिरस्कार याचा चेहरा किती मिळता-जुळता असतो पहा !...आम्ही एकमेकींबरोबर तशाच नाचत राहिलो असतो... पण तेवढ्यात नोकरांच्या मुकादमानं ' तशी पद्धत इथे नाही', असं खांद्याला स्पर्श करून सांगितल्यानं आम्ही थांबलो !

समारंभाला अशी रंगत आली असताना मला फोनवर बोलावणं आलं. ' ब्रोलीय् ' बंगल्यातून कुणीतरी सांगत होतं, की आमची सर्वांत छोटी विद्यार्थिनी ' एरिका ' हिला ' क्रूप ' झाला आहे...ती अत्यवस्थच होती...मरणाऱ्या दाराशीच जवळजवळ...मी टेलिफोनजवळून धावत धावत लोएनग्रीन बसला होता आपल्या पाहुण्यांच्या बरोबर, तिथे जेवणाच्या टेबलापाशी गेले, अन् म्हटलं, " तावडतोब फोनकडे चल...लगेच...आपल्याला डॉक्टरला बोलवायला हवं. " तिथे टेलिफोनच्या बूथशी आम्हाला दोघांनाही प्रिय असणारा एक जीव धोक्यांत असल्याचा जाणिवेच्या ताणाखाली म्हणा–संयमाचे बंध तुटले, आणि...आणि पहिल्यांदाच आमचे ओठ जुळले...पण एक सेकंदही आम्ही वाया घालवला नाही; लोएनग्रीनची मोटर दाराशी उभी होतीच. ' पीरो ' च्या वेषात आम्ही होतो तसेच निघालो, डॉक्टरला पकडलं आणि ' ब्रोलिय् ' कडे धाव घेतली. एरिकाचा जीव घुसमटला होता, अन् चेहरा तर काळाठिक्करच पडला होता...डॉक्टरांनी उपाय सुरू केले...आम्ही दोन घाबरलेले ' पीरो ' निकालाची, डॉक्टरांच्या निष्कर्षाची वाट पाहत बिछान्याजवळ निमूट उभे होतो...दोन तासांनंतर, खिडकीशी पहाटेची चाहूल हलक्या पावलानं येत असताना डॉक्टरांनी सांगितलं, की आता काही धोका नव्हता; छोटी वाचली होती दुखण्यातून...गालांवरून ओघळणाऱ्या आसवांच्या धारांनी आमच्या चेहऱ्यावरचा रंग वितळत असतानाच लोएनग्रीननं मला आपल्या बाहुपाशात घेतलं; म्हणाला, " असा धीर नाही सोडायचा मुळीच... चल पाहू...पाहुणे मंडळींना तसंच सोडणं बरं नाही...चल..." कारमधून परत जाताना त्यानं मला तसंच जवळ धरून ठेवलं होतं...अन् हलुवारपणे म्हणत होता, " ही एकच रात्र...ही एकच आठवण देखील तुझ्यावर आमरण प्रेम

करायला मला पुरेशी आहे...”

इकडे कॅसिनोमध्ये वेळ तर असा भराभर गेलेला असावा, की बहुतेक पाहुण्यांचं आमच्या गैरहजेरीकडे मुळी लक्षच गेलं नाही!

एका व्यक्तीनं मात्र आमच्या गैरहजेरीच्या अवधीतलं मिनिट न् मिनिट मोजलं होतं! त्या लहानसर बांध्याच्या ‘ हिरेजडित ’ स्त्रीच्या कमालीच्या मत्सरी डोळ्यांनी आमचं जाणं हेरलं होतं...अन् आम्ही परतलो तशी टेबलावरची एक सुरी उचलून ती लोएनग्रीनच्या दिशेनं धावून आली...सुदैवानं तिचा रोख वेळीच लोएनग्रीनच्या ध्यानात आला. त्यानं तिचं मनगट घट्ट पकडलं, आणि एका झटक्यात आपल्या डोक्याच्यावर उंच उचलून त्या तशा स्थितीत तिला स्त्रियांच्या प्रसाधनगृहाकडे नेलं.. सारं काही अशा आविर्भावात चाललं होतं की, जणू त्या ‘ कार्निव्हल बॉल ’च्या कार्यक्रमातलाच हा एक आगाऊ ठरलेला विनोदी प्रवेश होता! तिथे तिला तिथल्या नोकरमंडळींच्या स्वाधीन करताना त्यानं जाताजाता एवढंच म्हटलं, “ बाईसाहेबांचं मन तेवढं थाऱ्यावर दिसत नाही...मला वाटतं, त्यांना पाणीबिणी प्यायला द्यावं लागेल! ” बस्...एवढं करून तो बॉलरूममध्ये परतलासुद्धा... कसलाही परिणाम दिसत नव्हता त्याच्यावर...उलट अगदी खूप खुषीत दिसत होता तो! अन् खरंच, त्यानंतरच पुन्हा समारंभाचा रंग दुणावत गेला... त्या आनंदानं परमावधी गाठली ती पहाटे पाच वाजता! त्या दिवशीच्या साऱ्या प्राकृतिक, उर्मिल अन् परस्परविरोधी भावनांच्या कल्लोळाला ‘ मॅक्स डिअरली ’च्या बरोबर ‘ टँगो आपाश् ’ नाचताना मी मोकळी वाट करून दिली तेव्हा...पहाटे पाच वाजता!

सूर्य उगवला, त्या सुमाराला सर्व मंडळी विखुरली, तेव्हा ती ‘ हिरेजडित ’ बाई एकटीच आपल्या होटेलवर निघून गेली. लोएनग्रीन माझ्याबरोबर मागेच राहिला होता. मुलांबाबत त्याला वाटणारा जिव्हाळा, एरिकाच्या आजारात त्याला वाटलेली काळजी, अन् त्याचं ते मनापासूनचं दुःख, यामुळे त्यानं माझं प्रेम जिंकलं होतं!

दुसऱ्या दिवशी, नव्यानं वारसं झालेल्या त्याच्या यॉटमधून सफरीला येण्याबद्दल त्यानं मला विचारलं...तेव्हा माझ्या छोट्या चिमखडीला तेवढं बरोबर घेऊन, शाळेला गव्हर्नेसेसच्या ताब्यात दिली, अन् आम्ही इटलीचा मार्ग धरला...

पैसा, कसा का असेना, आपल्याबरोबर एक शाप घेऊन येत असतो; त्यामुळे ज्यांच्याकडे पैसा असेल त्या लोकांच्या दैवात पुऱ्या चोवीस तासांची देखिल मनःशान्ती कधी नसायची हे ठरलेलंच!

...ज्या माणसाच्या सहवासात आता मी होते, त्याचा स्वभाव एखाद्या

लाडावलेल्या लहान पोरासारखा आहे, एवढी एकच गोष्ट माझ्या लक्षात यायला पाहिजे होती; मग सगळं काही ठीक झालं असतं—माझा प्रत्येक शब्द मी मग तोलून मापून टाकला असता...प्रत्येक छोट्यामोठ्या कृतीत देखिल त्याची खुषी सांभाळण्याचं तंत्र पाळलं असतं...पण मी पडले एकतर वयानं फार कोवळी, अन् मनानं सरळश्चोपट; मला एवढी समज कुठून असायला ? माझी बडबड अखंड चालू असायची—माझ्या जीवनाबद्दलच्या कल्पना, प्लेटोचं 'रिपब्लिक', कार्ल मार्क्स, एकंदरीत सबंध जगाच्याच सुधारणेबद्दलचे माझे विचार, सारं काही त्यात यायचं...मी कसला उत्पात घडवण्याच्या बेतात आहे याची पुसटशी देखील कल्पना मला नव्हती ! इकडे ज्यानं माझ्या धैर्यावर आणि उदार स्वभावावर भाळून माझ्यावर प्रेम असल्याची ग्वाही मला दिली, तो हा गृहस्थ जास्त-जास्त अस्वस्थ व्हायला लागला—कसली ज्वलज्जहाल क्रांतिकारक विचारांची स्त्री आपण आपल्या नौकेवर ठेवून घेतली आहे, याची जाणिव त्याला आता कुठे होत होती ! माझ्या आदर्श कल्पना नि विचार यांच्याशी त्याच्या मनःशान्तीचा मेळ कधीच बसणार नाही, हेही मग हळूहळू त्याच्या लक्षात आलं...पण जेव्हा, एक दिवस संध्याकाळी, त्यानं मला माझ्या सर्वांत आवडत्या कवितेचं नाव विचारलं, तेव्हा मात्र सर्वांत कळस झाला ! मी आनंदानं आपलं नेहमीचं बिछान्या-जवळचं लाडकं पुस्तक घेऊन आले, वॉल्ट व्हिटमनचं—अन् त्याची 'सॉंग ऑफ दि ओपन रोड' ही कविता लोएनग्रीनला वाचून दाखवली. माझ्या त्या उत्साहाच्या भरात ह्या वाचनाचा माझ्या श्रोत्यावर काय परिणाम होतो आहे, याकडे माझं लक्षच नव्हतं...शेवटी मी जेव्हा वर पाहिलं, तेव्हा त्याचा तो सुरेख चेहरा रागानं अगदी कोंदल्यासारखा झालेला...! मी इतकी चकित झाले म्हणता !

"एकदम रद्दी ! फालतू ! आपलं पोट भरणं देखिल जमलं नसणार या माणसाला...!"

"एवढं कसं कळत नाही तुला ? स्वतंत्र अमेरिकेचं स्वप्न पहात होता हा द्रष्टा कवी !"

"खड्डयात जाऊ दे ते स्वप्न !"

एकाएकी माझ्या डोक्यात प्रकाश पडला. बरोबर ! लोएनग्रिनचं स्वतःचं स्वप्न—म्हणजे त्याच्या संपत्तीची गंगोत्रीच म्हणावी, अशी डझनावारी फॅक्टरीज आणि कारखान्यांनी धुरकटलेली अमेरिका !...पण स्त्रीचा स्वभाव किती अतर्क्य, विकृत नि विचित्र असतो पाहा ! आताच्या नि अशा अनेक भांडणांनंतर नि वादावादी-नंतरही मी मला त्याच्या बाहुपाशात झोकून देत असे. सारं काही विसरून... त्याच्या त्या आंजरण्यागोंजारणाऱ्या पाशवी स्पर्शाच्या मोहात गुरफटून...! शिवाय माझी मीच समजूत घालून घेत होते एका विचारानं : त्याचे डोळे

लवकरच एक दिवस उबडतील...त्याला एक नवी दृष्टी लाभेल...आणि मग सामान्य लोकांच्या मुलांबाळांसाठी काढायच्या एका महान् नृत्यशाळेचं माझं स्वप्न आकारायला तो मला हातभार लावेल...

...दरम्यान ती सुंदर यॉट निळ्या निळ्या भूमध्यसमुद्रातून विहार करत चाललीच होती...

...सारं काही कालच घडलं असावं तसं उभं आहे अजून डोळ्यांसमोर... यॉटचा तो रुंद डेक, चांदीच्या नि पैलूदार काचेच्या उपकरणांनी लावलेलं दुपारच्या जेवणाचं टेबल...पांढऱ्या कुडत्यात इकडेतिकडे नाचणारी डेईर्द्र!...मी प्रेमात पडले होते, तशी सुखीही होते...हे सारं खरंच...तरी पण त्या सुखात देखील काही तरी अस्वस्थ बोच होती जिवाला...मनात यायचं, इंजिनाच्या तिथल्या त्या आगभट्टीला एकसारखा कोळशाचा घास भरवणारे ते कामकरी, बोटीवरचे पन्नास खलाशी, कॅप्टन आणि त्याचा सहकारी...ह्या सर्वांवरचा कल्पनातीत खर्च कशा-साठी? तर केवळ दोन जिवांच्या ऐषआरामाखातर! माझ्या कामाकडे दुर्लक्ष करून प्रत्येक मोलाचा दिवस व्यर्थ घालवण्याचा हा उपक्रम माझ्या अंतर्मनातली हुरहुर, नकळत दिवसानुदिवस वाढवत होता...यौवनाच्या उंबरठ्यावर नुकती मी उभी होते, तेव्हाची ती कष्टप्रद धडपड...तो कटू संघर्ष...अन् आताचं हे ऐष-आरामी संपन्न जीवन, ह्या अष्टौप्रहर चालणाऱ्या मेजवान्या,—ऐहिक सुखापुढे आपण अविवेकानं पत्करलेली ही शरणागति...मनात तुलना सुरू झाली, की कालच्या आयुष्याचं पारडं खाली जायचं!...पण मग पुन्हा विचार पालटायचा...

...पहाटेची किरणप्रभा झळाळत्या दुपारच्या उष्म्यात अलगद विलीन होत असताना माझ्या तनमनावर त्याच्या होणाऱ्या त्या सुखद परिणामाचं भान मला व्हायचं...माझा लोएन्ग्रीन, माझा 'नाईट ऑफ द ग्रेल'! वाटायचं, त्यानं सुद्धा डेकवर यावं यावेळी माझ्या या भव्य कल्पनेचा माझ्यासह आस्वाद घ्यायला!

...एक दिवस आम्ही पॉम्पेला घालवला...लोएनग्रीनच्या डोक्यात तेवढ्यात ती अद्भुत कल्पना अवतरली...'पेस्तुम'च्या मंदिरात चांदण्या रात्री मला नृत्य करताना त्याला बघायचं होतं...लगेच तो गेला आणि नेपल्सचा एक छोटा स्थानिक वाद्यवृंद ठरवून आला...एवढंच नाही तर त्या मंडळींनी तिथे पुढे जावं अन् आमची वाट पहावी, अशीही व्यवस्था त्यानं करून टाकली; पण कर्म-धर्मसंयोगानं त्याच दिवशी उन्हाळी मोसमातलं एक वादळ झालं अन् पावसानं तर प्रलयच मांडला...यॉट तर त्या अन् दुसऱ्याही दिवशी बंदरात अडकून पडली होती...शेवटी आम्ही पेस्तुमला येऊन पोहोचलो तर वादकांची स्थिती भलतीच केविलवाणी झालेली!...सारेजण चिंब भिजलेले, अन् चोवीस तास आमची वाट पाहत देवळाच्या पायऱ्यांवर बसून ताटकळलेले!

लोएनग्रीननं तावडतोब मद्याच्या डझनावारी बाटल्या आणि 'पेलिकेर' मटण मागवलं...आम्ही ते अरबांच्या पद्धतीप्रमाणे हाताच्या बोटांनीच खाल्लं. त्या उपाशी वादकांनी 'खा खा' खाल्लं, अन् इतकं मद्यपान केलं की त्यामुळे, आणि देवळातल्या ताटकळण्यानं आलेल्या थकव्यामुळे वाद्यं वाजवणं वगैरे त्यांना आता शक्यच नव्हतं...अन् इकडे पावसाची रिमझिमसुद्धा थोडीफार सुरू झालेली होती पुन्हा; तेव्हा मग आम्ही सर्वजण बोटीवरच गेलो – आणि नेपल्सची वाट धरली... वादक लोकांनी मोठा धीर करून आमच्यासाठी डेकवर काही वाजवायचा प्रयत्न केला खरा; पण बोट जशी पाण्यावर हलायलाडुलायला लागली, तसा प्रत्येक चेहरा हिरवा पडत चालला...अन् सारे झोकांड्या खात खात आपापल्या कॅबिन-कडे निघाले...

पेस्तुमच्या मंदिरात चांदण्या रात्री नृत्य करण्याच्या त्या रोमांचकारी कल्पनेचा शेवट हा असा झाला !

भूमध्यसमुद्रातला तो जलविहार तसाच आणखी चालू ठेवायची लोएनग्रीनची इच्छा होती; पण रशियातल्या माझ्या व्यवस्थापकाबरोबर केलेल्या कराराची मला आठवण झाली; अन् मग त्याच्या सगळ्या विनवण्याविनंत्यांना न जुमानता मी माझा करार पुरा करायचा निश्चय केला...खरं म्हणजे मनातल्या मनात मलाही त्याला सोडून जायला अवघड वाटत होतं ! लोएनग्रीननं मला परत पॅरिसला आणून पोहोचवलं. तो रशियाला देखिल आला असता माझ्याबरोबर – पासपोर्ट वगैरेची अडचण येण्याची त्याला भीती वाटली...माझा डबा त्यानं फुलांनी सजवून भरून टाकला होता...अखेर ती वेळ आली अन् मोठ्या हळुवारपणानं आम्ही एकमेकांचा निरोप घेतला.

...आपल्या प्रेमाच्या माणसापासून आपण दूर जात असतो...जिवाला दुःखाच्या भयंकर कळा एखादवेळी लागलेल्या असतात...आणि तरीसुद्धा मनात कुठे तरी सुटकेचा एक अनाकलनीय भावही तरळत असतो...ही वस्तुस्थिती किती विचित्र आहे नाही ?

रशियाचा हा दौरा इतर सर्व दौऱ्यांसारखाच यशस्वी ठरला. एका प्रसंगाची आठवण मात्र ह्या दौऱ्यावर आपला छाप ठेवून गेली...खरं तर ही शोकांतिकाच व्हायची पण अखेर विनोदी घटना ठरली...एक दिवस क्रेग सरळ आत आला मला भेटायला – अन् क्षणभर मला वाटून गेलं की काही खरं नाही...क्रेगला पुन्हा पाहण्याच्या या आनंदाखेरीज इतर काहीच काही खरं नाही...माझी शाळा नाही...लोएनग्रीनसुद्धा नाही ! अन् माझ्या मनातली हीच भावना विश्वासार्ह धरण्याच्या बेतात होते मी...पण... एकनिष्ठा हा माझ्या स्वभावातला एक प्रबळ पैलू आहे !

क्रेग फारच खुबीत होता...स्टॅनिस्लॅव्हस्कीच्या आर्ट थिएटरमध्ये 'हॅम्लेट'चं कलादिग्दर्शन करण्याची जबाबदारी त्याच्यावर होती ना ! स्टॅनिस्लॅव्हस्की संचातल्या बहुतेक साऱ्या नट्या त्याच्या प्रेमात पडल्या होत्या अन् नटसुद्धा त्याच्या देखणेपणावर, मनमिळाऊ स्वभावावर आणि कमालीच्या उत्साही व्यक्तिमत्त्वावर प्रसन्न होते. तास न् तास त्यांच्यासमोर तो नाट्यकलेवरची प्रवचनं ठोकायचा; तेही सारेजण त्याच्या त्या अलौकिक कल्पना...अन् स्वप्नरंजन समजून घ्यायचा प्रयत्न करायचे.

दुसऱ्याच दिवशी मी 'कीयेव्ह'ला जाणारी गाडी पकडली....अन् काही दिवसांनी आम्ही पॅरिसला परतलो सुद्धा...एल्. तिथे भेटायला आला होता.

'प्लास दे वोझ' मध्ये त्याचं एक उदासवाणं, जरासं चमत्कारिक अपार्टमेंट होतं. तो मला तिथे घेऊन गेला. तिथल्या त्या 'चौदावा लुई' छाप पलंगावर मला कुरवाळण्यानं अन् कुसकरण्यानं त्यानं माझा जीव घुसमटून टाकला खरोखर! या क्षणी प्रथमच, शरीरातली नस न् नस, अन् संवेदना, याचं स्वरूप बदलून कोणत्या थराला पोहोचू शकतं, त्याचं भान मला झालं ! मला वाटलं की मी पुन्हा नव्यानंच जन्माला येत आहे...नव्या चेतनेनं, नव्या उर्मीनं मी पाऊल टाकते आहे जगात...ही भावना अगदी अननुभूत होती, अपूर्व होती !

झेऊससारखा तो नवीन नवीन आकार, नवनवी रूपं धारण करत होता... आता खोंडासारखा, तर आता राजहंसासारखा...अन् लगेच त्या सोनेरी प्रपातासारखासुद्धा...अन् मी त्याच्या या प्रेमभरात न्हाऊन कधी लाटांच्या हिंदोळ्यावर झुलत होते...कधी पांढऱ्या शुभ्र पंखांच्या हळुवार स्पर्शसुखानं मोहरत होते...रूपयौवन लुटण्याचा एक अपूर्व ढंग अनुभवत होते...कधी 'सोनेरी ढगा'च्या तेजोवलयात लपेटली जात होते...

याच सुमाराला पॅरिसशहरातली सारी खरोखरी उत्तम प्रतीची 'शाही' रेस्तराँज मला माहिती झाली. तिथे एल्. ला कमालीचा भाव होता. सारेजण धावून, लवून त्याला एखाद्या राजासारखेच वागवायचे. सगळे 'मेत्र दोतेल' (—हॉटेल मॅनेजर) अन् आचारी यांच्यात त्याला खूष करण्यासाठी अहमहमिका चालायची. नवल नाही ...कारण तो देखील राजेरजवाड्यांच्या दिलदारीनंच देणंघेणं करायचा ...याच वेळी मला 'पूले कोकोत्' (झाकणावर पाणी ठेवून वाफेनं शिजवलेली कोंबडी) अन् 'पूले सॅम्प्ल' (नुसती शिजवलेली कोंबडी) त्यातला फरक कळला—'ऑरतोलां', 'ट्रूफल्स्' किंवा 'मश्रूम्स' या पदार्थांचे वेगवेगळे दर कळले.—थोडक्यात म्हणजे माझ्या जिभेखाली, नि टाळूच्या ठायी असलेल्या चवीढवीच्या सुप्त संवेदनांना चांगलीच जाग आली...मदिरांच्या रसायनशास्त्रात देखील माझा चंचूप्रवेश झाला; कुठल्या वर्षातली अन् कोणत्या जातीची मदिरा

सुवास नि स्वाद या दोन्ही दृष्टींनी उत्तम, याची जाण येण्याबरोबर इतरही किती तरी आधी माहीत नसलेल्या गोष्टींचं ज्ञान मला झालं.

...मग आयुष्यात पहिल्यांदाच मी एका अद्ययावत् ड्रेस मेकरच्या दुकानाला भेट दिली...बांध्यातल्या उणिवा भरून काढणारे 'स्टफ्स', रंगवैचित्र्य नि आकार-प्रकार...एवढंच नव्हे तर हॅटस् वगैरेंच्या अटळ प्रलोभनाला मी बळी पडले... मी! एक छोटं पांढरं ट्यूनिक् तेवढं अंगात अडकवणारी मी—हिवाळ्यात लोकरीचं, उन्हाळ्यात साधं लिननचं, एवढंच—ती मी सुंदर सुंदर गाऊन्सच्या ऑर्डर्स द्यायला लागले...नव्हे ते अंगावर घालून मिरवण्याच्या मोहाला बळी पडले! मात्र माझ्याकडे याला एक सबळ समर्थन होतं...हा कपडे बनवणारा कुणी साधा शिंपी नव्हता...तो होता एक प्रतिभाशाली कलावंत...'पॉल प्वारे'—तो एखाद्या स्त्रीला अशी नटवायचा वस्त्रप्रावरणांनी, की जणू ती एक कलानिर्मितीच होती त्याची...सारं खरं असलं, तरी माझ्यापुरता हा बदल म्हणजे पवित्र अशा कलारूपाचं विडंबन करून तिला भ्रष्ट स्वरूपात मांडण्यासारखं होतं!

ह्या सर्व सुखोपभोगांची...चैनीची...प्रतिक्रियाही लवकरच दिसून आली... अन् मग 'न्यूरास्थेनिया' नावाच्या त्या भयंकर रोगाच्या वार्ता करण्यातसुद्धा कधीमधी आमचे दिवस जायला लागले!

.. मला आठवतं—, एक प्रसन्न सकाळ होती. एल्. बरोबर 'ब्वा द् बूलोन्य्' मध्ये मी हिंडत होते...त्याच्या चेहऱ्यावर एक खिन्नतेची झाकप सरली...मन कुठे दूरदूर उडून जावं, तसा तो भाव तरळताना मी पाहिला (पुढे पुढे मी या प्रकाराची धास्तीच घेतली होती!) अन् त्याचं कारण त्याला विचारलं, तर तो म्हणाला,

"कुठेही असलो तरी मृत पेटिकेतला तो माझ्या आईचा मृत चेहराच माझ्या नजरेसमोर येत राहतो...साऱ्याचा शेवट मरणातच आहे, तर मग जगायचं तरी कशाला? काय अर्थ आहे त्यात?"

...अन् त्या क्षणी एक गोष्ट माझ्या ध्यानात आली...संपत्ती किंवा ऐषआराम यांनी मनाचं समाधान कधीच मिळत नसतं...आयुष्यात काहीतरी विशेष करून दाखवणं, ही गोष्ट श्रीमंतांनाच फार कठीण आहे...बंदरात नांगर टाकून उभी असलेली ती यॉट, त्या निळ्या निळ्या समुद्रावर जलविहार करायला खुणावत असतेच!

## २३

तो सबंध उन्हाळा तर आम्ही ब्रिटनीच्या आसपास यॉटवरच घालवला. कधीकधी समुद्र इतका खवळायचा, की मी उतरून किनाऱ्या किनाऱ्यानं मोटरीनं प्रवास करत यॉटबरोबर जायची. एल्. यॉटवरच राहिला होता...त्यालाही बोटीच्या प्रवासाचा त्रास होत नसे, असं काही नाही...उलट एखादवेळी तर तो अगदी हिरवानिळा पडायचा... पण श्रीमंती सुखविलास हे असे असतात!

सप्टेंबरमध्ये मी बेबी आणि तिची नर्स, यांना घेऊन व्हेनिसला गेले. काही आठवडे मग त्यांच्या बरोबर एकटीच होते मी...एक दिवस सेंट मार्कोच्या कॅथिड्रलमध्ये मी गेले, अन् अशीच एकटी बसले होते घुमटावरचे निळे नि सोनेरी रंग न्याहाळत...इतक्यात मला छोट्या मुलाचा एक चेहरा डोळ्या-समोर तरळून गेल्यासारखा भास झाला... तो चेहरा निळ्यानिळ्या विशाल डोळ्यांच्या देवदूताचा होता...सोनेरी जावळाची प्रभावळ होती त्याच्या माथ्याभोवती...

...पुढे लिडोला गेले मी...आणि तिथे देईर्दशी पुळणीवर खेळत काही दिवस मी नुसते स्वतःशी चिंतनात घालवले...सेंट मार्कोच्या त्या चर्चमध्ये मला झालेल्या भासामुळे माझं मन एकीकडे आनंदलं होतं, तर दुसरीकडे हुरहुरत होतं...अस्वस्थ झालं होतं...मी प्रेम केलं – करत होते, सारं खरं; परंतु पुरुष ज्याला 'प्रेम' म्हणतात, त्या भावनेच्या चांचल्याची, अहंकारी अस्थिरतेची काहीशी कल्पना मला आता आली होती...त्यापायी करावा लागणारा हा त्याग...कलेची द्यावी लागणारी आहुती...आहुतीच नाहीतर काय?...माझी कला, माझं कार्य नामशेषच व्हायचा संभव होता की

यात ! ... विचार करता करता एकाएकी माझ्या कलाविश्वातल्या यच्चयावत् गोष्टींच्या आठवणी माझ्या मनात उमाळून आल्या... माझं काम, माझी शाळा ...मन त्यासाठी हुरहुरायला लागलं... अन् माझ्या कलास्वप्नांशी... त्या कल्पनाविश्वांशी तुलना करताना हे मानवी जीवन कसलं जड, पार्थिव वाटायला लागलं !

... मला वाटतं प्रत्येकाच्या आयुष्यात – प्रत्येक ललाटलेखात, आध्यात्मिक प्रगतीची एक रेषा असते ... एक ऊर्ध्वगामी वळण असतं, या वळणाला धरून जे जे काही घडतं, आणि घडताना जे या वळणाला जास्त जास्त समर्थ बनवत जातं, तेच प्रत्येक आयुष्याचं सार असतं ... खरं जीवन असतं ... बाकीचं सारं असतं तण ! तण – नि भुसा, आत्मिक प्रगतीच्या प्रत्येक उभरत्या क्षणासरशी उडून, गळून पडणारा ! ... माझ्या जीवनात माझी कला हीच माझ्या आध्यात्मिक प्रगतीची रेषा आहे. खूण आहे... जगण्याचे दोनच हेतू मी मानले आहेत ... प्रेम अन् कला ! कितीदा तरी प्रेम हे कलेला मारक ठरलं होतं, अन् कितीदा कलेच्या सर्वसमर्थ आज्ञेनं प्रेमाची शोकांतिका झाली होती; कारण या दोघांतून विस्तवदेखील जाऊ शकत नाही ... सदैव युद्धाचाच पवित्रा असतो त्यांचा एकमेकांविरुद्ध !

अशा या अनिश्चित परिस्थितीत आणि विषण्ण मानसिक अवस्थेतच मी मिलनला एका डॉक्टर मित्राला भेटायला गेले. त्याला मी अगोदरच मुद्दाम तिथे बोलावून घेतलं होतं ... माझी समस्या मी त्याच्यासमोर मांडली ...

"छे छेः ! हा अगदी मूर्खपणा आहे तुझा ... अविचार आहे शुद्ध !" तो उद्गारला : "तू एक असाधारण कलाकार आहेस; जिथे तुझ्या कलेला जगानं कायमचं मुकण्याचा संभव आहे; अशा साहसात तू उडी घेताच कामा नये ... अशक्य ... अशक्य गोष्ट आहे ही ... कृपा करून माझा सल्ला ध्यानात घे आणि मानवतेचा अपराध करू नकोस !"

माझ्या मनाचा अजूनही काही निश्चय होत नव्हता ... मी तशीच हुरहुरलेली ... संभ्रमित अवस्थेतच त्याचं बोलणं मी ऐकून घेत होते ... एका क्षणी शरीराला पुन्हा येणारा बेडौलपणा आठवून मन बंड करून उठत होतं ... अन् 'शरीर' हेच तर माझ्या कलाविष्काराचं साधन होतं, वाहन होतं ! ... दुसऱ्या क्षणी ती साद, ती आशा ... स्वप्नावस्थेत तरळलेला तो देवदूताचा चेहरा ... माझ्या मुलाचा चेहरा ... यांनी मी व्याकुळ होत होते ...

शेवटी स्वतःशी पक्का विचार करण्यासाठी मी माझ्या मित्राकडून एक तासाचा वेळ मागून घेतला ... निवांत, एकटी बसले ... मला हॉटेलमधली ती बेडरूम आठवते...जरा उदासवाणी खोली...एवढ्यात समोर मला एक चित्र दिसतं ...

कधीच पाहिली नसल्यानं तो खूपच उत्साहात होता. त्याच्या अमेरिकन रक्ताची त्याला आठवण झाली होती ना! त्यानं अर्थात् बोटीवरचा सर्वांत मोठा 'स्वीट' घेतला होता. दररोज आमच्याकरता रात्री मुद्दाम छापून घेतलेला 'मेन्यू' समोर यायचा... असल्या राजेशाही थाटात आमचा प्रवास चालला होता... एकंदरीत पाहिलं, तर एखाद्या लक्षाधीशाची सोबत असली, की साऱ्या गोष्टी किती सोप्या होऊन जातात! प्लाझामध्ये सुद्धा आम्हाला इतकं भव्य नि अप्रतिम अपार्टमेंट मिळालं होतं... शिवाय जो तो डाव्या उजव्या बाजूनं झुकून वाकून सलाम ठोकत होता, ती गोष्ट वेगळीच!

मला वाटतं 'यू. एस. ए.'त एक कायदा म्हणा, संकेत म्हणा किंवा रूढी म्हणा हवं तर, आहे... प्रेमिकांना त्यामुळे एकत्र प्रवास करता येत नाही... गरीब बिचाऱ्या गॉर्कीची गोष्ट घ्या... सतरा वर्षांचा काळ बरोबर काढलेली त्याची प्रेयसी अन् तो – या दोघांचा घरादारातून पाठपुरावा करून त्यांना जगणं 'नको – पुरे' होईल अशी व्यवस्था करून टाकली होती लोकांनी... पण अर्थातच कुणी अत्यंत श्रीमंत कूळ असलं, तर मग ह्या छोट्या संकेतांचे, अडचणीं-रूढींचे अडसर आपोआपच गळून पडतात!

अमेरिकेचा हा दौरा खूप सुखाचा, यशस्वी आणि लाभदायक ठरला... पैशाकडे पैसा जातो म्हणतात ना?... मात्र एक दिवस एक बाई माझ्या निवासात मला भेटायला आली... तिचा अगदी गोंधळ उडाला होता... बावरूनच गेली होती ती.

"पहिल्या ओळींतून सगळं अगदी... अगदी स्पष्ट दिसतं मिस् डंकन! हा प्रकार असाच चालू ठेवणं बरोबर नाही..."

तिच्या या आक्षेपावर मी उत्तर दिलं, "अरे हो!... पण असं पहा मिसेस 'क्ष', माझ्या नृत्यातून मला तेच दाखवायचंय्... तेच... प्रेम... स्त्रीत्व... जडणघडण, जुळणी-रचना... आणि वसन्तागम! बॉटिचेलीचं 'द फ्रूटफुल अर्थ' (= सुफला धरित्री) हे चित्र माहीत आहे ना?... त्या तीन गर्भवती नृत्यललिता... 'ग्रास ॲसेऑंत'... ती कुमारीमाता... मॅडोना... अन् नवचैतन्याचा गर्भ वाढविणारे झेफिरस् सुद्धा... सारं काही सळसळतंय्... लहरतंय्... नव्या जीवनाची कानगोष्ट करतंय्, हे दिसत नाही का तुम्हाला? ... माझ्या नृत्याचा अर्थसुद्धा हाच आहे, हेच सांगायचंय् मला नृत्यातून..."

'क्ष' बाईचा चेहरा चमत्कारिकच झाला... पण थोडा विचार केल्यावर आम्हीही अशा निर्णयाला आलो, की हा दौरा आता स्थगित करून युरोपला परत जावं हेच बरं; कारण माझी गरोदर अवस्था आता अगदी उघडच होती... जाहीरच होत होती... आनंदाची गोष्ट म्हणजे ऑगस्टिन अन् त्याची

मुलगी हेही दोघं आमच्याबरोबर परतले...तो आपल्या बायकोपासून आधीच वेगळा झाला होता, तेव्हा मलाही वाटलं की त्याचं मन रमायला ह्या सफरीचं छान कारण जुळून आलं...

* * *

"तुला पुरा हिवाळा 'दाहाबीया' नौकेवरच राहून नाईल नदीत विहार करायची कल्पना कशी वाटते? राखी रंगाच्या उदास रुसक्या आकाशातून निसटून झळाळत्या सूर्यप्रकाशाच्या प्रसन्न प्रदेशात जायला आवडेल तुला? 'थीब्ज', 'डेन्डेरा' पहायची किती दिवसांची तुझी इच्छा पुरी होईल! अलेक्झांड्रियापर्यंत तर आपण यॉटमधूनच जाऊ शकू; पुढे मग तैनातीत तीस तद्देशीय खलाशी आणि उत्तम स्वयंपाकी घेऊन 'दाहाबीया'वर तळ ठोकायचा...मोठ्या मोठ्या कॅबिन्स असतात चांगल्या...झोपायच्या खोल्यांना जोडून न्हाणीघरं वगैरे सर्व सोयी असतात..."

"पण माझी शाळा? माझं काम – त्याचं काय?"

तुझी बहीण एलिझबेथ तर तुझ्या शाळेची चांगलीच काळजी घेते...अन् तुझं वय अजून इतकं कोवळं आहे, की काम करायला तुला वेळ कमी नाही पडणार पुढे...

...शेवटी आम्ही नाईल नदीच्या प्रवाहातून विहार करण्यात हिवाळा घालवला...हा काळ न्यूरास्थेनियाचं एक गालबोट सोडलं, तर एखाद्या सुख-स्वप्नासारखाच गेला...न्यूरास्थेनियाचा हा राक्षस अधूनमधून मानगुटीवर बसायचाच मात्र... अन् सूर्याला काळंकुट्ट ग्रहण लागावं, तसं व्हायचं तेवढ्या-पुरतं...

...नाईलच्या प्रवाहातून दाहाबीया पुढे पुढे जात असते, तसतसा आपला आत्मा मात्र हजार, दोन हजार, पाच हजार वर्षं मागे जायला लागतो... भूत-काळाच्या धुक्यातून अगदी अनन्ताच्या अनादी द्वारापर्यंत!

हा जलविहार मला किती प्रशान्त, किती सुंदर वाटत होता म्हणून सांगू! ... विशेषतः एका नव्या जीवनाची चाहूल माझ्या उदरात मी बागवत असताना सारं कसं निवान्त नि रम्य वाटत होतं...वाळवंटाच्या सोनेरी वाळूतून डोकावणारी पुरातन ईजिप्तच्या राजांच्या कथा सांगणारी ती मंदिरं... फॅरोजच्या थडग्यातल्या अतिगहन रहस्यात पाय रोवून बसलेली मंदिरं... अंधकार नि मृत्यूच्या त्या भूमीच्या रोखानं चाललेल्या आमच्या प्रवासाची अंधुक जाणीव माझ्या पोटातल्या छोट्या जीवालासुद्धा झालेली होती की काय, नकळे!...एका चांदण्या रात्री, डेन्डेराच्या मंदिरात तर मला एक विचित्रच भास झाला... जागोजाग 'हाथोर' देवतेचे छिन्नभिन्न चेहरे दिसत होते...'हाथोर'

म्हणजे ॲफ्रडाईटचा इजिप्शियन अवतारच म्हणायचा ... तर काय सांगत होते, मोहिनीविद्येचं तंत्र वापरावं, तसे हारीनं नजर रोखून पाहणारे तिथल्या अनेक हाथोर – प्रतिमांचे डोळे जणू माझ्या पोटातल्या अजात बाळावरच खिळून राहिलेत, असं वाटलं मला !

मृतांची दरी तर विशेषच अद्‌भुत वाटली ... त्यातसुद्धा सर्वांत जास्त लक्ष वेधून घेतलं माझं, ते त्या छोट्या राजकुमाराच्या थडग्यानं – बिचाऱ्याला एखादा थोर फॅरो किंवा राजा होण्याइतकं आयुष्यच लाभलं नाही ... इतक्या कोवळ्या वयात मृत्यू पावलेला ... शतकानुशतकांच्या ऐतिहासिक काळात 'एक मृतबालक' एवढीच त्याची नोंद उरलेली ... मनात विचार येतो, थोडीथोडकी नाहीत, सहा हजार वर्षं हा इथे असा पडून आहे ... जिवंत असता, तर सहा हजार वर्षांचा म्हातारा असता !

त्या ईजिप्तच्या सफरीतलं सांगू मला काय आठवतं ? तो जांभळा सूर्योदय, तो गडद जास्वंदी सूर्यास्त, वाळवंटातल्या वाळूचं ते सोनेरी वैभव ... ती मंदिरं ... तिथल्या सभामंडपात फॅरोजच्या जीवनाचा स्वप्नपट उलगडायचा प्रयत्न करत, होऊ घातलेल्या बाळाची स्वप्नं पहात वेचलेले प्रसन्न उन्हाचे दिवस ... आपल्या सुडौल माथ्यावर अवधान राखून तोललेल्या फुलदाण्या सावरत नाईलच्या तीरावरून जाणाऱ्या त्या शेतकरी बायका ... अन् गडद वस्त्रप्रावरणात लपेटलेल्या त्यांच्या समृद्ध देहांची ती झुलतीझुकती चाल ! ... डेकवर नाचणारी बागडणारी देईद्रेची शेलाटी आकृती ... अन् थीब्जच्या पुरातन रस्त्यातून हिंडणारी, पिचल्या-खचल्या जुन्यापुराण्या देवमूर्ती न्याहाळणारी चिमुकली देईद्रे ...

स्फिंक्स पाहून ती म्हणाली, "ममा, ही बाहुली एवढी काही छान नाही, पण रुबाबदार आहे, नाही ग ?"

देईद्रेला आता कुठे तीन शब्दांची ओळख होत होती !

... 'इटर्निटी' (शाश्वती)च्या मंदिरासमोरचं ते लहान मूल ... फॅरोच्या थडग्यातला तो छोटा राजकुमार ... 'द व्हॅली ऑफ द किंग्ज' ('शाही' दरी) ... वाळवंटातून प्रवास करणारे ते काफिले ... वाळूच्या लाटा उठवणारं वाळवंटातलं वारं ... हे सारे कुठे निवाले होते ? कोणत्या दिशेनं ?

... इजिप्तमध्ये अगदी पहाटे चारलाच सूर्योदय व्हायचा ... एवढंच नाही, तर उगवतानाच सूर्याला असं अलौकिक तेज चढलेलं असायचं, की मग पुढे झोप लागणं अशक्यच व्हायचं ... शिवाय नाईलचं पाणी उपसणाऱ्या मोटांची केविलवाणी 'कुईकुई' एकसारखी एका लयीत ऐकायला यायला लागायची तेव्हापासून ... किनाऱ्यावर इतर कामकऱ्यांची वर्दळही सुरू व्हायची लगेच ... कुणी पाणी भरताहेत, कुणी शेतं नांगराताहेत, तर कुणी उंट हाकताहेत ... हे

असं सूर्यास्तापर्यंत चालायचं... हालत्याचालत्या जिवन्त चित्रांचा एक पट डोळ्यांपुढून सरकत असावा, तसं...

वल्ह्यांच्या वरखाली होण्याबरोबर खलाशांची ती ब्राँझ धातूची घडवल्यासारखी शरीरंही हेलकावायची... पुढेमागे व्हायची... त्या लयीला सूर फुटायचा त्यांच्या गाण्यांतून... अन् त्या गाण्यानं धुंदावून दाहाबीया डुलत डुलत आपली वाट काढायची... आम्ही स्वस्थ बसून सारं दृश्य न्याहाळत दुरून साऱ्याची मजा चाखत असू...

रात्री तर फारच रम्य असायच्या... आमच्याबरोबर एक 'स्ताईनवे' पियानो होता, अन् एक अत्यंत गुणी इंग्लिश कलाकार... तरुण... तो रोज रात्री बाख् अन बीथोव्हन याचं संगीत आमच्यासाठी वाजवायचा... या दोन्ही संगीतज्ञांच्या त्या गंभीर रचनांचा इजिप्तच्या परिसराशी नि मंदिरादेवळातल्या वातावरणाशी इतका अपरूप मेळ जुळायचा!

पुढे काही आठवड्यांनंतर आम्ही 'वादी हाफा'ला पोहोचून, तिथून 'न्यूबियांत शिरलो ... तिथे नाईल इतकी अरुंद होते, की दोन्ही बाजूच्या तीरांना सहज हात लावता येईल, असं वाटतं. आमच्या पार्टीतले पुरुष उतरून इथून पुढे खार्टुमला गेले; मी अन् देईर्द्र मात्र दाहाबीयावरच राहिलो ... ते दोन आठवडे म्हणजे माझ्या आयुष्यातला अगदी सर्वांत शांतनिवांत काळ म्हणायला हवा... तो सुंदर प्रदेश! ... तिथे काळज्या नि अडचणींचा विचार मनात आणणंसुद्धा व्यर्थ होतं... आमची बोट जणू शतकानुशतकांची अनादी लय पकडून झुलतडुलत होती... पैशाच्या दृष्टीनं शक्य असेल, तर एखादी दाहाबीया आधी ठरवून ठेवून नाईलमधून केलेली सफर म्हणजे जगात विश्रांतीची सर्वोत्तम कल्पना ठरायला हरकत नाही!

आम्हाला तर इजिप्त ही एक स्वप्नभूमी वाटते. गरीब कष्टकऱ्यांना ती नुसती 'कर्म'भूमी वाटत असेल कदाचित् ... तसं का असेना ... तरीही, जिथल्या कष्टांनाही सौंदर्याचा स्पर्श झालेला असतो, अशी ही एकच भूमी आहे – इजिप्तची – असंच मी म्हणेन! केवळ डाळींचं सूप अन् आंबवून हलका न केलेला पाव, यावरच मुख्यतः गुजराण करणाऱ्या कामकऱ्यांचं शरीरसुद्धा सुंदर अन् लवचिक असतं इथे ... ते शेतात काम करताना वाकलेलं असो, किंवा नाईलमधून पाण्याचा उपसा करणारं असो – एखाद्या शिल्पकाराच्या हृदयाला आनंद देणाऱ्या ब्राँझ मॉडेलसारखं दिसतं...

* * *

आम्ही फ्रान्सला परतून 'व्हील् फ्रॉश्'ला पोहोचलो, अन् एल्. नं पुऱ्या सीझनसाठी 'बोलियू'ला एक अलिशान बंगला भाड्यानं घेतला... त्याच्या

ओवऱ्या समुद्रापर्यंत उतरत उतरत जात होत्या. मनात येईल ते त्या क्षणी करून मोकळं व्हायच्या त्याच्या नेहमीच्या स्वभावाप्रमाणे एल्. ' का फेरा 'ला थोडी जमीन खरेदी करण्याच्या नादात रमून गेला ... त्याच्या मनात तिथे एक इटालियन धर्तीचा भव्य दुर्ग बांधायचा होता !

मोटरीतून आम्ही मग ' आव्हीन्याँ 'चे मनोरे आणि ' कारकासॉन 'च्या भिंती पहायला गेलो ... एल्. च्या दुर्गासाठी ' नमुने ' म्हणून त्यांचा उपयोग व्हायचा होता ... आता पाहिलंत, तर ' का फेरा 'वर आजही एक दुर्ग उभा आहे ... पण ... एल्. च्या इतर अनेक कल्पनांप्रमाणे तोही आहे ! ... अपुरा ... अधुरा !

या सुमाराला एल्.ला एकतऱ्हेच्या असाधारण अनैसर्गिक अस्वस्थतेनं पछाडलं होतं ... का फेराला जमीन-खरेदीसाठी जायची धावपळ चालू नसेल, तर तो सोमवारी ' रापीद ' ही वेगवान् गाडी पकडून पॅरिसला जायचा – अन् बुधवारी परतायचा ... मी आपली शांतपणे निळ्यानिळ्या समुद्राच्या सान्निध्या-तल्या बागेत आपला काळ कंठत होते ... ' जीवन ' आणि ' कला ' यांना एकमेकांपासून वेगळं काढणाऱ्या त्या विचित्र वैधर्म्याचा विचार माझ्या मनात घोळत असायचा ... अनेकदा मला प्रश्न पडायचा, की स्त्री ही खरोखरीची कलाकार कधीतरी होऊ शकेल का ? कारण ' कला ' ही कर्मकर्कश वृत्तीची ... सारं काही मागणारी ... घेणारी ... तर स्त्री ही प्रेमवश असली की सारसर्वस्व जीवनाला अर्पण करणारी ! ... जीवनावरून जीव ओवाळून टाकणारी ! ... असो ... माझ्या कलेपासून दुरावून ... काहीही करता न येण्यासारख्या अवस्थेला मी ही दुसऱ्यांदा अशी येऊन पोहोचले होते खरी ! ...

... मग एका सकाळीच, निळ्या समुद्राच्या, नि पेटत्या सूर्याच्या साक्षीनं माझ्या बाळाचा ... माझ्या मुलाचा जन्म झाला ... सारा निसर्गच आनंदानं मोहरला होता ... तुरे, फुलोरे फुटले होते ... मे महिन्याची पहिली तारीख उजाडली होती !

या वेळचे डॉ. बॉसन हुशार होते – नॉर्डविकच्या खेडवळ डॉक्टरसारखे मूर्ख नव्हे ... योग्य प्रमाणात मॉर्फियाचा उपयोग करून गर्भवतीची वेदनांपासून सुटका करण्याच्या तंत्राची त्यांना माहिती होती; त्यामुळे हा दुसरा अनुभव पहिल्या-पेक्षा अगदीच वेगळा ठरला.

देईर्द्र माझ्या खोलीत आली ... तिच्या त्या गोड चेहऱ्यावर उमटलेलं, वयाला न शोभणारं मातृत्व काहीसं गमतीशीर नि आगंतुक होतं ...

" छोटा छोटा ग बाई बाळ माझा ... आई, तू याची कधी काळजी करू नको हं ... मी त्याला नेहमी अस्सा मिठीत घेईन अन् त्याची सगळी काही

काळजी वाहीन ..."

...त्या आखडलेल्या छोट्या छोट्या गोऱ्या बाहूत मृतावस्थेतही तिनं त्याला कवळून धरलेलं मी पाहिलं, तेव्हा तिचे ते शब्द पुन्हा एकदा माझ्या कानात जसेच्या तसे घुमले ! काही झालं की लोक देवाला का मदतीसाठी हाक घालत असतात, कोण जाणे ... तो देव कुठे कोण अस्तित्वात असलाच तरी त्याला इकडे काय घडत असतं याची कुठे आहे पर्वा, दखल ?

...तर पुन्हा एकदा एक बाळ ओटीत घेऊन मी समुद्राच्या सान्निध्यात आले होते ... फरक इतकाच की तो वाऱ्यात हिंदकळणारा चिमुकला, पांढरा शुभ्र व्हिला मारिया नव्हता इथे ... इथे होता एक अस्वस्थ राजेशाही इमला ... अन् तिथल्या उदास मागुसवाण्या उत्तर समुद्राची जागा या निळ्यानिळ्या भूमध्य समुद्रानं घेतली होती ...

# २४

मी पॅरिसला परतले – एल्. नं मला विचारलं, "तुझ्या सगळ्या मित्र-मंडळींसाठी तुला एखादी मोठी पार्टी नाही का द्यायची ... साग्रसंगीत ... ? तुझ्या मनात असेल, तर तू त्याचा विचार कर ... मी त्यासाठी हवं तर 'ब्लँक चेक 'ही द्यायला तयार आहे तुला ..."

मला वाटतं श्रीमंत लोकांच्याकडे मौजमजेचा, पार्टीचा कार्यक्रम कसा घडवून आणावा, याबद्दलचं कल्पनादारिद्र्य जन्मतःच असतं ... साधं जेवण द्यायचं म्हटलं तरी एखादा गरीब दरवान वगैरे करेल, त्या समारंभाहून विशेष वेगळं काही तुम्हाला दिसणार नाही ... अन् मला तर नेहमीच वाटायचं, की खरोखर पैसा जर पुरेसा हाताशी असेल, तर किती सुंदर तऱ्हेनं असा एखाद्या पार्टीचा जल्लोष करता येईल ... आता आयती संधी मिळाल्यावर मी कसं कसं सारं केलं ते सांगते ...

सर्व निमंत्रितांना व्हर्सायला दुपारी ४ वाजता बोलावलं होतं; अन् तिथल्या उद्यानात उभारलेल्या तंबूतून तऱ्हतऱ्हेच्या खाद्यपदार्थांची नि पेयांची व्यवस्था केली होती – अगदी 'काव्हिआर ' आणि 'शॅम्पेनं'पासून चहा नि केकसपर्यंत ! त्यानंतर एका मोकळ्या जागेत उभारलेल्या शामियान्यात कोलोन ऑर्केस्ट्रानं पिअर्नेच्या निर्देशनाखाली रिचर्ड वाग्नरचं संगीत सादर करण्याचा कार्यक्रम झाला. त्या रम्य उन्हाळी दुपारी, तिथल्या मोठमोठ्या वृक्षांच्या छायेत 'झीगफ्रीड इडिल् 'चं वादन किती सुंदर वाटत होतं ... नि सूर्य मावळताना घुमलेले 'झीगफ्रीड फ्युनरल मार्च 'चे तरळते सूर किती उदासगंभीर भासले होते ... अजूनही सगळं आठवतं !

संगीताच्या या मैफलीनंतर सुखाची व्यावहारिक पातळीवरची सोय लावण्यासाठी, एका विशेष, भव्य प्रमाणावरच्या मेजवानीचा थाट रचला होता! ही वेगवेगळ्या, वैचित्र्यपूर्ण रुचिदार पदार्थांनी खच्चून झालेली मेजवानी तशीच मध्यरात्रीपर्यंत चालली होती ... ती संपेतो दिव्यांची आरासच मांडल्यानं सारा परिसर झगमगायला लागला होता ... अन् व्हिएन्नाच्या ऑर्केस्ट्राच्या साथीवर निमंत्रितांच्या नृत्याला सुरुवात झाली होती ... असा सारा जल्लोश पहाटेपर्यंत चालला होता ...

एखाद्या धनिक माणसाला आपल्या मित्रमंडळींचं आतिथ्य आणि मनोरंजन करण्यावर पैसा खर्चायचाच असेल, तर त्यानं तो कशा तऱ्हेनं खर्च करावा या संबंधातली माझी कल्पना ही अशी होती ... या माझ्या समारंभाला पॅरिसचा सारा प्रतिष्ठित समाज आणि एकजात सारे कलावंत हजर होते ... साऱ्यांना तो कार्यक्रम खरोखर खूप आवडल्याचं दिसलं ...

मात्र या सर्वांतली विचित्र वस्तुस्थिती अशी, की ही सारी धडपड एल्. ला खूष करण्यासाठीच मी केली असताना, अन् एल्. चा त्यासाठी पन्नास हजार फ्रँक्स एवढा (तेही युद्धाच्या आधीचे फ्रँक्स!) खर्च झालेला असताना, तो स्वतःच या समारंभाला हजर नव्हता!

त्या समारंभाच्या साधारण एक तास आधी मला एक तार आली होती: एल्. ला म्हणे 'स्ट्रोक' आला होता ... अर्थातच त्या परिस्थितीत तो येऊ शकत नव्हताच ... मात्र मी त्याच्याशिवायच निमंत्रितांची सगळी व्यवस्था ठेवायची होती!

... मला कम्युनिस्ट व्हावसं वाटलं यामुळे, तर काही नवल आहे का? वेगवेगळ्या अनेक उदाहरणांनी मी एका ठाम निष्कर्षाला आले होते. श्रीमंत मनुष्याला सुखाचा शोध लागणं म्हणजे सिसिफसनं त्याचा पत्थर थेट नरकापासून वर ढकलत नेण्यासारखंच होतं!

त्याच उन्हाळ्यात एल्. च्या मनानं घेतलं, की आमचं लग्न झालं पाहिजे ... मी लग्न करण्याच्या विरुद्ध असल्यामुळे त्याला नकार दिला, तरी त्याचा हट्ट कायमच होता ...

"एखाद्या कलावतीनं विवाहाच्या बंधनात पडणं हा केवळ मूर्खपणाच आहे .. " मी म्हटलं; "शिवाय माझं आयुष्य जगभरचे दौरे करण्यात जायचं, हे ठरलेलंच आहे ... मग तू काय जन्मभर स्टेजच्या बॉक्समध्ये बसून माझं कौतुक करत रहाणार आहेस?"

"आपलं लग्न झाल्यावर मुळी तुला दौरे करत रहाण्याची जरूरीच उरणार नाही ..."

" मग काय करायचं तरी काय आपण ? "

" लंडनमधल्या माझ्या बंगल्यात किंवा हवं तर खेड्यातल्या माझ्या इस्टेटीवर निवांत राहायचं... "

" अन् त्यानंतर पुढे ? "

" यॉट आहेच की आपली... "

" पण त्यानंतर मग ? "

एल्. चं म्हणणं, निदान तीन महिन्यापुरता हा प्रयोग करून पाहावा...

" तुला ते आयुष्य...तो जीवनक्रम आवडला नाही, तर मात्र आश्चर्यच वाटेल मला ! "

...तेव्हा त्या उन्हाळ्यात आम्ही डेव्हनशायरला गेलो...एल्. नं इथं एक शॅटो (= किल्ला) बांधला होता. ' व्हर्साय ' अन् ' पर्ती त्रिआनां ' चं किल्ले बांधल्यानंतरची हीच त्या धर्तीची एक भारदस्त वास्तू म्हणावी लागेल...अनेक शय्यागृहं...अनेक स्नानगृहं...आणि अनंत ' स्वीटस् ' जोड दालनं वगैरे... हे सारं काही खास माझ्यासाठी ! याशिवाय गराजमध्ये चौदा मोटारी अन् बंदरात एक यॉट— विहारनौका !...सारं तसं छानच होतं, पण इथल्या पावसाची मात्र मला बिलकूल कल्पना नव्हती !...इंग्लंडमधल्या उन्हाळ्यात दिवसभर पाऊस पडतो ! इंग्लिश लोकांना त्याचं काही वाटतही नाही म्हणा... ते आपले नेहमीप्रमाणे उठतात;...जरा लवकरच सकाळी बेकन, हॅम, किडनी अन् पॉरिज ( खारवलेलं डुकराचं मांस, कलेजी अन् ओटस्‌ची खीर ) यांचा नाश्ता करतात; अन् मग रेनकोट चढवून बाहेर पडतात...दुपारच्या जेवणा-पर्यंतचा वेळ त्या ओल्या उष्णतेत काढावा लागतो बाहेर...पण तो काय जातो सहज...मग जेवण...खूप पदार्थांचं — कोर्सेसचं...अन् शेवटी डेव्हनशायरची प्रसिद्ध क्रीम !

जेवणानंतर संध्याकाळी पाच वाजेपर्यंतचा वेळ पत्रव्यवहार करण्यात जायचा... पण मला अशी शंका आहे, की त्या वेळी त्यांची ' वाम — दक्षिण कुशी ' चालत असावी ! पाच वाजता चहासाठी खाली येणं !...' चहा ' म्हणजे नुसता चहा नाही — तऱ्हेतऱ्हेचा केक्स्, पाव, लोणी ...मुरंबे, आणि चहा ! त्यानंतर ब्रिजचा डाव टाकण्याचा नुसता आव आणायचा...ते कुठपर्यंत ? दिवसातल्या सर्वांत महत्त्वाच्या कामाची, — रात्रीच्या जेवणापूर्वीचा जामानिमा करायला जाण्याची वेळ येईपर्यंत ! या जेवणाला पुरा संध्याकाळचा टिपटॉप ड्रेस असतो... स्त्रिया चांगल्याच उघड्या रुंद नि खोल गळ्यांच्या ड्रेसेस्‌मध्ये अन् पुरुष कडक इस्त्रीच्या शर्टस्‌मध्ये...एवढं सजणंधजणं सगळं वीस कोर्सेसच्या जेवणाच्या फडशा पाडण्यासाठी !...हे सारं झालं, म्हणजे मग मुखशुद्धीसाठी एखादा

हलकाफुलका राजकीय प्रश्न चवळायचा सर्वांनी मिळून... किंवा तत्त्वज्ञानाच्या 'गोष्टी' करायच्या...तोपर्यंत झोपेची वेळ येतेच!

...असा हा जीवनक्रम मला पसंत पडला असेल की नसेल, हे तुम्हीसुद्धा सांगू शकाल! काही आठवड्यांच्या अवधीतच मी कमालीची बेचैन होऊन गेले अगदी... त्या शॅटोमध्ये एक सुंदर बॉलरूम... नृत्यदालन होतं... जुनी 'गोबेलिन'ची पडदे वगैरेंची सजावट... अन् तसंच डेव्हिडचं नेपोलियनच्या राज्याभिषेकाचं एक चित्र ... डेव्हिडनं म्हणे अशी दोन चित्रं रंगवली होती... त्यांपैकी एक 'लूव्हर'मध्ये अन् दुसरं एल्. च्या डेव्हनशायर-शॅटोमध्ये आहे...

माझी वाढती विपण्णता पाहून एल्. म्हणाला, "तू नाचायला सुरुवात का करत नाहीस, इथल्या नृत्यदालनात?"

मला त्या गोबेलिन सजावटीची अन् डेव्हिडच्या चित्राची आठवण झाली...

ह्या वातावरणात, ह्या चित्रासमोर आणि चिकट-तेलकट मेणवलेल्या जमिनीवर मी कशी काय माझं साधंसुधं प्राकृतिक नृत्य करणार?

"एवढीच अडचण असेल, तर तुझी ती सतरंजी—गालिचा आणि तुझे पडदे मागवून घे तू."

...तेव्हा मग माझे पडदे आणवून त्या पूर्वीच्या सजावटीवर ते लावले, अन् त्या मेणचट जमिनीवर माझी सतरंजी पसरली...

"एक पियानोवादक पण हवा आता..."

"तोही घे की बोलावून"... एल्. उत्तरला ...

मग मी कोलोनला एक अशा अर्थाची तार पाठवली: 'उन्हाळा इंग्लंडमध्ये घालवत आहे... रियाज़ तर करायला हवा ... पियानोवादक पाठवा.'

कोलोनच्या ऑर्केस्ट्रामध्ये एक पहिला व्हायोलिनवादक (=फर्स्ट व्हायोलिनिस्ट) होता... दिसायला अगदीच विचित्र...कशाशाच घडलेल्या देहावर डुलणारं भलं मोठं डोकं! हा गृहस्थ पियानोही वाजवायचा. कोलोननंच त्याला माझ्याकडे आणला होता...पण त्याचं माझ्याशी बिलकुल जमायचं नाही... इतकं की त्याला पाहताक्षणी, किंवा त्याच्या हाताला चुकून जरी स्पर्श झाला, तरी मला खरोखर भयंकर किळसच वाटायची...तिटकारा यायचा... म्हणून मी कोलोनला बजावून ठेवलं होतं—मला भेटायला त्याला कधीकध्धी आणू नको म्हणून;—कोलोनचं म्हणणं,—त्या गृहस्थाला माझ्याविषयी भलतंच कौतुक-आदर होता ... पण मी सरळ सांगून टाकलं की, माझा नाइलाज होता... त्या तिटकाऱ्याच्या पुढे माझी मीच हतबल होते...त्याचं सान्निध्य मला सहन होण्यासारखं नव्हतं मुळींच...पूर्वी एकदा कोलोन आजारी पडल्यानं 'गेते

लीरिक् 'मधल्या माझ्या कार्यक्रमाच्या वेळी वाद्यवृंदाचं निर्देशन करू शकला नव्हता, तेव्हा त्यानं स्वतःच्या बदली त्यालाच पाठवलं होतं... मी भयंकर चिडले होते... म्हटलं होतं, " हा जर आज निर्देशन करणार असेल, तर मी नाचूच शकणार नाही ! "

...तो रंगपटातल्या माझ्या खोलीत मला भेटायला आला होता – डोळ्यांत पाणी आणून त्यानं अजीजीनं म्हटलं होतं, " इझाडोरा, तुझ्याबद्दल मला फार आदर आहे, कौतुक आहे...एकदाच, आज एकदाच मला ही संधी दे... "

थंडपणानं मी त्याच्याकडे पाहिलं होतं...

" तुझ्याकडे पाहिलं की मला किळस येते, तिटकारा येतो, हे आज तुला सांगणं भागच आहे मला ! "

हे ऐकताक्षणी त्याला रडूच फुटलं होतं !

प्रेक्षकवर्ग ताटकळला होता...तेव्हा 'ल्यूने पो 'नं 'पिअर्ने 'चं मन वळवून त्याला संगीत-निर्देशन करायला उभं केलं होतं मग...

... एक दिवस पावसानं विशेष धरणं धरलं होतं, अशा वेळी कोलोनची तार आली : 'पियानोवादकाला पाठवत आहे...अमुक अमूक दिवशी अमूक वाजता तो पोहोचेल...'

मी स्टेशनवर गेले...आणि त्या श्री. 'क्ष ' ना गाडीतून उतरताना पाहून इतकी चकित झाले म्हणता !

" कोलोननंच तुला पाठवलं म्हणतोस ? कसं शक्य आहे ? मला तुझ्याबद्दल किती तिरस्कार अन् तिटकारा वाटतो, ते माहीत नाही की काय त्याला ? "

" माफ करा बाईसाहेब... मालकांनीच... गुरुजींनीच मला पाठवलं आहे..." तो अडखळत म्हणाला...

कोण पियानोवादक आला होता, ते पाहिल्यावर एल्. मला म्हणतो, " निदान मला मत्सर वाटायचं काही कारण नाही, एवढं बरं आहे ! "

एल्. ला त्याच्या कल्पनेप्रमाणे जो पक्षघाताचा झटका आला होता, त्याचा परिणाम म्हणून अजूनही त्रास होत होता... त्यामुळे एक डॉक्टर आणि एक अनुभवी नर्स त्याच्या दिमतीला शॅटोमध्ये सतत रहात असत. एल् . च्या बाबतीत मी कसं वागावं, हे त्यांनीच ठरवून दिलेलं होतं, अन् मी ते कटाक्षानं पाळण्यावर त्यांचा अगदी भर होता ! घराच्या अगदी दुसऱ्या टोकाच्या शेवट-शेवटच्या एका खोलीत माझी व्यवस्था केलेली होती. कोणत्याही कारणानं एल्. ला भेटून त्याच्या विश्रांतीला बाधा आणायची नाही, अशी सक्त ताकीद होती मला ! त्याला केवळ भात, मॅकरोनी ( = मोठ्या शेवया ) आणि पाणी, या पथ्यावर ठेवलं होतं;...दिवसाचे पुष्कळ तास त्याला त्याच्या खोलीतच काढायचे असत

... दर तासाला डॉक्टर येऊन त्याचा रक्तदाब घ्यायचा ... कधी कधी पॅरिसहून आणलेल्या एका पिंजऱ्यासारख्या कॅबिनमध्ये एल्. ला बसवून हजारो वोल्ट्सच्या विजेच्या लहरींचा त्यांच्यावर प्रयोग करत ... तो बिचारा अगदी केविलवाणा दिसायचा तिथे बसून ... म्हणायचा, "यानं तरी मला बरं वाटेल, अशी आशा आहे!"

या सगळयामुळे माझ्या बेचैनीत भरच पडायची ... त्यातच पावसाची एक-सारखी रिपरिप सुरू ... पुढे ज्या अघटित घटना घडल्या त्यांचं स्पष्टीकरण कदाचित सापडलं तर याच परिस्थितीत सापडू शकेल.

काही करून मनाला आलेली मरगळ आणि ती बेचैनी निपटून टाकायला हवी होती, तेव्हा मग मी त्या श्री 'क्ष' च्या बरोबर काम करायला सुरुवात केली ... तो अगदी आवडत नसतानासुद्धा; मात्र जेव्हा जेव्हा तो माझ्यासाठी पियानो वाजवायला बसायचा तेव्हा तेव्हा त्याच्याभोवती मी एक पार्टिशन उभं करायची ... "तुझा मला इतका अवर्णनीय तिटकारा येतो, की तुझ्याकडे बघणं देखील माझ्या सहनशक्तीपलीकडलं आहे" असं सरळ त्याला सांगून!

त्यावेळी शॅटोमध्ये एल्. ची एक जुनी मैत्रिण काऊंटेस 'ए' सुद्धा राहत होती. ती मला म्हणायची, "त्या गरीब बिचाऱ्या पियानोवादकाला तू असं कसं वागवू शकतेस?" ... एक दिवस तर तिनं हट्टच धरला ... दुपारच्या जेवणा-नंतर आम्ही एका बंद मोटरीतून नेहमी एक चक्कर मारायला बाहेर पडत असू ... तिनं आग्रहच धरला की, "आपल्याबरोबर फिरायला आज त्याला बोलावंच तू!"

नाइलाजानं मी त्याला बोलावलं ... मोटरीत अलग घडी होणाऱ्या खुर्च्या वगैरेंची व्यवस्था नसल्यानं एका सलग सीटवरच आम्हा सर्वांना बसणं भाग होतं ... मी मध्ये, काऊंटेस 'ए' माझ्या उजव्या बाजूला 'श्रीयुत 'क्ष' डाव्या ... नेहमीप्रमाणे धोधो पाऊस पडतच होता. गावाबाहेर थोडंफार गेलो न गेलो तो 'क्ष' बद्दलची माझी किळस अगदी उफाळून आल्यासारखं मला झालं ... मी मधल्या काचेवर टक्टक् करून ड्रायव्हरला घराकडे परत गाडी वळवायची आज्ञा केली ... त्यानं "हो" म्हणून मान हलवली, अन् मला खुष करावं म्हणून की काय कोण जाणे, एकदम जोरात झरकन गाडी वळवली ... त्या कच्च्या रस्त्यावर आधीच सगळ्या चाकोऱ्या झालेल्या, त्यामुळे गाडी वळताक्षणी मी जशी काही 'क्ष' च्या बाहुपाशातच फेकली गेले! त्यानं मला हातांनी कवळलं ... मी उठून सरळ झाले अन् त्याच्याकडे पाहिलं मात्र ... माझं पुरं अस्तित्व ... माझं सत्त्वच जणू पेटून उठलं ... गवताच्या पेटत्या गंजी-सारखं ज्वालामय होऊन निःशेष झालं ... इतका आवेग, असा उन्माद मी

कधीच अनुभवला नव्हता ! ... त्याच्याकडे पाहता पाहता एकाएकी मी स्तिमित झाले ... याआधी कसं कधी ते मला दिसलं नाही ? ... त्याचा चेहरा निर्मळ सुंदर होता ... नि त्याच्या डोळ्यांत किंचित् गुदमरलेली प्रतिभेची ज्योत तेवत होती ...! त्याच क्षणी मला साक्षात्कार झाला की तो एक फार थोर माणूस होता ...

परत येताना सारा वेळ मी त्याच्याकडे टक लावून बसले होते ... एक-तऱ्हेच्या वासनातंद्रित हरवल्यासारखी झाले होते मी ... मग शॅटोच्या दिवाण-खान्यात शिरल्या शिरल्या त्यानं माझा हात हातात घेतला ... अन् अजूनही माझ्यावर रोखलेली आपली नजर अजिबात ढळू न देता त्यानं मला हलकेच बॉलरूममधल्या पार्टिशनच्या पाठीमागे नेलं ... त्या अनावर तिटकाऱ्यातून एका अनावर प्रीतीचा जन्म व्हावा, हे शक्य तरी कसं झालं ?

एल्. ला त्या वेळी मद्यार्काच्या स्वरूपाचं एक पेय घ्यायची परवानगी होती ... त्या वेळी हे पेय नव्यानं शोधून काढलेलं, अन् म्हणून प्रसिद्ध अन् गाजलेलं होतं – आता अर्थात ते बाजारात हजारो बाटल्यांतून अन् सर्वत्र मिळतं, हे सोडा – पण तेव्हा रक्तातल्या पांढऱ्या पेशींना त्या औषधामुळे तरतरी येते, असा समज होता ... बटलरला आज्ञा देऊन ठेवलेली असायची की एल्. च्या अभिवादनासह ते पेय दररोज पाहुण्यांच्यापुढे करायचंच ... ते तरी किती, तर वाईनग्लास भरून ! पुढे मला समजलं की ते औषध चहाच्या चमचाभरच फक्त घ्यायचं असे !

... मोटरीतला तो प्रसंग घडला तेव्हापासून आम्हाला एकच ध्यास लागला ... एकान्त मिळवण्याचा – फुलांच्या हरितगृहात, बागेत ... किंवा गावाबाहेरच्या चिखलानं बरबटलेल्या गल्ल्या तुडवत लांब लांब फिरायला जाताना का होईना ! ... पण अशा तऱ्हेच्या अनिवार वासनासक्तीची अखेर नेहमी अनिवार, अटळच असते, तसंच इथेही झालं ... अन् एक दिवस असा उगवला, की 'क्ष' ला शॅटो सोडून निघून जावं लागलं ... कधीही न परतण्या-साठी ! एका मरणोन्मुख समजल्या जाणाऱ्या व्यक्तीला जीवदान देण्यासाठी आम्ही हा त्याग केला !

नंतर पुष्कळ वर्षांनी 'द मिरर ऑफ् जिजस' (= येशूचा आरसा) ची सुंदर संगीतरचना मी ऐकली, तेव्हा हा माणूस प्रतिभावान आहे, असं मला मनोमन वाटलं होतं, ते अगदी खरं असल्याची साक्ष पटली ... आणि प्रति-भावन्त म्हटला, की ज्योतीवर झडप घालणाऱ्या पतंगाप्रमाणे माझ्या आकर्षणात सापडलाच म्हणून समजावं ... तसंच घडत आलेलं आहे आजवर ...

... एक गोष्ट आमच्या प्रकरणामुळे नक्की सिद्ध झाली – असं गृहस्थाश्रमी

आयुष्य रेटणं माझ्यासारखीला अशक्यच होतं – तेव्हा हेमन्त ऋतूत अमेरिकन दौऱ्याचा तिसरा एक करार केला होता, – तो पुरा करायला मी अमेरिकेला निघाले ... काहीशी अनुभवानं शहाणी झालेली ... अन् त्यामुळेच उदासलेली-सुद्धा ... मग पुन्हा एकदा – आता हे शंभराव्यांदा असेल जवळजवळ – मी एक पक्का निश्चय केला मनाशी ... यापुढे मी माझं पुरं जीवन कलेलाच वाहीन ... कारण कला अदय असेल, पराकाष्ठेचे प्रयास करायला लावणारी महामाया असेल, पण तरी माणसापेक्षा शंभर टक्क्यांनी जास्त कृतज्ञ असते ती !

... या दौऱ्याच्या वेळी मात्र अमेरिकेला मी एक निश्चित आवाहन केलं ... माझ्या शाळेच्या स्थापनेला मदत करण्याबद्दल ... श्रीमंती जीवनक्रमाच्या तीन वर्षांच्या अनुभवानं मला ते जगणं किती अर्थहीन, वांझोटं नि स्वार्थी असतं, त्याची खात्रीपूर्वक कल्पना आली होती ... आणि त्यातून सिद्ध झालं होतं की, प्राकृतिक नि सर्वसमावेशक भावभावनांच्या आविष्कारानं लाभणाऱ्या आनंदासारखा आनंद कुठेही इतरत्र मिळत नाही ... मेट्रोपॉलिटन थिएटरमधल्या एकावर एक असलेल्या बॉक्सेसमध्ये बसणाऱ्या प्रेक्षकांना त्या हिवाळाभर – मी अगदी सतावून सोडलं होतं ... वृत्तपत्रांनी एक सनसनाटी बातमी म्हणून ठळक शीर्षकात छापलं सुद्धा होतं, 'इझाडोराने केलेला श्रीमंतीचा अवमान' असं ...! पण मी जे काय वक्तव्य केलं होतं, ते असं होतं :

"अमेरिकेच्या संबंधात मी वाईट उद्गार काढते, असं नेहमी सांगितलं जातं ... कदाचित काढलेही असतील असे उद्गार मी ... मात्र त्याचा अर्थ अमेरिकेवर माझं प्रेम नाही, असा होत नाही ... काढायचाच असेल तर एखादवेळीं असाच अर्थ निघेल, की माझं अमेरिकेवर नको इतकं प्रेम आहे ... माझ्या माहितीचा एक माणूस होता ... तो अशा एका स्त्रीच्या प्रेमात आकंठ बुडून गेला होता, की जिच्यापाशी त्याच्याशी बोलायला शब्द देखिल नव्हते ... जी त्याला मनस्वी वाईट तऱ्हेनं वागवत होती ... दरदिवशी तो तिला एक अपमानास्पद पत्र पाठवायचा ... 'असला उद्धट मजकूर तू माझ्या पत्रात का लिहितोस ?' असं जेव्हा तिनं विचारलं, तेव्हा तो म्हणाला, 'माझं तुझ्यावर अतिशय प्रेम आहे म्हणून ...!'

एखादा मानसशास्त्रज्ञ या वरच्या गोष्टीचं मर्म तुम्हाला समजावून देऊ शकेल ... माझं अन् अमेरिकेचं हे असंच असावं प्रकरण ! माझं अर्थातच प्रेम आहे अमेरिकेवर ... ही माझी शाळा, हे विद्यार्थी ... आम्ही सारीजणं म्हणजे वॉल्ट व्हिटमनची मानस-प्रजा नव्हे का ? अन् तेवढं तरी कशाला ? हे नृत्य ... हे 'ग्रीक' म्हणवलं जाणारं नृत्य ... हे तर अमेरिकेच्या सत्त्वांतूनच स्फुरलेलं आहे ... नव्या अमेरिकेचं, उद्याच्या अमेरिकेचं नृत्य आहे हे ... हे

सारे हावभाव, अंगविक्षेप...हे कुठून आले?...सांगू? अमेरिकेच्या थोर निसर्गाचं दान आहे ते...'सीरा नेव्हाडा'च्या प्रकृतीतून ते फुलले आहेत... कॅलिफोर्नियाच्या किनाऱ्याला स्नान घालणाऱ्या प्रशान्त महासागराच्या इशाऱ्यांनी घडलेले आहेत... रॉकी पर्वताच्या विशाल परिसरानं, योसेमाईट दरीनं, नायग्रा प्रपातानं त्यांना स्फूर्ती दिली आहे...

"बीथोव्हन आणि शूबर्ट पुऱ्या आयुष्यभर जनताजनार्दनाची अपत्यं म्हणूनच जगले... ती तशी गरीब माणसंच होती... आणि म्हणून त्यांच्या महान महान रचनांचा उगमही मानवतेच्या पोटी अन् मानवतेसाठीच होता... जनताजनार्दनाला नाट्य, संगीत, नि नृत्यादी थोर कलांचा महानैवेद्य हवाच हवा...

"आम्ही 'ईस्ट साईड'ला गेलो आणि एक कार्यक्रम तसाच केला. कुणी कुणी लोक मला म्हणाले, 'तुम्ही शूबर्टची सिंफनी या बाजूला वाजवली, तर लोकांना ते काही फारसं आवडणार नाही.'

आम्ही विनामूल्य कार्यक्रम दिला (गल्लाभरतीची अपेक्षाच नसलेलं थिएटर... किती मजा!) लोक जागच्या जागी तिथे खिळून गेलेले... गालां वरून आसवांच्या धारा लागलेल्या... त्यांच्या पसंतीची, त्यांच्या समजेची खूण ही अशी पटवली त्यांनी! 'ईस्ट साईड'च्या लोकांच्या जिवातला चैतन्य, काव्यात्मता आणि कलात्मता यांचा झरा जणू ऊर्मीनं उसळायची वाटच पहात असतो... रंगमंदिराचा खरा समाजवादी नमुना म्हणता येईल, असं एक विशाल वर्तुळाकृती रंगमंदिर त्यांना बांधून द्या... सर्वांना सारख्या अंतरावरून रंगमंचा-वरचं दृश्य दिसण्याची सोय... बॉक्स नाही की बाल्कनी वगैरे प्रकार नाहीत... नाहीतर इथे वर गॅलरीकडे पहा: चांगली जीती जागती माणसं अशी माश्या-मच्छरांप्रमाणे छतावर चिकटल्यासारखी बसवायची, आणि मग त्यांना नृत्य, संगीत वगैरेचा 'रसास्वाद' घ्यायला सांगायचं... हा काही न्याय आहे का?... तुम्हीच सांगा!

"एक साधं सुंदर रंगमंदिर बांधा... सोनेरी मुलामा द्यायची वगैरे काही जरूर नाही... नक्षीकाम... सजावट, अलंकरण वगैरेंचीही आवश्यकता नाही — ललितकला जन्म घेते, तीच मुळी हृत्कमलातून... तिला या बाह्य गोष्टींचं काय होय?... आमच्या नृत्यशैलीनं तऱ्हतऱ्हेची वेषभूषा, अलंकार, यांना सपशेल काटच मारला आहे; तिथे महत्त्व आहे ते मानवी आत्म्याच्या गंगोत्रीतून झरणाऱ्या उत्स्फूर्त सौन्दर्याला, अन् त्या आत्म्याची स्वरूपातली धारणा सिद्ध करणाऱ्या देहाला!... या ठिकाणी माझ्या कलादर्शनातून तुम्ही काही बोध घेतला असाल तर तो हाच असेल, अशी मी आशा करते... सौन्दर्याचा वेध घ्यायचा असतो

आणि शोध लागतो तो बाळगोपाळांच्या मेळाव्यात... त्यांच्या तेजाळ डोळ्यांत, रम्य चळवळनाच्या नादात पसरलेल्या त्यांच्या छोटुकल्या हातात, बाहूत... सर्वसाधारणपणे इथल्या बॉक्सेसमध्ये बसणाऱ्या रमणींच्या गळ्यातल्या मोत्यांच्या माळेपेक्षा, हातात हात गुंफून रंगमंचावर इकडून तिकडे वागडणाऱ्या या मुलांची चेतन माळ अधिक सुंदर दिसते, हे तर खरं ना?... झालं तर... तेच माझे हिरेमोती... मला आणखी दुसरे नकोतच मुळी... या मुलांना सौन्दर्य, स्वातंत्र्य अन् सामर्थ्य मिळू द्या... कलेचं दान ज्यांना आवश्यक वाटतं त्यांच्याच पदरात पडू द्या... उत्तमोत्तम दर्जाच्या संगीताचा आनंद, ही केवळ चार सुसंस्कृत लोकांचीच मिरासदारी बनता कामा नये ... ते वरदान सबंध जनतेलाही सर्रास मिळायला हवं... हवा आणि अन्न, या गोष्टींच्या इतकीच माणसाची कलास्वादाची गरज मूलभूत आहे, मौलिक आहे ... कारण कला ही मानव्याला उत्साहित करणारी एक तऱ्हेची आध्यात्मिक मदिराच आहे..."

अमेरिकेच्या या सफरीत 'डेव्हिड बिसफाम' या प्रतिभावान कलावंताच्या मैत्रीनं मला खूप दिलासा दिला. तो माझ्या प्रत्येक नृत्यप्रदर्शनाला यायचा, अन् मीही त्याच्या प्रत्येक मैफलीला हजर राहायची... नंतर प्लाझामधल्या माझ्या स्वीटमध्ये जेवल्यावर तो मला 'ऑन द रोड टू मंडाले' (मंडालेच्या रस्त्यावर) किंवा 'डॅनी डीव्हर'सारखी गाणी गाऊन रिझवायचा... आम्ही हसायखिदळायचे, एकमेकांना मिठ्या मारायचे... असा परस्परसंमतीच्या आनंदात काळ जायचा ...

या प्रकरणाला तुम्ही 'प्रेमाचा प्राकृतिक पुरस्कार' वगैरेसारखं काही म्हणू शकाल ..कारण आतापर्यंत मला कळून चुकलं होतं की 'प्रीती' हे एक मनोरंजन होऊ शकतं, तशीच ती शोकान्तिकाही ठरू शकते... तेव्हा मी एक प्रकारच्या अनागर, प्राकृतिक निरागसतेनंच प्रीतीला सामोरी गेले... सारे पुरुष सौन्दर्याचे भुकेले असल्यासारखे दिसत होते...प्रेमाचे भुकेले दिसत होते....स्फूर्ती देणारं, प्रसन्न करणारं भयकुशंकांचं काजळवोट न लावणारं, जबाबदारीच्या बेड्या पायांत न ठोकणारं असं प्रेम त्यांना हवं असायचं...अन् एखाद्या कार्यक्रमानंतर मांझ्या ट्यूनिकमध्ये मी इतकी गोड अन् आकर्षक दिसायची! माझ्या केसांना असायची वरून गुलाबफुलांची महिरप...! असल्या या सौंदर्याचा उपयोग नाही घेऊ द्यायचा तर काय करायचं? का घ्यायचा नाही त्याचा आस्वाद कुणी?...दुधाचा एक प्याला पिऊन कान्टचं 'क्रिटिक ऑफ प्युअर रीझन' वाचत बसायचे ते दिवस केव्हाच मागे पडले होते! आता माझ्या सौंदर्याबद्दल चार कौतुकाचे शब्द तोंडून काढणाऱ्या एखाद्या आकर्षक पुरुषाच्या सोबतीनं, घुटक्याघुटक्यानं शँपेनचा आस्वाद घेणं, हेच मला जास्त नैसर्गिक

वाटत होतं...हेच सुसंगत, नि काळाला धरून होतं...तो दिव्य प्राकृतिक देह, ते कामलालस ओठ, ते आलिंगनोत्सुक आग्रही बाहू, कुणाच्या तरी प्रेमळ खांद्यावर विसावून अनुभवलेली गोड प्रसन्न निद्रा...ह्या साऱ्या गोष्टींनी मिळणारा आनंद मला निरुपद्रवी, निरागस नि प्रसन्न वाटत होता...काही लोकांना धक्काच बसेल माझं हे मत ऐकून...पण असं का व्हावं, मला काही समजत नाही!... असं एक शरीर घेऊन तुम्ही जन्माला आलेले असता की वेदना, दुर्वर्गावाणी यांचा जो काय कमीजास्ती वाटा तुमच्या नशिबी असेल, तो निमूट उचलणं, हा तुमचा एक अटळ भोग असतो...आज काय, दात येतो आहे, दात काढायचा आहे...दात भरायचा आहे...एक ना दोन...शिवाय मनुष्य कितीही का सद्गुणी असेना, त्याला आजारीपण – रोगराई चुकत नाही ती नाहीच! अशी वस्तुस्थिती आहे, तर याच देहाकडून शक्य तेव्हा, शक्य तितकं सुख, का म्हणून मिळवायचं नाही? एखादा माणूस सारा दिवसभर आपला मेंदू शिणवत असतो...मोठमोठ्या समस्यांनी अन् काळज्यांनी त्याला घेरून टाकलेलं असतं; त्याचं ते दुःख, तो शिणवटा हलका करण्यासाठी, दिवसभरातलं सारं काही विसरायला लावणाऱ्या सुंदर बाहूंचा आधार घेऊन, सौन्दर्याचे नि विश्रब्धतेचे चार घुटकेसुद्धा त्यानं घटकाभरासाठी घेऊ नयेत का? माझ्यापुरतं मी म्हणेन, की ज्यांना ज्यांना मी असा सौन्दर्यास्वाद दिला त्या त्या सगळ्या व्यक्तींनी त्या स्मृती माझ्याप्रमाणेच मोठ्या आनंदानं हृदयाशी जपल्या असतील, अशी मला आशा आहे. त्या सर्वांबद्दल या स्वगतात सविस्तरपणे लिहायला वेळ तरी आहे कुठे? ...तसं म्हणाल, तर आजवर रानावनात किंवा शेतात घालवलेल्या आयुष्यातल्या अनेक नितान्तसुंदर घटिकांच्या आठवणी, – किंवा मोझार्ट, बिथोव्हन, यांच्या सिंफनीसंगीतातून मला आजपर्यन्त मिळालेल्या अतर्क्य आनंदाचं संपूर्ण वर्णन – किंवा 'इसाये', 'वॉल्टर रमेल', 'हेनर स्कीन' आणि इतर अशाच कलावंतांच्या सहवासात गेलेल्या अनेक रम्य क्षणांचं, पळांचं, तासांचं टिपण...हे सारं या एकाचं स्मृतिखंडात गोवणंसुद्धा अशक्यच नाही का?

"मला असंस्कृतच राहू द्या...प्राकृतिक राहू द्या"... असं एकसारखं मी म्हणायची...पण एवढा मंत्र घोकून घोकून सुद्धा 'श्लील असंस्कृतपणा' – किंवा 'असंस्कृत श्लीलता' म्हणा हवं तर, हीच प्रगतीची पायरी मी गाठू शकले!

...पॅरिसला मी परतले, तो प्रसंग मी कधीच विसरणार नाही...व्हर्सायला एका गव्हर्नेसजवळ मी माझी मुलं ठेवून आले होते...मी दार उघडलं तसा माझा छोटुकला धावत माझ्याकडे आला...माथ्याभोवती सोनेरी जावळाची प्रभावळ होती...मी दौऱ्यावर गेले तेव्हा पाळण्यातलं चिमुकलं बाळ होतं हे अगदी!

एकोणिसशेआठमध्ये 'न्युईली' इथे 'जर्व्हे'चा स्टुडिओ मी विकत घेतला

होता...ह्या स्टुडिओत एक ' चॅपेल '—एक छोटं प्रार्थनामंदिर असावं तसं संगीताचं वेगळं दालन होतं...तिथेच मग या वेळी माझ्या मुलांच्यासह राहायला गेले मी. इथे माझा अगदी निष्ठावान मित्र हेनर स्कीन याच्याबरोबर मी दिवसभर, अन् कधीकधी रात्रभरसुद्धा काम करत बसायची...हा एक अत्यंत गुणी पियानोवादक होता...थकणं त्याला माहीतच नव्हतं.. सतत काम करत राहण्याचा उत्साह त्याच्या ठायी होता...सकाळी सकाळीच आमची कामाला सुरुवात व्हायची... आतून सर्व बाजूंनी माझे निळे पडदे लावलेले होते, अन् झगझगीत आर्कलॅम्पच्या उजेडात सारं काम चालायचं — त्यामुळे बाहेरचा प्रकाश या स्टुडिओत अजिबात झिरपायचा नाही...मग काळवेळाचं भान कुठून राहणार? कधी क्वचित मी म्हणायची, " तुला भूक नाही का लागली? किती वाजलेत, कुणास ठाऊक!" अन् मग घड्याळाकडे पहावं तर दुसऱ्या दिवसाच्या पहाटेचे चार वाजलेले असायचे! ...आमचा जीव आमच्या कामात एवढा गुंतलेला असे, की हिंदू लोक म्हणतात तसल्या त्या ' आनंदसमाधी 'चाच अनुभव घेत होतो आम्ही जवळजवळ!

माझी मुलं, त्यांची गव्हर्नेस, आणि नर्स यांच्यासाठी बागेत एक आमचं घर होतं...तिथे त्यांना आमच्या संगीताचा त्रास पोहोचत नसे...तिथली बाग इतकी सुंदर होती म्हणून सांगू!...वसंतऋतूत अन् उन्हाळ्यात स्टुडिओची दारं सताड उघडी टाकूनच आम्ही नाचत असू!

या स्टुडिओत आम्ही नुसतं कामच करत होतो असं नाही...खेळत, मौजमजा सुद्धा करत होतो...एल्. ला मेजवान्या, मैफली वगैरे घडवून आणण्याची खूप हौस होतीच...तशा वेळी मग ह्या भल्या थोरल्या स्टुडिओचं रूपान्तर एखाद्या उष्णप्रदेशातल्या उद्यानात किंवा स्पॅनिश राजवाड्यात व्हायचं — त्या निमित्तानं पॅरिसमधल्या प्रसिद्ध व्यक्तींची नि कलाकारांची पायधूळ तिथे नेहमी झडायची!

...अशाच एका संध्याकाळी ' सेसिल सोरेल ', ' गाब्रियेल दान्यून्झिओ ' अन् मी मिळून एक आयत्या वेळचं मूकनाट्य सादर केलं होतं...दान्यून्झिओ त्याच्या अभिनयकौशल्यामुळे चांगलाच चमकला त्या दिवशी!

* * *

ड्यूजविषयी मला वाटत असलेल्या कौतुकादरामुळे, किती तरी वर्षं दान्यून्झिओबद्दल माझ्या मनात एक ठाम पूर्वग्रह होता...मला वाटत होतं, की त्यानं ड्यूजला वाईट वागणूक दिलेली होती...त्यामुळे त्याला भेटायचं मी नाकारतच होते...एका मित्रानं एकदा विचारलंसुद्धा होतं मला, की " तुला भेटायला दान्यून्झिओला मी घेऊन येऊ का?" मी उत्तर दिलं होतं, " बिलकूल नको — कारण त्याला पाहताक्षणी माझ्या हातून त्याचा फार मोठा अपमान झाल्याशिवाय राहणार नाही!"...पण माझ्या इच्छेविरुद्ध तो एक दिवशी

उगवलाच...पाठोपाठ दान्यून्झिओला घेऊन !

मी त्याला त्यापूर्वी कधीच पाहिलं नव्हतं...आणि जेव्हा ते कमालीचं तेजस्वी नि आकर्षक व्यक्तिमत्त्व माझ्या दृष्टीला पडलं, तेव्हा माझ्या तोंडून " या, याना ...भलतेच आकर्षक आहात हं तुम्ही ! " असेच उद्‌गार निघाले... !

...तर एकोणिसशे बारामध्ये—म्हणजे मी ज्या प्रसंगाचं वर्णन केलेलं आहे त्याच सुमाराला,—दान्यून्झिओसुद्धा मला भेटायला आला, तोच मुळी मला जिंकायची खूणगाठ मनाशी पक्की बांधूनच...माझ्या दृष्टीनं ही गोष्ट काही फारशी कौतुकाची, अपूर्वाईची नव्हती; कारण दान्यून्झिओ जगातल्या प्रत्येक विख्यात स्त्रीला आपल्या नादी लावत होता ... रेड इंडियन नाही का ठार मारलेल्या माणसांच्या कवट्या कमरेला अडकवून मिरवतो, तसाच काहीसा छंद होता दान्यून्झिओचा !...जिंकलेली प्रत्येक स्त्री आपल्या संग्रहात सामावून घेऊन त्यांचं सर्वांचं प्रदर्शन मांडण्याचा ! मीच एक डय़ूजच्या प्रेमाखातर त्याचा प्रतिकार करत होते...मला वाटलं, त्याला वश न झालेली अशी स्त्री मी एकटीच असेन...पण आपला धीरोदात्तपणा दाखवायची ती एक क्षणिक ऊर्मी होती, एवढंच !

दान्यून्झिओला जेव्हा एखाद्या स्त्रीला वश करून घ्यायचं असतं, तेव्हा दररोज सकाळीं तो तिला एका कवितेचा आणि त्या कवितेच्या अर्थाला साजेशा एका फुलाचा आहेर करतो—माझ्याकडेही अर्थात दररोज सकाळीं आठ वाजता ही छोट्या फुलाची भेट यायला लागली...पण मी मात्र माझं ' धीरोदात्त ' अवसान संभाळून होते !

एक दिवशी रात्री— तेव्हा ' होटेल वायरन 'च्या जवळच्याच रस्त्यावर मी एक स्टुडिओ घेतलेला होता— दान्यून्झिओ मला विशिष्ट संदर्भात म्हणावं, तसं म्हणाला, " मी मध्यरात्री येईन ! "

मी आणि माझ्या एका मित्रानं मिळून दिवसभर बसून स्टुडिओची सजावट केली...पांढऱ्या शुभ्र फुलांनी— लिलीच्या फुलांनी स्टुडिओ भरून गेला—लिलीची फुलं...अंत्ययात्रेसाठी आणतात ती सगळी फुलं !...अन् अगदी अगणित मेण-बत्त्यांचं तारांगण पेटवलं...स्टुडिओतलं ते दृश्य पाहून दान्यून्झिओ अगदी दिपून गेला...त्या पेटत्या मेणबत्त्या आणि ती शुभ्र फुलं, यामुळे माझा स्टुडिओ एखाद्या गोथिक प्रार्थनामंदिरासारखाच दिसत होता. तो आला, तसे आम्ही पुढे झालो अन् त्याला गाद्यागिरद्यांनी झाकलेल्या दिवाणकडे नेलं...प्रथम मी त्याच्या समोर नृत्य केलं, नंतर त्याच्यावर फुलं उधळली...अन् मग शोपांच्या मृत्युयात्रा-संगीताच्या ( ' फ्यूनरल मार्च 'च्या ) सुरलयीला अनुसरून हलक्या पावलानं तरळत त्याच्या सभोवार आजूबाजूला मेणबत्त्यांची आरास केली...होता होता मात्र एकएक करत त्याच्या डोक्याजवळची नि पायाजवळची मेणबत्ती सोडून बाकी

साऱ्या मी विझवून टाकल्या...तो तर मन्त्रमुग्ध झाल्यासारखाच दिसत होता... पुढे तसाच त्या संगीतावर मृदू पदक्षेप करत जाऊन मी त्याच्या पायाजवळची मेणबत्तीही विझवली...पण जेव्हा मी अगदी गंभीरपणे त्याच्या डोक्याजवळच्या मेणबत्तीच्या रोखानं निघाले, तेव्हा अगदी इच्छाशक्तीच्या निकराच्या बळानं तो उडी मारून उठून उभा राहिला, अन् भीतीनं एक किंकाळी फोडून स्टुडिओबाहेर धावला...इकडे मी अन् तो पियानोवादक हसण्यानं बेजार होऊन एकमेकांच्या मिठीतच कोसळलो...!

दुसऱ्यांदा दान्यून्झिओच्या आकर्षणशक्तीला मी थोपवून धरलं ते व्हर्सायिला, त्रियानाँ पॅलेस होटेलमध्ये मी त्याला रात्री जेवायला बोलावलं होतं; 'पॅरिस'— प्रकरणाला दोन वर्षं लोटल्यानंतरची ही गोष्ट आहे— आम्ही माझ्या मोटरीतून तिथे गेलो होतो.

"जेवणापूर्वी तुला जंगलात थोडे पाय मोकळे करायचे नाहीत का?"

"हो हो...जरूर...खूपच मजा येईल..."

मार्लीच्या जंगलापर्यंत आम्ही मोटरीतून गेलो; त्यानंतर गाडी तिथेच सोडून आम्ही जंगलात शिरायला सिद्ध झालो...दान्यून्झिओ भलता खुषीत होता...

थोडा वेळ आम्ही फिरलो इकडेतिकडे; मग मी एक सूचना केली—म्हटलं, "चला, जेवायला परत जाऊ या आता"...पण गाडी कुठे होती आमची? मग काय...होटेल त्रियानाँ शोधून काढून त्या जेवणापर्यंत पायीच पोहोचायचा प्रयत्न करायचं आम्ही ठरवलं...चाल चाल चाललो...पण ते फाटक काही केल्या आम्हाला सापडेना...शेवटी दान्यून्झिओ तर लहान मुलासारखा रडायला लागला. "मला जेवायचंय्...मला जेवायला द्या कुणी तरी...मला मेंदू आहे...पण अन्नावाचून त्याची धारणा कशी होणार...उपासमार झाली...की बस्— संपलो मी—थांबलो— बसलोच!"...वगैरे...

मी माझ्याकडून शक्य तेवढं त्याला समजावण्याचा प्रयत्न केला...शेवटी ते फाटकही आम्हाला अर्थात सापडलं, अन् आम्ही आमच्या होटेलमध्ये परतलो, तेव्हा दान्यून्झिओला चांगलं सुंदरसं जेवणसुद्धा मिळालं!

त्याच्या आकर्षणशक्तीला मी बळी न पडल्याचा तिसरा प्रसंग मात्र खूपच वर्षानंतरचा...तेव्हा महायुद्ध सुरू झालेलं होतं. रोमला येऊन मी 'होटेल रेगिना'-मध्ये उतरले होते—अन् आश्चर्याची गोष्ट, म्हणजे एका अतर्क्य योगायोगानं दान्यून्झिओदेखिल माझ्या शेजारच्याच खोलीत उतरला होता...दररोज रात्री तो 'मार्कीजा कासाती' बरोबर जाऊन जेवायचा...एका रात्री तिनं मलाही बोलावलं जेवायला. मी राजवाड्यात गेले अन् एका उपदालनात जाऊन बसले...तिथली सारी सजावट अगदी ग्रीक पद्धतीची होती...मी आपली मार्कीजाची वाट पहात



बसले होते, इतक्यात एकाएकी अगदी कमालीच्या घाणेरड्या भाषेत मला वाहिलेली अपशब्दांची जोरकस लाखोली माझ्या कानावर आदळली...मी इकडे-तिकडे वळून पहाते, तो काय? एक हिरवा पोपट फक्त! सुटा, मोकळाच! मी तशीच उठले अन् उडी मारून शेजारच्या दालनात गेले...तिथे पुन्हा मार्कीजाची वाट पहाते, तर एकदम 'वर्रर्रर्र' असा गुरगुरण्याचा आवाज आला...अन एक पांढरा सफेत बुलडॉग दिसला...तोही बेटा साखळीशिवायच! दुसऱ्या क्षणीच माझी उडी पुढच्या दालनात पडली...या दालनात जमिनीवर पांढऱ्या अस्वलांच्या केसांपासून बनवलेले गालिचे अन् भिंतीवर तसल्याच पांढऱ्या अस्वलांची कातडी वगैरे टांगलेली होती; तिथेही तेच मार्कीजाची वाट पहाणं आलं.. तेवढ्यात 'फुस्स्स्' असा आवाज...मी खाली पाहिलं, तर माझ्या दिशेनं फूत्कार टाकत एक नाग एका पिंजऱ्यात फणा काढून उभा! अर्थात पुढलं दालन! वाघाच्या कातड्यांनी सबंध भरलेलं...अन् वर एका दात विचकणाऱ्या गोरिलाचं दर्शन!...धावत, धापा टाकत मी पुढच्या दालनात शिरले...ते भोजनाचं दालन निघालं...अन् तिथे मात्र मार्कीजाचा चिटणीस मला भेटला...पुढे मग मार्कीजा जेवायला खाली उतरली एकदाची...तिनं पार-दर्शक सोनेरी जरीचा पायजमा घातलेला होता...मी तिला म्हटलं, "जनावरांची तुम्हाला फारच आवड दिसतेय्!"

"अगदी खरं...माझा प्राण्यांच्यावर फारच जीव आहे...माकडावर तर काही विचारूच नका"...आपल्या चिटणिसाकडे पहात ती म्हणाली...

आश्चर्य म्हणजे एका एवढ्या भूक चाळवणाऱ्या सलामीनंतर पुढे सारा भोजन-समारंभ अत्यंत गंभीरपणे शिष्टसंमत स्वरूपात पार पडला!

जेवणानंतर आम्ही ते ओरँगउटांग माकड ठेवलं होतं, त्या दालनात परत गेलो, अन् मग मार्कीजानं आपल्या ज्योतिषीणबाईला बोलावणं पाठवलं – ती आली, ती एक उंच टोकेली हॅट अन् चेटकिणीचा असावा, तसा एक ढोलदार अंगरखा घालूनच...अन् मग पत्ते मांडून तिनं आमचं भविष्य सांगायला सुरुवात केली.

एवढ्यात दान्यून्झिओही आत आला (आणि ह्या सैतानानं कसा वेष केला असेल अशी तुमची कल्पना आहे )

दान्यून्झिओचा शकुन-अपशकुन, संकेत वगैरेंवर भलता विश्वास आहे...झाडून साऱ्या ज्योतिष्यांवर त्याचा विश्वास बसतो... ह्या ज्योतिषीणबाईनं त्याला एक कमालीची अद्भुत गोष्ट सांगितली. म्हणाली, "तू हवेत उड्डाण करशील, अन् त्यातही अनेक धाडसी कृत्यं तुझ्या हातून घडतील...मग तू पडशील, अन् मृत्यूचं दार ठोठावून येशील...प्रत्यक्ष मरणातूनही कदाचित तू जाशील–कदाचित

मरणाला चाटून जाशील आजूबाजूनं...अन् नंतर मोठी यशसंपदा उपभोगायला जिवंत राहशील ! ”

मला तिनं सांगितलं तें असं :

“ राष्ट्राराष्ट्रांना जाग आणून तू एका नव्या धर्माधिष्ठानाची त्यांना ओळख करून देणार आहेस...जगभर सर्वत्र तू विशाल मंदिरं उभवशील...तुला एक फार मोठं अतर्क्य अभयदान लाभलेलं आहे...जेव्हा जेव्हा तुला अपघात व्हायचा संभव येईल, तेव्हा तेव्हा कुणी महान देवदूत तुझं रक्षण करतील...तुला उदंड आयुष्य आहे...तू अमर होशील. तुला मरण मुळीं नाहीच...”

...मग जेव्हा आम्ही होटेलवर परतलो, तेव्हा दान्यून्झिओ मला म्हणाला, “ मी तुझ्या खोलीत दररोज रात्री बारा वाजता येणार आहे...जगातल्या एकूणएक स्त्रिया मला वश झालेल्या आहेत, पण अजून इझाडोरा काही मला दाद देत नाही ! ”

म्हटल्याप्रमाणे रात्री बारा वाजता दररोज तो पठ्या माझ्या खोलीत यायचा...

पण मी मुळीं स्वतःशी ठरवलंच होतं,–मी अशीच सर्वांपेक्षा आगळी वागणार आहे – दान्यून्झिओला वश न झालेली जगातली एकुलती एक स्त्रीच व्हायचं आहे मला !

त्यानं मला त्याच्या आयुष्यातल्या, त्याच्या तारुण्याच्या अन् कलेच्या संबंधातल्या अत्यन्त अद्भुत आणि रम्य गोष्टी सांगाव्या, अन् शेवटी म्हणावं, “ इझाडोरा, मला आता सहन होत नाही; घे मला – माझा स्वीकार कर...”

त्याच्या प्रतिभेच्या दर्शनानं आधीच मी इतकी दिपून गेले होते, की अशा वेळी कसं वागावं, हेच मला समजायचं – सुधरायचं नाही; मग मी हलुवारपणे त्याला माझ्या खोलीतून उठवून त्याच्या खोलीत नेऊन सोडायची. असं हे प्रकरण जवळजवळ तीन आठवडे अबबडलं!...अन् शेवटी मात्र माझी मनःस्थिती इतकी वेड्यापिश्यासारखी झाली की मी सरळ स्टेशनची वाट धरली, अन् जी गाडी मिळाली ती पकडून तिथून निसटले...

तो मला विचारायचा, “ माझ्यावर तू का प्रेम करू शकत नाहीस ? ”

“ एलिनोरामुळे ...” मी म्हणायची...

‘ ओतेल त्रियानाँ’ मध्ये दान्यून्झिओकडे एक ‘ गोल्डफिश ’ जातीचा मासा होता ...त्याला भारीच आवडायचा तो... एका सुंदर पैलूदार काचपात्रात ठेवलेला असायचा...दान्यून्झिओ त्याचं खाणंपिणं बघायचा...त्याच्याशी बोलायचासुद्धा... तो मासासुद्धा वेडा आपले कल्ले हलवत अन् तोंडाची उघडझाप करत त्याला जणू प्रतिसाद द्यायचा ...

त्रियानाँमध्ये राहत असताना होटेलच्या मॅनेजरला एकदा मी विचारलं,

" दान्यून्झिओचा तो गोल्डफिश कुठं आहे ? "

" बाईसाहेब, ती एक फार दुःखाची गोष्ट आहे...दान्यून्झिओसाहेब इटलीला जाताना त्यांची काळजी घ्यायला आम्हाला बजावून गेले होते; म्हणाले, " बघा हं, हा सोनमासा माझ्या जिवाचा कलिजा आहे अगदी...माझ्या सर्वांगीण सुखाची ती खूण आहे, प्रतीक आहे ! " त्यांच्या सारख्या तारांवर तारा यायच्या तिथूनसुद्धा – माझा लाडका ॲडोल्फस काय म्हणतो '...वगैरे मजकुराच्या; पण एक दिवस ॲडोल्फसचं काचपात्रातलं ते गोल गोल पोहणं नेहमीपेक्षा मंद वाटलं, आणि हळूहळू करत त्यानंही दान्यून्झिओची वार्ता विचारणं कायमचं थांबवलं... ...मी त्याला उचलून खिडकीबाहेर फेकूनही दिलं, आणि इकडे साहेबांची तार आली ' ॲडोल्फसची तब्येत बरी नसावी असं वाटतं '...मी तारेनंच कळवलं, ' ॲडोल्फस मरण पावला – काल रात्री ' – दान्यून्झिओसाहेबांची पुन्हा तार : ' त्याला बागेत पुरा...त्याच्या थडग्याची नीट व्यवस्था करा '...मग मी एक सार्डिन मासा घेऊन चंदेरी कागदात गुंडाळला, अन् त्याला बागेत पुरलं; अन् तिथे ॲडोल्फसच्या नावाचा एक क्रूस उभारला ! दान्यून्झिओंनी परतल्यावर ॲडोल्फसचं थडगं कुठे आहे, म्हणून विचारलंच...मी त्यांना बागेतली जागा दाखवली, तेव्हा त्यांनी तिथे खूप फुलं आणून वाहिली, आणि किती तरी वेळ त्यावर आसवं गाळीत ते उभे राहिले ! "

* * *

आमच्या एका अलिशान पार्टीचा शेवट मात्र एका शोकप्रद घटनेत झाला... माझा स्टुडिओ मी एखाद्या उष्ण प्रदेशातल्या उद्यानासारखा सजवला होता; कुंजाकुंजातून आणि दुर्मिळ झाडारोपांतून दोघादोघांसाठी मेजं लावून ठेवली होती, आतापर्यंत पॅरिसमध्ये चालणाऱ्या वेगवेगळ्या प्रेमप्रकरणांची मला थोडीफार माहिती झालेली होतीच – त्यामुळे मी एकान्ताची जरुरी भासणाऱ्या प्रेमिकांची मनं समजून, तशाच जोड्या लावल्या होत्या...अर्थात ह्या व्यवस्थेमुळे काहींच्या बायकांना अश्रू ढाळण्याची पाळी आली, ती वेगळी गोष्ट !...सर्व निमंत्रित पर्शियन वेषात होते अन् जिप्सी वाद्यवृंदाच्या संगीतावर त्यांचं नृत्य चालू होतं...या सगळ्या मंडळीत ऑरी बातेय् अन् त्याची प्रसिद्ध दुभाषी बर्त बेडी हे फार वर्षांचे माझे जुने स्नेही देखिल होते...

मागे एकदा मी सांगितलं तसा माझा स्टुडिओ एका छोट्या प्रार्थनामंदिरासारखाच होता—अन् पंधरा मीटर उंचीपर्यंत माझे निळे पडदे सर्व बाजूंनी सोडलेले होते; पण तिथल्या वरच्या उंच आगाशीवर एक दालन होतं; अन् प्वारेच्या कलास्पर्शानं त्याचं रूपांतर खुद्द ' सर्स 'च्या मंदिरात झालेलं होतं जणू ! काळे ' सेबल 'चे मखमली पडदे सोनेरी चौकटीच्या आरशात प्रतिबिंबित झालेले दिसायचे तिथे...

एक काळाच गालिचा...अन् कोणत्यातरी पौर्वात्य पोताच्या गाद्यागिरद्यांनी लाडावलेला दिवाण...या वस्तूंनी या सजावटीला पूर्णता आणली होती... खिडक्या कायमच्या बंद करून टाकलेल्या होत्या, आणि दारं काही विचित्रच होती...'एत्रुस्कन' थडग्यांची तोंडं असावीत तशी! दालन पूर्ण झाल्यानंतर स्वतः प्वारेसुद्धा म्हणाला होता की, "इथे अशा तऱ्हेच्या जागा आहेत, की एरवी कधी करू शकणार नाहीत, नि बोलू शकणार नाहीत, त्या गोष्टी या वास्तूत लोक सहज करतील अन् बोलतील!"

अगदी, अगदी खरं होतं हे!...हे छोटं दालन, सुंदर होतं, आकर्षक होतं, अन् धोकेबाजही! नीतिनिष्ठ बिछाने, आणि गुन्हेगार कोच, आदरणीय खुर्च्या अन् पापी दिवाण...असे भेद फर्निचरमध्येही दाखवून देणारं काही वैशिष्ट्य या सामानांच्या जातीतच अंगभूत असतं की काय नकळे! काही का असेना, प्वारे म्हणाला, त्यात तथ्य होतं खास! या दालनात पाऊल टाकलं की माणसाला वेगळंच भावायचं...माणसं नेहमीपेक्षा वेगळंच बोलायची. माझ्या चॅपेल–छाप स्टुडिओत असं कुठे होत होतं?

एल्. जेव्हा जेव्हा असे समारंभ घडवून आणतो, पार्ट्या देतो, तेव्हा वाहत असते, त्याच वेगानं या विशिष्ट संध्याकाळी शॅंपेन वाहत होती! पहाटे दोन वाजता प्वारे दालनात मी ऑरी बातेयूबरोबर एका दिवाणवर बसले होते... तो माझ्याशी खरं तर अगदी आजपर्यंत भावाच्याच नात्यानं वागलेला होता... पण त्या दालनाच्या अंगभूत आकर्षणाचा असर होऊन की काय, त्या रात्री त्याचं वागणं बोलणं जरा वेगळंच वाटत होतं...आणि अशा वेळी तिथे कुणी येऊन टपकावं? एल्. नं! त्यानं जेव्हा त्या सोनेरी दिवाणावर पहुडलेल्या ऑरी बातेयूला नि मला तिथल्या आरशांतून अनेकवार प्रतिबिंबित झालेलं पाहिलं, तेव्हा तो स्टुडिओकडे धावला परत; अन् साऱ्या पाहुण्यांसमोर माझ्याबद्दल नाना तऱ्हेचे उद्गार काढायला लागला...म्हणाला, की "मी चाललो या क्षणी दूर...आता कधीही मी परत येणार नाही"...

या प्रसंगामुळे पाहुण्यांचा हिरमोड झाला होताच, पण मी तर एका क्षणातच सुखचैन विसरून एखाद्या शोकांतिकेच्या भावस्थितीत शिरले होते...

स्कीनला मी म्हटलं, "चल लवकर, 'डेथ ऑफ इजल्ट्' ही संगीतरचना सुरू कर, नाहीतर सारा रंगाचा बेरंग होऊन जाईल—"

घाईघाईनं मी माझा कशिदेदार कुडता काढून पांढरं ट्यूनिक् चढवलं, अन् त्या दिवशी, नेहमीपेक्षा अधिकच रंगात येऊन वाजवणाऱ्या त्या वादनकुशल स्कीनच्या संगीत साथीवर मी पहाटेपर्यंत नाचत राहिले...

पण त्या रात्रीच्या शोकान्तिकेचा आणखी एक अंक व्हायचा राहिलाच होता

अजून...आम्ही अगदी निरपराध असूनही एल्. ची समजूत कशी ती पटली नव्हतीच...माझं तोंड इतःपर न पाहण्याची शपथ घेऊन तो तर मोकळा झाला होता...मी किती विनवण्या केल्या—पण व्यर्थ ! अन् ऑरी बातेय् सुद्धा या घटनेमुळे इतका अस्वस्थ झालेला होता, की त्यानं एल्.ला पत्र पाठवण्यापर्यंतची मजल मारली...कशाचा काहीही उपयोग झाला नाही...

एका मोटरीत केवळ माझी भेट घ्यायचं तेवढं एल्. नं कबूल केलं...त्याचे शिव्याशाप राक्षसी घंटांच्या अर्थहीन घणघणाटासारखे माझ्या कानावर आदळत होते...एवढ्यात एकाएकी तो शिव्या द्यायचा थांबला, अन् मोटरीचं दार उघडून रात्रीच्या अंधारात त्यानं मला बाहेर ढकलून दिलं...मी त्या तसल्या एकाकी बेभान अवस्थेत रस्त्यातून तासन्‌तास चालतच होते...अनोळखी लोक माझ्याकडे जातायेता पाहून तिरस्कारानं तोंडं वाकडी करत होते; कुणी संशयास्पद विचारणाही करू धजत होते...सारं जग एकाएकी घाणेरड्या किळसवाण्या नरकासारखं भासायला लागलं मला...

...दोन दिवसांनी...दोन दिवसांनीच ती बातमी कानावर आली माझ्या... एल्. ईजिप्तला निघून गेला होता...

## २५

या दिवसांत मला सर्वांत जास्त दिलासा देणारी एकच व्यक्ती होती—माझा अत्यन्त प्रिय मित्र, संगीतज्ञ—हेनर स्कीन. तसं म्हणाल, तर तो एक विचित्र वल्लीच होता...यश किंवा वैयक्तिक महत्त्वाकांक्षा या गोष्टींचा त्याला भयंकर तिटकारा!...माझ्या कलेचा मात्र तो इतका चाहता अन् भोक्ता होता, की माझी साथ करण्यातच त्याचं सर्व समाधान सामावलेलं असायचं. मला आजपर्यंत भेटलेल्या सर्व चाहत्यांच्यापेक्षा स्कीनची माझ्याबद्दलची भक्ती विशेष वेगळीं होती...तो एक कुशल पियानोवादक तर होताच, पण कोणत्याही प्रसंगात न डगमगणारं स्थिरधीर डोकं त्याच्या खांद्यावर होतं!—सबंध रात्रभर तो माझ्यासाठी पियानो वाजवत बसायचा...एकादी रात्र बिथोव्हनच्या सिंफनीच्या वादनात जायची, तर दुसऱ्या एखाद्या रात्री 'राईनगोल्ड' पासून 'गेतेरडेमेरुंग' पर्यंतचं 'रिंग'-चं पुरं आवर्तन व्हायचं.

एकोणिसशेतेराच्या जानेवारीत आम्ही रशियामध्ये एका छोट्याशा दौऱ्यात बरोबर होतो. या सफरीत एक लक्षात राहण्यासारखी घटना घडली. कीएव्हला एका सकाळीसकाळीं पहाट फुटताना आम्ही येऊन उतरलो, आणि बर्फातून चालणाऱ्या 'स्ले'तून हॉटेलमध्ये गेलो. अजून झोपेतून पुरेशी जाग आलेली नव्हतीच; एवढ्यात रस्त्याच्या दोन्ही बाजूंनी शवपेट्यांच्या दोन रांगा चाललेल्या मी अगदी स्पष्टपणे पाहिल्या; पण त्या नेहमीसारख्या साध्या नव्हत्या, लहान मुलांच्यासाठी खास बनवलेल्या शवपेट्या होत्या त्या...मी स्कीनचा हात पकडून धरला...म्हटलं,

"बघ...सारीच्या सारी...सगळी मुलं देवाघरी गेलेली आहेत..."

" कुठे काय ? इथे तर काहीच नाही "—त्यानं माझी समजूत घातली.

" नाही काय ? तुला दिसत नाही का ? "

" नाही... बर्फाशिवाय आहे काय इथे दुसरं ? रस्त्याच्या दोन्ही बाजूंनी बर्फाचे, हिमाचे ढीग साचून राहिलेले आहेत...बस्...मी सांगतो, तुला कसला तरी विचित्र भास झाला नुसता...शिणली आहेस तू—थकलेली आहेस..."

त्या दिवशी शिणवटा जाईल, आणि मनालाही जरा स्वस्थता मिळेल म्हणून मी रशियन स्नानगृहात गेले. तिथे गरम-उष्ण खोल्यांतून एकावर एक अशा लांब लाकडी फळ्यांची व्यवस्था असते. असल्याच एका फळीवर मी निजलेली होते... परिचारिका जरा बाहेर गेली होती.. तेवढ्यात एकाएकी त्या उष्म्याचा परिणाम होऊन मी फळीवरून खाली संगमरवरी फरशीवर पडले. परिचारिका परत आली तर मी आपली बेशुद्धीतच...तसंच त्यांना मला हॉटेलमध्ये न्यावं लागलं... डॉक्टरला बोलावणं गेलं– डॉक्टरांच्या मते मेंदूला बारीकसा धक्का पोहोचला होता..

" आज तुम्हाला नाचणं शक्यच नाही होणार...केवढा ताप आहे अंगात ! "

" पण मला प्रेक्षकांची निराशा करणं बिलकूल आवडत नाही..." असं म्हणून मी थिएटरवर जायचा हट्टच धरला मुळी... शोपांचं संगीत होतं त्या दिवशी; कार्यक्रमाच्या शेवटी एकदम काय मनात आलं कुणास ठाऊक, मी स्कीनला शोपांचा ' फ्यूनरल मार्च ' वाजवायला सांगितला...

" पण कशासाठी ? ती रचना तर तू आतापर्यंत कधीच नाचलेली नाहीस..."

" मला तरी कुठे समजतंय् कशासाठी ते ? पण तेच वाजव तू..."

मी इतक्या आर्जवानं आग्रह धरून बसले, की शेवटी तो तयार झाला आणि त्या रचनेवर मी नृत्य केलं...मी झाले एक कुणीतरी...आपल्या कुणातरी जिव्हाळ्याच्या माणसाचं शव हातावर घेऊन, सावकाश, अडखळत्या पावलांनी त्या अखेरच्या विश्रामधामाची वाट चालणारं...थडग्याखालच्या त्या खड्ड्यात उतरण्याचा नृत्याविर्भाव मी केला...आणि मग झाले तो बंधमुक्त आत्मा... हाडामांसाच्या दैहिक शृंखला तटातट तोडून निघालेला...ऊर्ध्वगामी...प्रकाशोन्मुख आत्मा...पुनरुत्थानरूपी प्रकाशाची ओढ लागलेला...

नृत्य संपलं...पडदाही पडला...पण एक आगळं मौन चहुबाजूंना ओठंगून राहिलं होतं !...मी स्कीनकडे पाहिलं...त्याचा चेहरा एखाद्या मरणोन्मुख माणसासारखा पांढराफटक पडला होता...सारं अंग थरथरत होतं...माझे हात त्यानं आपल्या हातांत घेतले...त्याचे ते हात किती म्हणून थंडगार पडावेत !

" पुन्हा कधीच ही रचना वाजवायचा आग्रह मला करू नकोस—" तो कळवळून म्हणाला..." प्रत्यक्ष मरणातून जावं, तसा अनुभव आलाय आज

मला...त्या पांढऱ्या फुलांचा वास देखिल आला...प्रेतावर उधळलेल्या !...अन् लहान बाळांच्या त्या शवपेटिकाही गेल्या तरळून डोळ्यांसमोरून..."

आमचे दोघांचेही जीव हेलावून गेले होते...मनं थाऱ्यावर नव्हती...मला तर वाटतं, कुठूनतरी कुणा अशरीर जीवात्म्याकडून आम्हाला पुढे होणाऱ्या घटनेची ही एक विचित्र पूर्वसूचनाच मिळाली असावी...

पॅरिसला आम्ही एकोणिसशेतेराच्या एप्रिलमध्ये परतलो, तेव्हा 'त्रोकादेरो'-मधल्या एका लांबलचक कार्यक्रमाच्या शेवटी स्कीननं तो 'फ्यूनरल मार्च' पुन्हा एकदा वाजवला...तेव्हा प्रथमतः एकतऱ्हेची धार्मिक भावनेनं पाळली जावी, अशी स्तब्धता सगळीकडे पसरली – मग काही क्षण प्रेक्षक भारावल्यासारखे झाले, आणि मग अगदी कडकडून टाळ्या पडल्या ...काही बायकांना रडू आवरत नव्हतं, तर काही भान हरपल्यासारख्याच बसल्या होत्या...

भूत–वर्तमान–अन् भविष्यकाळ म्हणजे एक लांबच लांब सलग रस्ता असावा बहुतेक करून...प्रत्येक वळणानंतर, पुढे 'संपला' वाटतो तिथे रस्ता असतोच असतो...फक्त आपल्याला तो दिसत नाही एवढंच...आपण म्हणतो, तो 'पुढे अस्तित्वात येणारा' भविष्यकाळ आहे...पण हा भविष्यकाळ भूतकाळासारखा कधीचा आपल्यासाठी येऊन थांबलेला असतो, हे कुठे आपल्याला माहीत असतं ?

कीएव्हमधल्या त्या अन्त्ययात्रेच्या भासानंतर मला पुढे घडणाऱ्या दुःखद घटनांची चाहूल लागल्याची विचित्र भावना सारखीच व्हायला लागली...अन त्यामुळे फार उदासउदास वाटायला लागलं...बर्लिनला परतल्यावर काही नृत्यप्रयोग मी केले...पण कुठून तरी अज्ञातातून एक विशिष्ट नृत्य रचण्याचा माझ्यावर जोरा होतो आहे, असंच मनाला वाटत होतं...कुणी एखादं पुढे पुढे जात असताना एकाएकी एका भयंकर आघातानं चिरडलं भरडलं जातं...अन् तरीही दैवाच्या या क्रूर फटक्यानं विद्ध झालेलं ते कुणीतरी पुन्हा उभं राहण्याचा प्रयत्न करतं... कदाचित कोणतीतरी एक नवी आशा उराशी बाळगून...असा या नृत्याचा विषय होता...

रशियाच्या माझ्या दौऱ्याच्या वेळी मुलं एलिझ्बेथकडे राहत होती, त्यांना बर्लिनला मी परत माझ्याकडे आणलं...तब्येत अगदी छान होती; नि तशी दोघंही अगदी मजेत होती ...खूप नाचायबागडायची...जणू काही 'आनंदा'ची अगदी साक्षात अभिव्यक्ती !...पॅरिसच्या न्यूईलीतल्या आमच्या प्रशस्त बंगल्यात आम्ही सारी बरोबरच परतलो...

पुन्हा एकदा न्युईलीत मी मुलांसह रहायला लागले. देईर्द्र स्वतःशी स्वतःची नृत्यं रचत असताना, मी दूर आगाशीत उभी राहून तिच्या न कळत कितिदातरी तिला न्याहाळायची...स्वतःच्या कवितांच्यावरसुद्धा ती स्वतःचे नाच रचायची !

छोटीशी बालिश मूर्ती— त्या भल्यामोठ्या निळ्या स्टुडिओत उभी राहून आपल्या गोडगोड बालिश आवाजात म्हणायची, "आता मी आहे पक्षी...मी ढगांतून किनई अशी उंच उंच भरारी मारते!" अन् "मी आहे आता फुल...वर उडत्या पक्ष्याकडे पहात झुलणारं...डुलणारं...हे असं नि असं..." तिच्यातलं ते अप्रतिम लालित्य अन् सौन्दर्य पाहून, माझी शाळा पुढे ती माझ्या कल्पनेबर-हुकूम चालवेल, अशी स्वप्नं मला पडायला लागली होती...माझी सर्वोत्तम शिष्या होती ना ती!

पॅट्रिकच्या नृत्यालासुद्धा सुरुवात झालीच होती...त्यानं स्वतःच रचलेल्या चमत्कारिक संगीतावर तो नाचायचा. मात्र तो कधीही मला...त्याला काही शिकवू म्हणून द्यायचा नाही. "छे!" तो गंभीरपणे म्हणायचा, "पॅट्रिक पॅट्रिकचंच नृत्य नाचेल फक्त!"

न्युइलीतलं ते वास्तव्य: स्टुडिओत काम करायचं...आपल्या लायब्ररीत तास न् तास वाचायचं...मुलांच्या बरोबर बागेत खेळायचं तरी, किंवा त्यांना नृत्य करायला शिकवायचं...मी अगदी सुखात होते...माझ्या मुलांच्यापासून मला दूर ठेवणारे आणखी दौरे माझ्या दाराची वाट चालत असतील की काय, ह्या एका शंकेनं हुरहूर वाटायची तेवढीच! दिवसानुदिवस मुलं जास्त जास्तच गोड दिसायला लागली, तसतसं त्यांना सोडून जाण्याचं धैर्य गोळा करणं अधिकाधिक कठीण वाटायला लागलं...मी एक भविष्य नेहमीच वर्तवत आले होते...की असा एक कलाकार पुढे जन्माला येणार आहे, की ज्याच्या ठायी नृत्य नि संगीत या वेगवेगळ्या क्षेत्रातल्या रचना करण्याचे सर्वस्वी वेगवेगळे प्रतिभागुण एकसमय एकत्र नांदताना आढळून येतील. माझ्या हा छोटा बाळ नाचायला लागला, की मला वाटायचं,— स्वनिर्मित नवसंगीतातून नवनृत्य निर्माण करणारा तो उद्याचा कलाकार, कदाचित — हाच तर नसेल?

या दोन गोड मुलांशी मी काही केवळ रक्तमांसाच्या प्राकृतिक मर्मबंधानं बांधली गेलेली नव्हते...त्यांचं माझं यापेक्षा कितीतरी उच्च पातळीवरचं — अतिमानवीच म्हणावं — असं नातं जुळलेलं होतं; कलेच्या अपार्थिव बंधानं आम्ही एकमेकाशी निगडित होतो...त्या दोघांनाही संगीताचं अपरिमित प्रेम होतं — एखाद्या छांदिष्टाला असतं तसं...त्यामुळे स्कीनचं वादन चालू असताना किंवा मी तिथे काम करत असताना स्टुडिओत बसू देण्याबद्दल ती दोघं अगदी गयावया करायला लागायची! अन् आत एकदा बसू दिलं की इतकी शांत रहायची — चेहरे एकाग्र करून — की कधीकधी मला भीतीच वाटायची... वाटायचं, एवढ्या लहान वयाच्या मुलांचं ते इतकं लक्ष देऊन ऐकणं — काही खरं नव्हे — बरंही नव्हे!

एक आठवण आहे मला एका दुपारची. तो थोर कलावंत 'राऊल प्युन्यो,' 'मोझार्ट' वाजवत होता. मुलं हलक्या पावलांनी आत आली, अन् पियानोच्या दोन्ही बाजूला जाऊन उभी राहिली. त्याचं वादन संपलं, तशी दोघंही अगदी एकाच वेळी त्याच्या हाताखालून आपली तपकिरी ब्राऊन डोकी वर उचलून, त्याच्याकडे इतक्या कौतुकादरानं एकटक पहात उभी राहिली, की तो चकितच झाला, उद्गारला, "हे तर यक्षकिन्नर...देवदूत...मोझार्टचे देवदूत, हे इथे अवतरले तरी कुठून ?" ते ऐकून मुलं खूप खिदळली, अन् त्याच्या मांडीवर चढून त्याच्या दाढीत त्यांनी आपली तोंडं लपवली...

त्या गोड त्रिमूर्तीकडे मी हळुवारपणे, भारावून पाहत राहिले...ह्या तीन्ही व्यक्ती, परतीची वाटच नसलेल्या, ('फ्रॉम व्हेन्स नो ट्रॅव्हलर रिटर्नस्') त्या अंधाऱ्या अज्ञाताच्या अगदी उंबरठ्यावरच उभ्या आहेत, याची मला त्यावेळी कल्पना असती तर ?

...हा मार्च महिना होता...'शॅतले' अन् 'त्रोकादेरो' या थिएटरातून आलटूनपालटून माझे कार्यक्रम चालू होते...खरं म्हणजे जे करीन त्यात यश मिळण्यानं, माझं परिसासारखं आयुष्य सुखसमाधानानं ओसंडायला हरकत नव्हती ...पण ते बाजूला राहून उलट माझं मन सतत एका विचित्र दडपणाखाली हुरहुरत होतं....

'त्रोकादेरो' तल्या एका रात्रीच्या कार्यक्रमाच्या वेळी स्क्रीन ऑर्गनवर साथीला असताना शोपांचं मृत्युसंगीत मी पुन्हा नाचले... अन् तोच तो निशिगंधचा अन् तसल्याच, मरणाच्या सावटीत जगणाऱ्या इतर पांढऱ्या फुलांचा उग्र वास दरवळला...मधोमधच्या बॉक्समध्ये बसलेली शुभ्रसुंदर वेषातली देईर्द्र मला ते नृत्य करताना पाहून एकाएकी काळीज फाटावं, तशी हमसाहुमशी रडायला लागली, अन् ओरडली, "माझ्या ममाला का एवढं वाईट वाटतंय् ? काय होतंय् माझ्या ममाला ?"

माझ्या आयुष्यातल्या नैसर्गिक सुखाच्या, आनंदाच्या सर्व आशाअपेक्षांना लवकरच्च कायमची तिलांजली देणाऱ्या शोककथेच्या पूर्वरंगाची, ही कुठे नांदी होती ! मला वाटतं, जगरहाटीप्रमाणे माणूस नंतरही तसाच जगत असल्यासारखा दिसला, तरी काही दुःखं अशी असतात, की ती माणसाला जीवे मारतात ! आपलं व्यवहाराधीन जिणं तसंच फरफटत मनुष्य ओढतो, पण त्याचं सत्त्व कधीच चिरडलं गेलेलं असतं ...कायमचं !...दुःखाच्या सोज्वळ परिणामांचे गोडवे गाताना मी लोकांना ऐकलेलं आहे...मी एवढंच म्हणेन माझ्यापुरतं की तो वज्राघात होण्यापूर्वीचे काही दिवस, हा माझ्या आत्मिक जीवनाचा तरी समारोपच ठरला ! ...तेव्हापासून एकच उच्छा उरली आहे ...उडून जाण्याची, पळून जाण्याची ! त्या

भयानक अनुभवापासून स्वतःची सुटका करून घेण्याची...!...आता माझं आयुष्य म्हणजे तरी काय ?...अशाच उदासभीषण पलायनांची एक लांबच लांब परंपरा आहे ती केवळ...त्या दुःखी भटक्या ज्यू सारखी ('द वाँडरिंग ज्यू')...उडत्या डच माणसासारखी ('द फ्लाइंग डचमन')!...एखाद्या भुताटकीच्या सागरावर हिंदकळणाऱ्या झपाटलेल्या जहाजासारखं झालेलं आहे हे पुरं आयुष्य माझं !

...मनात पिंगा घालणाऱ्या गोष्टींचं प्रतिबिंब काही तरी विचित्र योगायोगानं कधीकधी व्यवहारात पार्थिव वस्तूंवरही उमटलेलं दिसतं खास...मी आधीच वर्णन केलेलं, ते उन्मादक–गूढ वातावरणाचं दालन प्वारेनं निर्माण केलं, तेव्हा तिथल्या प्रत्येक सोनेरी दरवाजावर त्यानं एक दुहेरी काळा क्रूस ठेवला होता... प्रथम ही सजावट मला नवीन, पण जरा चमत्कारिक वाटली होती...पण तेवढ्या-वरच ते संपलं होतं...आता मात्र हळूहळू त्या काळ्या दुहेरी क्रूसाचा माझ्यावर काही विचित्रच परिणाम व्हायला लागला...

मगाशी मी म्हटलं त्याप्रमाणे, वरवर पाहता मला नशीबवानच म्हणावं अशी माझी सर्व बाजूंनी परिस्थिती असतानाही मनावरच्या एका विचित्र दडपणा-खालीच मी आयुष्य कंठत होते...एकतऱ्हेच्या भयप्रद पूर्वसूचनेनं मला ग्रासून टाकलं होतं म्हणानात...आता तर रात्री अपरात्री भीतीनं दचकून उठायला व्हायचं ...अवचित जागच यायची...मग रात्रीचा एक मंद दिवा ठेवून निजायला मी सुरुवात केली...एक दिवस तर मला एक विचित्रच भास झाला...माझ्या बिछान्यासमोरच्या काळ्या दुहेरी क्रूसांतून, काळे कपडे घातलेली एक हलती-चालती आकृती उमटली, अन् माझ्या पायथ्याशी येऊन कारुण्यानं एकटक माझ्याकडे पहात राहिली ! क्षण दोन क्षण मी भीतीनं एका जागी खिळूनच गेले अन् नंतर सगळेच्या सगळे दिवे लावून पाहिलं, तर ती आकृती नाहीशी झाली होती...असला हा चमत्कारिक भास होण्याची ही खरं म्हणजे माझी पहिलीच वेळ...पण त्यानंतर हीच गोष्ट अंतराअंतरानं,–पण वारंवार घडायला लागली...!

या साऱ्यामुळे मी इतकी त्रासून बावरून गेले होते, की एकदा रात्री माझी जिव्हाळ्याची मैत्रीण श्रीमती रॅचेल बॉयर, हिच्याकडल्या पार्टीला गेलेली असताना मी तिला विश्वासात घेऊन ती सारी हकीकत सांगितली. तिला काळजीच वाटली अन् तिच्या नेहमीच्या सहृदयतेला अनुसरून तिनं तिच्या डॉक्टरला टेलिफोन करून बोलावूनच घ्यायचं ठरवलं.

ती म्हणाली, "तुला एखादेवेळी एखादी मानसिक व्यथा जडली असेल, कुणी सांगावं !"

तो तरुण देखणा डॉक्टर 'रने वादे'सुद्धा लगेच येऊन पोहोचला. त्याला मी माझ्या त्या भासाबद्दल सगळं सांगितलं...

“ तुमच्या मनावर फार ताण पडलेला आहे, हे तर दिसतंच आहे...खरं म्हणजे काही दिवस तुम्ही शहराबाहेर मोकळ्या वातावरणात जाऊन राहायला हवं...”

“ पण पॅरिसमधल्या नृत्यकार्यक्रमांच्या बाबत मी करारानं बांधली गेलेली आहे ”...मी उत्तर दिलं...

“ तसं असेल तर, तर व्हर्सायला जा...ते इतकं जवळ आहे...कार्यक्रमासाठी मोटरनं तुम्ही सहज येऊ शकाल पॅरिसला...अन् त्या हवेत तुम्हाला पहा किती बरं वाटेल...”

दुसऱ्या दिवशी मुलांच्या त्या गोड नर्सला मी हा बेत सांगितला...तेव्हा तीही आनंदून गेली...“ मुलांनासुद्धा व्हर्सायला राहणं खूप मानवेल अगदी—” ती म्हणाली.

दोनतीन सूटकेसेसमधून आम्ही सामान भरलं, अन् आता निघणार, तो फाटकाशी काळ्या कपड्यांतली एक कृश आकृती दिसली...बंगल्याच्याच दिशेनं हळूहळू रस्त्यावरून पुढे येणारी...माझ्याच त्रस्त, बावऱ्या मनाचा तो खेळ नुसता, की दररोज त्या दुहेरी क्रूसांतून बाहेर पडणारी तीच ही आकृती, कोण जाणे!...ती माझ्या जवळ आली...

“ मी पळून आलेय्...केवळ तुला भेटायला. गेले काही दिवस तुझीच स्वप्नं मला पडतायत...मला वाटलं, की तुला अगदी भेटायलाच हवं जाऊन...”

...आता मी तिला ओळखलं...राजेरजवाड्यांच्या जुन्या जमान्यातली नेपल्सची राणी होती ती. आधीच काही दिवसांपूर्वी देईद्रेला मी तिला भेटायला घेऊन गेले होते. मी म्हटलं होतं, “ देईद्रे, आपण एका राणीसाहेबांना भेटायला जाणार आहोत बरं का ! ”

“ हो का, मग मला चांगला ‘ खास ’, फ्रॉक घालायला हवा...” प्वारेनं तिच्यासाठी बनवलेल्या—कशिदागारीच्या झालरींनी फुलारलेल्या फ्रॉकला ती ‘ खास ’ म्हणायची !

राजेरजवाड्यांच्या पुढे करतात तसलं खास अभिवादन तिला करायला शिकवण्यात मी थोडा फार वेळ खर्च केला होता...तिला खूप गंमत वाटली होती त्याची...पण शेवटल्या क्षणी ती रडायलाच लागली; म्हणे, “ खरोखरीची राणी बघायला जायला मला भीतीच वाटतेय् ममा ! ”

परिकथेतल्या एखाद्या मूकनाट्यातल्याप्रमाणे आपल्याला खरोखरीच्या दरबारात उभं राहावं लागणार, असंच छोट्या देईद्रेला वाटलं असणार बहुतेक ! पण मग ‘ ब्वा ’ च्या टोकावरच्या त्या ‘ मोठ्या ’ छोट्या बंगल्यात, पांढऱ्याशुभ्र केसांच्या वेण्यांनी बनलेला मुकुटच जणू माथ्यावर धारण केलेल्या, एका कृश पण अप्रतिम स्त्रीच्या पुढ्यात देईद्रे उभी राहिली, तेव्हा तिनं तिला मोठ्या



विंटाईनं ते दरबारी नम्र अभिवादन करण्याचा प्रयत्न केला...अन् मग क्षणातच मुक्तपणे हसून ती राणीच्या पसरलेल्या बाहूंत जाऊन विसावली...सहृदयता अन् सुजाण, अभिजात वागणं यांची प्रत्यक्ष प्रतीती देणाऱ्या त्या राणीचं देईद्रेला कुठून भय वाटणार ?

...त्या दिवशी तर्शी ती काळ्या शोकसूचक वेषात आली असताना आम्ही व्हर्सायला जायला निघालो असल्याचं तिला सांगितलं, अन् जाण्याचं कारणही स्पष्ट केलं; ती म्हणाली, तिलाही आमच्या बरोबर जायला फार आवडलं असतं ...तेवढीच जरा नेहमीपेक्षा वेगळी गंमत ! मध्येच वाटेत तिनं एकाएकी माझ्या दोन्ही छोट्या चिमुरड्यांना हळुवारपणे जवळ घेऊन आपल्या छातीशी ओढून धरलं...पण ती दोन भुरीतपकिरी डोकी तिच्या त्या काळ्या प्रावरणात गुरफटल्या-सारखी दिसली मात्र...माझ्या काळजावर अलीकडे सतत अनुभवलेलं तेच; ते दडपण आलं एकदम...

व्हर्सायला पोहोचल्यावर मुलांच्या बरोबर हसण्याखिदळण्याच्या दरम्यान चहा वगैरे झाला...अन् मग नेपल्सच्या राणीला मी तिच्या निवासात पोहोचवून आले...दुर्दैवी एलिझबेथच्या या बहिणीहून गोड स्वभावाचं, सहानुभूतीपूर्ण आणि हुषार असं दुसरं व्यक्तित्व कधीच माझ्या आढळात आलेलं नाही...

दुसऱ्या दिवशी होटेल त्रियानॉंच्या रम्य उद्यानात जाग आली, तेव्हा मनातल्या शंकाकुशंका नि भीती यांचा कुठे मागमूस देखिल राहिला नव्हता... डॉक्टरांनी बरोबर सल्ला दिला होता...मला जरुरी होती, ती या शहराबाहेरच्या निर्मळ वातावरणाची...अरेरे ! ग्रीक शोकान्तिकेतला तो कोरस इथे असता तर ? गरीब बिचाऱ्या इडिपसचा करुण दाखला देऊन त्यानं मला विधिलिखिताचा एक संकेत सांगितला असता...की दुर्दैवाची भेट टाळण्यासाठी उलट दिशेचा रस्ता पकडायला आपण जातो; आणि तिथेच बरोबर त्याची साक्षात आमोरासमोर गाठ पडते ! वरचेवर मिळणाऱ्या मृत्यूच्या दृष्टान्ताचं दडपण बाजूला सारण्यासाठी मी व्हर्सायला गेलेच नसते तर ? तर पुढे तीन वर्षांनंतर त्याच रस्त्यावर घडून आलेला माझ्या मुलांचा अपघाती मृत्यू टळला असता !

...ती संध्याकाळ मला खूप स्पष्ट आठवते...कारण त्या दिवशीसारखी मी कधीच नाचले नाही...एक स्त्री अशी मी राहिलेच नव्हते तशी तेव्हा...मी होते एक आनंदज्योत...एक अग्निज्वाला...ऊर्ध्वगामी स्फुलिंग...तुषारलेल्या ठिणग्या... समष्टीच्या काळजातून उमसणारा चक्राकार धूर...अन् अखेरीस अनेकदा वन्स-मोअर घेतल्यानंतर निरोपादाखल मी 'मोमॉं म्युझिकाल' (संगीतक्षण) नाचायला सुरुवात केली...तेव्हा नाचतानाचतानाच कुणी तरी माझ्या अंतरात एक गीत गात आहे असा मला भास झाला. "जीवन अन् प्रीती–आनंदाची ती परमावधी–अन

ते भांडार देखिल माझ्या ठायी...भरभरून दान करण्यासाठी...!...त्यांना ज्याची तहान आहे, त्यांना मुक्त हस्तानं दान देण्यासाठी !"...नेवढ्यात मला पुन्हा भास झाला की माझ्या एका खांद्यावर देईद्रे आणि दुसऱ्या खांद्यावर पॅट्रिक आहे ...अगदी खूप मजेत, पूर्णपणे तोल संभाळून दोघं बसली आहेत...अन् नाचता नाचता मी या बाजूनं त्या बाजूला मान वळवली की त्यांचे खिदळते, तरतरीत नि बालिश चेहरे...अन् ते बाळहसू मला सामोरं येत आहे...माझ्या पावलांना त्या दिवशी थकवा कसा तो आला नाही !!

* * *

त्या कार्यक्रमानंतर एक आश्चर्याची गोष्ट घडली. काही महिन्यांपूर्वी इजिप्तला निघून गेल्यापासून मला अजिबात न भेटलेला एल्. माझ्या निवासात आला. माझ्या त्या दिवशीच्या नृत्यानं आणि आमच्या पुनर्भेटीनं तो खूपच हेलावून गेल्यासारखा दिसला – मग 'शाँझेलिझे' हॉटेलमधल्या ऑगस्टीनच्या जागेत जेवायला यायचं त्यानं ठरवलं...आम्ही परतलो, अन् जेवण वगैरे लावून टेबला-भोवतीच त्याची वाट पाहत थांबलो...मिनिटं गेली, एक तास गेला वाट पाहण्यात, पण तो काही आला नाही; या त्याच्या वागण्यानं माझी स्थिती मात्र चमत्कारिक झाली...मनाच्या अस्वस्थतेनं अगदी शिखर गाठलं...त्याची इजिप्तची सफर काही कुणाच्या सोबतीशिवाय झाली नव्हती, हे माहीत असूनही त्याला पाहून मला आतून एक प्रकारचा आनंदाचा गहिवर आला होता...माझं त्याच्यावर प्रेम होतंच होतं – नेहमी असणारच होतं – अन् शिवाय त्याचा मुलगा – त्याच्या गैरहजेरीत वाढलेला – किती सुंदर नि सशक्त झालेला होता, ते मला त्याला दाखवायची फार इच्छा होती...पण तीन वाजेपर्यंत तो आला नाही, हे पाहिलं, अन् निराशेची कडू चव तोंडात घोळवत मी व्हर्सायला मुलांच्या-कडे जायला निघाले...

कार्यक्रमाचा तो भावनिक शीण आणि वाट पाहण्यातले ते मानसिक क्लेश, यांनी मी इतकी थकून गेले होते, की पोहोचल्याक्षणी बिछान्यावर अंग झोकून दिलं... अन् गाढ झोपून गेले मी...

दुसऱ्या दिवशी सकाळीसकाळी मुलं त्यांच्या नित्यक्रमाप्रमाणे माझ्या पलंगावर उड्या मारून हसायखिदळायला आली, तेव्हा कुठे मी जागी झाले, अन् मग नेहमीप्रमाणे आम्ही सर्वांनी मिळून न्याहरी केली...

पॅट्रिक त्या दिवशी नेहमीपेक्षा जरा जास्तच रंगात आला होता...खुर्च्या उलट्यापालट्या करण्यातच त्याला मजा वाटत होती...एकेक खुर्ची आदळायची तसतसा तो आनंदानं आरोळ्या ठोकायचा...

...मग एक विचित्र घटना घडली...आदल्या रात्री कुणा अनामिक व्यक्तीनं–

जिचं नाव आजपर्यंत मला कळलेलं नाही, – ' बार्बी दोरव्हीली 'च्या ग्रंथाच्या सुंदर बांधणी केलेल्या दोन प्रती मला पाठवल्या होत्या...हात लांब करून त्यापैकी एक खंड माझ्या शेजारच्या टेबलावरून मी उचलला...पॅट्रिकला फार गोंगाट करण्याबद्दल मी रागावण्याच्या बेतात होते, इतक्यात सहज ते पुस्तक उघडलं, अन् माझी नजर प्रथम ' निओब ' या नावावर अन् मग खालच्या मजकुरावर गेली...

" हे सुंदरी, अन् तुला शोभेशा मुलांच्या माते, ते जेव्हा ऑलिंपसबद्दल तुझ्याकडे बोलायचे, तेव्हा तू हसत असायचीस...तेव्हा तुला शिक्षा करण्यासाठी ईश्वराच्या भात्यातल्या शरांनी तुझ्या सश्रद्ध मुलांच्या माथ्याचा वेध घेतला... ...आणि तुझं अनावृत वात्सल्य त्यांचं त्या क्षणी रक्षण करू शकलं नाही. "

...नर्ससुद्धा तेवढ्यात माझ्याकडे पाहून पॅट्रिकला म्हणाली, " कृपा करून हा कल्लोळ बंद कर...ममाला त्रास होतोय् तुझ्या. "

ती नर्स गोड स्वभावाची चांगली बाई होती...साऱ्या जगाचा धीर अन् शांतपणा तिच्या ठायी होता...अन् या दोन्ही मुलांवर तिचा फारच जीव होता ...

" राहू दे – राहू दे "...मी मोठ्यानं म्हटलं..." त्यांची ही गडबड, हा गोंगाट नसेल, तर आयुष्य कसं रितं होऊन जाईल, विचार कर नर्स ! "

...अन् तो विचार त्या क्षणी सरळ माझ्या डोक्यात घुसला...मुलांच्याशिवाय आयुष्य किती रितं नि अंधार होऊन जाईल...कारण माझ्या कलेपेक्षा किंवा कोणत्याही पुरुषाच्या प्रीतीपेक्षा हजार पटींनी अधिक आनंद या मुलांनी मला दिला होता...माझ्या आयुष्याचा प्याला आनंदानं शिगोशिग भरून ओसंडत होता, तो यांच्यामुळे !...मी पुढे वाचायला लागले...

" जेव्हा तुझ्या वक्षाखेरीज दुसरं लक्ष्यच वेध घ्यायला उरलं नव्हतं, तेव्हा तू उत्सुकतेनं त्या बाणाला सामोरी होऊन वाट पाहू लागलीस...पण सारं व्यर्थ ! उदात्त, दुर्दैवी स्त्रिये, ईश्वराची प्रत्यंचा ढिली पडली...तुला हिणवू लागली...

...याच पवित्र्यात तू तिष्ठत राहिलीस...तुझ्या साऱ्या जीवनभर ..प्रशान्त विषण्णता नि मूक निग्रह यांच्या बळावर...कुणा माणसाच्या खांद्यावर डोकं विसावून अश्रू ढाळत बसली नाहीस तू !...निश्चल झालीस...अविचल झालीस ...असं म्हणतात, की तुझ्या काळजातली अचल निष्ठा व्यक्त करण्यासाठी, तू शिळा बनलीस..."

मी पुस्तक बंद केलं...कारण एकाएकी भीतीनं काळीज धडधडायला लागलं होतं...हात पसरून दोन्ही मुलांना मी जवळ बोलावलं, आणि त्यांच्याभोवती हात गुंफले, तो माझे डोळे पाण्यानं भरून आले...त्या दिवशीची ती सकाळ मला अगदी स्पष्ट आठवते...बोलला गेलेला प्रत्येक शब्द...केलेली प्रत्येक हालचाल

रात्ररात्र झोपेवाचून तळमळताना, त्या दिवसाच्या प्रत्येक क्षणाची मी कितीदा ळणी केली असेल...अन् एखाद्या दृष्टान्ताच्या किंवा स्वप्नाच्या म्हणा बळावर ल्या संकटाची कल्पना का मला मिळाली नाही, असा व्यर्थ विचार कितीदा ात आला असेल...एक देवच जाणे !

ती एक करड्या रंगाची मऊसूत सकाळ होती...पार्ककडे बघणाऱ्या उघड्या डक्यांतून मोसमातल्या पहिल्या मोहराचे नि बहराचे फुलोरे मिरवत असलेली डे दिसत होती...वसंतऋतूतल्या त्या पहिल्या मृदुविलोल दिवसांत जो एक नंदाचा विशिष्ट उमाळा आपल्याला आतआतूनच येत असतो, त्याचा अनुभव वर्षी मी पहिल्यांदाच – त्या दिवशी घेतला...अन् एकीकडे तो वसंतागमनाचा सव, नि दुसरीकडे मुलांकडे पाहतानाचं दृष्टिसुख...यामुळे दुथडी भरून हणाऱ्या आनंदाच्या भरात मी बिछान्यातून उडी मारून उठले, अन् मुलांच्या ोबर नाचायला लागले...! तिघांनाही हास्याच्या उकळ्या फुटत होत्या...नर्स- द्धा आमच्याकडे पाहात हसत होती...

एवढ्यात टेलिफोनची घंटी वाजली...एल्. चा आवाज होता...मुलांना घेऊन ानं मला शहरात भेटायला बोलावलं होतं..." मला त्यांना पहायचंय्" – ्णाला. चार महिने झाले होते त्यांना बघून त्याला...

या निमित्तानं गैरसमज वितळून, मला हवे होते, तसे पूर्वीसारखे संबंध जुळून तील, या विचारानं, मी आनंदले होते...तेव्हा देईर्द्रच्या कानात मी ती बातमी ांगितली ...

ती लगेच ओरडली, " पॅट्रिक, अरे आपण आज कुठे जाणार आहोत, ाहीत आहे का ! "

" आपण आज कुठे जाणार आहोत माहीत आहे का ? " हे शब्द उच्चार- ारा तो बालिश आवाज कितीदा माझ्या कानात घुमतो म्हणून सांगू !

माझी गरीब बिचारी, नाजूक सुंदर मुलं !...दैव कसला क्रूर डाव तुमच्याशी ळणार होतं त्या दिवशी, हे मला माहीत असतं तर ? कुठे ? कुठे गेलात तुम्ही ्या दिवशी ?...

...तेवढ्यात नर्स म्हणाली, " बाईसाहेब, आज पाऊस पडणारसं दिसतंय्... ला वाटतं, मुलं घरी राहिलेलीच बरी..."

तिनं अभावितपणे केलेली ती सूचना अजूनही एखाद्या भयंकर दुःस्वप्नाप्रमाणे ाझ्या कितीदातरी कानावर पडते; अन् त्याकडे दुर्लक्ष केल्याबद्दल मी स्वतःला ोल लावत बसते ! पण त्या क्षणी मात्र असं वाटलं होतं, की मुलांच्या उपस्थिती- च एल्. ला नव्यानं भेटणं सोपं होईल...सहज होईल...

मुलांना बाहुपाशात घेऊन मोटरीतून केलेल्या व्हर्साय ते पॅरिस या शेवटल्या

प्रवासात, मी एका नव्या आशेनं, आणि जीवनाबद्दलच्या आत्मविश्वासानं मोहरून गेले होते...मला खात्री होती, की पॅट्रिकला पाहताक्षणी एल्. माझ्या बाबतीतला त्याचा वैयक्तिक राग वगैरे सारं विसरून जाईल...कुणी सांगावं, आमच्या पुन्हा एकदा जुळलेल्या प्रीतीच्या धाग्यातून, एखाद्या खरोखरी भव्य कार्याचा पट देखिल विणला जाईल ...मी स्वप्न पाहात होते...!

इजिप्तला जाण्यापूर्वी एल्. नं पॅरिसच्या अगदी मध्यवर्ती परिसरात एक बहुमोल प्लॉट विकत घेतला होता...तिथे माझ्या शाळेसाठी एक थिएटर बांधण्याचा बेत होता...जगातल्या साऱ्या थोर थोर कलावंतांचं ते माहेरघर ...अन् जिव्हाळ्याचं नि निवाऱ्याचं ठिकाण होणार होतं...म्यूजच्या दिव्य कलेला साजेसं कोंदण तिथे लाभेल, असं मनात यायचं माझ्या...मूने स्यूलीचं 'इडिपस रेक्स,' 'अँटीगॉन' अन् 'इडिपस ॲट कोलोनस,' ही नाटकत्रयी पाठोपाठ करण्याचं किती काळ हृदयाशी जपलेलं स्वप्न इथेच साकार होईल असं वाटायचं...

पॅरिसपर्यंतच्या त्या प्रवासात हे असेच विचार माझ्या डोक्यात खेळत होते...अन् माझं मन.कलेबद्दलच्या मोठ्या आशाआकांक्षांनी हलकं पीस बनलं होतं!...हं! ते थिएटर कधीच उभवलं जायचं नव्हतं! म्यूजच्या प्रतिभेला साजेलसं मंदिर तिला लाभायचं नव्हतं...नि सोफोक्लीजची नाटकत्रयी सादर करण्याची इच्छा साकार होण्याच्या आत मूने स्यूलीचा अंत ओढवणार होता! ...कलाकाराच्या आशाआकांक्षा म्हटल्या, की अर्ध्यामुर्ध्या, तुटल्याभंगल्या स्वप्नांच्याच रूपानं बहुधा मागं उरायच्या, असं का?...का?

...मी म्हटल्यासारखं झालं. एल्. ला आपल्या छोट्या मुलाला अन् देईर्द्रेला पाहून खूप आनंद झाला. देईर्द्रेवर त्याचं खूप प्रेम होतंच...एका इटालियन रेस्तराँमध्ये आम्ही मोठ्या मजेत जेवलो...खायला स्फॅगेटी...प्यायला चियांटी अन् बोलायला त्या अनुपम थिएटरच्या भविष्याचा सुंदर विषय!

"इझाडोराचं थिएटर, होणार ते——" एल्. म्हणाला...

"नाही"...मी म्हटलं..."पॅट्रिकचं थिएटर...कारण पॅट्रिक उद्याचा मोठा संगीतकार आहे...भविष्यकालीन नवसंगीताला साजेसं नवनृत्य तोच निर्माण करणार आहे..."

जेवण झालं, तसं एल्. म्हणाला, "मी आज इतका खुषीत आहे... सुखसमाधानात आहे...खरंच, आपण 'सालों देझ्युमोरीस्त' ला जायचं का?"

पण माझं तर तालमीला जायचं आधी ठरलेलं होतं, तेव्हा आमच्याबरोबर तिथे असलेल्या त्या तरुण मित्राला 'आश दे एस्' लाच एल्. बरोबर घेऊन गेला...मी मात्र मुलं आणि नर्स यांना घेऊन न्युइलीला परतले; अगदी दाराशी

आलो, तेव्हा मी नर्सला म्हटलं, "तूही मुलांच्या बरोबर इथे थांबशील ना?" पण ती म्हणाली, "नको बाईसाहेब...मला वाटतं आम्ही परत गेलेलं बरं. बाबालोकांना जरा आता विश्रांतीची जरूर आहे..."

मी त्यांचे पापे घेतले, अन् स्वतःदेखील लवकर परतायचं आश्वासन दिलं... जाता जाता देईद्रनं आपले ओठ खिडकीच्या काचेवर टेकले होते—मी पुढे वाकले, अन् त्या क्षणी तिचे ओठ जिथे टेकले होते, त्याच जागी काचेचा पापा घेतला किती थंडगार काच...माझ्या मनःपटलावरून एक उदासगूढ छाया तरळून गेली!

...मी माझ्या भल्या मोठ्या स्टुडिओत पाऊल टाकलं...अजून तालमीला वेळ होता...थोडी विश्रांती घ्यावी, असा विचार करून माझ्या त्या वरच्या दालनाकडे मी चढून गेले, अन कोचावर अंग टाकलं...कुणी पाठवलेली फुलं अन बॉनबॉन्सची एक पेटी तिथे पडलेली होती. त्यातलं एक बॉनबॉन घेऊन ते आरामात चघळत मी विचार करत होते...तसा सुखदुःखाचा जमाखर्च पाहिला तर मी पुष्कळ सुखात आहे,– कदाचित् जगातील सर्वांत सुखी स्त्री मीच असेन, असंच माझं मला उत्तर मिळेल, नाही?...माझी कला, यश, संपत्ती, मला लाभलेली प्रीती...अन् या सर्वांवर कळस म्हणजे माझी चित्रांसारखी सुंदर मुलं...!

आरामशीरपणे चघळलेल्या चॉकोलेटस्‌चं वंगण मिळून माझं विचारचक्र विनासायास फिरत होतं..."एल. परत आलाय्, आता सारं काही ठीक होईल..." इतक्यात एक अनोळखी' अपार्थिव किंकाळी माझ्या कानावर आदळली...

मी डोकं वळवून पाहिलं...एल्. एखाद्या प्यालेल्या माणसासारखा झोकांड्या खात तिथे उभा होता. त्याच्या गुडघ्यात शक्तीच उरली नव्हती...माझ्यासमोर तो कोसळलाच...अन् त्याच्या ओठातून हे शब्द ओघळले..."मुलं...मुलं... मुलं गेली...कायमची..."

* * *

मला आठवतं, माझ्या अस्तित्वावर एक विचित्र निःशब्द, मूक, स्तब्धता पसरली...फक्त घशात मात्र फुललेला निखारा गिळावा, तशी धग होती; पण... पण मला कशाचा उमज कसा तो पडत नव्हता...मी त्याच्याशी अगदी हळुवारपणे बोलले, त्याला शान्त करायचा प्रयत्न केला...त्याला सांगितलं, हे खरं असणं मुळी शक्यच नाही...

तेवढ्यात इतर लोकही जमले...नक्की काय झालं होतं, याचा बोधच मला होत नव्हता...इतक्यात एक दाढीवाला मनुष्य आत आला— काळीभोर दाढी! कुणीतरी सांगितलं, तो डॉक्टर आहे..."खरोखरच हे खरं नाही"— तो म्हणाला, "मी वाचवतो की नाही पहा त्यांना..."

मी वेडीनं ते खरं मानलं– त्याच्याबरोबर जायचं होतं, पण लोकांनी मागे ओढून धरून ठेवलं मला...आशेला बिलकूल जागा नव्हती, हे मला कळायला नको; म्हणून सारी धडपड...पण हे अर्थात मला नंतरच कळलं...त्या धक्क्यानं एखादवेळी मला वेडसुद्धा लागायचं, असं सर्वांना वाटत होतं...पण खरं म्हणाल तर एक प्रकारच्या परमोच्च आनंदाच्या तंद्रीतच मी स्वतः हरवून बसले होते... आजूबाजूला सारेजग ओक्साबोक्शी रडताना दिसत होते, पण मी रडले नाही... उलट सर्वांचं सांत्वन करण्याची एक उत्कट इच्छाच माझ्या मनात उमळली होती. आता मागे वळून पाहताना माझ्या त्यावेळच्या त्या विचित्र मनःस्थितीचा अर्थ लावणं देखील मांझ मला कठीण वाटतं...एका आध्यात्मिक सजगतेच्या पातळी-वर त्या क्षणी मी पोहोचले होते की काय नकळे! कदाचित त्यामुळेच जणू मला माहीत होतं, की 'मृत्यू' हे सत्य नाही!...ती समोर थंडगार पडलेली मेणाची शरीरं, म्हणजे माझी बाळं नव्हतंच...ती केवळ त्यांनी बदलून टाकलेली त्यांची वस्त्रं...आत्म्याच्या रूपात माझी बाळं एका प्रकाशमय अस्तित्वात अजून होतीच होती...अन् ते अस्तित्व शाश्वत होतं...अनन्तकाळचं होतं...

...प्रत्येक 'आई'च्या मुखातून दोनच क्षणी असे उत्कट उद्गार बाहेर पडतात...की जे तिच्या स्वतःच्याही जाणिवेपलीकडून उमटलेले असतात...तिच्या अस्तित्वाशी त्या क्षणीच्या उद्गारांचा काडीमात्र संबंध लावता येत नाही...ते दोन क्षण, म्हणजे 'जन्म' आणि 'मृत्यू'!...कारण जेव्हा ते छोटे थंडगार हात मी हातात घेतले, अन् ते हात यापुढे कधीच उलट माझ्या हात उत्तरादाखल दाबू शकणार नाहीत, हे मला जाणवलं, तेव्हा मी माझ्याच तोंडून निघालेला तो भयंकर उद्गार, ती किंकाळी ऐकली!...अगदी तशीच, जशी ह्या बाळांच्या जन्माच्या क्षणी मी ऐकली होती – माझ्याच तोंडून! 'तशीच' तरी कशी म्हणायची? एक क्षण परात्पर आनंदाचा नि दुसरा दारुण दुःखाचा! काय कुणास ठाऊक, – कारण उमजत नाही, समजत नाही, पण खात्री मात्र वाटते, की तीच ही किंकाळी – तोच उद्गार! मग असं तर नसेल? की या विश्वात सुख, दुःख हर्षामर्ष या साऱ्यासाऱ्यांना सामावून बसलेला सर्वंकष असा एकच उद्गार आहे आणि तो म्हणजे मातेचा प्रसवक्षणींचा धन्योद्गार?

* * *

...कित्येकदा असं होतं, की उगाच काही हलक्याफुलक्या कामासाठी आपण बाहेर पडलेलो असताना खिश्चन अंत्यविधीसाठी निघालेली, भयाचं सावट आणणारी काळी शवयात्रा आपल्या अंगावरून जाते...आपला थरकाप होतो अन् आपल्या सगळ्या जीवाभावाच्या माणसांची आठवण मनात तरळून जाते...मग ओघानेच येणाऱ्या–एक दिवस आपल्यालाही असल्या काळ्या प्रेतयात्रेत शोकाकुल

मनानं सामील व्हावं लागणार आहे, – ह्या विचाराचा मनात शिरकाव होऊ न देण्यासाठी, आपली सारी धडपड सुरू होत...

...माझ्या अगदी लहानपणापासून माझं, 'चर्च' आणि चर्च या संस्थेशी संबंधित असलेल्या सर्व गोष्टी, यांच्याशी भयंकर वैर आहे...इंगरसॉल, डार्विन आणि मूर्तिपूजक पंथीयांचं तत्त्वज्ञान यांच्या वाचनमननानं हे वैर वाढतच गेलं... लग्नविधीच्या चालू संकेताला माझा विरोध आहेच...अन् अन्त्यसंस्कारांची आजची रूढ प्रथा तर 'जंगली' म्हणावी, इतकी मला भयंकर नि घृणास्पद वाटते...विवाहविधीला नकार देण्याचं, आणि मुलांच्यावर नामकरणाच्या वेळचे धार्मिक संस्कार चर्चच्या प्रथेप्रमाणे न करण्याचं धैर्य मी एकदा दाखवलं होतंच; त्याच चालीवर आता त्यांच्या मृत्यूच्या वेळीसुद्धा 'ख्रिश्चन अंत्यसंस्कार' या नावाखाली जे विडंबन चालतं, त्याला वाव द्यायचं मी सपशेल नाकारलं...मला एकच ध्यास होता...त्या भीषण अपघाताचं रूपांतर सौंदर्यात बदलून आणण्याचा ...मनातली व्यथा आसवातून ओघळून जाण्यापलीकडची होती...मला मुळी रडायला येतच नव्हतं...भेटायला येणाऱ्या असंख्य मित्रमंडळींना आणि हित-चिंतकांना रडू आवरत नव्हतं... आणि बागेत, रस्त्यावर तर गर्दी करून लोक अश्रू ढाळत उभे होते...पण मी ! माझ्या डोळ्यांना पाण्याचं टिपूससुद्धा येत नव्हतं...माझा एकच आग्रह होता...हव्यास होता...सहानुभूती व्यक्त करायला येणारी ही काळ्या वेषातली माणसं...तो सारा काळाकबरा देखावाच मला बदलून सुंदर बनवायचा होता...काळे कपडे मी कुठे घातले होते ? कपडे बदलून काय साधणार होतं ? मला हे असे शोकसूचक कपडे वापरणं नेहमीच मूर्खपणाचं नि अनावश्यक वाटत आलं आहे...ऑगस्टिन, एलिझबेथ आणि रेमंड यांनी माझ्या मनातली ही भावना ओळखून स्टुडिओत एक मोठी फुलांची रास रचली...अन् माझं मन किंचित थाऱ्यावर आल्याक्षणी माझ्या कानावर काय पडलं असेल, तर कोलोनच्या वाद्यवृंदातून उमटणारं ग्लूकच्या 'ओरफी'चं सुंदर शोकगीत...!!

...पण एका दिवसात घाणेरड्या प्रवृत्ती बदलून त्यांचं सौंदर्यनिर्मितीच्या ऊर्मीत रूपांतर होणं, म्हणजे किती कठीण गोष्ट आहे !... माझ्या हातात सारं असतं तर ती भयाण काळ्या हॅटस् घातलेली माणसं दिसली नसती...शवपेट्या नसत्या...ती अर्थहीन विडंबनं, त्या चेष्टा–ज्यामुळे 'मृत्यू'तलं उन्नयन विसरून त्याचं सामान्य, अघोरी रूपच शिल्लक उरतं – यांचा कुठे मागमूसदेखिल ठेवला नसता ! शेलीच्या देहाला समुद्राच्या सान्निध्यात, नि समुद्राच्याच साक्षीनं अग्नी देण्यात बायरननं किती कमालीचं औचित्य दाखवलं...!...तसं काही इथे घडणं शक्य नव्हतं...मग आमच्या त्या काळच्या संस्कृतिसमजेनुसार त्याहून सौंदर्य-तुलनेत कनिष्ठ असा, दहनविधी मी स्वीकारला...

माझी मुलं अन् त्यांची ती गोड नर्स, यांच्या पार्थिव अवशेषांचा निरोप घेतानाही त्यांच्याकडून काही प्रत्युत्तर, किंवा चैतन्याची चाहूल असलेला खुणेचा पालव.. मला मिळेल, असं मला वाटत होतं...मला वाटतं, कधी तरी तो दिवस उजाडेलच...तेव्हा मग साऱ्या जगातला बुद्धिवाद जागा होऊन चर्चप्रणित वाणेरड्या विधींविरुद्ध बंड करून उठेल...अन् अन्त्यसंस्कारांची एखादी शुभसुंदर कल्पना काढून नवीन प्रथा म्हणून ती प्रत्यक्षात उतरवेल...दहनस्थल, ही जमिनीत शवं पुरण्याच्या भयंकर रूढीपेक्षा प्रगतिपथावरची बरीच पुढची पायरी आहे खरीच ...अन् माझ्यासारख्या विचारसरणीची माणसं काही थोडीथोडकी नसतील... पण माझं मत म्हणून हे विचार पुढे मांडण्याच्या माझ्या प्रयत्नावर मात्र सडकून टीका झाली...कर्मठ धर्मवेडे लोक तर अतिशय चिडून गेले...माझ्या जिवलग बाळांना द्यायचा तो निरोप सुसंवादी, सुरंगी, सुप्रभ नि सुंदर वातावरणात ...सुंदर तऱ्हेनं द्यावा, या माझ्या हट्टासुळे ...आणि त्यांचे देह कृमिकीटकांना चार घास भरवण्यासाठी जमिनीत न पुरता अग्नीच्या साहाय्यानं पंचत्वात विलीन होऊ देण्याच्या माझ्या इच्छेमुळे, मी एक कठीण काळजाची भयंकर बाई आहे, असंच या धर्ममार्तण्डांना वाटलं! 'जीवन,' 'प्रीती' आणि 'मृत्यू' यांकडे पाहण्याच्या आपल्या दृष्टिकोणात बुद्धिवादाचा, प्रज्ञेचा, थोडा तरी वरचष्मा होईल, असा काळ यायला किती तिष्ठावं लागणार आहे, कोण जाणे!

मी त्या दहनस्थलाच्या उदासीन तळघराशी आले आणि त्या शवपेट्या माझ्या दृष्टीला पडल्या...त्यात विसावलेली ती सोनेरी डोकी, ते ओटंगणारे—फुलांसारखे हात, ती छोटी अचपळ पावलं...माझ्या प्रेमाच्या या सबंध दौलतीचा घास आता अग्निज्वालांना भरवला जाणार होता, अन् पाठीमागे काय उरणार होतं, तर राखेची एक केविलवाणी मूठ!

...न्युइलीतल्या माझ्या स्टुडिओत मी परत आले...आत्महत्या करण्याचा माझा एक निश्चित बेत मनाशी ठरवूनच आले होते मी...मुलांच्या पाठीमागे, त्यांच्याशिवाय मी कशी जगणार होते? जगू शकले असते? पण माझ्या शाळेतल्या इतर साऱ्या चिमुकल्यांनी मला वेढा घातला...म्हणाल्या, "इझाडोरा, आमच्यासाठी तरी तुला जगायला हवं...आम्हीसुद्धा तुझीच मुलं नाही का?"...ह्या शब्दांनी मला जाग आली...देईद्रे अन् पॅट्रिक यांच्या मृत्यूमुळे उमाळ्यानं हमसूनहुमसून रडणाऱ्या या इतर मुलांचं सांत्वन मीच करायला हवं, याची जाणीव झाली...

हे दुःख आयुष्यात फार पूर्वी माझ्या वाट्याला आलं असतं, तर त्यातून मी बाहेर पडू शकले असते...त्याच्यावर मी मात करू शकले असते...अजूनही खूप पुढच्या वयात आलं असतं, तर ते इतकं भयंकर वाटलं नसतं...पण आरोग्य,

शक्ती, उत्साह, यांनी जीवन रसरसून ओसंडून जात असलेल्या या क्षणी, त्या दुःखानं माझा जोम, माझं चैतन्य—सारं सारं काही समूळ उद्ध्वस्त करून टाकलं ...!...एखाद्या गहिऱ्या, समजदार प्रीतीनं आधार देऊन मला या सर्वांपासून दूर नेलं असतं तर...पण एल्. नं मला तसा प्रतिसाद दिला नाही...!

...निर्वासितांच्यामध्ये काम करायला रेमंड नि त्याची बायको पेनिलोप अल्बानियाला जायला निघाले होते...त्यानं तिथे जायच्याबद्दल माझं मन वळवलं होतं ...एलिझबेथ अन् ऑगस्टिन यांच्याबरोबर मी कॉर्फ्यूला निघाले...रात्रीच्या मुक्कामापुरतं आम्ही मिलनला उतरलो. चार वर्षांपूर्वी पॅट्रिकच्या जन्माबाबतच्या 'होय–नाही' तल्या संघर्षानं घेरलेले तासन्तास जिथे मी काढले होते, तीच खोली मला दिली होती...त्यानंतर पॅट्रिक जन्मलाही होता—सेंट मार्कोमध्ये पाहिलेल्या स्वप्नातला तो दैवी चेहराच घेऊन तो माझ्या पोटी आला...आला... अन् आता गेलासुद्धा...

जेव्हा पुन्हा त्या चित्रातल्या स्त्रीच्या उदासभीषण डोळ्यांत पाहिलं, तेव्हा ते जणू म्हणत होते, "मी म्हटलं तेच सिद्ध झालं की नाही अखेर?...साऱ्या वाटा शेवटी मृत्यूच्या उंबरठ्यापाशीच येऊन थांबतात, होय ना?"—भासच असणार तो; पण त्यामुळे माझा भीतीनं असा थरकाप झाला, की मी धावतच बाहेर आले, अन् मधल्या बोळाच्या टोकाशी ऑगस्टिनला गाठून मला दुसऱ्या होटेलमध्ये घेऊन जाण्याबद्दल त्याच्यापाशी हट्टच धरला!

ब्रिंडिसीहून पुढे आम्ही बोटीनं निघालो...अन् लवकरच एका रम्य सकाळीं आम्ही कॉर्फ्यूला पोहोचलो...सारा निसर्ग हसरा नि आनंदी वाटत होता, पण मला त्यापासून काही दिलासा मिळेना...त्यावेळीं बरोबर असलेली माणसं सांगतात, की पुढे पुष्कळ दिवस, – दिवस काय अन् आठवडे काय म्हणा – मी आपली नुसती एकटक समोर दृष्टी लावून बसलेली होते!...वेळाचं भान तर हरवलंच होतं...जिथे जगण्याचीच इच्छा लोपली होती – जागचं उठावं, हलावं असं देखिल वाटत नव्हतं, अशा एका रंगविहीन विराण प्रदेशात मी जाऊन पोहोचले होते...जेव्हा खऱ्या दुःखाची गाठ पडते, तेव्हा त्या हतबुद्ध जीवाला आपल्या वेदनेला मोकळं करायला ना शब्दाची वाट सापडते, ना आविर्भावाची ...शिळा बनलेल्या 'निओब'प्रमाणे एका जागी बसून मरणातल्या संपूर्ण लयाला मी आवाहन करत होते...

एल्. लंडनला होता...एल्.च्या नुसत्या परत येण्यानंही कदाचित या भयंकर बेभान – बेशुद्ध अवस्थेतून मी बाहेर पडू शकेन, असं मला वाटत होतं...प्रेमळपणे अंगाभोवती लपेटणाऱ्या हातांची ऊब मला मिळाली, तर माझं जीवन कदाचित पुन्हा थाऱ्यावर येईल...

एक दिवस, मला त्रास न देण्याबाबत सर्वांना ताकीद देऊन, माझ्या खोलीतल्या खिडक्यांचे पडदे सोडून, छातीवर हात गुंफून मी अंधारात पडून राहिले...निराशेचा अगदी कडेलोट झाला होता...एल्.ला पुन्हा पुन्हा एक मनोमन संदेश पाठवायचा मी आटोकाट प्रयत्न करत होते...

" माझ्याकडे ये...मला तुझी जरूर आहे...मरणाच्या पंथावर आहे मी... तू आला नाहीस तर मी मुलांची वाट धरलीच म्हणून समज..."

हा जप मी पाद्री लोकांच्या प्रार्थनेतल्या आवाहनासारखा इतक्यांदा केला... मी उठले, तेव्हा मध्यरात्र झाली होती...त्यानंतर पुन्हा झोप लागली तीही अशी अशान्त...अस्वस्थ...

दुसऱ्या दिवशी ऑगस्टिन मला उठवायला आला, तेव्हा त्याच्या हातात एक तार होती !

' कृपा करून इझाडोराचं कुशल कळवा...कॉर्फ्यूला ताबडतोब येत आहे... एल्. '

पुढच्या साऱ्या प्रतीक्षेच्या दिवसांत आतापर्यंतच्या निबिड अंधकाराला पहिल्या-वहिल्या आशेच्या किरणाचा कोंब फुटणार, अशा अपेक्षेच्या तंद्रीतच मी होते...

एक दिवस सकाळी एल्. येऊन पोहोचला– फिकट चेहऱ्यानं...अस्वस्थ मनानं...

" मला वाटलं, तूही मला अंतरलीस कायमची, " तो म्हणाला...

मग त्यानंच सारा उलगडा केला...ज्या दिवशी दुपारी मी त्याला तो संदेश पाठवला, त्याच दिवशी, माझी अस्पष्टशी आकृती त्याच्या बिछान्याच्या पायथ्या-पाशी उभी राहून, तेच माझे अनेकवार जपलेले निरोपाचे शब्द उच्चारताना त्यानं पाहिली होती...' माझ्याकडे परत ये...परत ये.. मला तू हवा आहेस... तुझी मला जरुरी आहे...तू नाही आलास तर मी मरून जाईन...'

त्याच्या माझ्या दरम्यान मानसिक सुसंवादाचा हा एक बंध असल्याचा असा पुरावा मिळताक्षणी मला क्षणभर आशा वाटली...कदाचित एखाद्या उत्स्फूर्त प्रेमाविर्भावानं भूतकाळावरची दुःखदायक सावट दूर करता येईल...अन् काळजात कुठे तरी पुन्हा चैतन्याची चाहूल उठेल...मला सुखसमाधान द्यायला माझी मुलं इहलोकात कदाचित परत येतील...पण असं कुठचं व्हायला ! मला अंतर्यामी लागलेली ती तीव्र ओढ ...तं माझं दुःख...हे सारं काही एल्.ला पेलणं शक्य नव्हतं...एका सकाळी तो आला तसाच, आधी न सांगतासवरता एकाएकी निघूनही गेला...कॉर्फ्यूहून बोट दूर दूर जाताना मी पाहिली, अन्...अन् तो त्या बोटीवर होता, हे आतूनच मला जाणवलं...निळ्या निळ्या पाण्यावरून अलगद सरकणारी बोट झरझर दुरावत होती...आणि मी...पुन्हा एकदा एकटी पडले

होतें...एकटी...!

मी स्वतःशी विचार केला– झट्दिशी हे आयुष्य संपवलं पाहिजे, किंवा रात्रंदिवस काळीज कुरतडणाऱ्या या दुःखावर मात करून जीव जगवता येईल, असा काही उपाय तरी शोधून काढला पाहिजे...कारण दररोज रात्री...जागेपणी काय अन् झोपेत काय, मी पुन्हा पुन्हा ती शेवटची भयंकर सकाळ जगत होतें!... देईद्रेचा, "आपण कुठे जाणार आहोत सांग पाहू?" असं विचारणारा आवाज कानात घुमत होता, "बाईसाहेब, आज मुलं कुठंच नाही गेली तर बरं नाही का?" हे नर्सचं सूचक बोलणं ऐकू येत होतं– मी घाबरून उत्तर देत होते, "हो, हो – तेच बरं होईल...तुझं म्हणणं खरं आहे...त्यांना घरीच राहू दे... बाई ग, आज त्यांना बाहेर जाऊ देऊ नकोस..."

...रेमंड अल्बानियाहून आला...तो नेहमीप्रमाणे उत्साहाच्या भरातच होता..."साऱ्या देशाला आज आपली जरुरी आहे...खेडी उद्ध्वस्त झालीत ...पोराबाळांची उपासमार चाललीय्...अशा वेळी तुझ्या वैयक्तिक दुःखातच गुरफटून जाण्याएवढा स्वार्थीपणा तुझ्याच्यानं कसा करवतो? चल, मुलामाणसांना खाऊ घालायला, बायकामंडळींना धीर द्यायला मदत कर ..."

अखेर त्याची विनवणी फळाला आली...मी पुन्हा एकदा माझं ग्रीक ट्यूनिक अन् सॅन्डल्स् चढवले, अन् रेमंडच्या मागोमाग अल्बानियाला निघाले... अल्बानियाच्या निर्वासितांच्या मदतीखातर निवाऱ्याच्या छावण्या निर्माण करण्यासाठी रेमंडनं अजबच कल्पना काढल्या होत्या...त्यानं कॉर्फ्यूच्या बाजारात जाऊन कच्ची लोकर विकत घेतली, अन् एका भाड्यानं घेतलेल्या बोटीवर ती लादून, 'सान्ती क्वारान्ता' या निर्वासितांच्या मुख्य बंदरात घेऊन गेला...

मी म्हटलं, "रेमंड, त्या साऱ्या उपाशी लोकांना तू कच्ची लोकर का खायला घालणार आहेस?"

"जरा दम धर...लवकरच तुला त्यातलं मर्म कळेल...मी त्यांना पाव आणून दिला, तर तो जेमतेम आजच्या पुरताच ठरेल...पण मी त्यांच्यासाठी लोकर आणली आहे...ती त्यांना भविष्यकाळही दाखवेल..."

निर्वासितांचं एक केंद्र रेमंडनं जिथे उभारलं होतं, त्या सान्ती क्वारान्ताच्या खडकाळ किनाऱ्याला आम्ही लागलो...तिथे एक सूचना लिहिलेली होती... "लोकर कातायला तयार असतील, त्यांना प्रत्येक दिवशी एक ड्राक्मा मिळेल..."

गरीब, रोड-क्षीण, सुकेल्या बायकांची एक रांग लवकरच उभी राहिली. त्या एक ड्राक्माच्या मोबदल्यात, बंदरात ग्रीक सरकारतर्फे विकलं जाणारं पिवळं धान्य तरी मिळू शकत होतं...

मग रेमंडनं आपली छोटी बोट पुन्हा एकदा कॉर्फ्यूकडे वळवली...तिथे सुतार लावून त्यानं हातमाग तयार करवून घेतले, आणि तो सान्ती कारान्ताला परतला. ...मग दुसरी एक सूचना झळकली : 'कातलेली लोकर निरनिराळ्या नमुन्याबर-हुकूम विणायचं काम करणाऱ्यांनाही दिवसाकाठी एक ड्राक्मा मिळेल...'

कितीतरी उपाशीतापाशी लोकांनी या कामासाठी आपली वर्णी लावली... पुरातन ग्रीक फुलदाण्यांवरचे नमुने रेमंडनं त्याला दिले...लवकरच समुद्रकाठी विणकरी स्त्रियांची एक रांगच्या रांग दिसायला लागली...रेमंडनं त्यांना विणताना एकत्र गाणी म्हणायला शिकवलं होतं...संपूर्ण विणल्यानंतर ते सारे नमुने कोचाची सुंदर आवरणं बनवायच्या उपयोगाचे झाले !...इतके सुंदर, की रेमंडनं पन्नास टक्के नफ्यानं ते लंडनला विकायला पाठवले...या नफ्यातून त्यानं मग तिथे एक भटारखाना सुरू केला...या भटारखान्यात चांगला पांढरा पाव तयार करून, ग्रीक सरकारच्या पिवळ्या धान्यापेक्षा पन्नास टक्के स्वस्त दरानं तो तो विकू लागला...अशा तऱ्हेनं त्यानं त्याचं खेडं उभवलं...मार्गाला लावलं !

आम्ही समुद्राच्या सान्निध्यातच एका तंबूत तळ ठोकला होता...दररोज सूर्योदयाच्या सुमाराला आम्ही समुद्रात बुडी मारून खूप पोहायचं...रेमंडकडे अधूनमधून ब्रेड अन् बटाटे उरायचे, मग तिथल्या टेकड्यांपलीकडे जाऊन तिथल्या खेड्यांतून भुकेलेल्यांना ब्रेड वगैरेचं वाटप करायचं...

...अल्बानिया हा एक विचित्र, उदास देश आहे...गरजणाऱ्या झेऊसचं पहिलं पूजापीठ इथे होतं...त्याला 'गरजणारा झेऊस' असं म्हणायचं कारण म्हणजे, या देशात हिवाळ्यात काय किंवा उन्हाळ्यात काय, वादळांचा कडकडाट गडगडाट एकसारखा चालू असतो – अन् धो धो पाऊस पडतो...नुसती ट्यूनिक्स् नि सॅन्डल्स्, या वेषात या वादळातून वाट काढत जात असताना पावसात अभ्यंग स्नान घडणं, हे रेनकोट घालून पावसातून चालण्यापेक्षा किती उत्साहवर्धक असतं, त्याचा मला इथे प्रत्यय आला...

...किती तरी करुण दृश्यं इथे माझ्या दृष्टीस पडली...आपल्या छोट्या तान्ह्याला हातात कवळून झाडाच्या निवाऱ्याला बसलेली एक आई...अन् तिला ओटंगून बसलेली तिची आणखी तीन–चार मुलं...सारीच उपाशी अन् बेघर...उघड्यावर पडलेली...त्यांचं घर आगीत जळून खाक झालं होतं...त्या बाईचा नवरा आणि बाप तुर्की लोकांकडून मारले गेले होते...गाईगुरं कुणी चोरून नेली, अन् पिकं होती उद्‌ध्वस्त झालेली...ती बिचारी आई उरलेल्या पोरांना घेऊन तिथे ताटकळत होती...अशा सर्वांना रेमंडनं बटाट्यांची पोतीच्या पोती पुरवली...

तंबूत आम्ही परतायचे, ते भलते थकूनभागून...तरीही एका आगळ्याच

आनंदाची—समाधानाची चाहूल मला माझ्या अंतर्यामी लागू पहात होती... माझी मुलं काळानं नेली होती खरीच...पण दुसऱ्यांची होती ना...तीही भुकेलेली अन् दुःखी...त्यांच्यासाठी मी जगू शकणार नाही का?

...सान्ती क्वारान्तामध्ये ' केशभूषा ' करणारी ' सुंदरबनं ' नव्हती!...तेव्हा तिथे मी प्रथम माझे केस कापले, अन् समुद्रात फेकून दिले...

माझी शक्ती अन् आरोग्य जसंजसं परत यायला लागलं, तसतसा निर्वासितांच्या मेळाव्यातला हा जीवनक्रम मला असह्य होऊन गेला...बाकी सन्ताच्या नि कलावन्ताच्या जीवनात आमूलाग्र फरक असतो, हे उघडच आहे...माझं कलावंत मन माझ्या ठायी एकाएकी जागं होऊन उठलं...अन् मी विचार केला—माझ्या हताशी असणाऱ्या तुटपुंज्या सामग्रीनं, अल्बानियन निर्वासितांच्या रूपानं अंगावर येणारा हा दुःखाचा पूर निवारणं, मला सर्वस्वी अशक्य होतं...सर्वस्वी अशक्य होतं...

## २६

एक दिवस मला वाटलं की हा खुपशा डोंगरांचा, उत्तुंग खडकांचा आणि वादळांचा प्रदेश सोडून मी कुठे तरी दूर गेलंच पाहिजे...मी पेनिलोपला म्हटलं, "हे सारं दुःख मला आता पहावेनासं झालेलं आहे...एखाद्या मशिदीत एक संथ जळणारी दिवटी लावून एकटं बसायची ओढ मला लागली आहे...पायदळीं पर्शियन गालिच्याचा मऊ स्पर्श मला हवासा वाटतो आहे...या रस्त्यांना मी कंटाळून गेले आहे...येतेस का माझ्याबरोबर? कॉन्स्टॅन्टिनोपलची एक उडती सफर आपण करून येऊ..."

पेनिलोपला ती कल्पना भलतीच आवडली. आम्ही आमचे ग्रीक ट्यूनिक्स बदलून साधे कपडे घातले, आणि कॉन्स्टॅन्टिनोपलची बोट पकडली...सारा दिवसभर मी डेकवरच्या माझ्या कॅबिनमध्ये काढला...अन् रात्री इतर सारे प्रवासी झोपून गेल्यानंतर डोक्याभोवती एक स्कार्फ लपेटून घेऊन दाराबाहेर पडले ती सरळ डेकवरच्या चांदण्यातच...जहाजाच्या एका बाजूला रेलून उभी असलेली आणखी एक आकृती दिसत होती...चंद्राकडेच डोळे लावून बसलेली...शुभ्र-पांढरा वेष– अगदी हातमोज्यांपर्यन्त...तो एक तरुण होता...हातामध्ये एक छोटं काळं पुस्तक धरलेलं...त्यातून मधूनमधून काहीतरी वाचताना आणि नंतर प्रार्थने-सारखं काही पुटपुटताना दिसला तो...त्याचा पांढराफिका ओढलेला चेहरा, खरं म्हणजे त्याच्या काळ्याभोर विशाल डोळ्यामुळे आणि माथ्यावरच्या तशाच गडद काळ्या केसांमुळेच उजळल्यासारखा दिसत होता...

मी जवळ येताक्षणी तो अनोळखी पुरुष मला म्हणाला, "तुमच्याशी बोलण्याचं धाडस मी करणार आहे...मात्र त्याला तसंच कारणही आहे. तुमच्या दुःखाची

बरोबरी करेल असंच भयंकर दुःख माझ्याही वाट्याला आलेलं आहे....मी कॉन्स्टॅन्टिनोपलला जातोय् ते माझ्या आईचं सांत्वन करायलाच...माझी आई बिचारी दुःखानं पार मोडून गेलीय्...महिन्यापूर्वीच माझ्या सर्वांत मोठ्या भावानं आत्महत्या केल्याची शोचनीय बातमी तिच्या कानावर पडली...आणि नंतर जेमतेम दोन आठवड्यांतच तो दुसरा घाला पडला...माझ्या दुसऱ्या भावानंही जीव दिला !...आता मीच एक उरलो तिला...पण मी तिचं काय समाधान करू शकणार आहे कुणास ठाऊक...कारण माझी स्वतःचीच मनःस्थिती इतकी भयंकर उदास आहे, की या क्षणी मला सर्वांत सुखद गोष्ट काही वाटत असेल... तर ती म्हणजे...माझ्या भावांचीच वाट धरणं..."

आम्ही तसेच एकमेकांशी बोलत उभे राहिलो...तो नट होता...हॅम्लेट नाटकात, नायकाचीच भूमिका करायची असल्यानं, त्याचा अभ्यास तो करत होता...त्याच्या हातातलं पुस्तक हॅम्लेटचं होतं, वगैरे सारं त्यानं मला सांगितलं...

दुसऱ्या दिवशी पुन्हा आम्ही डेकवर भेटलो...दोन दुःखी भुतांसारखे... दोघेही आपापल्या विचारात बुडून गेलेले...पण तरी एकमेकांच्या उपस्थितीनंही थोडाफार दिलासा मिळत होता आम्हाला...पहाटेपर्यंत आम्ही डेकवरच होतो.

कॉन्स्टॅन्टिनोपलला आम्ही पोहोचलो...संपूर्ण काळा पोशाख घातलेली एक उंच देखणी स्त्री त्याला भेटायला आलेली दिसली...तिनं त्याला मिठी मारली...

पेनिलोप आणि मी 'पेरा पॅलेस' हॉटेलमध्ये उतरलो, अन् पहिले दोन दिवस कॉन्स्टॅन्टिनोपलमध्ये भटकण्यातच घालवले...अरुंद रस्ते असलेल्या जुन्या शहरांतूनच मुख्यतः आम्ही फिरलो...तिसऱ्या दिवशी एक अनपेक्षित व्यक्ती मला भेटायला आली...बोटीवरच्या माझ्या त्या दुःखी मित्राची, त्या दिवशी धक्क्यावर भेटायला आलेली आईच होती ती ! बिचारी भारीच व्यथित होऊन आली होती...तिनं तिच्या त्या दोघां सुस्वरूप मृत मुलांचे फोटो मला दाखवले, अन् म्हणाली, "ही मुलं तर देवाघरी गेलेली आहेत, त्यांना परत आणणं कधीही शक्य नाही...पण या तिसऱ्याचे–'राऊल' चे प्राण वाचवण्याची भीक मागायला मी तुझ्याकडे आलेय्. मनातल्या मनात मला राहूनराहून वाटतं की तोही त्याच्या भावांच्या मागेच जाऊ पहातोय्..."

"पण मी त्याच्यासाठी काय करू शकणार ?...अन् कशापासून त्याला धोका आहे असं तुम्हाला वाटतंय् ?"

"हे शहर सोडून 'सॅन स्टेफानो' नावाच्या लहानशा खेड्यात तो अगदी एकटाच जाऊन राहिलाय्...अन् जातानाचा त्याचा आततायी–अन् कमालीचा निराश चेहेरा पाहिल्यावर तर एका भयंकर शंकेनं इकडे माझा जीव अगदी गलबलून गेलाय्...खरं सांगू का ? तुमची त्याच्यावर इतकी छाप पडलेली मला दिसत

होती, की हे कृत्य किती गर्हणीय आहे...हे तुम्हीच त्याला पटवून देऊ शकाल असं माझ्या मनानं घेतलं...त्याच्या या आईबद्दल कीव वाटून तिच्यासाठी तरी तो पुन्हा जीवनाला सामोरा जाईल, असं काही तरी तुम्हीच करू शकाल..."

"...पण इतकं निराश व्हायला त्याला झालंय् तरी काय ?"

"त्याच्या भावांनी का जीव दिला, हे सुद्धा जर मला माहीत नाही, तर ह्या गोष्टीचा तरी काय उलगडा मी करू शकणार? एवढी देखणी, तरुण अन् नशीबवान् मुलं ! का...का त्यांना मरणाचाच ध्यास लागावा ?..."

त्या बिचाऱ्या बाईनं अगतिकतेनं केलेली ती विनवणी ऐकून माझं मन अगदी विरघळून गेलं...अन् शेवटी, सॅन स्टेफानोच्या खेड्यात जाऊन राऊलचं मन ठिकाणावर आणण्यासाठी शक्य तितकी खटपट करण्याचं वचन मी तिला देऊन टाकलं ! हॉटेलमधल्या नोकरानं सांगितलं की सॅन स्टेफानोचा रस्ता खूप खडबडीत आहे...तेव्हा मोटारचा प्रश्नच निकालात निघाला...मग धक्क्यावर जाऊन मी एक लहानशी 'टग' बोटच ठरवली भाड्यानं...वारा सुटला होता, अन् बॉसफोरस सामुद्रधुनीतलं पाणी भयंकर खळखळ करत होतं !...पण आम्ही त्या छोट्या खेड्याला सुखरूप येऊन पोहोचलो...राऊलच्या आईनं सांगितलेल्या खाणाखुणांच्या मदतीनं तो बंगला शोधून काढला...तिथल्या अगदी जुन्यापुराण्या स्मशानाच्या शेजारच्या एका एकाकी बाजूला एका बागेत तो पांढरा बंगला दिसला...बाहेर घंटा वगैरे नव्हतीच... बरं...दारावर टकटक केली तरी काही आतून उत्तर आलं नाही...मग दाराचाच जरा अंदाज घेतला, तर ते उघडंच !...मी आत शिरले ...तळमजल्यावरच्या खोलीत कुणीच नव्हतं...तेव्हा मग एक छोटा जिना चढून, दुसरं एक दार उघडून आत गेले...तिथे राऊल सापडला एकदाचा...ही खोली सबंध पांढऱ्या रंगाची होती...पांढऱ्या भिंती...पांढरीच दारं...नि जमीन-सुद्धा पांढरी...पांढरं आवरण असलेल्या एका कोचावर राऊल पडलेला होता... बोटीवर मला भेटला, तेव्हाच्या त्याच त्या पांढऱ्या शुभ्र सूटमध्ये होता तो.. तेच कमालीचे शुभ्र हातमोजेसुद्धा होते हातात...कोचाच्या जवळच एक छोटं मेज होतं... मेजावरच्या पैलूदार काचेच्या फुलदाणीत एक पांढरं सफेत लिलीचं फूल...अन् तिथेच शेजारी एक रिव्हॉल्वर !

तो पोरगा तर कुठच्या कुठे दूर हरवून बसला होता स्वतःला...माझा आवाज तिथे त्याच्यापर्यंत कसा पोहोचणार होता, कोण जाणे !...दोन-तीन दिवस त्याच्या काही पोटातही गेलं नसावं...मी त्याला हलवून माणसात आणायचा प्रयत्न केला...त्याच्याशी त्याच्या आईबद्दल खूप बोलले...त्याच्या भावांच्या मृत्यूमुळे आईच्या जिव्हारी केवढी खोल जखम झालेली आहे, हे त्याच्या मनावर ठसवलं ...अन् शेवटी तर हाताला धरून नुसत्या माझ्या शारीरिक बळाच्या जोरावरच

ोढून, त्याला धक्क्यावर थांबलेल्या माझ्या बोटीकडे नेलं...अर्थात् ते रिव्हॉल्वर थेच विसरून येण्याची काळजी मी घेतलीच होती!

परत येताना तो सारखा आसवं गाळत होता...अन् आईकडे परत जायला र सपशेल नकार दिला त्यानं...तेव्हा मग 'पेरा पॅलेस 'मधल्या माझ्या खोलीकडे ण्याबद्दल त्याचं मन मी वळवलं...अन् त्याच्या त्या दुःखातिरेकाचं कारण याच्याकडून काढून घ्यायचा प्रयत्न केला...कारण भावाचा मृत्यू, हे एकच कारण याच्या या अवस्थेच्या मुळाशी असेल, असं मला मुळीच वाटेना!...शेवटी तो टपुटला...

" तू म्हणतेस ते खरं आहे...या दुःखाच्या मुळाशी ' सिल्विओ ' आहे..."

" कोण ' सिल्विओ '? कुठे असते ती? " मी विचारलं...

" सिल्विओ:ही जगातली सर्वांत सुंदर व्यक्ती आहे...इथेच, कॉन्स्टॅन्टिनोपलमध्ये ाहतो तो, आपल्या आईबरोबर."

' सिल्विओ ' नाव मुलाचं आहे, हे कळल्यावर मला जरा धक्काच बसला! ..पण मी प्लेटोला मानत आले आहे...त्याची एकप्रकारची शिष्याच आहे मी ..अन् ' फेड्रुस ' हे आतापर्यंत रचल्या गेलेल्यातलं सर्वांत उत्तम प्रेमगीत आहे, असंच माझं मत आहे...माझी तर अशी धारणा आहे, की अत्यंत उदात्त प्रेम ी एक शुद्ध आत्मिक ज्योत असते...अन् ' सेक्स ' किंवा ' स्त्री-पुरुष भेद, ' या कल्पनेशी तिचं अर्थाअर्थी काहीसुद्धा नातं नसतं...त्यामुळे प्लेटोच्या त्या फेड्रुसनं काही लोकांना बावरून टाकलं, तसं मला काही झालं नव्हतं...

...इथे मात्र काहीही करून राऊलचं आयुष्य व्यर्थ न जाऊ देण्याचा निश्चयच करून मी बसले होते...तेव्हा त्याच्या त्या उत्तरावर काहीच टीकाटिप्पणी न करता, मी नुसतं विचारलं,

" सिल्विओचा टेलिफोन नंबर काय? "

मग सिल्विओचा आवाजच कानावर आला मुळी माझ्या...' एका गोड आत्म्यातून उमटलेली एक गोड साद ', असंच मला वाटलं त्या क्षणी...

" तू ताबडतोब इकडे निघून ये..."

थोड्याच वेळात सिल्विओ येऊन पोहोचला...अठरा वर्षांच्या आसपासचा एक सुंदर तरुण होता तो...महापराक्रमी झेऊसच्या हृदयात खळबळ उडवून देणारा ' गॅनीमीद ' सुद्धा त्या क्षणी कदाचित् असाच दिसला असेल!

" ...ही भावना जेव्हा अजूनही उर्मिल असते, आणि तो त्याच्या आणखीच जवळ आलेला असतो..., क्रीडेतले निरनिराळे पवित्रे घेत त्याला आलिंगन देत असतो, तेव्हा...आणि अशाच इतरही भेटीगाठीच्या वेळी, झेऊस ' गॅनिमीद '-रूपी अभिलाषेच्या प्रेमात पडलेला असताना, त्याच्या हृदयगाभ्यातल्या अंतः-

स्रोताचं ते कारंजं थुईथुई नाचून त्या प्रेमिकाला अंगांगी भिजवू लागतं...या स्रोताचा एखादा झोत त्याच्या अतम्यापर्यंत देखील जाऊन पोहोचतो...अन् तोही प्याला भरल्यानंतर पुन्हा ओसंडून जातो...आणि तसाच, खडकांच्या गुळगुळीत दरडीवर आपटून पुन्हा निवाल्याठिकाणी परतणारा वारा, किंवा प्रतिध्वनी यांच्या-प्रमाणे हा सौन्दर्यस्रोत देखील आत्म्याची गवाक्षंच असलेल्या डोळ्यातून थेट आत शिरून फिरून त्या सुंदरालाच येऊन भिडतो !...भिडताक्षणी प्राणांची पंख पालवण्याची लय वाढते...मनातले झरे पाझरू लागतात...ऊर्जा पल्लवित होते... अन् प्रेमिकाचा आत्माही प्रेमानं काठोकाठ भरून जातो...त्याच्या प्रेमाची रीतच ही ...पण ते प्रेम कशावर-कुणाबर, याची त्याची त्यालाच नसते जाण...स्वतःच्या अवस्थेचा त्यालाच नसतो पडलेला उमज...तो कशाचंही स्पष्टीकरण देऊ शकत नाही...असंच कुठून तरी उचललेलं असतं त्यानं ते आंधळेपण...ज्याला तो बघत असतो तो प्रेमिक, हाच असतो दर्पण त्याचा...पण ह्याही वस्तुस्थितीचं नसतं त्याला भान..."

— ज्योवेट —

आम्ही एकत्रच जेवण केलं, अन् संध्याकाळही एकत्रच घालवली — त्यानंतर केव्हातरी बॉसफोरस सामुद्रधुनी जिथून सहज दिसायची, त्या बाल्कनीत राऊल अन् सिल्विओ एकमेकाशी एकांतातल्याप्रमाणे अगदी हळुवार संभाषणात गुंगून गेलेले मी पाहिले...अन् सुटकेचा श्वास सोडला ...या वेळेपुरता तरी राऊलचा जीव वाचला होता. माझा प्रयत्न फळाला आल्याचं मी त्याच्या आईला टेलिफोन-वरून सांगितलं...ती बिचारी आनंदानं इतकी गहिवरून गेली, की तिला वाटणारी कृतज्ञतासुद्धा ती माझ्यापाशी त्या क्षणी व्यक्त करू शकली नाही...

त्या रात्री माझ्या त्या मित्रांचा निरोप घेताना मला मनात समाधान वाटत होतं...एका सुंदर मुलाचा जीव वाचवण्याचं सत्कृत्य माझ्या हातून घडलं होतं ! ...पण नंतर थोड्याच दिवसांत, त्याची आई पुन्हा माझ्याकडे आली...भयंकर बावरून गडबडून गेली होती...

"राऊल पुन्हा सॅन स्टेफानोच्या त्या बंगल्यात जाऊन बसलाय्...काहीही कर, पण आणखी एकवार त्याचा जीव वाचव..."

माझ्या चांगुलपणाचा हा गैरवाजवी फायदा घेतला जात आहे, असं माझ्या मनात येऊनसुद्धा त्या बिचाऱ्या आईची ती विनंती मी धुडकावून लावू शकले नाही...मात्र यावेळी बोटीच्या प्रवासातला गेल्या वेळचा त्रास आठवून मी मोटरनं तो रस्ता पार करायचा धोका पत्करला...सिल्विओलाही लगेच फोन केला, अन् माझ्या बरोबर यायला फर्मावलं...

"आता पुन्हा काय हे वेड घेतलंय् राऊलनं ? इतकं निराश व्हायला पुन्हा

काय झालंय् त्याला ? ”

“ त्याचं असं आहे...राऊल मला प्रिय आहे हे तर खरंच...पण त्याचं माझ्यावर जितकं प्रेम आहे, तितकंच माझंही त्याच्यावर आहे, असं काही मी सांगू शकत नाही...तेव्हा मग जगण्यात काही अर्थच नाही, असं त्याला वाटतं ! ”

...सूर्यास्ताच्या सुमाराला आम्ही निघालो...अन् रस्त्यावरच्या खाचखळग्यांचे हिसके नि हिंदकळणं सोसून एकदाचे बंगल्यावर जाऊन पोहोचलो...उदास बसलेल्या राऊलला आम्ही अवचितच घेरलं, आणि जबरदस्तीनं पुन्हा एकदा आमच्या हॉटेलवर त्याला परत घेऊन आलो...त्या रात्री नंतर कितीतरी वेळ पेनिलोपबरोबर हीच चर्चा नि बोलणं चाललं होतं आमचं...राऊलला जडलेल्या या विचित्र बाधेवर परिणामकारक असा उपाय काय...?

...दुसऱ्या दिवशी आम्ही दोघी कॉन्स्टॅन्टिनोपलच्या जुन्या गल्ल्याबोळांतून हिंडत असताना, एका अंधाऱ्या नि अरुंद गल्लीतल्या एका पाटीकडे पेनिलोपनं बोट केलं...पाटी आर्मेनियन भाषेत होती...पेनिलोपनं ती वाचून सांगितलं, की तिथे भविष्य सांगणारी एक बाई राहते...

“ चल, तिचाच सल्ला घेऊ...” पेनिलोप पुढे म्हणाली.

आम्ही एका जुनाट घरात शिरलो ...आणि एका गोल गोल जिन्याच्या पायऱ्या चढून...अन् ढासळणाऱ्या जुन्या बांधकामाची गदळ साठलेले अनेक पुराणकालीन बिट्टेबोळ ओलांडत एका पाठीमागच्या खोलीत गेलो...तिथे एक खूपच म्हातारी बाई एका रसायनाच्या काहिलीवर ओणवून बसलेली दिसली. काहिलीतून कमालीच्या चमत्कारिक गंधाचे भपकारे येत होते...ती जरी आर्मेनियन होती, तरी ग्रीकही तिला थोडंबहुत येत होतं...त्यामुळे पेनिलोपला तिचं बोलणं नीट समजत होतं. तिनं आम्हाला तिची हकीकत सांगितली...तुर्कांनी केलेल्या शेवटच्या कत्तलीत इथेच...ह्या खोलीत, तिचे सगळे मुलगे, मुली, अन् नातवंडं...घरातल्या अगदी तान्ह्या पोरापर्यंतची सारीजणं कशी डोळ्यादेखत मारली गेली होती !...त्याच क्षणापासून म्हणे तिला हे द्रष्टेपण प्राप्त झालं होतं...भविष्यकाळातलं सगळं तेव्हा-पासून तिला कळायला लागलं होतं...

“ माझ्या भविष्यात काय दिसतंय् पहा पाहू ! ”— मी पेनिलोपच्या मध्यस्थीनं तिला सांगितलं...

म्हातारीनं काहिलीतल्या धुरात काही वेळ नजर रोखली अन् मग पुढे ती काय पुटपुटली ते पेनिलोपनं मला सांगितलं...पेनिलोप म्हणाली,

“ ‘ सूर्यकन्या ’ म्हणून ती तुला अभिवादन करतेय्...ह्या जगावर परम आनं-दाची पखरण करायला तुझी पाठवणी झालेली आहे...एक अभिनव तत्त्वनिष्ठा,

एक नवा धर्म, या आनंदातून निर्माण होईल...खूप मुशाफरी केल्यानंतर आयुष्याच्या अखेरीला तू जगात ठिकठिकाणी मंदिरं उभारशील...अन् अशीच पुढे कधीतरी इथे परत येशील...इथेही मग एक मंदिर उभं राहील...ही सारी मंदिरं सौन्दर्य नि आनंद, यांनाच वाहिलेली असतील...कारण तू 'सूर्यकन्या' आहेस!"

त्या वेळची माझी विषण्ण नि निराश मनःस्थिती लक्षात घेता ही काव्यमय भविष्यवाणी मला अजबच वाटली!

मग पेनिलोपनं स्वतःचं भविष्य विचारलं...म्हातारी पेनिलोपला उत्तर द्यायला लागली, तसतसा पेनिलोपचा चेहरा पांढराफटक पडत चालल्याचं माझ्या ध्यानात आलं...पेनिलोप चांगलीच बावरलेली दिसली...

"काय, म्हणाली तरी काय ती तुला?" मी विचारलं...

"ती जे काय सांगतेय्...ते मनाला चटका लावणारं आहे...ती म्हणते, माझं एक कोकरू आहे...(—म्हणजेच माझा 'मेनालकास') म्हणे, मला आणखी दुसरं एक कोकरू हवंसं वाटतं (—मला दुसरी मुलगी व्हावी असं वाटतं, तेच असणार ते) तिच्या म्हणण्याप्रमाणे माझी ही इच्छा कधीच पूर्ण होणार नाही... पुढे तिनं सांगितलं की माझं अतिशय जिव्हाळ्याचं एक माणूस भयंकर आजारी असल्याची अन् दुसरं तर मरणाच्या दारीच पडल्याची तार मला लवकरच मिळेल. माझं आयुष्यसुद्धा काही फार लांब नाही म्हणे...कुठं तरी उंच स्थळी...जगाकडे दृष्टिक्षेप टाकत...शेवटचं ध्यानचिंतन माझ्या हातून घडल्यावर मी जगाचा निरोप घेणार आहे..."

पेनिलोप साहजिक अगदी अस्वस्थ होऊन गेली होती...तिनं म्हातारीच्या हातावर थोडे पैसे ठेवले, अन् तिचा निरोप घेऊन माझ्या हाताला धरून ती जवळजवळ पळतच निघाली...त्या सगळ्या बिऱ्हाडबोळातून नि पायऱ्यांवरून धावत आम्ही तशाच थेट त्या अरुंद रस्त्यावर येऊन पोहोचलो, अन् एका टॅक्सीनं होटेलवर परतलो...

होटेलमध्ये पाऊल टाकल्याटाकल्या तिथला नोकर एक तार घेऊन पुढे आला. पेनिलोपनं तर माझ्या हाताचा आधार घेतला...तिला घेरीच यायच्या बेतात होती...हळूच तिला मग मी तिच्या खोलीत नेलं— अन् ती तार फोडून वाचली. 'मेनालकास आणि रेमंड खूप आजारी...ताबडतोब परत या...'

बिचारी पेनिलोप हतबुद्ध होऊन गेली...आम्ही घाईघाईनं आमच्या सगळ्या वस्तू ट्रंकांच्यातून कोंबल्या, अन् सान्ती कारान्ताला जाणाऱ्या बोटीची चौकशी केली ...पोर्टर म्हणाला, संध्याकाळी निघणारी एक बोट आहे...एवढ्या सगळ्या गर्दी-गोंधळातही राऊलच्या आईची मला आठवण होतीच...'तुझ्या मुलावर असलेल्या

संकटाच्या छायेतून तुला त्याला सोडवायचं असेल, तर त्यानं कॉन्स्टॅन्टिनोपल चटकन् सोडून जावं, अशी व्यवस्था तू कर...कारण काय, ते कृपा करून मला विचारू नकोस...पण हे शक्य असेल, तर आज संध्याकाळी पाच वाजता मी जाणार आहे, त्या बोटीवर त्याला घेऊन ये...' अशी चिठ्ठी मी तिला पाठवली...

माझ्या चिठ्ठीला काहीच उत्तर आलं नाही...पण बोट अगदी सुटायच्या क्षणी —जिवंत म्हणावं, की मेलेला म्हणावं, अशा कळाहीन चेहऱ्यानं, आपली बॅग संभाळत राऊल गँगवेवरून धडपडत बोटीवर येऊन पोहोचला...त्याला त्याच्या तिकिटाबद्दल किंवा राखीव कॅबिनबद्दल विचारलं, तेव्हा ह्या गोष्टींचा काही विचारच त्यानं केला नसल्याचं कळलं...पण या पूर्वेकडल्या बोटींची शिस्त तेवढी कडक नव्हती, अन् थोडं इकडेतिकडे करून प्रवाशांची सोय बघितली जाण्याचा इथे संभव होता; अन् शिवाय त्याला कॅबिन मिळू शकलं नाहीच, तर माझ्या स्वीट-मधल्या बैठकीच्या खोलीत त्यानं झोपावं, अशी सवलतीची व्यवस्था मी कॅप्टनला सांगून करून ठेवली होती...कारण एखाद्या आईला आपल्या मुलाबद्दल वाटेल, अशीच काळजी राऊलबद्दल मला मनात वाटत होती...

सान्ती कारान्ताला आले, तर रेमंड अन् पेनालकास, दोघंही तापानं फणफणलेले ...हा अल्बानियाचा उदास प्रदेश सोडून माझ्याबरोबर युरोपला परत जाण्याबद्दल मी रेमंड नि पेनिलोप यांची किती मनधरणी केली...कदाचित् त्याचं म्हणणं पटेल, म्हणून जहाजावरच्या डॉक्टरलासुद्धा मी रेमंडला भेटायला घेऊन आले ...पण व्यर्थ ! ते निर्वासित, किंवा त्याचं ते खेडं सोडून जायची रेमंड मुळी भाषाच काढेना...अन् पेनिलोप त्याला सोडून कुठे जाणार ? तेव्हा मग त्या घोंघावणाऱ्या वादळ वावटळींच्या राज्यात—फक्त एका तंबूचाच निवारा असलेल्या त्या वैराण खडकाळ प्रदेशात त्यांना नाइलाजानं तसंच सोडून मला परत निघावं लागलं...

जहाज त्रीयेस्तच्या रोखानं निघालं; राऊल अन् मी दोघंही उदासच होतो... त्याची आसवं तर गळायची थांबतच नव्हती...मी त्रीयेस्तला तार करून माझी गाडी तिथे मागवली होती...कारण आगगाडीच्या प्रवासात इतर प्रवाशांशी होणाऱ्या अटळ घसटीची मला भारी धास्ती वाटायची...आम्ही मोटरनं उत्तरे-कडे निघालो...पर्वतराजींच्या मधून प्रवास करत स्वित्झर्लंडच्या दिशेनं वाट चालली होती...

जिनिव्हाच्या त्या प्रसिद्ध सरोवराशी आम्ही थोडा विसावा घेतला...आमची जोडी गमतीदारच दिसत होती !...दोघंही आपापल्या दुःखात हरवलेले...पण कदाचित् त्यामुळेच आमचं एकमेकांशी इतकं चांगलं जुळलं असावं...त्या सरोवरावरच एका लहानशा बोटीत आम्ही काही थोडे दिवस घालवले...अन्

शेवटी, त्याच्या आईखातर तरी त्यानं आत्महत्येचा प्रयत्न करण्याचं पुन्हा मनात-देखिल आणायचं नाही, असं एक पक्कं पवित्र वचन त्याच्याकडून घेण्यात मला यश आलं...

...मग एके दिवशी सकाळी त्याला आगगाडीत चढवून देऊन मी त्याचा निरोप घेतला...त्याच्या नाट्यव्यवसायाकडे तो पुन्हा वळणार होता...त्यानंतर आजतागायत मी त्याला, किंवा तो मला भेटलेला नाही...पुढे त्यानं त्याच्या व्यवसायात खूप यश मिळवलं,...वगैरे मात्र माझ्या कानावर आलं होतं...त्याची हॅम्लेटची भूमिका म्हणे फारच गाजली होती...साहजिकच आहे! कारण 'टु बी ऑर नॉट टु बी '– 'जगावं की मरावं'...हे हॅम्लेटचं स्वगत बिचाऱ्या राऊलच्या इतक्या समजेनं कोण वठवू शकलं असतं, सांगा वरं?...पण वयानं तो इतका कोवळा होता, की आयुष्यात पुढे तरी कधी त्याला सुखाचा शोध लागला असेल, अशी कल्पना केल्याशिवाय मला राहवत नाही...!

इकडे स्वित्झर्लंडमध्ये मी एकटीच एकटी पडल्यानं मला कमालीच्या थकव्यानं नि नैराश्यानं खचल्यासारखं वाटायला लावलं...एका जागी कुठे फार वेळ राहणंच अशक्य झालं...त्यामुळे त्या अशांत मनःस्थितीत मी साऱ्या स्वित्झर्लंडभर माझ्या मोटरमधून फिरफिर फिरले...अन् शेवटी एका अनावर ऊर्मीच्या भरात पॅरिसला परत जाऊन पोहोचले...अगदी एकटी होते मी...कारण आजकाल कुणादुसऱ्याचा सहवास मला असह्यच वाटायला लागला होता...खरं म्हटलं तर स्वित्झर्लंड-पासूनच ऑगस्टीन माझ्या बरोबर होता; पण माझ्या जिवाला झालेल्या बाधेचं सावट दूर करण्याचं सामर्थ्य त्याच्याही सहवासात नव्हतं...शेवटी अशी अवस्था झाली माझी, की माणसाचा आवाजदेखिल कानावर पडायला नको वाटायला लागलं...खोलीत कुणी लोक यायचे, तरी ते कुठे दूर असल्यासारखे...खोटे खोटे...भासासारखे वाटायचे...पॅरिसमध्ये, न्यूईलींतल्या माझ्या घराच्या उंबरठ्याशी मी एका रात्री पोहोचले, ती तशीच...फाटकाजवळच्या पोर्टरच्या खोपटात राहणारा नि बाग संभाळणारा एक म्हातारा सोडला, तर तिथे कुणी चिटपाखरूसुद्धा नव्हतं...जागा नुसती विराण, विराण दिसत होती...

मी माझ्या भव्य स्टुडिओत पाऊल टाकलं, तशी तिथल्या त्या निळ्या पडद्यांनी मला माझी कला, माझं कार्य,...यांची एक क्षणभर आठवण करून दिली... मीही कलेच्या विश्वाकडे पुन्हा परतायचा प्रयत्न करायचा निश्चय केला...एवढंच नव्हे, तर त्या हेतूनं हेनर स्कीनला साथीसाठी पुन्हा बोलावून देखिल घेतलं... पण त्या संगीताचे ते ओळखीचे सूर मात्र दावेदार बनले होते जणू माझे!...ते सूर ऐकताक्षणी रडण्याचे उमाळे फुटायचे नुसते मला...उसासून, उसासून मी उन्मळून पडायची...खरं म्हणजे 'त्या' दिवसानंतर मला आलेला हा पहिलाच

उमाळा रडण्याचा !...इथल्या या वास्तूतली प्रत्येक गोष्ट, माझ्या त्या पूर्वीच्या–सुखानं शिगभरल्या–दिवसांची आठवण उत्कटतेनं करून देत होती...मला मुलांचे आवाजही बागेतून कानावर पडल्यासारखा भास व्हायचा...एक दिवस मुलं राहायची त्या छोट्या घरात सहज डोकावले, तर तिथे त्यांचे कपडे अन् खेळणी इतस्ततः विखुरलेली दिसली...ती पाहिली मात्र...मी पुरती कोसळून पडले!... न्यूइलीच्या त्या बंगल्यात माझ्याच्यानं यापुढे राहावायचं नाही, हे पुरतं कळून चुकलं मला...तरीही मोठ्या शर्थीनं मी माझा प्रयत्न चालू ठेवलाच होता... काही मित्रमंडळींनासुद्धा बोलावून घेतलं मी माझ्याकडे...

रात्री मात्र झोप कशी ती यायचीच नाही...त्यातून या बंगल्याला नदीचं धोकादायक सान्निध्य आहे, हे लक्षात आल्यानं ते वातावरण असह्य व्हायचं ... अशाच तिरमिरीत एक दिवस मी पुन्हा एकदा माझ्या गाडीत बसले, अन् दक्षिणेकडचा रस्ता धरला...

गाडीमध्ये बसले, आणि गाडी चांगली ताशी सत्तर-ऐंशी किलोमीटर्सच्या वेगानं जात असली म्हणजे रात्रंदिवस पाठपुरावा करणाऱ्या माझ्या त्या शब्दांपलीकडल्या दुःखाची कळ किंचित् उगावायची...

मी आल्प्स् ओलांडून इटलीत गेले...माझी भ्रमन्ती चालूच होती...कधीकधी सारी रात्र वल्हवत राहण्याची आज्ञा नावाड्याला देऊन, व्हेनिसच्या एखाद्या कालव्यावर मी गोंडोलात पहुडलेली आढळायची...तर कधी रिमिनीच्या पुरातन शहरात मला मी सापडायची ! एक रात्र मी फ्लॉरेन्सला काढली...क्रेग तिथेच राहत होता हे मला माहीतच होतं...क्षणभर त्याला बोलावणं पाठवायची तीव्र इच्छा झाली होती...पण त्याचं आता लग्न झालेलं होतं...गृहस्थी आयुष्यात तो व्यवस्थित रमलेला होता...त्याच्या येण्यानं तसं काय साधणार होतं? उलट आणखी विसंवाद निर्माण व्हायचाच संभव होता...मी माझ्या मनाला आवर घातला...

समुद्राकाठच्या एका छोट्या शहरात एक दिवस एक तार माझ्या हातात पडली...'तू इटलीतून भटकतेयस, हे मला कळलंय्...इझाडोरा, तू माझ्याकडे ये...तुला दिलासा द्यायचा मी शक्य तेवढा प्रयत्न करेन...' सही? एलिनोरा ड्यूज !

ही तार करायला तिनं माझा पत्ता कसा शोधून काढला, हे कोडं आजपर्यंत मला उलगडलेलं नाही...पण ते जादुगार नाव मी वाचलं मात्र...वाटलं की ड्यूज ही एकच व्यक्ती अशी होती, की जिला भेटावंसं वाटणं मला जड गेलं नसतं ! तार व्हिआरेजिओहून पाठवलेली होती...मी जिथे होते, त्या उंच प्रदेशाच्या बरोबर विरुद्ध बाजूला व्हिआरेजिओ होतं...मोटरीनं लगेच निघालेच

मी...फक्त माझ्या येण्याची सूचना देणारं एक कृतज्ञ प्रत्युत्तर मात्र आधी पाठवून दिलं तिला...

व्हिआरेजिओला पोहोचले, त्या रात्री भयंकर मोठं वादळ झालं...गावाबाहेर बऱ्याच दूरच्या एका छोट्या बंगल्यात एलिनोरा राहत होती...पण तिच्याकडे तिथं जायच्याबाबत तिनं ग्रॅण्ड होटेलमध्ये व्यवस्थित निरोप ठेवला होता.

# २७

दुसऱ्या दिवशी सकाळी मी ज्यूजला भेटायला निघाले...ती एका द्राक्षांच्या मळ्यापाठीमागच्या गुलाबी रंगाच्या बंगल्यात राहत होती; द्राक्षाच्या वेलींनी आच्छादलेल्या वाटेनं मला सामोरी येताना ज्यूज एका तेजस्वी देवदूतीसारखी भासली...तिनं हलकेच माझ्याभोवती आपले हात गुंफले अन् माझ्यावर जडलेले तिचे सुंदर डोळे प्रेमानं अन् हळुवारपणानं इतके ओथंबून आले, की 'पारादीसो'त, 'बिआत्रिस'च्या प्रत्यक्ष भेटीच्या वेळीं झालेल्या डान्टेच्या मनःस्थितीचा मी साक्षात् अनुभव घेतला !

त्यानंतर मी व्हिआरेजिओत तिथेच राहिले ...एलिनोराच्या डोळ्यांच्या तेजः-प्रभेनं माझ्यातही एकप्रकारचं बळ, धैर्य निर्माण होत होतं...ती तर मला मिठीत घेऊन जणू जोजवायची—माझी व्यथा हलकी करायला प्रयत्न करायची...असं वाटायचं की ते नुसतं सांत्वन असं नव्हतंच...तर माझ्या काळजावरचं दुःखाचं दडपण ती आपल्या काळजावर जणू ओढून घेत होती...तेव्हा मला एक गोष्ट जाणवली : इतर कुणाचाही सहवास मला सह्य वाटत नव्हता, कारण कुणीही झालं,तरी आपल्या नाना चेष्टांनी मला ते दुःख फक्त विसरायला लावायला पाहत होतं... याउलट एलिनोरा म्हणायची, " देईर्द्र अन् पॅट्रिक यांच्याबद्दल मला सांग पाहू सगळं काही..." त्यांचं बालिश बोलणं, त्यांच्या गंमतीजमती पुन्हापुन्हा ती माझ्या-कडून वदवायची...त्यांचे फोटो तिला पाहायला हवे असायचे...अन् त्या फोटोंचे पापे घेता घेता ती स्वतःच रडायला लागायची...माझं दुःख मी आवरावं, असं तिनं चुकूनसुद्धा म्हटलं नाही...उलट माझ्याबरोबर ती माझ्या दुःखात सहभागी व्हायची...तेव्हा माझ्या बाळांच्या मृत्यूनंतर प्रथमच मला किंचित् दिलासा

वाटला...वाटलं की मी अगदी एकटी-एकाकी नाही !...एलिनोरा ड्यूज ही खरोखर एक अलौकिक व्यक्ती होती...तिचं मन एवढं मोठं होतं, की साऱ्या विश्वाचं दुःख ती आपल्यात मुरवून सामावून घेऊ शकली असती ! या जगतातल्या दुःखार्तांच्या मनातल्या अंधाराला भेदून त्यांच्यावर प्रकाशाची पखरण करणाऱ्या महाभागांच्यात ड्यूजचाच आत्मा सर्वांत अधिक दीप्तिमान् होता, यात शंका नाही...तिच्याबरोबर समुद्राच्या किनाऱ्याकिनाऱ्यानं फिरताना कित्येकदा वाटायचं की ड्यूजचं माथं आभाळात ग्रहताऱ्यांच्या प्रभावळींपर्यंत पोहोचलं-नि आहे हात पर्वतशिखरांना कुरवाळत आहेत...!

पर्वताकडे पाहून ती एकदा माझ्याजवळ म्हणाली, " 'गिलार्दोन'च्या वृक्षाच्छादित उतरणी, अन् ऊन खाणाऱ्या तिथल्या द्राक्षवेली नि फुलारलेल्या रम्य तरुलता यांच्याशेजारी 'क्रोस'च्या उग्र नि खडबडीत बाजू किती शिष्टगंभीर दिसतात बघ तरी...पण मग याच काळ्या खडबडीत क्रोसच्या अगदी माथ्याकडे दृष्टी वळवून पहा...एक शुभ्र संगमरवर चमक मारून तुला इशारा करील...तो तिथे वाट पाहत बसलाय त्याला अमरत्वाचं वरदान देणाऱ्या एका द्रष्ट्या शिल्पकाराची... अन् त्याच्या उलट गिलार्दोन- माणसाच्या ऐहिक गरजा भागवणाऱ्या चिजा उत्पन्न करण्यात पार हरवून बसलाय् स्वतःला; क्रोस...क्रोस मात्र बघतोय् त्याच माणसांची स्वप्नं ! कलाकाराचं आयुष्य हे असंच असतं...अंधारं, उदास, गंभीर, व्यथित...शापित...पण त्यातूनच मिळतं वरदान शुभ्र संगमरवराचं- मानवाच्या आशा-आकांक्षा पल्लवित करणारं- ! "

एलिनोराला शेलीचं प्रेम होतं...सप्टेंबरच्या अखेरीला, वारंवार वादळं होणाऱ्या दिवसात एखाद्या दिवशी समुद्राच्या कातर लाटांवर झपकन् वीज चमकून गेली, की समुद्राकडे बोट दाखवत ती म्हणायची, " बघ बघ, शेलीची राख चकाकतेय्...तो आहे तिथे...लाटांवरून चालतोय्..."

होटेलमध्ये कुठे उतरलं, की अनोळखी लोकांच्या 'बघे'पणाचा ससेमिरा माझ्या पाठीमागे लागायचाच, हे ठरलेलं...तेव्हा मी एक बंगलाच घेतला... अशी ही जागा पसंत करायला मला कुणी सांगितलं होतं ? उदासवाण्या पाईन-वृक्षांच्या जंगलात दूरवर कुठे तरी बांधलेली वास्तू...चहुबाजूंनी भल्यामोठ्या भिंतींचा वेढा !...बाह्य देखावा जर उदासवाणा म्हटला, तर आतलं वातावरण तर असं कमालीचं विषण्ण होतं, की त्याचं वर्णन करणं अशक्यच आहे... खेडवळ लोक या बंगल्याबद्दलची एक दंतकथा सांगायचे : ऑस्ट्रियन राजदरबारातल्या एका बड्या अधिकाऱ्याबरोबरचं-( कुणी म्हणतात तो प्रत्यक्ष फ्रान्झ जोसेफच होता ! ), आपलं प्रेमप्रकरण शोकान्त ठरल्यावर एक स्त्री इथे येऊन राहिली होती...अन् पुढे तर त्या प्रकरणापासून झालेला मुलगाही वेडा झाल्याचा

दुःखभोग तिच्या वाट्याला आला होता !...आता सांगा, अशी ही जागा पसंत करायला मला कुणी सांगितलं होतं ?...बंगल्यात अगदी वर एक छोटी, भक्कम गजांनी खिडक्या बंद केलेली खोली होती...भिंतींच्यावर चमत्कारिक आकृत्या रंगवलेल्या होत्या...अन् दरवाज्याला एक छोटं चौकोनी भोक होतं...विशेष उन्माद चढला की त्या गरीब बिचाऱ्या वेड्या तरुणाला त्या भोकातूनच जेवण-बिवण काय ते देण्याचा प्रघात असावा...छतावर एक मोठी उघडी आगाशी होती...तिथून एका बाजूला समुद्र दिसायचा, नि दुसऱ्या बाजूला पर्वतांच्या रांगा...

—तर असं कमीत कमी साठ खोल्यांचं हे उदासउजाड घर माझ्या पसंतीला उतरलं, आणि मी ते भाड्यानं घेतलं ! मला वाटतं, सभोवतालच्या पाईन वृक्षांचा तो जंगलवेढा, आणि वरच्या आगाशीतून दिसणारा मनोरम देखावा, यांचं आकर्षण मला वाटले असावं ...मी खरं तर एलिनोरालासुद्धा माझ्याबरोबर तिथं रहायला आवडेल का, म्हणून विचारलं ...पण तिनं शिताफीनं सौम्य नकार दिला, आणि त्याऐवजी तिच्या त्या उन्हाळी बंगल्यातलं बस्तान आवरून ती जवळच्या एका छोट्या पांढऱ्या बंगलीत येऊन राहिली...

...पत्रव्यवहाराच्या बाबतीतला ड्यूजचा खाक्या अगदी कमालीचा अजब होता...तुम्ही जर दुसऱ्याच कुठल्या देशात असलात, तर तुम्हाला तीन एक वर्षांच्या अवधींत ती अधूनमधून नुसत्या लांबलचक ताराच पाठवत राहील... पण आता आम्ही इतक्या जवळ राहत होतो ना एकमेकींच्या, तर जवळजवळ दररोज– आणि कधीकधी तर दिवसातून दोनतीनदासुद्धा तिची काही तरी दोन गोड शब्दांची चिठ्ठी यायचीच मला...मग आम्ही एकत्र जमायचं अन् समुद्राच्या काठाकाठानं हिंडायफिरायचं...ड्यूज तेव्हा म्हणायची "द ट्रॅजिक डान्स प्रोमनेडस् वुइथ द ट्रॅजिक म्यूज "...(शोकमग्न नृत्यगंधा शोकविव्हल नाट्य-ललितेसह विहार करीत आहे...!)

एक दिवस अशाच आम्ही फिरत असताना ती माझ्याकडे वळली. मावळत्या सूर्याच्या किरणांचं एक सोनसळी तेजोवलय तिच्या माथ्याभोवती झळाळत होतं. ती माझ्याकडे बराच वेळ एकटक पहात राहिली– मनात काय चाललं होतं तिच्या कोण जाणे !—अन् मग गहिवरल्या आवाजात म्हणाली, " इझाडोरा, पुन्हा कधी म्हणून सुखाच्या शोधात निघू नकोस...जगातल्या साऱ्या महान् दुर्दैवी लोकांच्या-सारखी तुझ्याही कपाळावर दुःखाची तप्तमुद्रा उमटलेली आहे...पण जो दुःख-भोग तुझ्या वाट्याला आलाय् आजवर, तो केवळ उपोद्घात आहे...ती आहे केवळ प्रस्तावना...हे लक्षात घे; अन् पुन्हा कौल लावायला जाऊन दुर्दैव ओढवून घेऊ नको अंगावर ! "

एलिनोरा, अग तुझी ती धोक्याची सूचना मी मनावर घेतली असती तर! पण आशेचं तण समूळ उपटून काढणं महा कर्मकठीण असतं; किती खुडा, कितीही तुडवा, माजायचं तसं माजतंच ते पुन्हा हेच खरं!

ड्यूज त्यावेळी तिच्या अगदी अमदानीत होती...जीवनरसानं परिपूर्ण, तीक्ष्ण-बुद्धी—असं ते एक महनीय व्यक्तित्व- होतं...पुळणीवर चालायची ती मोठ्या ढांगा घेत— रुबाबदारपणे...अशी आगळी चाल तिच्यावाचून कुठे आजवर पाहिली नाही मी...ती कॉरसेट वगैरे वापरत नसे...तिचा बांधा म्हणाल, तर काहीसा मोठाड अन् चांगला भरलेला...कदाचित् आधुनिक मताच्या प्रियकरांनी अशा बांध्याकडे पाहून नाकंसुद्धा मुरडली असती ...पण खरं म्हणजे त्या शरीर-यष्टीला एक राजस अन् उदात्त डौल होता...तिच्या थोर नि व्यथित आत्म्याची सर्वस्पर्शी जाण तिच्या संपूर्ण व्यक्तित्वातून सारखी झरत असे!. कित्येकदा ती माझ्यासमोर ग्रीक शोकांतिकांचं किंवा शेक्स्पियरचं वाचन करायची...अन् ॲन्टीगॉनच्या काही ओळी वाचून दाखवताना ड्यूजच्या त्या पारदर्शी समजेतून स्पष्ट होणारं त्या ओळींचं लोकोत्तर मर्म जगाला अगम्य राहणं, हा केवढा मोठा सामाजिक अपराध आहे, असं माझ्या मनात यायचं!...तिची कला उत्कर्षाचं शिखर गाठून आपल्या परिपूर्ण नि प्रगल्भ तेजानं तळपत असतानाच ड्यूज रंग-भूमीवरून निवृत्त झाली...आणि अखेर निवृत्तच राहिली; या घटनेला लोकांनी प्रेमभंग, भावविवश स्वभाव, किंवा प्रकृतीचं अस्वास्थ्य, वगैरे सोयीस्कर कारणं शोधली आहेत खरी, पण त्यातलं एकसुद्धा खरं नाही...! तिच्या कलाविषयक कल्पना स्वतःच्या मतानुसार प्रत्यक्षात साकार करायला लागणारी मदत, किंवा आवश्यक तो पैशाचा पाठिंबा, ड्यूजला मिळूच शकला नाही. हे तिच्या निवृत्तीचं खरं, रोखठोक अन् लाजिरवाणं कारण आहे! कलेवरच्या प्रेमाची बिरुदं मिरवणाऱ्या भोंदू जगानं या सर्वोत्तम, जगन्मान्य अभिनेत्रीला आपल्या आयुष्यातली पंधरा लांबलचक वर्षं वनवासात नि हालअपेष्टांत, मनाशी कुढत कुढत काढायला लावली! थोडीथोडकी नव्हेत, पंधरा...पंधरा वर्षं!...शेवटी मॉरिस जेस्टला जेव्हा यातली अरसिक प्रतारणा अखेर टोचलीबोचली, तेव्हा त्यानं तिच्यासाठी अमेरिकेचा एक छोटा दौरा मुक्रर केला...पण तोपर्यंत फार, फार उशीर झाला होता...कारण इतकी वर्षं जे साधायची वाट पाहण्यात गेली, त्या स्वतःच्या कार्यासाठी शर्थीनं भांडवल गोळा करण्याच्या त्या हृदयद्रावक प्रयत्नात दौऱ्यावरच तिला मृत्यूनं गाठलं...!

* * *

मी त्या बंगल्यातल्यासाठी एक पियानो भाड्यानं आणला, अन् मग माझा तो निष्ठावंत मित्र स्कीन, माझी तार मिळताक्षणी माझ्याकडे ताबडतोब निघून आला

...एलिनोराला संगीताची मनस्वी आवड होती. स्कीन रोज संध्याकाळी तिला बिथोव्हन, शोपां, शूमन, शूबर्ट वगैरे ऐकवावयाचा...कधीकधी ती सुद्धा आपल्या मन्द्र नि अप्रतिम स्वरमधुर आवाजात गायला लागायची...तिचं आवडतं गाणं म्हणजे, ' इन् क्वेस्टा टॉम्बा '...अगदी शेवटशेवटचे ' इनग्राटा, इनग्राटा ' हे शब्द म्हणताना तिच्या आवाजात अन् चेहऱ्यावरदेखिल एक खोल व्यथा, एक खन्त, एक तक्रार उमटायची...अन् डोळ्यात पाणी न येऊ देता त्यावेळी तिच्या-कडे बघणं अशक्यच व्हायचं !...

एकदा दिवस मावळायच्या सुमाराला मी एकदम उठले अन् स्कीनच्या साथी-वर बिथोव्हनच्या ' सोनाता पाथेतीक 'मधला विलम्बित लयीचा भाग ड्यूजबरोबर नाचले...त्या एकोणीस एप्रिलच्या घातवारानंतर माझ्या स्फूर्तीनं मी दाखवलेली पहिली नृत्योर्मी होती ती...त्याबद्दल ड्यूजनं तावडतोब आपल्या बाहूत कवळून माझं चुंबन घेतलं, अन् मला जणू धन्यवाद दिले...

' इझाडोरा, वेडे, तू इथे काय करत बसली आहेस ? तुला तुझ्या कलेकडे परतलंच पाहिजे...तुला मुक्ती मिळेल ती तिथेच...! "

मला नुकतीच एक दक्षिण अमेरिकेच्या दौऱ्याचा करार करण्याची संधी आली होती, हे एलिनोराला माहीत होतं...

" करून टाक तो करार पक्का. " ती आग्रहानं म्हणाली, " आयुष्य किती तोकडं असतं...अन् त्यातही निरोद्योगी जीवनातून उद्‌भवलेल्या कंटाळ्यानं ग्रासलेली सुस्त लांबलचक वर्षं असू शकतात; कंटाळा...वैफल्य...दुसरं काहीच नाही...हे तुला माहीत असतं तर...तर...जा जा इझाडोरा, त्या दुःखापासून, त्या कंटाळ्यापासून स्वतःची सुटका करून घे...जा..."

" पळ, पळ " ती म्हणत होती...पण माझा जीव जडशीळ होऊन गेला होता...एलिनोरासमोर मी काही तरी हावभाव करू शकले, पण प्रेक्षकांपुढे पुन्हा उभं राहणं मात्र मला अशक्यच वाटत होतं...माझं सारं अस्तित्वच यातनामय झालेलं होतं...काळीज प्रत्येक ठोक्यागणिक मुलांच्या नावानं आक्रोश करत होतं...एलिनोरा बरोबर असली, की तेवढा वेळ मला दिलासा असायचा...पण त्या एकाकी बंगल्यातली प्रत्येक रात्र मात्र, त्यातल्या सगळ्या रिकाम्या उदास खोल्यांतून उमटणारे ध्वनिप्रतिध्वनी ऐकत केवळ पहाटेची वाट पहाण्यात जायची...एकदाची पहाट झाली, की उठून तडक समुद्रात दूरवर पोहून जायचं... वाटायचं की इतकं दूर जावं, की परतण्याची शक्यताच उरू नये...पण माझं शरीर मात्र वेळीच किनाऱ्याकडे वळून सुखरूपपणे परतायचं...तरुण शरीरातली जीवनासक्ती किती प्रबळ असते, पहा !

पानगळीच्या दिवसातल्या एका रखरखीत-करपट दुपारी पुळणीतून मी एकटीच

भटकत असताना, एकाएकी मला माझ्या पुढ्यातच पॅट्रिक नि देईर्द्र या माझ्या मुलांच्या, हातात हात घालून चालणाऱ्या आकृती दिसल्या...मी त्यांना साद घातली...पण मुलं हसतखिदळत, माझ्या हातात न सापडता किंचित् पुढेपुढे धावत राहिली...शेवटी मी त्यांच्या मागे धावत सुटले...हाका मारत राहिले... आणि एवढ्यात समुद्राच्या लाटांच्या तुषारात मुलं दिसली तशीच एकाएकी दिसेनाशी झाली...मग एक भयंकर शंका मला भेडसावयाला लागली...मुलांचा असा हा सारखा भास होणं...खरंच मला वेड तर नाही ना लागलेलं? काही क्षणापुरती तर माझी खात्री झाली की माझं पाऊल, वेड नि शहाणपण यांच्या दरम्यानच्या सीमेवरच तारेवरचा नाच करतंय्...! वेड्यांचं इस्पितळ माझ्या डोळ्यांसमोरून तरळून गेलं...तिथलं ते भकास, तेच ते जीवन...विचार करता करता एकप्रकारच्या पराकोटीच्या कटू निराशेनं मला ग्रासून टाकलं, अन् मी पालथी पडून उमाळ्यानं रडरड रडले!

किती वेळ मी तशी तिथेच पडले होते, मला कल्पना नाही...एका प्रेमळ हाताचा स्पर्श माझ्या डोक्याला जाणवला...मी वर पाहिलं...सिस्टिन चॅपेल-मधल्या सुंदर चिंतनमग्न आकृतींपैकीच कुणीतरी दृष्टीस पडल्यासारखं मला वाटलं...समुद्रातून नुकताच बाहेर येऊन तो तिथे उभा होता...म्हणाला, "तू सारखी रडत, आसवं गाळत का बसलेली असतेस?...माझ्याकडून काही मदत वगैरे होण्यासारखी आहे का? मी करू का काही?"

मी वर पाहिलं...

"हो"—मी उत्तरले..."मला वाचव...माझा जीव नाही म्हणत मी—माझी बुद्धी...माझं मन...तें वाचव...मला...मला एक बाळ दे..."

त्या रात्री आम्ही माझ्या बंगल्याच्या छतावर जवळजवळ उभे राहिलो होतो ...सागराच्या पैलबाजूला सूर्य मावळत होता...नि उगवता चन्द्र पर्वताच्या संगमरवरी बाजूनं, चमचमणाऱ्या प्रकाशकिरणांची उधळण उधळत आकाशाची वाट वरवर चढत होता...अशा वेळीं त्याचे बलवान् यौवनमस्त बाहू माझ्या भोवती लपेटलेले, त्याचे ओठ माझ्या ओष्ठद्वयाला भिडलेले, आणि त्याचा तो इटालियन वासनावेग पुरासारखा धुवांधार माझ्यावर कोसळत असलेला!...हे सारं सुख अनुभवताना वाटलं, की दुःख नि मृत्यू यांच्या तावडीतून सोडवून कुणीतरी मला प्रकाशाची, प्रीतीची वाट दाखवली आहे...

दुसऱ्या दिवशी, घडलेलं सारं काही एलिनोराला मी जसंच्या तसं सांगितलं, तरी तिला काही त्याचं आश्चर्य वाटलेलं दिसलं नाही ...कलावंताच्या मनाचा वावर सारखा कल्पनांच्या, कथादन्तकथांच्या विश्वातच असल्यानं, मायकेल अँजेलोचं रसरशीत तारुण्यच जणू, माझं सांत्वन करायला समुद्राच्या कुशीतून अवतरलेलं आहे,

–असा मला झालेला भास तिला हास्यास्पद न वाटता साहजिकच वाटला... तिला खरं तर अनोळखी लोकांची भेट घ्यायला मुळीच आवडत नसे, पण माझ्या या कोवळ्या ॲन्जेलीची माझ्या–करवी ओळख करून घ्यायला तिनं मोठ्या दिलदारपणे होकार दिला...मग आम्ही दोघी त्याच्या स्टुडिओत गेलो–तो एक शिल्पकार होता...

त्याच्या कलाकृती पाहिल्यानंतर तिनं मला विचारलं, "हा एक प्रतिभावान् कलावंत आहे, असं तुला खरंच वाटतं?"

"निःसंशय!" मी म्हटलं, "कदाचित् हा दुसरा मायकेल ॲंजेलोच ठरेल..."

तारुण्यात मन किती कमालीचं लवचिक असतं...! प्रत्येक गोष्टीवर सहजासहजी विश्वास बसतो...मलासुद्धा हे नवीन प्रेमप्रकरण माझ्या दुःखावर मात करील, अशी जवळजवळ खात्रीच वाटत होती...बाकी त्या सततच्या भयंकर मनोव्यथेनं मी इतकी वैतागून गेले होते ...व्हिक्टर ह्यूगोची एक कविता मी सारखी वाचायची...शेवटी तशी माझ्या मनाची मी समजूत घातलीच...म्हटलं, "येतीलच ती परत...माझ्याकडे परत यायला मिळायचीच ती वाट पाहताहेत" ...अरेरे!...ही खात्री, हा विश्वास...ही कल्पना...यातलं काही म्हणता काहीच फार काळ टिकून राहिलं नाही!

माझ्या या प्रियकराचं कुटुंब भलत्या सनातनी, कर्मठ विचारांचं होतं; एवढंच नव्हे, तर त्याचं लग्नसुद्धा एका अशाच कर्मठ इटालियन कुटुंबातल्या मुलीशी ठरलं होतं. आधी याचा मला काहीच पत्ता त्यानं लागू दिला नव्हता...पण नंतर एक दिवस त्यानं पत्रानं सगळी हकिगत कळवून माझा निरोप घेतला...मला मुळीच त्याचा राग आला नाही...कारण माझी बुद्धी पुन्हा ठिकाणी आली, ती त्याच्यामुळेच, अशीच माझी भावना होती ...आणि नंतर मला जाणवलं की मी एकटी, एकाकी अशी नव्हतेच...त्या क्षणापासून मी एका अत्यंत आर्तगूढ अवस्थेत शिरले होते...माझ्या बाळांचे आत्मे माझ्याभोवतीच भिरभिरत होते, अशी माझी धारणा बनली...माझं समाधान करायला, दिलासा द्यायला ते येणारच होते या पार्थिव जगात...

हेमंत ऋतू आला, तशी एलिनोरा फ्लॉरेन्समधल्या तिच्या फ्लॅटमध्ये राहायला गेली; मीही मग माझ्या त्या उदासवाण्या बंगल्याला रामराम ठोकला...मी आधी फ्लॉरेन्सला जाऊन तिथून पुढे रोमला गेले...हिवाळाभर तिथेच राहायचा माझा बेत होता...नाताळलाही मी रोममध्ये होते...दुःखाची सावट त्या सणासमारंभावरही होतीच...पण मी मनाशी विचार केला, की मी थडग्यात नाही, किंवा वेड्यांच्या इस्पितळात नाही, इथे आहे, हे काय कमी आहे? अन् माझा

विश्वासू मित्र स्कीन तर होताच माझ्याबरोबर ...त्यानं कधी एका शब्दानंही मला कशाबद्दल काही विचारलं नाही, की शंका घेतली नाही...त्यानं दिला मला फक्त त्याचा निरपेक्ष स्नेह, कौतुक अन् त्याचं संगीत...!

...एखाद्या शोकमग्न जिवाला रिझवायला रोमसारखं अद्भुत शहर नाही दुसरं ! माझ्या अशा मनःस्थितीत ॲथेन्स शहराचा तो नेत्रदीपक झगमगाट आणि कलाविष्कारातली पूर्णता पाहून माझ्या दुःखाला जिथे उलट धारच चढली असती, तिथं रोम मात्र एखाद्या रामबाण उपायासारखं गुणकारी ठरलं...कारण रोमच्या ठायी-ठायी विखुरलेल्या भव्य अवशेषांमुळे थडग्यासमाध्यांमुळे, नि उत्स्फूर्त स्मारकांच्या-मुळे रोम मला समदुःखी भासत होतं... अनेक मृत पिढ्यांच्या रुण्डमाळा त्याच्या अंगणात तुटून विखुरल्या होत्या !...पहाटेपहाटेच ' एपियन वे ' वर भटकायला मला विशेष आवडायचं...दुतर्फा थडग्यांच्या लांबचलांब रांगा असलेल्या रस्त्यां-तून ' फ्रास्काती'हून येणाऱ्या मद्याच्या गाड्या रेंगायच्या...अन् त्यांचे मद्याच्या पिपांवर रेलून झोपी गेलेले गाडीहाक्ये अगदी दमल्याभागल्या तपकिरी रंगाच्या हरणांसारखे दिसायचे...वाटायचं, की काळाचं काळीजच इथे बंद पडलं आहे... अन् ' काम्पान्या 'ची विशाल भूमी, आणि राफेलच्या आकाशाची भव्य कमान, यांच्या संगतीत हजारो वर्षं एपियन वेवर संचार करणारं मी एक पिशाच्च आहे ! कधी कधी माझ्या उभारलेल्या हातांनी आकाशाला आवाहन करत मी नाचत जायची तिथून...थडग्यांच्या रांगांमधून वावरणाऱ्या एखाद्या विकल विव्हले-सारखी... !

रात्रीच्या वेळी स्कीन आणि मी फिरायला बाहेर पडून तिथल्या अनंत कारंज्यांची शोभा पाहात थांबत होतो...पर्वताच्या उथळया झऱ्यांचं पाणी अखंड-पणे या कारंज्यांतून फवारत राहायचं...तिथे बसून चुबकत्या, खळाळत्या, उसळत्या पाण्याचं ते गाणं ऐकायला मला भारी आवडायचं...बघता बघता आसवांच्या मूक धारा झरायला लागायच्या अनेकदा...अन् माझा हळुवार मनाचा मित्र माझे हात आपल्या हातात घेऊन मला दिलासा द्यायचा प्रयत्न करायचा...

अशा दुःखद भटकन्तीतून एक दिवस मला जाग आली ती एल्.च्या लांबलचक तारेनं ! माझ्या कलेची शपथ घालून त्यानं मला पॅरिसला परत येण्याची विनंती केली होती—हा संदेश परिणामकारक ठरला...मी पॅरिसची गाडी पकडली... वाटेत व्हिआरेजिओ लागलं, अन् पाईन वृक्षांच्या झाडीतून वर डोकावणारं लाल विटांच्या त्या बंगल्याचं छप्पर दिसलं, तेव्हा मन क्षणभर आठवणींच्या विश्वात तरळून आलं...आशा—निराशेच्या हिंदोळ्यावर आलटूनपालटून झोके घेत वावरलेले तिथले ते दिवस...ते महिने...अन् मागे राहिलेली माझी लोकोत्तर

मैत्रीण एलिनोरा...!

एल्. नं 'प्लास दे ला काँकोर्द' जिथून दिसतं, त्या 'क्रिआँ'मधलं एक सर्वोत्तम जोडदालन फुलांनी सजवून‌बिजवून माझ्याकरता तयार करून ठेवलं होतं; मी जेव्हा व्हिआरेजिओमधला माझा अनुभव, आणि मुलांच्या पुनर्जन्माचं अन् पुनरागमनाचं मला पडलेलं गूढ स्वप्न, हे सारं त्याला सांगितलं, तेव्हा त्यानं आपलं तोंड हातांनी झाकून घेतलं, अन् शेवटी मोठ्या प्रयत्नानं स्वतःला सावरून मला म्हणाला,

"एकोणीसशे आठमध्ये प्रथम मदतीचा हात पुढे करून मी तुझ्याकडे आलो, पण आपल्या प्रीतीनं आपल्याला शोकान्तिकेचीच वाट दाखवली; आता या उदास जगात इतरांच्यासाठी का होईना, पण सौन्दर्य निर्माण व्हावं, म्हणून, तुला पाहिजे तशी तुझी शाळा स्थापन करण्याचा आपण पुन्हा एकदा प्रयत्न करून पाहू निदान..."

बेलेव्ह्यूमधलं मोठं हॉटेल त्यानं माझ्या नृत्यशाळेसाठी विकत घेतल्याचंही त्यानं मग सांगितलं. तिथल्या गच्चीवरून सारं पॅरिस दिसायचं...वेगवेगळ्या बाजूंनी उतरत उतरत नदीपर्यंत पोहोचणाऱ्या तिथल्या बागा, अन् हजारएक मुलांची सोय होईल इतक्या खोल्या...हे सारं वरून ओणवणाऱ्या त्या गच्चीतून दिसायचं :...आता ती शाळा अखंडित चालवण्याची तेवढी एक मात्र माझी जबाबदारी होती...

"साऱ्या वैयक्तिक भावना बाजूला सारून, काही काळ तरी आता केवळ एका कल्पनेलाच वाहून घ्यायला मात्र तू तयार झालं पाहिजेस" – एल्. म्हणाला.

माझ्या आयुष्यानं यातनांचं नि संकटांचं जे जंजाळ माझ्यासाठी आजवर विणलं होतं, त्यात माझ्या कल्पनेचा, माझ्या स्वप्नाचा हा एकच धागा न विरता, न विटता सतत चमकत राहिला होता, हे लक्षात घेऊन मी त्याला होकार दिला...

दुसऱ्या दिवशी सकाळी आम्ही 'बेलेव्ह्यू'ला भेट दिली...अन् त्या क्षणापासून पुढे तिथली सजावट करणारे अन् फर्निश करणारे कर्मकार माझ्या मार्गदर्शनानुसार आपल्या कामात अगदी गढून गेले... त्या जराशा सामान्यच हॉटेलचं रूपांतर उद्याच्या एका 'नृत्यमंदिरात' व्हायचं होतं ना!

पॅरिसमधल्या एका मध्यवर्ती ठिकाणी घेतलेल्या स्पर्धेतून निवडलेल्या नव्या पन्नास विद्यार्थ्यांना प्रवेश दिला होता...शिवाय आधीच्या शाळेतली मुलं अन् त्यांच्या गव्हर्नेसेस वगैरे मंडळी होतीच...

जुन्या हॉटेलमधील पहिली जेवणघरं, आमची नृत्यदालनं होती...माझे आकाशी पडदे तिथे लावलेले होते...त्या लांबचलांब दालनाच्या मधोमध मी एक

व्यासपीठ तयार करवलं होतं...चढायउतरायच्या पायऱ्या वगैरे सारं होतंच... प्रेक्षकांना किंवा आपल्या एखाद्या कलाकृतीची प्रयोगात्मता पडताळून पहायला येणाऱ्या लेखकांना, ह्या व्यासपीठाचा उपयोग व्हायचा...सर्वसाधारण शाळांमधून जे एक तेचतेपणाचं, विटलेलं अन् आळसावलेलं वातावरण आढळून येतं, ते थोडंफार, तिथल्या जमिनीला—लादीला–सपाटीचा एकच एक स्तर ठेवण्यानं निर्माण झालेलं असतं, अशा निष्कर्षाला मी आलेली होते; त्यामुळे इथल्या कितीतरी खोल्यांतून, एका बाजूनं वर जाऊन दुसऱ्या बाजूनं खाली उतरणाऱ्या वाटा किंवा बोळ मी तयार करवून घेतले होते...लंडनमधल्या इंग्लिश हाऊस ऑफ कॉमन्स—लोकसभेच्या–दालनासारखी जेवणघरातली योजना केली होती... बसण्याच्या जागांच्या रांगा दोन्ही बाजूंनी वरवर जाणाऱ्या...मोठ्या विद्यार्थ्यांनी आणि शिक्षकांनी उंचीवरच्या जागेवर बसायचं, अन् छोट्या मुलांनी खालच्या जागेवर अशी व्यवस्था होती...

अशा तऱ्हेनं पुन्हा एकदा हसत्याखेळत्या चेतन जीवनानं माझ्या भोवती फेर धरलेला पाहिल्यानंतर मला विद्यार्थ्यांना शिकवण्याचा नव्यानं धीर आला...अन विद्यार्थ्यांनी तर शिक्षणात कल्पनेबाहेर प्रगती करून दाखवली...शाळा उघडल्यापासून तीन महिन्यांच्या अवधीत झालेला त्यांचा विकास, प्रगती पाहून त्यांना पहायला येणाऱ्या सर्व कलावंतांच्या कौतुकाचा नि आश्चर्याचा विषयच बनली ती मुलं...शनिवार हा तर मुळीं कलाकारांचाच वार ठरलेला होता. त्या दिवशी अकरा ते एक वाजेपर्यंत त्यांच्यासाठी एक नृत्यशिक्षणाचं प्रात्यक्षिक व्हायचंच... अन् एल्. च्या नेहमीच्या खर्चिक स्वभावानुसार दुपारी एक मोठी मेजवानी असायची...पाहुणे कलावंत नि सारी मुलं त्यावेळीं एकत्र जेवायची...जसजशी छान हवा पडायला लागली, तसतशी मेजवानीची व्यवस्था उघड्यावर बागेतच व्हायला लागली...जेवणानंतर मग संगीत, काव्य नि नृत्य...असा मनोरंजनाचा कार्यक्रम चालायचा...

रोदां आमच्याकडे वारंवार यायचा. त्याचं घर तिथे म्यूदॉला समोरच्याच टेकडीवर होतं. तो नृत्यदालनात बसून, तरुण मुलींची अन् छोट्या चिमखड्यांची नाचतानाची रेखाचित्रं काढायचा...एकदा तो मला म्हणाला,

" माझ्या तरुण वयात मला अशी मॉडेल्स मिळाली असती तर ! इथे हालचाली तर आहेतच, पण त्याचं निसर्गाशी संधानही आहे...जाणीवपूर्वक सुसंवाद साधलेला आहे निसर्गाशी...सुंदर मॉडेल्स आजवर माझ्या आढळात आली; नाही असं नाही...पण त्यातल्या एकीलाही तुझ्या या शिष्यांच्याप्रमाणे हालचालीच्या तंत्राची जाण असल्यासारखी दिसली नाही ! "

मुलांच्यासाठी मी वेगवेगळ्या रंगाचे केप्स–झुली विकत आणल्या होत्या...

त्या वाळून नृत्यशाळेच्या बाहेर रानावनात हिंडायफिरायला मुलं जायची, तेव्हा त्याचं धावणंपळणं पाहताना पक्ष्यांचा एक सुंदर थवाच विहरत आहे असा भास व्हायचा !

बेलेव्ह्यूमधली ही नृत्यशाळा कायम टिकेल, माझं उरलेलं आयुष्यही आता इथेच व्यतीत होईल...अन् माझ्या प्रयोगशील कार्यातून फळाला आलेल्या सिद्धान्तांचा पडताळाही याच नृत्यशाळेत माझ्यामागं लोकांना पहायला मिळेल—असा मला विश्वास वाटत होता...

...जूनमध्ये ' त्रोकादेरो 'मध्ये आम्ही एक नृत्यमहोत्सव साजरा केला...मी एका बॉक्समध्ये बसून माझ्या शिष्यांचं नृत्य पाहत होते...कार्यक्रमांतल्या काही नृत्यविशेषांच्या वेळी तर प्रेक्षक उठून उभे राहिले, अन् उत्साहाच्या अन् आनंदाच्या आरोळ्यांनी सारं थिएटर दुमदुमून गेलं...कार्यक्रम संपल्यानंतर तर लोकांनी इतका वेळ टाळ्यांचा गजर चालवला होता, की त्यांचं घरी जायचं काही लक्षणच दिसेना !...रूढ अर्थानं ज्या मुलांना ' तयार ' नर्तकनर्तकी, किंवा कलाकार म्हणता आलं नसतं, त्यांच्या कलाविष्काराला एवढी उत्स्फूर्त नि उत्साहपूर्ण साद-दाद मिळालेली पाहून मला पूर्वीपासून भावलेल्या एका अस्पष्ट कल्पनेला जणू दुजोराच मिळाला...प्रेक्षकांच्या त्या कौतुकात जसं मानवाच्या एका नव्या समजेचं स्वागत होतं, तशीच एका नव्या विचारपर्वाच्या आगमनाची आशाही प्रगट झाली होती, असं मला वाटलं...नित्शेच्या तत्त्वज्ञानाचाच हा आविष्कार होता खरं तर...

" नर्तक झारातुष्ट्र...अचपळ, अलगद पावलांचा...पंखाच्या पालवांनी साद घालणारा...भरारी घ्यायला कसा उत्सुक...साऱ्या पक्षिगणांना जातं त्याचं आवाहन...तेही असतात सारे उड्डाणाच्या तयारीतच...आनंदी, स्वच्छन्दी मनोवृत्तीचं त्याला लाभलेलंच आहे मुळी वरदान..."

...बिथोव्हनच्या नवव्या सिंफनीला नृत्यांकित करणारा उद्याचा नर्तकवृंद होता हा...!

२८

एक प्रकारच्या आनंदोत्साहानं खळखळतच आमचा बेलेव्ह्यूतला दिवस सुरू व्हायचा... घाईघाईनं कॉरिडॉरमधून पळणाऱ्या बाळपावलांचे आवाज अन् सामूहिक गीतं गाणारे बालआवाज कानावर पडायचे. मी खाली आले, की नृत्याच्या दालनात गोळा झालेल्या मुलांच्या 'गुड मॉर्निंग इझाडोरा!'च्या आरोळ्या उठायच्या...अशा वातावरणात कुणी उदास राहायचंच म्हटलं, तरी शक्य होतं का? कितीदा तरी त्या मुलांच्याकडे पाहताना दोन छोट्या चेहऱ्यांची गैरहजेरी तीव्रतेनं जाणवायची; अन् मग मी माझ्या खोलीत जाऊन पोटभर रडून घ्यायची ...पण तरीसुद्धा प्रत्येक नव्या दिवसाबरोबर त्या मुलांना सामोरं जाऊन त्यांना शिकवण्याचं धैर्य माझ्या ठायी गोळा होत होतं...त्यांच्या नृत्यातलं वाढतं लालित्य नि लोच पाहून माझ्या जगण्याला काही अर्थ निर्माण होत होता...

इसवीसनाच्या पहिल्या शतकात रोममधल्या एका टेकडीवर 'सेमिनरी ऑफ डान्सिग प्रीस्टस् ऑफ रोम' (रोम येथील नर्तकधर्मोपदेशकांचे विद्यापीठ) नावाचं एक विद्यालय होतं...त्या विद्यालयातल्या विद्यार्थ्यांची निवड अत्यन्त गर्भश्रीमंत कुटुंबातून केली जायची; एवढंच नव्हे तर त्यांच्या घराण्यांना पूर्वीची अनेक शतकांची परंपरा आहे किंवा नाही, आणि असली तर त्यांना प्रवादाचं कसलंही गालबोट कधीही लागलेलं नाही ना, हेही पडताळून पाहिलं जायचं...तत्त्वज्ञानाची सर्व दर्शनं, सर्व कला नि विद्या यांचं शिक्षण त्यांना दिलं जायचं; पण त्यांचं आत्माविष्काराचं मुख्य माध्यम 'नृत्य'च असे–वसंत, ग्रीष्म, हेमंत नि शिशिर या वर्षातल्या चार ऋतूंत ते रंगमंदिरांतून नृत्य करत असत;—अशा प्रत्येक वेळी त्या टेकडीवरून खाली रोममध्ये ते यायचे, तिथल्या काही समारंभातून भाग

ध्यायचे आणि सामान्यजनांच्या मनःशुद्धीसाठी त्यांच्यासमोर नृत्य करायचं... ह्या मुलाचं नृत्य इतकं आनंदार्त, प्रसन्न नि शुचिर्भूत असायचं की त्याचा त्यांच्या प्रेक्षकांवर विलक्षण प्रभाव पडायचा...त्यांचं सर्वतऱ्हेनं उन्नयन व्हायचं ...मानसिक व्यथेनं पीडलेल्या जिवांना त्या रोगावरचं औषधच सापडल्यासारखं वाटायचं! माझ्या नृत्यशाळेची स्थापना करताना मी स्वप्न पाहत होते, ती अशाच उदात्त कलाविष्काराची; पॅरिसच्या परिसरात एका उंच ॲक्रोपोलिससमान वास्तूवर उभारलेल्या माझ्या नृत्यशाळेकडे, आणि त्यातल्या कलावंतांच्याकडे हे शहरही रोमच्या त्या धर्मोपदेशक-नर्तकांच्या विद्यापीठाच्या भावनेनं पाहील— असा विश्वास मला वाटत होता—

आपल्या रेखाचित्रांच्या वह्या घेऊन चित्रकारांचा एक थवाच्या थवा प्रत्येक आठवड्याला बेलेव्ह्यूमध्ये येऊन हजर व्हायचा...कारण आमचं हे विद्यालय म्हणजे कलाकारांना मिळणाऱ्या स्फूर्तीचं उगमस्थानच जणू ठरलं होतं...शेकडो रेखाचित्रांना नि नृत्यकृतींच्या नमुन्यांना इथून स्फूर्ती लाभली होती...कितीतरी आजही अस्तित्वात असलेली नृत्याची रेखाटणं आणि चित्रं यांच्यामागची प्रेरणा म्हणजे ही शाळाच होती.. याच शाळेच्या प्रभावानं कलाकार आणि त्याचं मॉडेल यांच्यातल्या एका अभिनव, आदर्श नात्याची निर्मिती होईल, असंही स्वप्न मी रंगवत होते...आता बिथोव्हन नि 'सेझार फ्रान्क', यांच्या संगीतावर झुलणाऱ्या...क्षेपविक्षेप करणाऱ्या, ग्रीक कोरसला नृत्याचा साज चढवणाऱ्या, किंवा शेक्सपियरचं पठण करणाऱ्या, माझ्या शिष्यांची चालतीडोलती जिवन्त रूपं, मॉडेल्स म्हणून चित्रकारांच्या डोळ्यांसमोर तरळणार होती!... 'मॉडेल्स' म्हणजे स्टुडिओत अवघडून बसलेला गरीब बिचारा मुका प्राणी, ही असह्य कल्पनाच मुळीं नामशेष होणार होती इथे...हा चेतन...हालता–डोलता आदर्श म्हणजे जीवनाविष्काराची परम सीमाच ठरेल, असाही एक भावार्थ मला जाणवला होता...

साऱ्या आशाअपेक्षा आणखीच फुलारल्या, त्या एल्. च्या नव्या बेतांच्यामुळे ...पूर्वी एकदा दुर्दैवानं स्थगित झालेली, थिएटर बांधण्याची त्याची कल्पना पुन्हा एकदा पालवली होती...बेलेव्ह्यूच्या टेकडीवरच हे थिएटर बांधायचं...विशेष मोठ्या उत्सवाच्या वेळी पॅरिसची सारी जनता तिथे लोटेल, तेव्हा ते तसं भव्य नि महोत्सवीच असायला हवं...सिंफनिक वाद्यवृंदाची व्यवस्था तिथे ठेवणं हे ओघानं आलंच मग...

'लूई स्यू' या वास्तुशिल्पकाराला त्यानं पुन्हा एकदा बोलावून घेतलं; आणि मग पूर्वी बाजूला सारलेले रंगमंदिराचे सारे नमुने नि मॉडेल्स् लायब्ररीत पुन्हा एकदा मांडली गेली...पाया वगैरेची आखणी झालीच होती...संगीत, ग्रीक

शोकान्तिका ( नाट्य ) अन् नृत्य, ह्या सर्व कलांना त्यांच्या विशुद्ध स्वरूपात पुन्हा एकदा एकत्र आणण्याचा माझा मानस ह्याच थिएटरमध्ये प्रत्यक्षात येणार होता... मूने स्यूली, एलीनोरा ड्यूज किंवा सुझन देप्रे, हे कलावंत इथे 'इडिपस', 'ॲन्टीगॉन' किंवा 'एलेक्ट्रा' सादर करतील...माझी मुलं कोरस नाचतील... बिथोव्हनची शताब्दी साजरी करायची ती इथेच...अन् त्या निमित्तानं माझ्या हजार शिष्यांना रंगभूमीवर सादर करून त्यांच्या तर्फे बिथोव्हनच्या नवव्या सिंफनीचा नृत्यसाक्षात्कार रसिकांना घडवायचा...ही मुलं 'पॅन ॲथीन'च्याप्रमाणे टेकडी उतरून पुढे नदीवरून आवांलीदचा धक्का गाठतील; आणि ती पवित्र तीर्थयात्रा तशीच पँथिॲानपर्यंत पुरी करून एखाद्या मोठ्या राजकारणधुरंधर पुरुषाची, अथवा नेत्याची पुण्यस्मृती साजरी करतील...असाही एक शुभ दिवस माझ्या डोळ्यांसमोर तरळत होता...!

मुलांना नृत्य शिकवण्यात दररोज मी तासन्तास घालवत असे...मग कधीकधी हातापायात अगदी त्राणच उरलं नाही, की कोचावर रेलून बसायची, अन् हातांच्या नि बाहूंच्या हालचालींनीच त्यांना मार्गदर्शन करायची मी...नृत्य शिकवण्यातली माझी हातोटी तर अलौकिकच म्हणावी लागेल...मुलांच्याकडे मी माझे बाहू पसरून उभं राहण्याचा अवकाश...मुलं नाचायलाच लागत!...त्यांना मी नाचायला शिकवत असल्यासारखाही हा प्रकार वाटत नव्हता...वाटत होतं, की नृत्यकलेच्या पंचप्राणांचं स्फुरण त्यांच्या देहातून होण्याची वाट मी मोकळी करून देत आहे, इतकंच...

युरिपिडिसच्या 'बॅके'चा कार्यक्रम सादर करण्याचा आमचा विचार होता. माझा भाऊ ऑगस्टिन 'डायनिसस'ची भूमिका करणार होता; त्याला ती भूमिका मुळी पाठच होती—त्या भागाचं, किंवा शेक्सपियरच्या एखाद्या नाटकाचं, किंवा बायरनच्या 'मॅनफ्रेड'चं वाचन रोज रात्री ऑगस्टिन आमच्यासमोर करायचा... दान्यूंझिओलाही आमच्या शाळेतल्या प्रत्येक बाबतीत फार उत्साह असल्यानं कित्येकदा दुपारी किंवा रात्री तो आमच्या बरोबर जेवायला असायचा...

माझ्या पहिल्या शाळेतल्या उरलेल्या थोड्याबहुत शिष्या आता उंचनिंच होऊन यौवनाच्या उंबरठ्यावर उभ्या होत्या...छोट्या पोरींना शिकवताना त्यांची खूप मदत व्हायची मला...दरम्यानच्या काळात त्यांच्यात झालेला जमीन-अस्मानाचा फरक, अन् माझी नृत्यपरंपरा पुढे चालू ठेवण्याच्या त्यांच्या प्रयत्नांत दिसून येणारी त्यांची जाणकारी, समज नि आत्मविश्वास...हे सारं डोळ्यांनी टिपताना माझं मन हेलावून जायचं...

पण इसवीसन एकोणीसशे चौदाच्या त्या जुलैत साऱ्या जगावरच एक विचित्र दडपण आलं...मला आतल्या आत ते जाणवत होतंच, पण माझ्या चिमुक्या-

पिल्लयांनाही ते जागवायला लागलं...आमच्या गच्चीवरून पुरं पॅरिस दिसायचं ...तिथे वर जाऊन उभं राहिलो, की मुली आताशा अनेकदा शांत नि दबल्या-सारखी चिडिचिप होऊन जायच्या...आकाशात भले मोठे काळे ढग जमा झालेले ...एक अपरिचित गूढ विरामचिन्ह साऱ्या भूभागावर ओठंगून आंदोळत आहे, असं वाटायचं.. मला ते जागवायचं...आधीच्या दोन्ही वेळची निश्चित सशक्त हाल-चाल आठवता माझ्या पोटातल्या या बाळाची हालचाल अगदी क्षीण वाटायची...

मला वाटतं, दुःख आणि शोक यांना कलाटणी देऊन एका नव्या जीवनाला सामोरं जायच्या माझ्या प्रयत्नांतच माझा कमालीचा शक्तिपात झाला असावा... मला पार थकल्यासारखं होऊन गेलं होतं...तेव्हा जुलै महिना मध्यावर आला, तसं एल्. नं विद्यालयातल्या साऱ्यांना सुट्टीसाठी डेव्हनशायरच्या त्याच्या बंगल्यात पाठवावं, असं सुचवलं; एक दिवस सकाळी एका वेळीं दोघीदोघींनी येऊन साऱ्यांनी माझा निरोप घेतला...ऑगस्ट महिना समुद्रकाठी घालवून सप्टेंबरमध्ये सारीजणं परतणार होती...त्या सर्वांच्या पाठीमागे घर अगदी रिकामं, सुनंसुनं नि विचित्रच वाटायला लागलं...अन् किती प्रयत्न केला तरी माझ्या मनावर विषण्णतेची एक घनदाट सावट पडायची ती पडलीच...थकवा तर खूपच वाटत होता...पॅरिस शहर दिसायचं त्या गच्चीवर मी तासन्तास बसून राहायची... पहाता पहाता पूर्वेकडूनच काही संकट येणार आहे, असं जास्तच मनात यायला लागलं...

तेवढ्यात एक दिवस सकाळीं काल्मेतचा खून झाल्याची ती भयंकर बातमी कानावर आली...सारं पॅरिस एकाएकी अस्वस्थ आणि शंकाकुल होऊन गेलं; ती घटना तशी दुःखद होतीच, पण पुढे होणाऱ्या शोकांतिकेची ती नांदीच ठरली! काल्मेत माझ्या कलेचा आणि विद्यालयाच्या कार्याचा एक थोर पुरस्कर्ता होता ...त्यामुळे त्याच्या त्या खुनाच्या बातमीनं मला धक्काच बसला...अन् फार वाईट वाटलं...

जिवात एकप्रकारची अस्वस्थता होती, भय वाटत होतं...चिल्ल्यापिल्ल्यांच्या अभावी बेलेव्ह्यू केवढं तरी अफाट आणि भलतंच शान्त वाटायचं...त्या विशाल नृत्यदालनाला तर अगदी उदास कळा आली होती...लवकरच माझं बाळ जन्माला येईल, तेवढ्यात मग मुली देखील परत येतील, अन् बेलेव्ह्यू हे पुन्हा पहिल्यासारखं चैतन्याचं नि आनंदाचं निधान बनेल...असा विचार करून मी मनातली भीती पुसून टाकायचा प्रयत्न करायची...पण...पण वेळ जाता जायचा नाही...एके दिवशी आमचे पाहुणे म्हणून त्यावेळी तिथे डॉ. बॉसन पांढऱ्याफटक चेहऱ्यानं आत अले...हातात एक वर्तमानपत्र होतं...मी वाचायला जाते, तर जाड टाईपातली ती मोठी ठळक बातमी...'आर्चड्यूकचा खून'!...मग वदंता

आणि अफवा यांचे मोहोळ फुटलं, आणि लगोलग महायुद्धाची खात्रीशीर वार्ताही येऊन धडकली...पुढे होणाऱ्या घटनांची सावली त्या घटनांच्या आधीच पडते म्हणतात, ते किती खरं असतं पहा...आता मला कळून आलं की वेलेव्ह्यूवर एक अनामिक काळी छाया वावरते आहे, अशी जी भावना गेल्या महिन्याभर आपल्याला झाली होती, तिचं या युद्धाशीच नातं होतं...मी जेव्हा एकीकडे नाट्य, नृत्यांसारख्या कलांच्या पुनरुत्थानाचे बेत रचत होते, माणसाला सोज्वल नि परम आनंदाचा अनुभव देणारे महोत्सव घडवून आणण्याच्या कल्पनेत दंग होतं, तेव्हा दुसरीकडे दुसऱ्या काही शक्ती युद्धाची आखणी करत होत्या... मृत्यूला नि प्रलयाला आवाहन करत होत्या !... या साऱ्या शक्तींच्या युतीपुढे, माझी एकाकी अस्मिता किती नगण्य, किती क्षुल्लक होती !

ऑगस्टच्या पहिल्या तारखेला मला प्रसूतीपूर्वीच्या पहिल्या कळा जाणवल्या ...सैन्यभरतीची दवंडी माझ्या खिडकीखालीच जोरानं पुकारली जात होती... उकाडा फारच होता त्या दिवशी, तेव्हा खिडक्या उघड्या होत्या...माझं कण्हणं, विव्हळणं, माझ्या कळा, वेदना या साऱ्यांना गरजणाऱ्या ड्रम्स्ची नि दवंडी पिटणाऱ्यांच्या आवाजाची साथसंगत होती !

माझ्या मैत्रिणीनं–मेरीनं–पांढऱ्या मखमलीनं चहुबाजूंनी सजवलेला पाळणा माझ्या खोलीत आणून ठेवला. मी पाळण्यावरच डोळे लावून बसले होते... माझी खात्री होती की देईर्द्र किंवा पॅट्रिक यांच्यापैकी कुणीतरी नक्की माझ्याकडे परत येणार होतं...ढोल, नगारे वाजतच होते...सैन्यभरती...लष्कर...युद्ध... लढाई...युद्ध सुरू झालं की काय ?—मी मनालाच विचारत होते...पण माझं बाळ तर जन्माला आलंच पाहिजे...अन् ते जगात येणंच त्याला किती कठीण झालं होतं ! बॉसनला तर लष्करात भरती व्हायचा सरकारी हुकूमच मिळाल्यामुळे तो निघून गेला होता, अन् त्याच्या जागी एक कुणी अपरिचित डॉक्टर होता. त्याचा आपला एकच मंत्र...“धीर धरा बाईसाहेब !...धैर्य सोडू नका ...” अरे, भयंकर वेदनांनी ताणल्या—खेचल्या गेलेल्या गरीब बिचाऱ्या जिवाला धैर्याच्या कसल्या गोष्टी ऐकवतोस ? उलट तू म्हणायचंस, “ ‘ तू एक स्त्री आहेस, अन् हा सारा छळवाद एखाद्या हुतात्म्याच्या उदात्तपणे तू सोसला पाहिजे ’—वगैरे सारा व्यर्थ उपदेश विसर आता...ते सारं विसर आणि ओरड, किंचाळ्या मार...काय वाटेल ते कर...”...किंवा ह्याच्यापेक्षाही आणखी दयाळूपणा त्याला दाखवायचा असता, तर त्यानं मला थोडी शँपेनच द्यायची...पण हा डॉक्टर तर आपल्या ठराविक चाकोरीबाहेरचं काही जाणत नव्हता...त्यामुळे त्याच्या मंत्राच्या आवर्तनात काही अगदी खंड पडला नाही ! “धीर धरा बाईसाहेब, धीर धरा...”...नर्सही अगदी बावचळून गेली होती

…" युद्ध आहे बाईसाहेब, युद्ध चालू आहे" …हा इकडे तिचा जप! मी मनात म्हटलं, मला मुलगा होणार हे खरं आहे बाई, पण युद्धावर जायच्या मानानं तो फार लहान असण्याचा संभव नाही का?

…शेवटी एकदा बाळाचं रडू कानावर पडलं…बाळ रडला…म्हणजे… म्हणजे तो सुखरूप जन्मला म्हणायचा! त्या सबंध वर्षात भय नि यातना याखेरीज मी काय अनुभवलं होतं?…पण ते सारं या आनंदाच्या अवचित वर्षावाच्या एका क्षणात विरघळून गेलं…पार विरून गेलं…शोक, दुःख, अश्रू, अनंत काळची प्रतीक्षा आणि यातना, या साऱ्यांचा भरिभार त्या एका आनंदनिर्भर क्षणानं नाहीसा करून टाकला…खरंच, 'देव' म्हणून कुणी असेलच तर तो रंगमंचावरचा एक मोठा कुशल मंच-दिग्दर्शकच असला पाहिजे खास! माझ्या ओटीत एका सुंदर मुलाचं दान पडल्याक्षणी शोक नि भय यांची ती लांबलचक कंटाळवाणी घटकापळं कशी आनंदात विलीन झाली, कुणास ठाऊक!

इकडे ढोल मात्र गरजत होते…लष्करभरती.. युद्ध…लढाई…

खरंच का युद्ध सुरू झालं आहे? कुणास ठाऊक! माझं त्याच्याशी काय सोयरसुतक? माझं बाळ तर इथे माझ्या हातांच्या पाळण्यात आहे…सुरक्षित, सुखरूप आहे…आता करू दे त्यांना युद्ध…मी कशाला त्याची काळजी करू?…मी मनात म्हणत होतें…

माणसाचा आनंदसुद्धा किती आत्मकेंद्री असतो पहा!…माझ्या दाराखिडक्यांच्याबाहेर इकडूनतिकडे धावपळ, कलकलाट, बायकांचं रडणं–उसासणं, हाकारे, लष्करभरतीची चर्चा–अशी सारी धमाल चालू होती…आणि आत मी बाळाला उराशी कवटाळून एका असीम आनंदाचा अनुभव घेत होते!…बाहेरच्या सर्वनाशक संकटाची दाददखल न घ्यायचं धाडस या आनंदाच्या ठायीं होतं! आपलं स्वतःचं बाळ कुशीत घेण्याच्या अलौकिक आनंदाचे पंख लावून मी आपली दिव्यलोकात संचार करत होते!

संध्याकाळ झाली… माझ्या मिठीतल्या बाळाच्या आगमनाच्या निमित्तानं अभिनंदन करायला जमलेल्या मित्रमंडळींनी माझ्या खोलीत गर्दी केली होती… 'आता पुन्हा तुला एकदा सुख लागेल'…सारेजण म्हणत होते…

…मग एकेक करून सर्वजण गेले…मी आणि बाळ, दोघंच राहिलो… बाळाच्या कानाशी मी कुजबुजले, " कोण आहेस रे लबाडा तू? डेईर्द्रे की पॅट्रिक? दोघांपैकी आलंय् कुणीतरी परत माझ्यापाशी, होय ना!"…एवढ्यात त्या चिमुकल्या जिवानं एकटक माझ्याकडे पाहिलं अन् एक आचका दिला… त्याला श्वास घ्यायला जड जात असल्यासारखं दिसलं…अन् पाठोपाठच त्याच्या थंडगार ओठांतून शीळ घालावी तसा एक दीर्घ उसासा बाहेर पडला…मी

नर्सला हाक मारली...तिनं येऊन बाळाकडे पाहिलं मात्र, घाबरून तिनं बाळाला माझ्या हातांतून ओढून स्वतःकडे घेतलं आणि...दुसऱ्या खोलीतून लगेच 'ऑक्सिजन...गरम पाणी', अशा हाका नि आवाज कानावर यायला लागले...

एका तासाच्या हुरहुरत्या प्रतीक्षेनंतर ऑगस्टिन आत येऊन म्हणाला, "विचारी इझाडोरा......!......तुझं बाळ, इझाडोरा...तुझं बाळ गेलं...गेलं देवाघरी..."

मला वाटतं, या जगात जे काही दुःखभोग माझ्या वाट्याला येऊ शकले असते, त्या सर्वांची त्या क्षणी परमावधीच झाली !...कारण या बाळाच्या मरणानं माझी पहिली बाळं देखील पुन्हा एकदा मेली होती...त्या पहिल्या दुःखाचीच जणू ही पुनरावृत्ती होती...मात्र वाढवून तीव्र केलेली !...

मेरी आली, अन् रडत रडत तिनं खोलीतून पाळणा हलवला...आता त्याची काय गरज होती ? त्या छोट्या शवपेटीचा पाळणा माझ्या बाळाला लाभला होताच... शेजारच्या खोलीतून पेटी बंद करतानाचे आवाज कानावर पडत होते...की माझ्या काळजावरच पडणारे अंतिम निराशेचे ते अखेरचे स्वराघात होते ? कोण जाणे ! माझ्या असहाय नि चिरफाड झालेल्या त्या स्थितीत आसवं, दूध नि रक्त यांचं शरीरातून एक तिहेरी कारंजच माझ्या शरीरातून फवारत होतं !

मला भेटायला आलेला एक मित्र मला म्हणाला, "तुझ्या वैयक्तिक दुःखाचं एवढं काय कौतुक चालवलं आहेस ? लढाईत तर आत्ताच शेकडो माणसांचे बळी पडताहेत...जखमी अन् मरणोन्मुख माणसं आघाडीवरून माघारी यायलासुद्धा तर सुरुवात झालीय्..." अर्थात यानंतर हॉस्पिटलसाठी म्हणून मी बेलेव्ह्यू देऊन टाकणं, हे ओघानंच आलं...!

लढाईच्या त्या दिवसात जिकडे बघावं तिकडे एक समान उत्साह दिसून यायचा...आव्हान स्वीकारण्याचा तो विलक्षण संदेश...तो कमालीचा उत्साहोन्माद– त्यांनी कोणत्या श्रेयाची वाट दाखवली ?...तर शेकडो मैलांच्या उद्ध्वस्त प्रदेशाची...थडग्यांनी भरलेल्या स्मशानांची...! हे सारं बरोबर की चूक, याचा निवाडा कुणी करायचा ? आता या चालू क्षणी तरी हा सारा खटाटोप जरासा निरर्थक वाटत नाही का ? पण असं म्हणायचा तरी आपल्याला काय म्हणा अधिकार ? इकडे रोमा रोलाँसुद्धा स्वित्झर्लंडमध्ये बसून कुणाचे शिव्याशाप तर कुणाचे आशीर्वाद आपल्या अशक्त पण विचारी माथ्यावर ओढवून घेत होताच ना ?

ते काही असो...त्या क्षणी आम्ही अगदी अंगार अन् ज्वाला यांची कुंडंच बनलो होतो धगधगती ! कलावन्तांच्या तोंडीसुद्धा निराळीच भाषा : "'कला', 'कला' काय घेऊन बसलात ? तरणी पोरं, सैनिक...एकजात सारे आपल्या

जिवावर उदार होऊन राहिलेत...' कला '! कसली डोंबलाची कला ! "...माझं डोकं त्या वेळीं थोडं जरी ठिकाणावर असतं, तर मी म्हटलं असतं, " 'कला' नं ? ...कला तर जीवनापेक्षा मोठी आहे "...अन् कलानिर्मिती करत स्टुडिओमध्येच दंग राहिले असते... पण मी खऱ्या ' मला ' सोडून उरलेल्यांच्याच वाटेनं गेले प्रवाहपतितासारखी–अन् वर घोषणा केल्या. " ह्या खाटा घ्या...कलेचं अधिष्ठान म्हणून बांधलेलं हे घर घ्या...आणि जखमी लोकांच्या शुश्रूषेसाठी त्याचं हॉस्पिटल-मध्ये रूपांतर करून टाका..."

एके दिवशी स्ट्रेचर वाहणारे दोन कर्मचारी माझ्या खोलीत येऊन, माझं हॉस्पिटल मला पहायला आवडेल का म्हणून विचारायला लागले...मी अजून हिंडूफिरू शकत नव्हते.. तेव्हा एका स्ट्रेचरवरून त्यांनी मला खोलीखोलीतून फिरवून आणलं...प्रत्येक खोलीतले माझे ' बॅकॅन्टेस ' ( मदिराक्षी ), ' सॅटर्स ', ' निम्फ्ज ' ( जलपऱ्या ), आणि नाचरी तपकिरी हरणं—यांचे बासरिलिफ्स्, आणि पडदे वगैरे माझी सारी सजावट भिंतीवरून काढून, त्या जागी सोनेरी क्रॉसवरच्या काळ्या येशूच्या स्वस्त प्रतिकृती लावण्यात आल्या होत्या...लढाईच्या काळात असल्या हजारो प्रतिकृती बाजारात विक्रीला आणणाऱ्या एका कॅथलिक दुकानदारानंच हीही येशूची प्रतिमा पुरवली होती...माझ्या मनात गरीब बिचाऱ्या जखमी सैनिकांचा विचार आला...शुद्धीवर आल्याक्षणी त्यांना पूर्वी होत्या त्या स्वरूपातच खोल्या दिसल्या असत्या, तर आतापेक्षा त्यांना कितीतरी प्रसन्न वाटलं असतं ! त्यांच्या समोर सोनेरी क्रॉसवर ताणून धरलेल्या त्या बिचाऱ्या काळ्या येशूचं उद्वेगकारक दृश्य ठेवण्यात काय स्वारस्य होतं ?

माझ्या नृत्यदालनातले निळे पडदे नाहीसे होऊन, सारं दालन रुग्णाइतांची वाट पाहणाऱ्या खाटांच्या अनंत रांगांनी भरून गेलं होतं...जिथे ज्ञानाची दीक्षा घेतलेल्या सुसंस्कृतांची वाट पाहात फळीफळींवरून कवी ओठंगून उभे होते, त्या माझ्या ग्रंथालयाचं रूपांतर शस्त्रक्रियेच्या दालनात झालं होतं, अन् खोळंबा होत होता तो हुतात्म्यांच्या आगमनासाठी ! माझ्या त्या अशक्त प्रकृतीमुळे तर या साऱ्या दृश्यांचा माझ्यावर फारच खोल परिणाम झाला...' डायनिसस ' आता पुरा पराभूत झाला, असंच मला वाटलं...क्रूसावर चढवलेल्या येशूची राजवट होती ही !

यानंतर लवकरच स्ट्रेचर वाहणाऱ्यांची जड पावलं पहिल्यांदा कानावर ठसली ...जखमींची आवक सुरू झाली होती !

बेलेव्ह्यू ! थुईथुई नाचणारं स्फूर्तीचं कारंजं होऊ घातलेलं माझं ' ॲक्रोपोलिस ' ! तत्त्वज्ञान, काव्य आणि उच्च प्रकारचं संगीत यांच्या प्रेरणेनं उभारणाऱ्या उन्नत जीवनाचं दालन सर्वांसाठी खुलं करणारं कलापीठ इथे निर्माण व्हायचं होतं !

बेलेव्ह्यू ! ज्या दिवशी इथून कलेची नि सुसंवादाची हकालपट्टी झाली, त्याच दिवशी तुझ्या भिंतीभिंतीतून माझ्या पहिल्या किंकाळ्या निनादल्या...लढाईच्या ढोलांनी या दुनियेतून घाबरवून पळवून लावलेल्या तान्ह्या बाळाच्या, अन् त्याच्या विद्ध मातेच्या किंकाळ्या !...माझ्या कलामंदिराची झाली येशूची हौतात्म्यनिदर्शक कॅल्व्हरी... ! ...आणि शेवटी तर रक्ताळलेल्या जखमा आणि मृत्यू यांनी झपाटलेलं शवागारच... ! जिथे संगीताचे सूरच तरळणार असं मी मानलं होतं, तिथे आता वेदनेच्या कर्कश किंकाळ्याच घुमत होत्या !

बर्नार्ड शॉ म्हणतात, माणसं जोवर प्राण्याचे हाल करतात, त्यांची हत्या करतात, आणि त्यांचं मांस खातात, तोवर युद्धंही होणारच !...मला वाटतं, सगळ्या शहाण्या नि विचारवंत लोकांचं मतही असंच असणार;—माझ्या शाळेतली शिष्यमंडळी तर शाकाहारीच होती पूर्णपणे ..अन् केवळ भाज्या नि फळं—एवढ्या आहारावरच वाढून ती सशक्त नि सुंदर झाली होती...कधीकधी युद्धाच्या त्या खाईत जखमी रुग्णाचं कण्हणं—ओरडणं ऐकलं की खाटिकखान्यातल्या गुरांच्या केविलवाण्या हंबरण्याचीच मला आठवण व्हायची...वाटायचं की त्या गरीब बिचाऱ्या असहाय्य प्राण्यांचे हाल आपण करतो, तेव्हा देव आपल्यालाही तीच शिक्षा फर्मावतो, हे न्याय्यच म्हणायला हवं ! लढाई नावाची ही भयंकर चीज कुणाला प्रिय आहे ? बहुधा मांसाहारी लोकांना असावी—एकदा का कुणाला मारलं, रक्ताची चटक लागली, की मग मारण्याची एक गरजच निर्माण होत असावी आतआत...पक्षी मारा...प्राणी मारा...विद्ध पाडसं मारा... कोल्ह्यांच्या करा शिकारी...

खाटकाची रक्ताळलेली एप्रन रक्तपाताला, हिंसेलाच उद्युक्त करते...अन् का नाही करणार ? कोवळ्या पाडसाचा गळा कापल्यानंतर आपल्या भावाबहिणीच्या मानेवरून सुरी फिरवणं, म्हणजे पुढली एक पायरी चढणंच तर आहे ! आम्ही स्वतःच जर वध केलेल्या असंख्य प्राण्यांची प्रत्यक्ष चालतीबोलती थडगी आहोत, तर जगात आदर्श परिस्थिती निर्माण होण्याची आशा करण्याचा आम्हाला काय अधिकार आहे ?

*　　　*　　　*

थोडी हिंडण्याफिरण्याइतकी ताकद अंगात आल्यावर मेरी अन् मी बेलेव्ह्यू सोडून समुद्रकिनारी गेलो...युद्धग्रस्त प्रदेशातून आम्हाला वाटेनं जावं लागलंच ...पण माझं नाव मी सांगितलं, की खूप आदरानं आम्हाला वागवलं जायचं... एखादा पहारेकरी "इझाडोरा आहे ही...हिला जाऊ द्या..." असं म्हणायचा तेव्हा आपल्याला मिळालेला सर्वांत मोठा मान हाच आहे, असं माझ्या मनात यायचं...

...आम्ही ‘ दोविल् ’ ला गेलो अन् होटेल ‘ नॉर्मन्डी ’मधल्या खोल्या मुक्रर केल्या...माझ्या त्या आजारी नि शिणलेल्या अवस्थेत विश्रांती घ्यायला हा निवारा मिळाल्याचं समाधान वाटलं...पण त्यानंतर कितीतरी आठवडे गेले, तरी मला उत्साह कसा तो वाटेच ना...समुद्रावरचा ताजा वारा अंगावर घ्यायला पुळणीपर्यंत जायची देखील मला शक्ती नव्हती...एकंदर सारी परिस्थिती मुळी अशी निराशाजनक...शेवटी माझं आजारपण खरोखर मलाच चांगलं जाणवायला लागल्यानं मी हॉस्पिटलमध्ये डॉक्टरला बोलावणं पाठवलं...

आश्चर्याची गोष्ट, म्हणजे तो आला नाहीच स्वतः, एक उडवाउडवीचं उत्तरच आलं त्याच्याऐवजी !...शेवटी कुणीच हाताशी नाही, अशा स्थितीत मी आपली होटेल नॉर्मन्डीत पडून होते...पुढचे बेत तरी कसले करणार, अशा आजारी अवस्थेत ?

...त्या वेळीं पॅरिसमधल्या कितीतरी प्रसिद्ध व्यक्तींना याच होटेलचा आसरा घ्यावा लागला होता...आमच्या खोल्यांच्या लगतच ‘ कोंतेस र्द ला बेरेदियेर ’ च्या खोल्या होत्या...तिच्याकडे ‘ कोंत रोबेर र्द मॉंतेस्क्यि ’ हा कवी पाहुणा म्हणून उतरला होता...रात्री जेवणानंतर स्वतःच्या कवितांचं वाचन करतानाचा त्याचा पातळ चढा आवाज आम्हाला ऐकू यायचा...आणि सतत कानावर आदळणाऱ्या युद्धाच्या नि हत्याकांडाच्या बातम्यांच्या दरम्यान, सौन्दर्याच्या सामर्थ्याचा पुरस्कार करणारं ते ओजस्वी नि परमानंदी काव्यवाचन किती सुखकारक वाटायचं...

नॉर्मन्डीत ‘ साका गित्री ’ हाही एक पाहुणा होता...दररोज रात्री दिवाणखान्यात जमलेल्या श्रोत्यांना तो कथा, दंतकथा, अन् विविध किस्से सांगून त्यांची भरपूर करमणूक करायचा...त्याच्याकडे तसल्या गोष्टींचं एक अनावर भांडारच होतं...सारे खुष होऊन जायचे !...

फक्त आघाडीहून आलेल्या जासुदाच्या बातमीपत्रानं त्या जागतिक शोकान्तिकेच्या बातम्या आमच्यापर्यंत पोहोचल्या, की वास्तवाचं भान पुन्हा एकदा जागं करणारा एक काळाकुट्ट तास डोळ्यांपुढे उजाडायचा...

...लवकरच असल्या या जीवनाला काही चवच राहिली नाही...पण प्रवास करण्यासाठी शक्ती मात्र माझ्यात नसल्यानं, मी एक बंगला भाड्यानं घेतला... त्याचं नाव होतं, ‘ ब्लॅक ॲण्ड व्हाईट ’ ( काळा आणि पांढरा ). तिथले गालिचे, जाजमं, पडदे, फर्निचर...वगैरे सगळी सजावट काळ्या नि पांढऱ्या रंगातच होती ...मी तो बंगला घेतला, तेव्हा तिथलं सारं काही मला अत्याधुनिक नि फार ‘ स्टायलिश ’ वाटलं होतं...अन तिथे जाऊन राहीपर्यंतसुद्धा खरं म्हणजे, तीच सजावट किती उदास नि विराण वाटू शकते, याची मला कल्पना आली नव्हती...

...अखेर बेलेव्ह्यू – आणि त्याबरोबर त्यात साकारलेल्या नृत्यशाळेबद्दलच्या आशाआकांक्षा, कला, भविष्याच्या गर्भात वृद्धिंगत होणारं नवजीवन, याबद्दलच्या माझ्या कल्पना...सगळं सगळं सोडून समुद्रालगतच्या या छोट्या काळ्या पांढऱ्या बंगल्यात मी येऊन पडले होते! एकाकी...आजारी...अन् निराश...या सर्वांत छळवादी होतं, ते माझं आजारपण...पुळणीवर वाळूतून थोडसं फिरण्याइतकी-देखील माझ्या अंगात ताकद नव्हती...हेमंत ऋतू आला, तो सप्टेंबर महिन्यातल्या वादळांच्या सोबतीनंच! एल्. नं मला कळवलं, एखादवेळी युद्धकाळात तिथेच योग्य तो आसरा–निवारा मिळेल, या कल्पनेनं त्यानं माझी शाळा न्यूयॉर्कला हलवली होती...

...शेवटी एकदा फार विषण्ण वाटत असताना मीच उठून हॉस्पिटलपर्यंत गेले-माझ्याकडे यायला नकार देणाऱ्या त्या डॉक्टरला शोधून काढायला.. तो एक ठेंगणासा काळी दाढीवाला गृहस्थ होता...पण मला पाहताक्षणी जणू काय पळ काढण्याच्या पवित्र्यानं तो झर्रदिशी वळला...मग मला भासच झाला तसा, की खरंच त्यानं तसं केलं होतं, देव जाणे!...मी जवळ गेले अन् त्याला म्हटलं,

"मी बोलावलं तर तुम्ही येऊ नये, असा काय अपराध मी केलाय् तुमचा डॉक्टर? मी खरोखरच आजारी आहे, नि मला तुमच्या मदतीची जरूरी आहे, हे तुम्हाला माहीत नाही का?"

त्यानं चाचरत चाचरत न येण्याची काही जुजबी कारणं सांगितली...अन् दुसऱ्या दिवशी यायचं कबूल केलं...पण त्याचा चेहरा मात्र तसाच होता...पछाडल्या-सारखा...

दुसऱ्या दिवशी सकाळपासूनच हेमंतातली धुवांधार वादळं सुरू झाली ... समुद्र उतू चालल्यासारखा फुगलेला...धोधो पाऊस ... तेवढ्यात डॉक्टर महाशय 'काळ्यापांढऱ्या' बंगल्यात येऊन पोहोचले...

मी बसले होते लाकडांची शेकोटी पेटवत...पण ते धुराडं काही ठीक नव्हतं. सारखा धूर होत होता...डॉक्टरनं माझी नाडी चाचपली अन् नेहमीचे वहिवाटी प्रश्न विचारले...मी त्याला बेलेव्ह्यूमधली ती दुःखद घटना सांगितली...माझं देवाघरी गेलेलं बाळ...तो आपला पुन्हा त्याच त्याच्या झपाटल्या नजरेनं माझ्या-कडे एकटक पाहात होता...

...अन् एकाएकी त्यानं मला ओढून बाहुपाशांत घेतलं, आणि आवेगानं मला कुरवाळत उद्गारला,

"तुला कसलाही आजार झालेला नाही इझाडोरा...आजारी आहे ते तुझं मन...प्रेमाच्या भुकेपोटी ते आजारी झालंय्...अन् त्याला एकच एक उपाय आहे...प्रेम...खूप प्रेम...भरावेग प्रेम...!

मी अशी एकाकी, शिणलेली, आणि दुःखी...मला त्याचा तो स्नेहाळ आवेग, तो उत्स्फूर्त जिव्हाळा पाहून कृतज्ञता वाटल्यावाचून राहिली नाही...त्या अपरिचित डॉक्टरच्या डोळ्यांत मी डोकावले, अन् तिथे मला आढळली प्रीती.. तत्क्षणीच त्या प्रीतीला माझ्या विद्ध आत्म्यानं, अन् तितक्याच विद्ध देहानं, एक प्रकारच्या निराश उन्मेषानं प्रतिसाद दिला !

हॉस्पिटलमधलं त्याचं काम संपलं की दररोज तो माझ्या बंगल्यावर यायचा... दिवसभरातले सारे भयाण अनुभव मला सांगायचा...त्यांत सारं काही असायचं... जखमी लोकांच्या यातना...बहुधा अयशस्वीच ठरणाऱ्या शस्त्रक्रिया...थोडक्यात म्हणजे, त्या भीषण लढाईच्या सगळ्या भीषण हकिकती !

कधी कधी त्याची रात्रपाळी असताना मीच त्याच्याबरोबर जायची...कॅसिनोच्या तिथलं ते भलंमोठं हॉस्पिटल झोपलेलं असायचं...जागा असायचा केवळ माथ्यावरचा रात्रीचा दिवा...इथे तिथे आसपास जागा असलेल्या कुण्या हुतात्म्याचे कुशीला वळतानाचे उसासे आणि कण्हणं...डॉक्टर इकडून तिकडे जायचा...कधी एक सांत्वनाचा गोड शब्द, कधी प्यायला एखादा घोट, किंवा कधी देवाच्या कृपेचीच साक्ष असल्यासारखं भुलीचं औषध !

कठिण दिवस नि करुण रात्री, अशा त्या काचातून बाहेर पडायला या विलक्षण माणसाला प्रीतीची आणि विषयसुखाची गरज होती...दयनीय प्रीती अन् ओरबाडून काढणारी जंगली लालसा—एकाठायी...एकसमयी...पण याच पेटत्या प्रेमालिंगनांनी, आणि वेडंपिसं करून टाकणाऱ्या तासन्तास अनुभवलेल्या प्रेमोपभोगांनी मला संजीवन दिलं...माझा देह पुन्हा इतका निरोगी आणि स्वस्थ झाला की समुद्रकिनारी हिंडणंफिरणं देखील सुरु झालं...!

एका रात्री या विक्षिप्त डॉक्टरला शेवटी मी विचारलं...म्हटलं, माझ्या पहिल्या बोलावण्याला अजिबात दाद न देण्याचं कारण तरी काय होतं? त्यानं काहीही उत्तर दिलं नाही...पण त्याच्या डोळ्यांत अशी एक वेदना, एक दुःख उमटलं की त्या विषयाचा आणखी पाठपुरावा करण्याचा धीर मला झालाच नाही...कुतूहल मात्र वाढतच राहिलं...काहीतरी रहस्य होतंच इथे...त्यानं उत्तर न देण्याचा माझ्या भूतकाळातल्या कोणत्या तरी घटनेशी संबंध होता खास, असंच आपलं मला वाटत होतं...

नोव्हेंबरची पहिली तारीख...मृतांचा स्मृतिदिन...बंगल्याच्या खिडकीशी उभी राहून पाहात असताना काळ्यापांढऱ्या दगडांनी सीमा आखून वेगळा काढलेला बागेचा प्लॉट, अगदी दोन कबरी असाव्यात तसा दिसत होता, असं माझ्या लक्षात आलं...अन् मग बागेकडे पाहणं म्हणजे भुताटकीला नि भासआभासांना आमंत्रण, अशीच स्थिती होऊन बसली...अंगावर शहारा आल्याखेरीज

राहायचाच नाही तिकडे पाहिलं की !...बंगल्यात सारा दिवस एकटीच्या एकटीच वावरणारी...नाहीतर आता थंडगार अन् उदास भासणाऱ्या पुळणीवर फिरणारी मी...दुःखभोग नि मृत्यू यांच्या जाळ्यातच जणू मी सापडले होते...मरणोन्मुख किंवा जखमी माणसं...हाच माल वाहणाऱ्या, गाड्यांमागून गाड्या दोव्हिल्ला येऊन थडकत होत्या...

बरोबर वर्षापूर्वीच्या मोसमात जाझ बँड आणि हसणंखिदळणं यांनी निनादत राहणारं, ते एकाकाळचं अत्यन्त फॅशनेबल कॅसिनो...ते आता दुःखभोगाच्या काफिल्यांना आसरा देणाऱ्या एखाद्या भल्यामोठ्या तळासारखं दिसत होतं... मी उत्तरोत्तर विषण्णतेच्या आहारी चालले होते...आणि आन्द्रेचा वासनावेग त्याच्या त्या अतितीव्र स्वरूपातसुद्धा प्रत्येक रात्री अधिकच उमासायला लागला होता.. एखाद्या भयंकर स्मृतीनं झपाटल्यानं जिवावर उदार झाल्यासारखं त्याचं वागणं पाहून पुष्कळदा मी त्याला प्रश्न करायची...तर तो म्हणायचा, "तुला एकदा सगळं काही समजलं, की त्याचा अर्थ ताटातूट...तुझी माझी वेगळी वाट, असाच होणार, हे सांगून ठेवतो...खरं तर तू मला काहीच विचारू नयेस..."

एकदा रात्री मी सहज जागी झाले, तर माझ्यावर ओणवून हा मला त्या झोपलेल्या अवस्थेत न्याहाळतो आहे ! ...त्याच्या डोळ्यातला तो भयंकर हताश भाव आता मात्र मला सहन होणं शक्यच नव्हतं...

"तुला काय जाचतंय्...डाचतंय् ते मला सांगून टाक एकदा...ह्या भयंकर रहस्याची छाया माझ्याच्यानं यापुढे पेलवणार नाही..."

तो माझ्यापासून किंचित दूर सरला...अन् डोकं लववून माझ्याकडे स्वस्थ पाहात राहिला...ठेंगणा बांधा...रुंद शरीर...अन् काळी दाढी...!

"तू खरंच का मला ओळखलं नाहीस ?" त्यानं विचारलं.

मी नीट पाहिलं...हळूहळू धुकं विरत गेलं...माझ्या तोंडून किंकाळी बाहेर पडली.. सारं आठवलं...तो – तो भयंकर दिवस...! तो डॉक्टर...मला आशा लावून गेलेला...मुलांना वाचवण्याचा प्रयत्न करणारा...

"आता कळलं ना कोणत्या व्यथेनं मी जळतोय् ते...झोपलीस की तू इतकी तुझ्या मुलीसारखी दिसतेस.. ती तिथे पडली होती तशीच...मी प्रयत्नांची पराकाष्ठा केली होती तिला वाचवण्याकरिता...कितीतरी तास माझा श्वास— माझा प्राण—तिच्या मुखातून तिच्यात मुरवायचा प्रयत्न करत होतो मी...माझं आयुष्य तिला द्यायला धडपडत होतो..."

त्याच्या त्या शब्दांनी मोहोळ उठावं, तशा साऱ्या भयंकर वेदना जाग्या होऊन मला डसल्या...उरलेली सगळी रात्र असहाय्यपणे आसवं गाळण्यातच गेली... तोही तसंच, तितकंच सोसत असावा – माझ्या बरोबरीनं !

या रात्री मला कळून आलं की या माणसावर मी अतीव प्रेम करत होते...
वर या भावनावेगाकडे मी दुर्लक्षच केलं होतं ... पण जसजसं आमचं
रांवरचं प्रेम अन् एकमेकांच्या सहवासाची अभिलाषा वाढत गेली, तसतसे
ा होणारे ते आभासही वाढले...अन् एका रात्री जाग आली असताना ते
ण व्यथित डोळे माझ्यावर एकटक लागलेले मी पाहिले मात्र, – मला वाटलं,
याची ही विचित्र खंत आणि कल्पनेचे भयंकर खेळ आम्हाला दोघांनाही वेडं
न सोडल्याशिवाय राहणार नाहीत !

...दुसऱ्या दिवशी पुळणीवरून फिरत फिरत बरीच दूर गेले मी ... त्या
यापांढऱ्या बंगल्याकडे, किंवा त्या मरणाच्या छायेतल्या प्रीतीच्या सर्वंकष
र्षणाकडे, पुन्हा कधीही न परतायच्या एका भयंकर दुर्दम्य इच्छेला मनात
येत होते एकसारखे...या विचारात चालत चालत मी पुढे गेले...इकडे
हीसांजा झाल्या...अन् परतायचं भान येईपर्यंत तर अंधारही दाटला...
ीची वेळ होती ... 'येऊ का येऊ का' करीत आत घुसणाऱ्या लाटांतूनच
दा तरी वाट काढावी लागत होती...हवेत खूपच गारठा होता.. आणि
ही लाटांना सामोरं जाऊन सरळ त्यांच्या सोबतीनं समुद्रात शिरावं...ज्या
हय दुःखाला कलानंदानं, मुलाच्या पुनर्जन्मानं किंवा प्रीतीनंही सान्त्वना,
ासा मिळून उतार पडू शकत नव्हता, त्या दुःखाचाही स्वतःबरोबर शेवट
वा, अशी अनावर ऊर्मी मनात उसळली ... सुटकेच्या प्रत्येक प्रयत्नातून
या हाती श्रेय काय लागत होतं ? तर विध्वंस, यातना...अन् मृत्यू...
बंगल्याच्या अर्ध्याअधिक वाटेवर आन्द्रे मला भेटला...त्याला बिचाऱ्याला
कर काळजी लागली होती...पुळणीवरून बेलक्ष नि बेभान अवस्थेत चालताना
तच पडलेली माझी हॅट पाहताक्षणी तो शंकाकुल झाला होता...माझ्या
ाची अखेर करायला मी समुद्राच्या कुशीत शिरले तर नाही, असा विचार
्या मनात आला होता... मैल मैल चालल्यानंतर, मी जेव्हा सुखरूप जिवंत
येत असलेली त्याला दिसले, तेव्हा तो लहान मुलासारखा रडायलाच
ला...आम्ही बंगल्यात परत गेलो...एकमेकांचं सांत्वन करण्याचा प्रयत्न
ा...एक गोष्ट मात्र आम्हा दोघांनाही ठाम पटली होती. दोघांची डोकी नीट
ाणावर राहायला हवी असतील तर, आम्ही एकमेकांचा निरोप घेणं
रिहार्यच होतं...कारण आमच्या प्रीतीला एक भयंकर शाप होता...भूत-
ातल्या एका भयंकर घटनेची काळीकुट्ट सावट तिच्यावर कायमची पडलेली
ी...अशा प्रीतीनं आम्हाला दोनच वाटा मोकळ्या ठेवल्या होत्या...एक
ाची अन् दुसरी वेड्याच्या इस्पितळाची...!

...माझा हताशपणा वाढेल अशी याखेरीज आणखी एक गोष्ट तेवढ्यात

घडली...बेलेव्ह्यूमधून एक गरम कपड्यांची ट्रंक मी मागवली होती...त्यानुसार बंगल्यात एक ट्रंक येऊन पोहोचलीसुद्धा एक दिवस...पण ती पाठवणाऱ्यांची काहीतरी नजरचूक होऊन त्या ट्रंकेत निघाले सगळे देईर्द्रेचे नि पॅट्रिकचे कपडे! मुलांनी अखेर अंगाखांद्यांवर घातलेले ते छोटे ड्रेसेस–ते कोट, बूट अन् छोट्या चिमुकल्या टोप्या...हे सारं पुन्हा दृष्टीस पडताक्षणी पुन्हा तीच आर्त किंकाळी माझ्या कानांना भेदून गेली...मुलं निर्जीव, निष्प्राण झालेली मी पाहिली, तेव्हाची ...जशीच्या तशी...अकल्पित, दीर्घ—ओघळत्या, घरंगळत्या आवाजातली... माझीच होती का ती किंकाळी...तो माझाच आवाज?...छे! कुणा मर्मघातक्यानं जखमी केलेल्या प्राण्याच्या कंठातला मरणचीत्कार माझ्या गळ्यातून उमटला असावा!...

आन्द्रे परत आला, तो ते सारे छोटे कपडे उराशी घट्ट पकडून, उघड्या ट्रंकेवरच मी बेशुद्ध होऊन पडलेली त्याला दिसले...त्यानं मला दुसऱ्या खोलीत उचलून नेलं, अन् ट्रंक तर हलवलीच तिथून ताबडतोब...पुन्हा ती ट्रंक माझ्या दृष्टीला कधीच पडली नाही...

## २९

इंग्लंडसुद्धा जेव्हा युद्धात उतरलं, तेव्हा एल्. नंही डेव्हनशायरमधल्या त्याच्या त्या शॅटोचं रूपांतर एका हॉस्पिटलमध्ये केलं...अन् माझ्या विद्यालयातल्या वेगवेगळ्या राष्ट्रांतल्या मुलांच्या सुरक्षिततेची खात्री असावी, म्हणून त्यांची अमेरिकेला रवानगी करून दिली...ऑगस्टिन आणि एलिझबेथ मुलांच्याबरोबरच होते...मला तिकडेच निघून येण्याबद्दल त्यांच्या एकसारख्या तारा यायला लागल्यानं, मीही शेवटी तिकडेच जायचं ठरवलं...

आंद्रेनं लिव्हरपूलला नेऊन न्यूयॉर्कला जाणाऱ्या एका 'क्यूनार्ड'च्या जहाजावर मला व्यवस्थित पोहोचवून दिलं...

मी इतकी उदास अन् थकलेली होते, की सबंध प्रवासात दिवसा अशी मी कॅबिनमधून बाहेर पडलेच नाही...रात्री सगळे सहप्रवासी झोपून सामसूम झाली की मी खोली सोडून बाहेर डेकवर येऊन बसायची...शेवटी न्यूयॉर्कला ऑगस्टिन अन् एलिझबेथ मला उतरवून घ्यायला आले, तेव्हा माझ्यातला भयंकर बदल अन् माझी आजारी अवस्था पाहून त्यांना धक्काच बसला!

माझी शाळा एका व्हिलात थाटलेली होती...निर्वासितांची ती एक हसरी छावणीच होती जणू!...चवथ्या ॲव्हेन्यूतल्या तेविसाव्या रस्त्यावरचा एक मोठा स्टुडिओ घेऊन तिथे माझे निळे पडदे मी टांगले, अन् पुन्हा एकदा नव्यानं कामाला सुरुवात केली...

नुकतीच मी लढाईच्या खाईत रक्तबंबाळ झालेल्या शूर, धीर फ्रान्समधून आले होते...तेव्हा प्रथमदर्शनी अमेरिकेची युद्धाबाबतची ती निर्लेप नि बेपर्वा वृत्ती पाहून मला अगदी संताप आला...मग एका रात्री मेट्रोपॉलिटन ऑपेरा हाऊस-

मध्ये कार्यक्रमाच्या शेवटी मी माझी लाल शाल पांघरून घेतली, अन् ' मार्सेयेज' हे उत्स्फूर्त नृत्य नाचले...अमेरिकेतल्या ताज्या, तरुण रक्ताला घातलेली ती एक साद होती...' उठा, आणि आपल्या या युगातल्या परमोच्च संस्कृतीचं रक्षण करायला सिद्ध व्हा ', अशा अर्थाची साद होती ती...एक हाक होती, आवाहन होतं !...दुसऱ्या दिवशीची वृत्तपत्रे निदान त्या उत्साहाच्या भावनेनं झपाटलेली दिसली...एकात म्हटलं होतं :

" कु. इझाडोरा डंकन हिने कार्यक्रमाच्या शेवटी केलेल्या ' मार्सेयेज 'च्या अत्यंत भावूक नृत्यांकनाला चांगलीच दाद मिळाली...साऱ्या प्रेक्षकवर्गानं उठून उभे राहून कितीतरी मिनिटे नुसता टाळ्याआरोळ्यांचा गजर चालवला होता...तिचे धीरोदात्त पवित्रे म्हणजे पॅरिसमधल्या ' आर्क दे त्रियोम्फ ' वरच्या अभिजात आकृतींची जणू प्रतिबिंबे होती...त्या प्रसिद्ध कमानीवरच्या ( रूयूदच्या ) सुंदर प्रतिमांच्या जिवंत प्रतिकृती नृत्यातून तरळत असताना, प्रेक्षकांना जेव्हा एक विवक्षित पवित्रा घेऊन तिने थरारून सोडले, तेव्हा तिचे खांदे अनावृत होते...कमरेपर्यंतची शरीराची एक बाजू देखील अनावृत होती...त्या उदात्त शिल्पकलेचा हा चेतन आविष्कार पाहून प्रेक्षकांनी आनंदोत्साहानं चीत्कार केला.. टाळ्यांचा, अभिनंदनाचा वर्षाव केला..."

माझा स्टुडिओ पुन्हा एकदा कवी नि कलावंत यांचा एक अड्डा बनला...माझं गळालेलं धैर्य पुन्हा परत आलं...' सेंच्युरी ' थिएटर त्या वेळी नुकतंच बांधून तयार झालं होतं...ते मोकळं आहे, असं पाहून त्या सीझनपुरतं ते मी भाड्यानं घेतलं, अन् माझ्या ' डायनिशियन 'च्या निर्मितीला सुरुवात केली...

त्या थिएटरचं एकंदर शिष्ट-अहंमन्य स्वरूप पाहून मला भारी संताप यायचा; तेव्हा त्याचं रूपांतर ग्रीक रंगमंदिरात करून टाकायचं मी ठरवलं...प्रथम वाद्यवृंदाच्या सगळ्या खुर्च्या नि बैठकी काढून टाकल्या. अन् तिथे आकाशी रंगाचा एक रुजामा घातला...ग्रीक कोरसच्या हालचालींना ही सोयीस्करशी व्यवस्था झाली...तिथल्या त्या बेंगरूळ बॉक्सेसना देखील मोठ्या निळ्या पडद्यांनी झाकून जरा कळा आणली...अन् मग पस्तीस नटांच्या, ऐंशी वादकांच्या आणि शंभर गायकांच्या साहाय्यानं ' इडिपस 'ची शोकांतिका सादर केली...ऑगस्टिननं राजा ' इडिपस 'ची मुख्य भूमिका केली होती, आणि मी माझ्या शाळेतल्या नर्तकवृंदासह ' कोरस 'मध्ये होतेच...

माझा प्रेक्षकवर्ग मुख्यतः पूर्वभागातला होता ( ईस्ट साईडचा...) आता ओघानं आलं आहे म्हणून सांगते...त्या प्रेक्षकांचीच अमेरिकेत आज खऱ्या कलाप्रेमी लोकांत गणना व्हायला पाहिजे...त्यांना दिसणारी रसास्वादनाची अन् कलेची बूज पाहून मी इतकी हेलावून गेले, की माझं विद्यालय, माझा वाद्यवृन्द—अशा

माझ्या साऱ्या मेळाव्यानिशी तिथे जाऊन, तिथल्या यिडिश (ज्यू) थिएटरमध्ये मी एक विनामूल्य कार्यक्रम केला !...सारं काही माझ्या हातात असतं, तर ज्यांचा आत्मा काव्यसंगीत या कलांत भिजला-मुरलेला आहे, अशा या लोकांसाठीच मी नाचत राहिले असते...पण काय ! हे माझं मोठं धाडस म्हणजे एक चांगलाच महागात पडलेला प्रयोग ठरला...इतका की माझं मुळी दिवाळंच वाजलं ! मग न्यूयॉर्कच्या काही लक्षाधीशांच्यापुढे हात पसरणं आलंच ओघानं...उत्तर काय मिळावं ? तर...

"ग्रीक शोकांतिकाच सादर करायचा तुझा एवढा अट्टाहास का पण ?"... हा प्रश्न !

त्या वेळी सबंध न्यूयॉर्कभर 'जाझ' नृत्याचं वेड पसरलं होतं...बरंदाज कुटुंबातले म्हातारे-तरणे, बायकापुरुष 'बिल्टमोर' सारख्या होटेलच्या मोठमोठ्या दालनांतून निग्रो ऑर्केस्ट्राच्या जंगली हाकारे नि बांगा, यांच्या साथीवर फॉक्सट्रॉट नाचण्यात वेळ घालवताना दिसायचे...एक दोन विशेष नृत्यप्रसंगांचं आमंत्रण मलाही आलं होतं त्या वेळी.. आणि फ्रान्स तिकडे रक्त सांडत असताना, अन अमेरिकेच्या मदतीची त्या देशाला जरुरी असताना, असल्या अघोर काळात हा प्रकार चालावा, याबद्दलची चीड माझ्या मनात मावेनाशी झाली होती !...खरं म्हणजे माझ्या लेखी, एकोणीसशे पंधरा सालातलं सारंच वातावरण वैताग आणण्यासारखंच होतं...तेव्हा माझ्या विद्यालयासकट मी परत युरोपला जायचा निश्चय केला...

...पण आता आमच्या तिकिटांना लागणाऱ्या पैशाचं काय ? 'डान्टे ॲलिघिरी' या परतीच्या बोटीवर बर्थ वगैरे मिळायची व्यवस्था तर झाली...पण पैशाच्या व्यवस्थेचं काय ?...बोट निघायला अवघे तीन तास उरलेले, अन् अजूनही हवी तेवढी रक्कम जवळ जमा नाही, अशी स्थिती !...एवढ्यात माझ्या स्टुडिओत साधासा पोशाख केलेली एक तरुण अमेरिकन स्त्री आली, अन् त्या दिवशीच आम्ही युरोपला जायला निघणार होतो, किंवा कसं, याबद्दल तिनं माझ्याकडे विचारणा केली.

प्रवासाचे कपडे, अंगरखे वगैरे घालून तयार असलेल्या माझ्या बाळगोपाळांच्याकडे बोट दाखवून मी म्हटलं, "पहा, आम्ही तर सगळे तयार होऊन बसलोय्. पण तिकिटाचे पुरे पैसे देण्याएवढी रक्कम काही माझ्याकडे नाहीय्..."

"किती लागतील साधारण ?" तिनं विचारलं...

"जवळजवळ दोन हजार डॉलर्स हवेत" मी उत्तर दिलं; त्यावर त्या विलक्षण बाईनं एका छोट्या डायरीसारख्या वहीतून हजार हजाराच्या दोन नोटा काढून समोरच्या टेबलावर ठेवल्या...अन् वर म्हणते,

"या क्षुल्लक बाबतीत का होईना, पण तुला मदत करायची संधी मला मिळाली याचा मला फार आनंद वाटतोय्..."

मी आपली या अनोळखी बाईकडे आश्चर्यानं बघतच राहिले! तिला आधी कधी पाहिलंसुद्धा नव्हतं मी...अन् तरी पावतीबिवतीची काही अपेक्षा न करता एवढी मोठी पैशांची रक्कम आपली तिनं माझ्या हवाली केली होती...ती अनामिका कुणी एकाकी लक्षाधीश स्त्री असावी, एवढी फार तर मी कल्पना करू शकले तिच्याबाबत...पण मागून कळलं, की हे खरं नव्हतं...एवढी सारी रक्कम माझ्या स्वाधीन करता यावी, म्हणून आदल्या दिवशी तिनं आपले कर्जरोखे–शेअर्स वगैरे सगळी पुंजी विकून टाकली होती सरळ!

इतर पुष्कळ लोकांप्रमाणे तीही आम्हाला निरोप द्यायला बोटीवर आली होती. रूथ नाव होतं तिचं...रूथ! "तुझी माणसं तीच माझी माणसं– तुझा रस्ता तो माझा रस्ता."—असं म्हणणारी रूथ!...त्यानंतर आजपर्यंत माझ्या लेखी ती त्या वेळची तशीच 'रूथ' राहिली आहे...!

न्यूयॉर्कमध्ये 'मार्सेयेज'चे आणखी प्रयोग न करण्याबद्दल ताकीद मिळालेली होतीच...पण बोटीच्या डेकवर प्रत्येक मुलीच्या बाहीत एक एक छोटा फ्रेंच ध्वज लपवून आम्ही अगदी तयार उभे होतो...मी सर्वांना सांगून ठेवलं होतं, की शिट्टी वाजून जहाज किनाऱ्यापासून अलग झालं, की त्या क्षणी एकजात सर्वांनी ते ध्वज फडकावत मार्सेयेज म्हणायचं...आम्ही ठरल्याबरहुकूम वागलो...खूप मजा आली ...गोदीतला अधिकारी वर्ग मात्र वैतागून गेला...

माझी मैत्रिण मेरी खरं म्हणजे मला निरोप द्यायला आली होती...पण अगदी शेवटच्या क्षणी तिला माझ्या ताटातुटीची कल्पना असह्यच होऊन, सामान किंवा पासपोर्ट याचा विचार देखील न करता ती आपली उडी मारून डेकवर चढली, अन् आमच्यात येऊन मिसळली...'मार्सेयेज'सुद्धा गायली ती आमच्याबरोबर ...अन् म्हणाली, "मी तुमच्याबरोबर येणार...!"

अशा तऱ्हेनं 'मार्सेयेज'च्या गाण्याच्या पार्श्वभूमीवर आम्ही एकोणिसशे पंधरातल्या त्या वेळच्या श्रीमंत नि सुखलालस अमेरिकेला रामराम ठोकला, अन् इटलीची वाट धरली...आमच्या फिरत्या शाळेसकट!...नेपल्सला पोहोचलो तो दिवस तर अगदी उत्साहभराचाच होता...इटलीनं युद्धात उतरायचा निर्णय घेतला होता, आम्ही सर्वच परत आल्याच्या खुषीत होतो...मग शहराबाहेर आम्ही एक मनोरम उत्सवसुद्धा पार पाडला–मला आठवतं की तिथे जमून टकमका आमच्याकडे पाहणाऱ्या शेतकरी कामकरी लोकांच्या गर्दीसमोर मी एक व्याख्यानसुद्धा ठोकलं होतं...मी म्हटलं, "तुमच्या या सुंदर भूमीबद्दल तुम्ही ईश्वराला धन्यवाद द्या...अमेरिकेचा हेवा करायचं तर तुम्हाला काहीच कारण

नाही...निळयाभोर आकाशाचा तुमचा हा विलक्षण रमणीय देश ...हे द्राक्षाचे मळे...या ऑलिव्ह फळांच्या राया...अरे, तुमची ही संपदा अमेरिकेतल्या कुठल्याही लक्षाधीशाला खाली पाहायला लावेल...आहात कुठे? ''

...नेपल्समध्ये, आता पुढे कुठे जायचं याबद्दल बराच काथ्याकूट झाला... माझी ग्रीसला जायची फारच इच्छा होती...कल्पना अशी की कोपानोसवर मुक्काम ठोकून लढाई संपेपर्यंतचे दिवस काढावे...पण माझ्या शाळेतल्या मोठ्या मुलींना भीती वाटायला लागली...त्यांचे पासपोर्टस् जर्मन होते...मग स्वित्झर्लंडच्या आश्रयाला जावं असं ठरवलं...तिथे निदान कार्यक्रम होऊ शकले असते अनेक

...या बेतानुसार आम्ही झुरिचला गेलो...तिथे "बार दयू लाक्" या होटेलमध्ये एका प्रसिद्ध अमेरिकन लक्षाधीशाची कन्या उतरलेली होती...मला वाटलं, तिच्या मनात आपल्या विद्यालयाबद्दल कुतूहल निर्माण करण्याची ही बरी संधी आली आयती...मग एक दिवस संध्याकाळी बाहेर हिरवळीवर आमच्या मुलींचा खास तिच्यासाठीच एक कार्यक्रम घडवून आणला...ते दृश्य एकंदरीत इतकं रम्य दिसत होतं, की ती मुलगी मनोमन हेलावून गेली असणार अशी मला खात्री वाटत होती...पण जेव्हा मी शाळेला मदत करण्याचा विषय तिच्यापाशी काढायला गेले, तेव्हा ती म्हणाली, " मुली छान आहेत, दृश्यही मनोरम असेल पण मला यात बिलकूल रस नाही...माझ्या स्वतःच्या आत्म्याच्या स्वरूपाची चिकित्सा करण्यापलीकडे कोणत्याही गोष्टीची मला आवड नाही...इतर कशात रस नाही... फ्रॉईड या प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञाचा शिष्य डॉ. येंग यांच्याबरोबर ती बरीच वर्षं अध्ययन करत होती...दिवसातले तिचे किती तरी तास आदल्या दिवशी तिला पडलेली स्वप्नं कागदावर उतरवून काढण्यात घालवायची ती ...!

त्या उन्हाळयात माझ्या शिष्यांच्या जवळपासच असावं, म्हणून 'ऊशी' ला होटेल 'बो रीवाज' मध्ये मी राहिले होते...माझ्या खोल्या छान होत्या... बाल्कनीतून सरोवर समोरच दिसायचं...जवळच कामचलाऊ रेस्तराँ– खानावळ म्हणून वापरलेली एक भलीमोठी बॅरॅक होती. ती मी भाड्यानं घेतली...अन् नित्य स्फूर्तिदायक ठरलेल्या माझ्या त्या निळ्या पडद्यांनी ती सजवून त्या रूपान्तरित कलामंदिरात शिष्यांना शिकवायला नि दुपार संध्याकाळ तिथे नृत्य करायला मी सुरुवात केली...

आनंदाची गोष्ट म्हणजे 'वाईनगार्टनर' पतिपत्नीचं आगतस्वागत करायची आम्हाला संधी मिळाली...मग त्या दिवशी सबंध दुपार अन् सायंकाळदेखील ग्लूक, मोझार्ट, बीथोव्हन नि शूबर्ट यांचं संगीत त्यांच्यासाठी नाचण्यात घालवली आम्ही...

माझ्या बाल्कनीतून सरोवरावरच ओणवणाऱ्या दुसऱ्या एका बिस्कळ बाल्कनीतलं दृश्य दिसायचं...तिथे दररोज सकाळीं चकचकीत रेशमी किमोनो घातलेल्या सुंदर नि तरुण मुलांचा एक थवा माझ्या नजरेस पडायचा...त्यांच्या बाल्कनीतून माझ्याकडे पाहात ती मुलं स्मित करायची...एका रात्री त्यांनी मला जेवायला देखील बोलावलं...गोड होती, तशीच गुणी होती ती मुलं...निर्वासित बिचारी सगळी !

रात्री कधी कधी ते लोक मला मोटरबोटीतून 'लेमा' सरोवरावर फिरायला घेऊन जायचे...वातावरण प्रेमिकांना आवडावं, असं धुंद असायचं सरोवरावर... साऱ्या बोटीतून शँपेनचा दरवळ महकायचा...पहाटे चारच्या सुमारास 'मॉन्त्र'ला उतरायचे...तिथे कुणी एक अज्ञात इटालियन काऊंट – सरदार, चार वाजता 'सपर' द्यायचा ! हे रेखीव पण जरा कठोर नि उग्रभयाण म्हणावं असं सौन्दर्य दिवसभर निद्राधीन असायचं, अन् रात्र पडली, की जागृत व्हायचं ! कितीदा हा काऊंट आपल्या खिशातून एक चांदीची छोटी सिरिंज बाहेर काढून मुद्दाम आपल्या गोऱ्या कृश दंडामध्ये आपलं आपण एक इंजेक्शन घ्यायचा...इतर लोक आपलं लक्ष नसल्यासारखं दाखवायचे...अन् त्यानंतर त्याच्या विनोदबुद्धीला अन् उत्साहाला अगदी भरतं यायचं...पण पुढे म्हणे दिवसभर मग त्याला भयंकर यातना सहन कराव्या लागायच्या...

त्या तसल्या आकर्षक तरुणाच्या मजेदार सहवासामुळे माझ्या एरवीच्या उदास नि एकाकी अवस्थेतून मला थोडा वेळ तरी दिलासा मिळत होता हे खरंच...पण स्त्री-सौन्दर्याबाबतची त्याची निर्लिप्त वृत्ती पाहूत मात्र माझा अभिमान जरासा डिवचलाच गेला होता....मी माझी संमोहनशक्ती पणालाच लावायचं ठरवलं, अन् असलं भरघोस यश माझ्या पदरात पडलं म्हणता !...एका रात्री आम्ही त्या लोकांच्या प्रमुखाबरोबर एका उत्तमोत्तम मर्सिडिज कारमधून निघालो...बरोबर एक तरुण अमेरिकन मित्र तेवढा होता...अतिशय अद्भुत रात्र होती ती...लेमा सरोवराच्या काठानं आम्ही वेगानं निघालो...मॉन्त्र केव्हाच मागे पडलं...मी ओरडले, "आणखी पुढे चला...आणखी दूर"...शेवटी पहाटे पाहिलं तर आम्ही 'व्हीज'ला येऊन पोहोचलो होतो...तरी मी आपला धोशा लावलाच होता..."पुढे...आणखी पुढे"...तेव्हा मग त्या तिथल्या कायमच्या हिमाच्छादित रस्त्यातून मार्ग काढत त्याच वेगानं आम्ही 'सेंट गोतार'ची खिंडही पार करून गेलो...

माझ्या या मित्राचं पुरं मंडळच मागे राहिलं होतं...त्या सगळ्या तरुण सुंदरांना त्यांचा सुलतान निघून गेल्याचं—अन् तेही ज्या जातीचा त्यांना तिटकारा होता, त्या स्त्रीजातीच्याच एका नमुन्याबरोबर पळून गेल्याचं सकाळी कळल्यावर केवढा

का बसला असेल, या विचाराबरोबर मला हसूच लोटत होतं...मी तर माझं शीकरणाचं अस्त्र पणाला लावून बसले होते...लवकरच आम्ही खाली उतरून टलीत पोहोचलो...रोम येईपर्यंत मुळी आम्ही मग थांबलोच नाही, अन् रोमहून ढे लगेच नेपल्सला गेलो...गेल्या गेल्या तिथे समुद्राचं दर्शन घडलं मात्र, थेन्स पुन्हा पाहावं अशी एक ज्वलन्त ऊर्मी माझ्या मनात दाटून आली!

एक छोटी इटालियन बोट आम्ही पकडली...अन् ॲक्रॉपोलियाच्या पांढऱ्या शुभ्र गमरवराच्या पायऱ्या पुन्हा चढताना तो क्षण उगवला...मी निघाले होते त्या दिव्य नि प्रज्ञावती ॲथेनाच्या मंदिराच्या रोखानं ... यापूर्वीची माझी इथली वारी ला स्पष्ट स्पष्ट आठवत होती...दरम्यानच्या काळात सुज्ञपणा आणि सुसंवाद, या गुणांपासून मी किती भयंकर दूर गेले होते, साऱ्या आदर्शांपासून किती ढळले होते, याचा विचार मनात येऊन माझी मलाच लाज वाटली...अन् खरंच! दुःख-भोगांची...यातनांची केवढी भारी किंमत मोजून मी मला मोहवश करणारी वासना विकत घेतली होती!

ॲथेन्सच्या नव्या शहरात अगदी सावळागोंधळ चालला होता...'व्हेनेझेलॉस'ची माघार झाल्याची वार्ता आम्ही आल्याच्या दुसऱ्याच दिवशी जाहीर झाली . राजघराणं कैसरचीच बाजू घेईल, असा कयास बांधला जात होता...त्या दिवशी नी एक सुंदर मेजवानी दिली...माझ्या निमंत्रित पाहुण्यांत राजेसाहेबांचे चिटणीस एम्. मेलास, हेही होते.. टेबलाच्या मधोमध लाल गुलाबांची एक रास रचून याच्याखाली एक छोटा ग्रॅमोफोन मी लपवून ठेवला होता...त्याच खोलीत बर्लिन-हून आलेले काही महत्त्वाच्या हुद्द्यावरचे अधिकारीही एका टेबलाभोवती बसलेले होते...तिथून एकाएकी मद्याचे चषक उंचावून कैसरच्या विजयाला आवाहन केलेलं ऐकू आलं...त्याबरोबरच गुलाबपुष्पं बाजूला सारून मी माझा ग्रॅमोफोन सुरू केला...'मार्सेयेज' वाजायला सुरुवात होताक्षणी माझा मद्याचा प्याला उंचावून "फ्रान्सचा विजय असो"– अशी बांग मी दिली...

राजेसाहेबांचे चिटणीस जरा साशंक झाल्यासारखे वाटले...पण खरं तर त्यांना आनंदच झालेला दिसला, कारण त्यांची सहानुभूती पूर्णपणे दोस्तराष्ट्रांकडे होती...

एवढ्या वेळात आमच्या तिथल्या उघड्या खिडक्यांच्या अमोरच चौकात माणसांचा एक मोठा जमाव जमला होता...मी व्हेनेझेलॉसचं चित्र माझ्या डोक्यावर उंच धरलं आणि माझ्या तरुण अमेरिकन मित्राला ग्रॅमोफोन घेऊन माझ्या पाठोपाठ यायला सांगून मी त्या चौकाच्या मधोमध जाऊन पोहोचायच्या नेटानं निघाले 'मार्सेयेज' ग्रॅमोफोनवर सारा वेळ धीटपणे वाजत होतंच... त्याच्या साथीवर, अन् आतापर्यंत उत्तेजित झालेल्या जमावाच्या उत्स्फूर्त समूह-गानाच्या जोडीनं मी मग फ्रान्सच्या 'हिम् ऑफ फ्रान्स' या गीतावर नाचले...

अन् मग त्या जमावाला जरा चार गोष्टीही सुनावल्या. म्हटलं...

"दुसरा 'पेरिक्लस'च जणू, असा हा थोर व्हेनेझेलॉस तुम्हाला लाभला आहे...त्याला एकस्याला खाईत का लोटता तुम्ही? तुम्ही का नाही मागोमाग जात त्याच्या? तोच एक ग्रीसला पुन्हा मानाचं पान मिळवून देऊ शकेल!"

...मग व्हेनेझेलॉसच्या घरापर्यंत आम्ही एक मिरवणूक काढली.. अन् त्याच्या खिडकीखालीच 'ग्रीस'चं स्तोत्र अन् 'मार्सेयेज' आलटून–पालटून पुन्हापुन्हा आम्ही गात राहिलो...शेवटी संगिनीधारी सैनिकांनी दयामाया न ठेवता निकरानं आमची सभा उधळून लावली...

त्या एकंदर प्रसंगानं माझी चांगलीच करमणूक झाली...मात्र लगेच आम्ही नेपल्सची बोट पकडली आणि 'ऊशी'च्या वाटेला लागलो...

इथून पुढे युद्ध संपेपर्यंत माझी शाळा एकत्रित आणि सुसंघटित ठेवण्यासाठी मला अगदी पराकोटीचा नेट लावून झटावं लागलं...वाटायचं की युद्ध संपलं रे संपलं, की बेलेव्हूला सहज परतता येईल...पण युद्धाची लांबण लांबतच राहिली अन् स्वित्झर्लंडमध्ये ती शाळा चालू ठेवण्याच्या अवाढव्य खर्चामुळे मला सावकारांच्याकडून शेकडा पन्नास टक्के व्याजानं कर्ज घेणं भाग पडलं...

...या अडचणींमुळेच मी एकोणिसशे सोळामध्ये दक्षिण अमेरिकेच्या नृत्य-दौऱ्याचा करार केला, अन 'ब्यूनॉस एअरिस'ला जायला निघाले...

...ह्या आत्मकथनात जसजशी मी खोलखोल शिरते आहे, तसतसा स्वतःच्या आयुष्याचा–किंवा खरं तर माझ्यातल्या अनेक वेगवेगळ्या 'मीं'च्या आयुष्याचा सर्हासही आलेख काढणं किती अशक्य आहे, याचा मला अधिकाधिक अनुभव येतो आहे! जे प्रसंग मला अगदी आयुष्यभर पुरून उरले, त्यांच्या वर्णनाला इतकी थोडी पानं लागली!...माझ्या जीवनातली काही मध्यंतरं संपता संपत नव्हती... दुःखभोग आणि यातना, यांनी शिगोशिग भरलेल्या हजारो वर्षांसारखी भासली होती मला ती...त्यांतून बाहेर पडून केवळ जीव जगवण्यासाठी पुन्हा जगाच्या आखाड्यात उतरताना 'स्वतःचा बचाव...स्वसंरक्षण'- हीच एक खूणगाठ मनाशी मी बांधली होती...अन् त्या पायी मी पुरी बदलून गेले होते...पण आश्चर्य असं की, तो काळ इथे या आत्मकथनात रेंगाळताना दिसत नाही!... कित्येकदा तीव्र निराशेनं मी स्वतःलाच विचारते, "एवढ्या खटाटोपानंतर मी जो हा माझ्या आयुष्याचा सांगाडा केवळ उभा केला आहे, त्याला मेदमांसाची भर देऊन 'माणूस' बनवणं कोण्या भल्या वाचकाला तरी शक्य आहे का? 'सत्य' हातात पकडायचाच फक्त खरं तर मी प्रयत्न करते आहे...पण 'सत्य'च दूर पळत आहे एकसारखं...लपंडाव खेळत आहे माझ्याशी...कसं हुडकून काढू मी 'सत्य'? मी जर मुळात लेखिकाच असते, अन् वीस एक कादंबऱ्यांचा मजकूर

मी माझ्या स्वतःच्या आयुष्याबद्दल लिहिला असता. तर मग कदाचित वाचकांना 'सत्या' ची किंचित पुसटतीशी कल्पना तरी आली असती. पण त्या सर्व कादंबऱ्यांचं लेखन झाल्यावर नंतर मला माझ्यातल्या 'कलावंताची' एक स्वतंत्र गोष्ट लिहावी लागलीच असती ते निराळंच !...अन् ह्या गोष्टीचा मुखडाभोहरा आधीच्या भारुडापेक्षा पुन्हा सर्वस्वी वेगळाच दिसला असता, हे नवल !... माझ्यातलं कलावंतांचं विश्व नि कलेबद्दलचे विचार...आशा...अपेक्षा...आकांक्षा हे सारं सर्वथा स्वतंत्र होतं...स्वतंत्रच वाढत होतं...अजूनही तसंच चाललेलं आहे...एखाद्या अलग वाढणाऱ्या चेतन जिवाप्रमाणे माझ्या इच्छाशक्तीकडे संपूर्ण दुर्लक्ष करून माझ्यातलं कलाविश्व जगत आहे, स्वतःची जोपासना करत आहे...

...तरीसुद्धा माझ्या आयुष्यात जे जे काय घडलं, त्यातलं 'सत्य' शब्दात पकडायचा प्रयत्न मी इकडे करतेच आहे...पण वाटतं की ह्या साऱ्या उरस्फोडीतून एक अर्थहीन फापटपसाराच तर केवळ मागे उरणार नाही ना ?...काही असो... माझी संपूर्ण जीवनकहाणी कागदावर उतरवण्याचं हे अशक्य कोटीतलं काम मी एकदा अंगावर घेतलेलं आहे खरं...ते मी शेवटपर्यंत काही झालं तरी निभावणारच आहे ! खरं म्हटलं तर जगातल्या तथाकथित चारित्र्यसंपन्न स्त्रिया हा वृत्तांत वाचून काय उद्गार काढतील ते आजच मी ऐकू शकते आहे..."कुण्या एकीची एक अति गलिच्छ कहाणी !"..."तिच्यावर कोसळलेली संकटपरंपरा म्हणजे दुसरं तिसरं काही नाही...तिच्याच पापांची ती फळं !"...वगैरे वगैरे.. पण मी पाप केलं आहे, असं मला वाटतच नाही...नित्शे म्हणतो, "स्त्री हा एक दर्पण आहे—आरसा आहे..." आणि खरंच सांगते, माझा ताबा घेणाऱ्या शक्ती नि व्यक्ती, यांचीच प्रतिबिंबं नि प्रतिक्रिया माझ्या जीवनाच्या आरशात नित्य उमटत आली आहेत...ओव्हिडच्या 'मेटॅमॉर्फोसिस' (कायाकल्प) मधल्या नायिकांच्याप्रमाणे अमरांच्या—त्या सनातन देवगणांच्या आदेशानुसार मी माझं रूप नि गुण बदलत आले आहे !

न्यूयॉर्कला बोट थांबली, तेव्हा तिथपासून ऑगस्टिन माझ्याबरोबर आला... युद्धकाळात मी एकटीनं इतका दूरवरचा प्रवास करणं त्याला तेवढं योग्य वाटत नव्हतं...त्याची सोबत हा मला एक मोठाच दिलासा होता...बोटीवर काही तरुण बॉक्सर्स पण होते...'टेड लुईस' हा त्यांचा म्होरक्या होता. तो सकाळी सहा वाजताच मेहनतीसाठी अन् सरावासाठी उठायचा आणि नंतर बोटीवरच्या छोट्या खाऱ्या पाण्याच्या तलावात पोहायचा...त्यांच्याप्रमाणे मी सुद्धा त्या वेळीं रियाज अन् रात्री त्यांच्यासाठी नृत्य करायची...त्यामुळे तो जलप्रवास खूप गंमतीत झाला, अन् लांबता—रेंगाळता तर मुळीच वाटला नाही. 'मॉरिस ड्यूमेस्निल' नावाचा पियानोवादक या प्रवासात माझ्याबरोबर साथीला होता...

साधारणपणे उष्ण कटिबंधातली म्हणावी, अशा शहरांपैकी 'बाहिआ' शहराशी माझी पहिली ओळख झाली...बाहिआ मला खूप मुलायम, हिरवंगार अन् ओलंभिजलं असं वाटलं...पाऊस तर सारखा धोधो पडत असायचा... रस्त्यानं जाणाऱ्यायेणाऱ्या, पांढरे स्वच्छ सुती पोशाख घातलेल्या बायका पावसात पुऱ्या ओल्याचिंब झालेल्या दिसायच्या...कपडे तर अंगाला लगटून चिकटलेले ...पण पावसाचं, किंवा आपण भिजलो आहोत, की कोरड्या आहोत, याचं भान किंवा काळजी काही त्यांना दिसत नव्हती...तसंच काळ्या आणि गोऱ्या लोकांचं सरसहा एकत्र वागणंफिरणं—हा चर्चेचा विषय वगैरे होत नसल्याचा एक नवाच अनुभव इथे आला...दुपारी ज्या एका रेस्तराँमध्ये आम्ही जेवलो, तिथे एका टेबलाशी एक काळा मनुष्य गोऱ्या मुलांबरोबर बसला होता, तर दुसऱ्या टेबलाशी गोरा मनुष्य काळ्या मुलीच्या सोबतीनं जेवत होता...तिथल्या छोट्या चर्चमध्ये तर काळ्यागोऱ्यांच्या मिश्रविवाहापासून झालेल्या मध्यमरंगी मुलांना बाप्तिस्मा देण्यासाठी घेऊन आलेल्या बायकाही दिसल्या...

तिथल्या प्रत्येक उद्यानात लाल जास्वन्दीला बहर आलेला दृष्टीस पडत होता ...सारं बाहिआ शहर काळ्या-गोऱ्यांच्या अनिर्बंध मैत्रीच्या, प्रीतीच्या खुणा अंगावर वागवत होतंसं वाटलं...शहरातल्या काही भागात तर काळ्यागोऱ्याच काय, पण पिवळ्या कांतीच्या बायकासुद्धा नायकिणीच्या माड्यांवरच्या खिडक्यांतून आळसावलेल्या, रेलून बसलेल्या दिसायच्या...आणि गंमतीची गोष्ट म्हणजे मोठमोठ्या शहरातल्या नायकिणींचे खप्पड चेहरे किंवा चेहऱ्यावरचा चोरटा भाव इथे नावालासुद्धा आढळणं कठीण होतं!

* * *

ब्यूनॉस एअरिसमध्ये आल्यानंतर काही दिवसांनी आम्ही विद्यार्थ्यांच्या एका 'कॅबरे' नृत्याच्या कार्यक्रमाला गेलो...नेहमीप्रमाणे ते एक लांबच लांब, ठेंगण्या छताचं धुरकट दालन होतं...आणि तिथे 'टँगो' नाचणाऱ्या काळ्या युवकांची आणि त्यांच्यात मिसळून गेलेल्या तशाच काळ्यासावळ्या युवतींची बेसुमार गर्दी झाली होती...मी आजपर्यंत 'टँगो' कधीच नाचले नव्हते.. पण आमचा वाटाड्या म्हणून बरोबर असलेल्या त्या अर्जेन्टिन तरुणानं मला 'टँगो' नाचून पाहायचा आग्रह केला...पहिल्या किंचित बुजऱ्या पदक्षेपापासूनच माझी नाडी त्या कामुक नृत्याच्या दिलखेचक नि उन्मादक लयीला प्रतिसाद देत असल्याचं भान मला झालं...टँगोची ती लय...सुदीर्घ रतिस्पर्शासारखी मधुर...दक्षिण आकाशाच्या साक्षीनं रंगलेल्या प्रेमचेष्टेसारखी मदिर, अन् ऊष्णकटिबंधातल्या रानावनाच्या संमोहनाप्रमाणे अदय, गूढकातर, धोकेबाज!...त्या काळ्याभोर डोळ्यांच्या तरुणाचा हात वेळोवेळी नुसत्या चुटपुटल्या दाबानं मला नृत्यविन्यासा-

तून सांभाळून नेत असताना, – आणि त्याची नजर मधूनमधून मोठ्या धिटाईनं माझ्या नजरेला आव्हान देत असताना, ही सारी जादू मला जाणवली...

...इतक्यात एकाएकी त्या विद्यार्थ्यांनी मला ओळखलं...अन् माझ्याभोवती गराडा घातला...तो सारा महोत्सव अर्जेंटिनाच्या स्वातंत्र्यदिनानिमित्त होता, असं त्यांनी मला सांगितलं, अन् मग त्यांच्या राष्ट्रगीतावर नृत्य करायची मला विनंती केली....विद्यार्थ्यांना खुष करणं मला नेहमी मनापासून आवडतं; तेव्हा मी होकार दिला, आणि प्रथम त्या अर्जेंटिन स्वातंत्र्यगीताचा अनुवाद ऐकून शब्द समजावून घेतले. नंतर अर्जेंटिन ध्वज अंगाभोवती लपेटून घेऊन, एकाकाळी त्यांनी भोगलेलं गुलामगिरीचं दुःख, आणि हुकूमशहाच्या ताबेदारीतून त्यांनी मिळवलेलं स्वातंत्र्य नृत्यातून त्यांच्यापुढे सादर करण्याचा प्रयत्न केला...बिजलीसारखी माझी यशोलेखा क्षणात झळाळून गेली ...या विद्यार्थ्यांना अशा तऱ्हेचं नृत्य कधीच पाहायला मिळालेलं नव्हतं...त्यामुळे त्यांच्या अपार उत्साहाला आरोळ्यांची वाचा फुटली. ते गीत सारेजण पुन्हा पुन्हा गात राहिले...मला पुन्हा पुन्हा त्यांनी त्यावर नाचायला लावलं...

मी माझ्या यशानं फुलून आणि ब्यूनास एअरिसवर खुष होऊन हॉटेलमध्ये परतले तो काय! खुष होण्यात फार घाई झाली, असंच म्हणावं लागलं...कारण या नृत्यदौऱ्यातला माझा व्यवस्थापक, माझा आदल्या दिवशीच्या कार्यक्रमाचा सनसनाटी वृत्तान्त दुसऱ्या दिवशी सकाळी वृत्तपत्रात वाचून भडकून गेला... म्हणाला, "कायद्यानुसार हा करार आता संपला–मोडला, असंच तू समज!" ...ब्यूनॉस एअरिसमधल्या साऱ्या सुसंस्कृत मातब्बर लोकांनी कार्यक्रमाच्या तिकिटांचे पैसे परत मागून घ्यायला सुरुवात केली...माझ्या कार्यक्रमावर बहिष्कारच घालायचं ठरवलं...अन् अशा तऱ्हेनं, ज्या उत्स्फूर्त मेळाव्यानंतर मी एवढी मनात हरखून गेले होते, तोच मेळावा जणू ब्यूनॉस एअरिसच्या माझ्या छोट्या दौऱ्याच्या मुळावर आला!

जीवनात जो गोंधळ नि विसंवाद आढळून येत असतो, त्यालाच कला एक व्यवस्थित आकार नि आंतरिक मेळ देते...एक चांगली कादंबरी कलात्मकतेनं रसोत्कर्षाची एक विशिष्ट पायरी गाठते...अन् मग त्या कादंबरीच्या संदर्भात त्यानंतर रसापकर्षाचा संभवच उरत नाही...'इझोल्द'च्या उदाहरणातल्यासारखं, कलाविश्वातलं प्रेम संपतं, ते सुरांची एक शोकपूर्ण आणि सुंदर आस मागे तरळत ठेवून...पण जीवन म्हणाल, तर रसापकर्षाचंच आगर आहे...त्यामुळे वास्तवातलं प्रेम सरता सरता विसंवादी स्वरावर बोट ठेवून जातं...आणि ते सुद्धा एखादी सुंदर संगीतस्वरावली आसमंतात तरळत असताना तो क्षण पकडून, एकाएकी झडप घालणारा एखादा कणसुरा कर्कश विसंवाद साधून! अन् इतक्यानं काय

झालं आहे! खरंच, वास्तव जीवनात कित्येकदा प्रेमाचा उपसंहार झाल्यानंतरही उरलेली विझती धग क्षणभर पुन्हा पेटत्या निखाऱ्यासारखी दिसते, ती का? तर पोटगीसारख्या व्यावहारिक खटाखटी आणि वकिलांच्या खर्चाची भरपाई...असल्या थडग्यांवर डोकं आपटून शेवटी दीनवाणं मरण पत्करायला!

...खरं म्हणजे हा लहानसा दौरा मी पत्करला होता, तो युद्ध संपेपर्यंत शाळा चालवण्याइतपत पुरेसा पैसा कमावता येईल या आशेनं; त्यात स्वित्झर्लंड-हून मला एक तार आली...मी तारमनिऑर्डरनं पाठवलेले पैसे युद्धाच्या नियम-निर्बंधांच्यामुळे मधल्यामधेच अडकून पडले होते!...मला केवढा धक्का बसला असेल, कल्पना करा!...मुलींना ज्या शाळेच्या वसतिगृहात मी ठेवून आले होते, त्या शाळेची मुख्याध्यापिका पैशाशिवाय त्यांना ठेवून घेणार होती थोडीच! ती त्यांना हाकलून काढणार, ही भीती होतीच...माझ्या नेहमीच्या उतावीळ स्वभावानुसार, ऑगस्टिनला पुरेसे पैसे बरोबर देऊन जिनिव्हाला लगेच रवाना करायचं, आणि माझ्या शिष्यमंडळींवरचा प्रसंग निभवायचा, असं मी ठरवलं... तेवढं झाल्यावर मागे होटेलचं बिल देण्याएवढीसुद्धा रक्कम आपल्याजवळ नसेल, ह्याचा काही विचारच मी केला नाही...!...इकडे माझा तो चक्रम मॅनेजर एका फार्सिकल संगीतिका करणाऱ्या मंडळीला घेऊन चिलीला निघून गेलेला होता...अर्थातच मी, आणि माझा पियानोवादक ड्यूमेसनिल, असे दोघं पैशा-शिवाय ब्यूनॉस एअरिसमध्ये अडकून पडलो!

प्रेक्षकवर्ग तर थंड, जडबुद्धी आणि अरसिकच निघाला...खरं तर ब्यूनॉस एअरिसमध्ये एकच कार्यक्रम यशस्वी झाला...अन् तो देखील त्या रात्री 'कॅबरे'-च्या तिथे मी स्वातंत्र्यगीतावर नृत्य केलं, त्या दिवशीचा! होटेलमध्ये ट्रंक्स मागे ठेवूनच आम्हाला मॉंटेव्हिडिओला जावं लागलं...सुदैवाची गोष्ट म्हणजे होटेल-मालकांना आमच्या ग्रीक नृत्यवेषाविषयीचं तसं काहीच मोल कळत नाही!

मॉन्टेव्हिडिओचा प्रेक्षकवर्ग मात्र अर्जेन्टिन प्रेक्षकांच्या अगदी उलट प्रकृतीचा होता ..उत्सुक अन् भयंकर उत्साही...त्यामुळे 'रिओ द जानेरो' पर्यंत आम्ही आमचा दौरा नेऊ शकलो. तिथे आम्ही पोहोचलो, ते जवळ पैसा नाही, सामान-सुमानही नाही अशा कंगाल स्थितीत...पण तिथल्या नगरपालिकेच्या रंगमंदिराचा मुख्य अधिकारी इतका कनवाळू निघाला की त्यानं ताबडतोब आमचे कार्यक्रम मुक्रर केले; आणि इथे तर प्रेक्षक इतके बुद्धिमान, संवेदनाक्षम नि रसिक भेटले की काय सांगू! त्यांच्यासमोर जो कुणी कलावंत उभा राहील, त्याला स्वतःचं कसब आपल्या साऱ्या शक्तीपणाला लावूनच तिथे मांडावंसं वाटेल, असा गुणग्राही प्रेक्षकवर्ग होता तो!

इथेच माझी कवी 'ज्यां द रिओ' शी गाठ पडली...त्याच्यावर रिओच्या

एकजात साऱ्या युवकांचं प्रेम होतं, मर्जी होती....कारण उघड आहे...रिओ-तला प्रत्येक तरुण स्वतःही एक कवीच असतो! आम्ही बरोबर चालत जात असताना हे सारे तरुण 'ज्यां द रिओ झिंदाबाद' 'इझाडोरा झिंदाबाद' — अशा ललकाऱ्या देत होते!

रिओवर ड्यूमेस्‌निलची अशी छाप पडली होती, की त्यामुळे तिथून निघायला तो विशेष राजी दिसत नव्हता ... तेव्हा त्याला तिथेच सोडून मी एकटीच न्यूयॉर्कला परतले...मनातल्या नृत्यशाळेच्या काळजीमुळे प्रवास अगदी विषण्ण अन् एकाकी झाला ..जाताना बरोबर असलेल्या त्या बॉक्सर्सपैकी काही जण तर यश किंवा पैसा यांपैकी काहीच हाती न लागल्यामुळे बोटीवर 'स्टुअर्ड' म्हणून काम करताना दिसले!

आमच्या सहप्रवाश्यांत एक अमेरिकन गृहस्थ होता — सारखा बेटा दारूच्या नशेतच असायचा..."एकोणिसशे अकरापासून मुरलेली ही पॉमेरी मद्याची बाटली इझाडोरा डंकनच्या टेबलावर पाठवा", असं तो जेवण्याच्या तिथे रोज रात्री न चुकता म्हणायचा...तिथे बसलेल्या सर्वांना ते ऐकून धक्काच बसायचा!

न्यूयॉर्कला पोहोचलो, तेव्हा तिथे कुणीच आलं नव्हतं; कारण युद्धाच्या निर्बंधांच्यामुळे माझी तार पोहोचली नव्हती . मग 'आर्नोल्ड गेन्त' नावाच्या माझ्या एका जिव्हाळ्याच्या मित्राला मी आपला सहजच फोन केला ... तो प्रतिभावंतच नव्हता तर एक अद्‌भुत किमयागार होता ... त्यानं फोटोग्राफी-खातर चित्रकलेला सोडचिठ्ठी दिली होती...त्याची ही फोटोग्राफी मात्र कमालीची भयचकित करणारी अन् चकवणारी होती...आपल्या कॅमेऱ्यानं नेम धरून ज्यांची छायाचित्रं तो टिपायचा, त्यांचा, त्याच्या तयार छायाचित्रात कुठे मागमूससुद्धा दिसायचा नाही! छायाचित्रं उतरायची ती त्याच्या नजरबंदी करणाऱ्या कल्पना-शक्तीला जाणवणाऱ्या त्यांच्या रूपांची! माझीसुद्धा त्यानं कितीतरी छायाचित्रं घेतली ...त्यात कुठेही माझ्या शारीरिक व्यक्तित्वाचं प्रतिबिंब पडलेलं नसून माझ्या आत्म्याची वेगवेगळी रूपंच उमटलेली दिसतात...त्यातसुद्धा एक छाया-चित्र म्हणजे तर माझ्या आत्म्याचा अगदी साक्षात्कारच आहे...!

हा आर्नोल्ड माझा कितीतरी वर्षांपासूनचा जानीदोस्त होता, तेव्हा बोटीच्या धक्क्यावर एकटीच उभी असताना मी सहज त्याला फोन केला; मात्र आर्नोल्डच्या आवाजात प्रतिसाद न मिळता, दुसराच एक चिरपरिचित आवाज कानावर पडला, तेव्हा मला इतकं आश्चर्य वाटलं! एल्. होता तो...एका अकल्पित योगा-योगानं त्याच दिवशी सकाळीं तो आर्नोल्डला भेटायला आला होता...! धक्क्या-वर मी एकटीच थांबलेली आहे, अन् माझ्याकडे पैसे नाहीत,–कुणी मित्रमंडळी बरोबर नाहीत,–म्हटल्यावर, त्यानं मदतीला आपण ताबडतोब येत आल्याचं

सांगितलं...

काही मिनिटांत तो येऊन पोहोचलासुद्धा ...त्याची ती उंच रुबाबदार मूर्ती पुन्हा पाहिली मात्र, माझ्या मनाला एकाएकी धीर आला...सुरक्षित वाटायला लागलं...त्याच्याप्रमाणेच मलाही त्याला पाहून खूप आनंद झाला होता...

...माझं हे आत्मवृत्त वाचताना, सहज कंसात म्हणून का होईना, तुम्ही एक नोंद करून ठेवली असेल मनात, अशी मला आशा आहे...नोंद या वस्तुस्थितीची, की माझ्या प्रेमप्रकरणात मी माझ्याकडून नेहमीच एकनिष्ठ राहिले होते ... अन् दुसऱ्या व्यक्तीनं आपली निष्ठा सोडली नसती, तर त्यांपैकी एकालाही मी सोडलं नसतं...पूर्वी एकाकाळी जसं मी त्यांच्यावर प्रेम केलेलं असतं, तसंच तितकंच ते आताही असतं...आणि तसंच सदा राहणार आहे...कित्येक पुरुषांपासून मी वेगळी झाले असेन, दूर गेले असेन, तर त्याबद्दल मी पुरुषांच्या भ्रमरी, चंचल वृत्तीला अन् निष्ठुर दैवालाच दोष देईन...

...अशा साऱ्या परिस्थितीत, अन् अनेक अडचणींनी भरलेल्या प्रवास-दौऱ्यानंतर एल्. पुन्हा माझ्या मदतीला आलेला पाहून मी सुखावून गेले... नेहमीप्रमाणे आपल्या भारदस्त पद्धतीनं बोलून त्यानं माझं सामान कस्टममधून सोडवलं, अन् आम्ही आर्नोल्डच्या स्टुडिओत गेलो...त्यानंतर दुपारच्या जेवणाला, ‘ रिव्हरसाईड ड्राईव्ह ’ला जाण्यासाठी आम्ही तिघंही बाहेर पडलो... ‘ रिव्हरसाईड ड्राईव्ह ’च्या त्या तिथून ग्रँटची समाधी अगदी नीट दिसते...

पुन्हा एकदा सारे एकत्र जमल्यानं, आम्ही फारच खुषीत होतो...तेव्हा शँपेनचं अगदी ‘ मुक्तसुरई ’ पान ओघानंच आलं !...मला वाटलं, की न्यूयॉर्कमध्ये पाऊल पडलं ते तरी निदान एका शुभमुहूर्तावर, एवढं बरं...एल्. तर त्याच्या अगदी भलत्या प्रेमळ आणि दिलदार ‘ मूड ’ मध्ये होता...जेवणानंतर घाईघाईनं जाऊन आधी तो मेट्रोपॉलिटन ऑपेरा हाऊस ठरवून आला ... अन् एका बड्या, विनामूल्य नृत्योत्सवाची आमंत्रणं एकजात साऱ्या कलावंतांना पाठवण्यात त्यानं पुढे सबंध दुपार अन् संध्याकाळ घालवली ! त्या वेळचा हा नृत्यप्रयोग म्हणजे माझ्या आयुष्यातला एक अत्यंत सुंदर अनुभव ठरला ! न्यूयॉर्कमधले सगळे चित्रकार, नट आणि गायकवादक तिथे उपस्थित होते; अन् बॉक्सऑफिसचं दडपण मनावर नसल्यानं मनसोक्त नाचण्याचा आनंद चाखता आला होता...अर्थात युद्धाच्या काळातल्या माझ्या रिवाजाप्रमाणे याही कार्यक्रमाची सांगता ‘ मार्सेयेज ’नंच झाली...अन् फ्रान्सच्या अन् दोस्तराष्ट्रांच्या वतीनं खूप टाळ्या नि प्रशंसा मला मिळाली.

ऑगस्टिनला मी जिनिव्हाला कसं पाठवलं, ते मी एल्. ला सांगितलं...आणि माझ्या शाळेची काळजी माझ्या मनात कशी दाटून राहिली होती, तेही त्याला कळून

चुकलं...अर्थात त्याच्या त्या अलौकिक दानतीनुसार, त्यानं सबंध शाळा न्यूयॉर्कला आणण्यासाठी लागणारी रक्कम तडक तारेनं रवाना केली...दुर्दैवाची गोष्ट अशी, की सबंध शाळेला त्याचा फायदा मिळण्याच्या दृष्टीनं पैसे फार उशिरा पोहोचले. ...दरम्यान जवळजवळ सर्वच्या सर्व छोट्या शिष्यांना त्यांच्या पालकांनी आपला उपजत हक्क बजावून परत घरी नेलं होतं...माझे कितीतरी वर्षांचे श्रम नि मेहनत ज्या नृत्यशाळेच्या कारणी पडली, तिच्याबाबत दैवानं केलेली ही 'वजाबाकी' पाहून मला फार वाईट वाटलं, पण तेवढ्यात ऑगस्टिनच्या अन् सहा मोठ्या मुलींच्या आगमनानं मात्र माझ्या दुःखावर किंचित साय धरली !

एल्. अजूनही त्या दिलदार नि उत्तमोत्तम 'मूड' मध्ये होता...माझ्या नि माझ्या शिष्यांच्या भाग्यात यापेक्षा आणखी काय चांगलं व्हायचं उरलं होतं ? 'मॅडिसन स्क्वेअर गार्डन'च्या वर त्यानं एक मोठा विस्तृत स्टुडिओ भाड्यानं घेतला—रोज दुपारी तिथे आमच्या तालमी चालायच्या.. सकाळी हडसन नदीच्या काठाकाठानं तो आम्हाला मोटरमधून लांब दूर फिरवून आणायचा...सर्वांना छोट्यामोठ्या भेटवस्तू द्यायचा...खरं तर श्रीमंतीच्या ह्या अद्भुत सत्तेच्या पाठबळावर तेवढा काही काळ कितीतरी सुरम्य भासला...!

...मात्र न्यूयॉर्कचा कडक हिवाळा सामोरा येऊ लागला तसतशी माझी प्रकृती ढासळायला लागली; एल्. नं सुचवलं, की विश्रांतीखातर मी क्यूबाची ट्रिप करून यावं ..त्यासाठी त्यानं आपल्या सेक्रेटरीला माझ्यासोबत पाठवलं...

क्यूबाच्या माझ्या मनातल्या स्मृती मोठ्या मधुर आहेत...एल्. चा तरुण सेक्रेटरी कविमनाचा होता...तब्बेत बरी नसल्यामुळे कार्यक्रम करण्याएवढी ताकद माझ्यात नव्हतीच...पण किनाऱ्याकिनाऱ्यानं मोटरीतून हिंडत, आजूबाजूच्या, चित्रासारख्या रम्य परिसराचं दृष्टिसुख अनुभवत आम्ही हॅवानामध्ये तीन आठवडे मजेत घालवले...त्या तिथल्या वास्तव्यातला एक कडूगोड प्रसंग माझ्या चांगला ध्यानात आहे...

हॅवानापासून दोन किलोमीटर अंतरावर एक जुनीपुराणी महारोग्यांची वसाहत आहे...सर्व बाजूंनी एका उंच भिंतीनं वेढलेली...मात्र एक भयंकर मुखवटा असावा, तसा एखादा चेहरा भिंतीवरून आमच्याकडे पाहताना दृष्टीला पडू शकेल इतपतच ती भिंत उंच होती...ती महारोग्यांची वस्ती आणि शेजारीच असलेलं अत्याधुनिक, ऐषारामी थंड हवेचं ठिकाण—यातला विसंवाद तिथल्या अधिकाऱ्यांना नंतर जाणवला असावा; कारण त्यांनी ती वस्ती तिथून हलवण्याचा निर्णय घेतला...मात्र महारोग्यांनी तिथून जायला सपशेल नकार दिला...कुणी दारं पकडून, भिंतीलगत चिकटून बसले, तर कुणी छतावर चढून जाऊन काहीबाही आधाराला घेऊन ठाण मांडून बसले...अशीही वदंता सगळीकडे पसरली, की

त्यापैकी काही महारोगी पळून जाऊन हॅवानात कुठे कुठे लपले आहेत...त्या वस्तीची हलवाहलव ही घटना, कधीही विचार केला तरी 'मेटरलिंक'च्या एखाद्या चमत्कारिक नि गूढ नाटकासारखी वाटते...

तिथल्या आणखीही एका, जुन्यात जुन्या घराण्यातल्या कुटुंबाच्या घरी मी गेले होते...त्या कुटुंबाला माकडं, वानरं...गोरिला वगैरे पाळण्याचा शौक होता. ...या जुन्यापुराण्या घराची बाग मालकिणीनं पाळलेल्या प्राण्यांच्या अनेक पिंजऱ्यांनी अगदी गजबजून गेली होती. तिचं घर हा, बाहेरून आलेल्या सर्व मुशाफिरांना एक कुतूहलाचा विषय होता...सर्व येणाऱ्याजाणाऱ्यांचं नि पाहुण्यांचं ती अतिशय मुक्त हस्तानं अन् अगत्यानं आतिथ्य करायची...स्वागताला ती पुढे यायची तीच मुळीं खांद्यावर एक माकड नि हाताशी एक गोरीला अशा थाटात! तिच्या संग्रहातले सर्वांत माणसाळलेले प्राणी हे दोनच होते...इतर सगळे काही असे इतपत मवाळ नव्हते...त्यांच्या पिंजऱ्यापुढून कुणी गेलं, की ते पिंजऱ्याचे गज गदागदा हलवायचे, आरोळ्या ठोकायचे...अन् वेडावूनही दाखवायचे 'ही सर्व मंडळी तशी धोकेबाजच नाहीत का?' या माझ्या प्रश्नावर पठ्ठीनं निर्विकारपणे उत्तर दिलं : "कधीमधी पिंजऱ्याबाहेर हे लोक पडल्यानं एखाद-दुसऱ्या बागवानाचा बळी पडतो एवढंच...एरवी तसा काहीच धोका नाही!" या माहितीनं माझं धाबच दणाणलं, अन् तिचा निरोप घ्यायची वेळ झाली, तेव्हा तर चक्क आनंदच झाला...

आश्चर्याची गोष्ट अशी की ही 'मालकीण'बाई फारच देखणी होती! विशाल भावदर्शी डोळे होते तिचे...चांगलं वाचन वगैरे होतं, बहुश्रुत होती, अन् शिवाय बुद्धिमानही होती...कला आणि साहित्य या विषयांतल्या उत्तमोत्तम अलौकिक ग्रंथांचा संग्रह घरात करायचा तिला छंद होता...अशा सर्व बाजूंनी सुसंस्कृत स्त्रीचा, माकडं नि गोरीला यांच्याकडे इतका ओढा असावा, याला काही सुसंगत कारण शोधून तरी सापडेल का?' तिचा तो पुरा प्राणिसंग्रह, कर्करोग आणि क्षयरोग या विषयांतल्या संशोशोधनासाठी, तिच्यापाठीमागे, 'पाश्चर इन्स्टिट्यूट फॉर एक्सपरिमेंटल वर्क' या संस्थेच्या स्वाधीन करावा, असं मृत्युपत्र तिनं केलं असल्याचं तिनंच मला सांगितलं.. ही प्रेमाची कोणती रीत झाली? 'पोस्ट-मार्टेम प्रेम' म्हणावं का याला?

हॅवानातील आणखी एक मजेदार आठवण सांगते...कसली तरी महोत्सवी रात्र होती...सारी कॅबरे-नाचघरं आणि रेस्तराँज अगदी गजबजून गेली होती... नेहमीप्रमाणे समुद्रकिनाऱ्यानं अन् मग तिथल्या पंपासच्या गवताळ प्रदेशांतून फिरणं आटोपल्यावर आम्ही हॅवानाच्या विशिष्ट तऱ्हेच्या कॅफेत शिरलो...पहाटे तीनचा सुमार होता...इथे नेहमीची ती मॉर्फिन, कोकेन वगैरेचा नाद असलेल्यांची-गांजेकस, दारुडे नि इतर सगळी व्यसनं असलेल्या लोकांची-गर्दी कोंदाटलेली

होतीच...आम्ही एका छोट्या टेबलाशी जिथे बसलो होतो, ती खोली धुरानं कोंदलेली होती अन् धूसर प्रकाश होता तिथे...छत टेंगणं होतं...आम्ही बसलो तोच माझं एका माणसाकडे लक्ष गेलं...पांढराफटक, झपाटल्यासारखा चेहरा, खोल खोल गेलेले गालांचे खड्डे, अन् उग्रआसुरी डोळे !...त्याच्या त्या किडकिडीत लांब बोटांनी त्यानं पियानोच्या स्वरपट्ट्यांना स्पर्श केला मात्र, मी अगदी चकित होऊन गेले...शोपांच्या ' प्रेल्यूडस् 'च्या त्याच्या त्या वादनातून जाणवलेली समज, अन् ते प्रतिभेचं स्फुरण, काही आगळंच होतं ! थोडा वेळ मी तशीच ऐकत राहिले, अन मग उठून त्याच्या जवळ गेले...जेमतेम चारसहा तुटक शब्द त्याच्या तोंडून बाहेर पडले...तेवढ्यात माझ्या हालचालीनं मी साऱ्या कॅफेचंच लक्ष वेधून घेतलं होतं...एवीतेवी इथे मी उघडपणे माझ्या नावानं वावरत नव्हतेच...तेव्हा या चमत्कारिक प्रेक्षकवर्गापुढे नाचायची एक अतर्क्य ऊर्मीच माझ्या मनात उसळून आली...माझा केप मी स्वतःभोवती लपेटून घेतला...पियानोवादकाला काही सूचना दिल्या आणि त्या ' प्रेल्यूडस् 'च्या कितीतरी स्वरबंधांवर मी नृत्य केलं ! त्या छोट्या कॅफेमधले सारे मद्यपी हळूहळू शांत झाले...होता होता माझ्या नृत्याकडे त्यांचं लक्ष लागायला लागलं...कित्येकांच्या डोळ्यांना आसवांच्या धारा लागल्या...तो पियानोवादकही मॉर्फियाच्या गुंगीतून भानावर येऊन मोठ्या स्फूर्तीनं वाजवायला लागला...

सकाळपर्यंत मी नाचत होते...शेवटी जेव्हा मी तिथून जायला निघाले, अन् त्या लोकांनी मला प्रेमानं मिठ्या मारल्या, तेव्हा कोणत्याही थिएटरमध्ये नाचल्यानंतर वाटला नव्हता एवढा मला स्वतःचा अभिमान वाटला !...कारण माझ्यात कलागुण असल्याची ही खरीखुरी साक्ष होती !...इथे कुणी व्यवस्थापक नव्हता ...लोकांचं लक्ष आधीच वेधून घेणाऱ्या जाहिरातींचं जंजाळही नव्हतं...

यानंतर थोड्याच दिवसांनी मी आणि माझा कविमित्र फ्लॉरिडाची बोट पकडून पामबीचला येऊन उतरलो...तिथून एल्.ला मी तार पाठविली ..त्याप्रमाणे तो आम्हाला ' ब्रेकर्स ' होटेलमध्ये येऊन भेटला...

* * *

अत्यंत तीव्र अशा दुःखाचा सर्वात असह्य काळ लोकांना वरवर वाटतो तसा, अगदी सुरुवातीचा क्षण नसतो–त्या क्षणात तर दुःखाच्या धक्क्यानं आपण अशा एका निर्लिप्त, उन्नत अवस्थेला जाऊन पोहोचतो, पाहणाऱ्याला वाटावं हिला भूल तर दिलेली नाही ?...खऱ्या यातना जाणवतात त्या, त्या क्षणी नव्हे...नंतर...खूप खूप नंतर.. जेव्हा लोकं ' हं, आता तरी त्या व्यथेतून बाहेर निघालीय् बरं का ती '— ' आता ठीक आहे सारं, दुःखाला पुरून उरलीय् ती '...,असं काहीबाही म्हणायला लागलेले असतात...! एखाद्या मौजमजेच्या पार्टीच्या वेळी, जेव्हा एका बर्फगार

हाताचं आपल्या काळजावर पडलेलं दडपण आपल्याला जाणवत असतं...! किंवा एखाद्या जळत्यापेटत्या नखी पंजाच्या पकडीत आपला गळा सापडल्याचा भास जेव्हा आपल्याला होत असतो...!...थंडगार बर्फ अन् जळती आग...नरक-यातना आणि निराशा... अशा वेळी या साऱ्यावर मात करायची असते आपल्याला...म्हणून मग शँपेनचा पेला उचलून आपल्या आठवणींना विस्मृतीत बुडवायचा प्रयत्न–शक्य, अशक्य कोटीतला प्रयत्न–करतो आपण...अन् हेच क्षण असह्य असतात सर्वांत !...माझी चालू अवस्था अगदी अशीच होती... माझी सारी मित्रमंडळी म्हणायची, 'तिला आता विसर पडलाय्, त्यातून बाहेर पडलीय् ती'–आणि इकडे तर 'आई' अशी हाक मारत कुणी एखादं मूल खोलीत एकाएकी आल्यानं देखील माझ्या मर्मावर घाव बसायचा...सारा जीव एका वेदनेनं इतका पिळवटून निघायचा, की मग मेंदूला ध्यास लागायचा केवळ नेणिवेचा...विस्मृतीचा ! मग ती अवस्था कोणत्या का रूपानं किंवा उपायानं येईना !...आणि असल्या जीवघेण्या दुःख–भोगातून जीवनाचा नवा डाव पुन्हा मांडायची नि नव्यानं कला–निर्मिती करण्याची आस मी मनाशी बाळगली होती ! अपरिचितांच्या शवपेट्यांसमोर आपल्या फिक्या निस्तेज ओठांनी सतत रात्रभर प्रार्थना करत राहणाऱ्या नन्सच्या निर्लिप्तपणाचा मला इतका हेवा वाटतो म्हणून सांगू ! 'मी प्रीतीला शरण जाणारच, मी प्रेम करणारच...आनंद निर्माण करणारच...आनंद...प्रेम ! !'...असे नारे लावत, बंडाचं निशाण उभारणाऱ्या कलावंताला अशा अलिप्त स्वभावाचा हेवा वाटला तर काही नवल आहे का ?

...पर्सी मॅके नावाच्या एका अमेरिकन कवीला एल्. पामबीचला आपल्या-बरोबर घेऊन आला...एके दिवशी व्हरांड्यात सारीजणं एकत्र बसलेली असताना एल्.नं माझ्या सगळ्या कल्पना ध्यानात घेऊन बांधायच्या विद्यालयाचा एक प्लॅन काढून दाखवला...अन् त्यासाठी तळमजल्यावरच्या व्यवस्थित आखणीची 'मॅडिसन स्क्वेअर गार्डन', ही अशी साजेशी जागाही आधीच विकत घेऊन ठेवल्याची बातमीही मला ढांगितली...

एल्.च्या त्या बेतामुळे...अन त्या प्लॅनमुळे सर्वसाधारणपणे माझ्या मनालाही उत्साहच वाटला होता, तरी लढाईच्या अगदी ऐन धुमश्चक्रीच्या काळात एवढ्या मोठ्या प्रकल्पाला हात घालावा, हे मला ठीक वाटत नव्हतं...शेवटी एवढंच निमित्त होऊन एल्.चं डोकं इतकं फिरलं, की जेवढ्या उतावळेपणानं त्यानं ती गार्डन विकत घेतली होती, तेवढ्याच आततायीपणानं न्यूयॉर्कला परतल्याक्षणी तो खरेदीकरार त्यानं रद्द करून टाकला !...

...पर्सी मॅकेनं आदल्याच वर्षी माझ्या पोरींना नाचताना पाहून एक सुंदर कविता केली होती.

A bomb has fallen over Notre Dame :
Germans have burned another Beigian town :
Russians quelled in the East : England in qualm :
I closed my eyes, and laid the paper down.
Grey ledge and moor-grass and pale bloom of light
By pale blue sees :
What laughter of a child world-sprite,
Sweet as the horns of lone October bees,
Shrills the faint shore with mellow old delight ?
What elves are these
In smocks grey-blue as sea and ledge,
Dancing upon the silvered edge
Of darkness – each ecatatic one
Making a happy horizon.
With shining limbs, to the low sunken sun ?
See : now they cease
Like nesting birds from flight :
Demure and debonair
They troop beside their hostess's chair
To make their bedtime courtsies :
" Spokoini Notchi ! Gute Nacht !
Bon soir ! Bon soir ! Good night ! "
What far-gleaned lives are these
Linked in one Holy Family of Art ?
Dreams : dreams once Christ and Plato dreamed :
How fair their happy shades depart !
Dear God ! How simple it all seemed
Till once again
Before my eyes the red type quivered: slain :
Ten thousand of the enemy.
Then laughter ! Laughter from the ancient sea
Sang in the gloaming : Athens ! Galilee !
And elfin voices called from the extinguished light :

" Spokoini Notchi ! Gute Nacht !
Bon soir ! Bon soir ! Good Night ! "
...या कवितेचा भावार्थ असा :
नोत्रदामवर बॉंब पडलाय् एक :
जर्मन गनिमांनी आणखी एक बेल्जियन शहर केलंय् बेचिराख
पूर्वेकडे रशियनांची बसलीय् दातखिळ : इंग्लंड आहे संभ्रमात :
...मी माझे डोळे मिटले, आणि वृत्तपत्र हलकेच ठेवलं खाली...
राखी रंगाची आडवी दरड...माळरानातलं गवत...प्रकाश पाकळ्यांची
मंद फिकी उकल...
...फिक्या निळ्या सागराच्या साक्षीनं
बाळगोपाळांच्या बाळविश्वातल्या एखाद्या परीचं हसू
अश्विनातल्या एकाकी भृंगगणाच्या गूढगुंजनासारखं मऊमधुर—
तेच का गुंजतंय्...निनादतंय्...अबोध सागरतीराला सनातन
मृदुमधुर आनंदाच्या गुदगुल्या करीत ?
कोण आहेत या देवदूती...
धूसर...निळ्या चुणीदार परिवेषातल्या,
धूसर–निळसर दरडीचे–समुद्राचे रंग ल्यालेल्या ?
अंधाराच्या चंदेरी सीमेवर नाचतायत या...
मावळत्या, कलत्या दिनकरासाठी त्यांच्याच हर्षोल्लासातून,
त्यांच्या तेजाळ अंगांगातून का उमटतंय् एकेक मस्तमगन क्षितिज ?
पहा : थांबले ते विभ्रम त्यांचे...
वरट्याकडे परतणाऱ्या पक्षीगणांच्या भराऱ्यांसारखे !
शान्त...समधात...!
साऱ्याजणी जमतात त्यांच्या गृहस्वामिनीच्या आसनापाशी
रात्रीचं अभिवादन करण्यासाठीः
" स्पोकोईनी नोच्ची ! ( रशियन ) गूट नाख्ट ! ( जर्मन )
बों स्वार, बों स्वार ! ( फ्रेंच ) गुड नाईट ! ( इंग्रजी )"
कुठून दूरवरून आलेयत हे जीव एकत्र
कलेच्या एकमेव पवित्र कुळाशी गोत्र जुळवून निगडित झालेले ?
स्वप्नं ! स्वप्नं...येशूला पडलेली–प्लेटोनं पाहिलेली...
त्या स्वप्नांची ती सुखद किरणं झिरमिरतायत इतक्या दूरवर शुभ्रसुंदर...
परमेश्वरा ! सारं किती सहजसोपस भासत होतं...तोवर...जोवर
पुन्हा एकदा डोळ्यांपुढून माझ्या तरळली नव्हती ती

रक्तलांछित छापील अक्षरं !...मृत ! !...
शत्रू पक्षाचे दहा हजार!...
मग अट्टहास...अट्टहास प्राचीन सागराचा...
मावळतीच्या संधिप्रकाशानं झेललेले नादनिनाद—ॲथेन्स !...गॅलिली !
अन् इकडे देवावरच्या जिवांची किलबिलती साद ...
दिव्यानं डोळे झाकल्यावर उजळलेल्या अंधारात
" स्पोकोईनी नोची ! गूट नाख्ट !
बों स्वार, बों स्वार ! गुड नाईट. "

# ३०

एकोणिसशे सतराच्या पूर्वार्धात ‘ मेट्रोपॉलिटन ’ ऑपेरा हाऊसमध्ये माझे नृत्यप्रयोग चालू होते...त्या वेळी इतर पुष्कळ लोकांच्याप्रमाणे मलाही वाटत होतं, की या लढाईतल्या दोस्तराष्ट्रांच्या विजयावरच सबंध जगातल्या स्वातंत्र्य, पुनरुत्थान, संस्कृती – इत्यादी मूल्यांचं अस्तित्व टिकून राहणं अवलंबून होतं...त्यामुळे माझ्या प्रत्येक कार्यक्रमाच्या शेवटी मी ‘ मार्सेयेज ’ नाचायची...सारा प्रेक्षकवर्ग त्या वेळी उठून उभा राहायचा...असं जरी असलं, तरी रिचर्ड वॅग्नरच्या संगीतावरच्या माझ्या नृत्यांना मी कार्यक्रमांतून वगळलं वगैरे काही नाही...अन् मला वाटतं, केवळ लढाई चालू आहे म्हणून जर्मन कलावंतांवर बहिष्कार घालणं, हा अन्याय आहे, मूर्खपणा आहे, या माझ्या मनोधारणेशी सारेच बुद्धिवान लोक सहमत असतील...

रशियन क्रांतीची घोषणा झाली, त्या दिवशी साऱ्या स्वातंत्र्यप्रिय लोकांची मनं आशेनं आणि आनंदानं फुलून गेली होती...त्या दिवशी ‘ मार्सेयेज ’ नाचताना, जो अस्सल क्रांतीचा भावार्थ या रचनेच्या मुळाशी होता, त्याची मला खरी प्रतीती आली...‘ मार्सेयेज ’च्या पाठोपाठच ‘ मार्श स्लाव्ह ’चा नृत्यभाव मी माझ्या वेगळ्या कल्पनेप्रमाणे सादर केला...त्यात झारला उद्देशून एक ‘ स्तुती ’ होती...त्यावर हंटरच्या फटकाऱ्यानं लोळवल्या गेलेल्या कामकऱ्याचं चित्र मी स्टेजवर नृत्यांकित केलं ! !

नृत्याविर्भाव अन् त्याचं संगीत, यातला हा विसंवाद, किंवा नृत्याविर्भावानं त्याच्या संगीताचा केलेला हा अधिक्षेप म्हणा हवं तर, पाहून प्रेक्षकांत एकतऱ्हेचं वादळच उठलं...!

...माझ्या आजवरच्या कलाजीवनातल्या निराश, विफल प्रसंगांनी अन् बंड-खोर घटनांनीच माझ्या मनावर सर्वांत अधिक मोहिनी घातली आहे, ही किती चमत्कारिक गोष्ट आहे पाहा! माझ्या त्या 'लाल ट्यूनिक्'च्या वेषात मी क्रान्तीचंच नृत्य नाचत आले आहे सतत... 'दलितांचा उठाव' नृत्यानून साकार करत आले आहे...

रशियन क्रांतिदिनाच्या त्या रात्री मी एक प्रकारच्या रौद्रसुंदर उन्मादाचा नृत्यानंद चाखला! मानवतेच्या रक्षणासाठी ज्यांनी खूप काही सोसलं होतं, ज्यांचे हालहाल झाले होते, ज्यांनी बलिदान केलं होतं, त्या सर्वांच्या आत्म्यांना त्या क्षणी मुक्ती मिळाली होती...अन् त्या मुक्तीच्या आनंदाची माझ्या अंतरात नुसती घुसळणी चाललेली होती...रात्रीमागून रात्री आपल्या बॉक्समधून माझे हे नृत्य-प्रयोग पहाता पाहता एल्. शेवटी काहीसा अस्वस्थ दिसायला लागला...एक तऱ्हेनं त्यात नवल वाटण्यासारखं काहीच नव्हतं...लालित्य आणि सौंदर्य यांचा पुरस्कार करणाऱ्या ज्या नृत्यविद्यालयाचा तो आश्रयदाता होता, तेच विद्यालय पुढे कधीतरी त्याच्यासकट त्याच्या स्वतःच्या कोट्यवधी संपत्तीच्या मुळावर येण्या-इतकं धोकादायक तर ठरणार नाही ना, असा प्रश्न त्याला पडला होता...पण माझ्यातली कलेची ऊर्मी मलाच भारी असल्यानं, माझ्या जिव्हाळ्याच्या व्यक्ती-साठीसुद्धा मी ती ऊर्मी आवरू शकत नव्हते...

एल्. नं 'शेरीज' मध्ये माझ्याप्रीत्यर्थ एक अलिशान उत्सवच केला... खाण्यापिण्यानं सुरुवात होऊन समृद्धशा 'सपर'पर्यंत ती पार्टी चालली...आणि त्या निमित्तानं एल्. नं मला एक हिऱ्याचा सुंदर कंठा बक्षीस दिला...मला हिरे-माणकांचा हव्यास कधीच नव्हता....मी आजपर्यंत तसलं काही अंगाखांद्यावर घातलंही नव्हतं...पण एल्. ला इतका आनंद झालेला दिसत होता, की त्यासाठी त्याला मी तो कंठा माझ्या गळ्यात घालू दिला...गॅलनगॅलनभर शँपेनची आचमनं करून पाहुण्यांच्या अंगात संजीवनीचं स्फुरण झालेलं असताना, अन् तसं म्हटलं तर त्या क्षणाच्या सुखावलेपणी माझंही डोकं जरासं हलकच झालेलं असताना, उजाडता उजाडता माझ्या मनात एक दुर्दैवी कल्पना तरळली! ब्यूनॉस एअरिसमध्ये अस-ताना 'टॅन्गो' ज्या पद्धतीनं नाचलेला पाहिला होता, ती पद्धत एका देखण्या तरुण मुलाला शिकवण्याची मला बुद्धी झाली....एवढ्यात एकाएकी माझा हात आपल्या लोखंडी पकडीत धरून कुणीतरी हिसडल्याची मला जाणीव झाली... वळून पहाते, तो एल्...रागानं भलता खवळलेला!

मला वाटतं, तो कमनशिबी हिऱ्याचा कंठा वापरायची माझी ती पहिली अन् शेवटचीच वेळ ठरली...कारण या घटनेनंतर लगेच रागवायला आणखी काहीतरी कारण मिळून एल्. मुळी निघूनच गेला....अन् होटेलचं अवाढव्य बिल, अन्

विद्यालयाचा सगळा खर्च, हा सगळाच्या सगळा बोजा मात्र माझ्या डोक्यावर राहिला....! मदतीकरता त्याच्या मी किती विनवण्या केल्या – फुकट...शेवटी हिऱ्याचा तो 'प्रसिद्ध' नेकलेस गहाण ठेवण्याची पाळी आली....त्यानंतर माझ्या नजरेला तो कधीच पडला नाही!

....अशा तऱ्हेनं पुन्हा एकदा न्यूयार्कमध्ये मी कफल्लक स्थितीत एकाकी पडले ....इकडे कार्यक्रमांचा सीझनही संपतच आला होता – त्यामुळे त्या दिशेनं प्रयत्न करण्याचा काहीही उपयोग नव्हता....सुदैवानं माझ्याकडे एक अर्माइन कोट आणि एल्. नं दिलेला एक पाचूचा सुंदर खडा होता. मॉंटे कार्लोमध्ये आपला सगळा पैसा घालवून बसलेल्या एका राजपुत्राकडून एल्. नं तो विकत घेतला होता. तो पाचू म्हणे पूर्वी एका प्रसिद्ध मूर्तीच्या शिरोभागी होता – मी तो एका प्रथितयश स्वरकिन्नरीला विकला; कोटसुद्धा तशाच दुसऱ्या एका नावाजलेल्या गायिकेला विकत देऊन टाकला....अन् उन्हाळ्यापुरता लॉन्ग बीचवर एक व्हिला भाड्यानं घेतला....माझ्या शिष्यांची सोय तिथे लागल्यानंतर शरदृऋतूची वाट पाहण्याखेरीज काहीच हातात नव्हतं....पैसे मिळविण्याची शक्यता होती ती त्याच सीझनमध्ये पुन्हा...

बंगला, मोटार आणि इतर नेहमीच्या गरजा भागवण्याइतपत पैसा उभा झाल्याच्या क्षणी मी भविष्यकाळाची काळजी बाजूला ठेवली–नव्हे विसरलेच!.... नित्याच्या अदूरदर्शी स्वभावानुसार हे काही नवीन नव्हतं म्हणा!....खरं म्हणजे आता मी जवळजवळ खंकच होते, तेव्हा माझ्या फर्स् आणि जवाहीर विकून आलेला पैसा मी स्टॉक्स किंवा शेअर्समध्ये व्यवस्थित गुंतवायला हवा होता.... पण हे कुठलं मला सुचायला?....मी उलट लॉंग बीचला नित्याप्रमाणे पुष्कळ कलावंतांचं आगतस्वागत करत माझ्या शिष्यांच्यासह मजेत उन्हाळा काढला! तिथे अनेक आठवडे आमच्या संगतीत राहिलेल्या पाहुण्यांत 'इसाये' हा मनमिळाऊ स्वभावाचा व्हायोलीनवादक होता....त्याच्या सुंदर व्हायोलीनमधून निघणाऱ्या सुरांच्या तुषारांनी सकाळसंध्याकाळ आमच्या छोट्या बंगल्याला आनंदाचं न्हाण घडायचं....इथे आम्हाला स्टुडिओ असा नव्हताच....आम्ही आपले पुळणीवरच नाचायचे....इसायेसाठी मात्र आम्ही एक विशेषसमारंभ घडवून आणला; तेव्हा तो अगदी लहान मुलाप्रमाणे खुष झाल्याचं मला आठवतं....

पण या सबंध उन्हाळ्याभरच्या निर्विकल्प ऐषआरामानंतर पुन्हा न्यूयॉर्कला आम्ही आलो, तेव्हा माझ्याकडे पैशाची काहीही तरतूद नव्हती, हे सांगायला नकोच! दोन महिने असेच काळजीत काढल्यानंतर मग कॅलिफोर्नियाच्या दौऱ्याच्या कराराला मी संमती दिली...

या दौऱ्याच्या दरम्यान माझ्या मूळ गावाच्या अगदी जवळपास मी गेले होते

...तिथे पोहोचायच्या किंचित् आधी मी वृत्तपत्रातली रोदांच्या मृत्यूची बातमी वाचली होती...रोदांसारख्या माझ्या जिवलग मित्राला मी आता कधीच पुन्हा भेटू शकणार नाही, या विचारानं मला अश्रू आवरेनासे झाले...शेवटी ओक-लंडला पोहोचल्यावर, प्लॅटफॉर्मवर जमलेल्या वार्ताहरांना सुजऱ्या डोळ्यांनी सामोरं जायला नको, म्हणून मी माझा चेहरा एका काळया लेसच्या दुपट्ट्यानं झाकून घेतला...तेवढ्यानं मुलाखत घ्यायला जमलेल्या त्या पत्रकारांनी दुसऱ्या दिवशीच्या बातमीपत्रात काय 'टिप्पणी' करावी ? तर म्हणे मी एक गूढ, रहस्यमय, वातावरण माझ्याभोवती निर्माण करण्याचा स्टंट केला होता !

...बावीस वर्षांपूर्वी सॅनफ्रॅन्सिस्कोचा निरोप घेऊन माझ्या त्या दिग्विजयी परिक्रमेला मी सुरुवात केली होती, त्यानंतर एकोणिसशे सहाच्या भूकंपानं, आणि आगीनं ते शहर पुरतं बदलून गेलेलं पाहून, जन्मगावी पुन्हा एकदा पाऊल ठेवताना माझ्या मनाला काय वाटलं असेल, याची तुम्हीच कल्पना करू शकाल ! तिथलं सारं काही नवंनवंच होतं मला...इतकं की तेच हे शहर अशी ओळख पटणंसुद्धा कठीण !

तसं म्हटलं, तर कोलंबिया थिएटरमध्ये जमलेला वेचक श्रीमंत प्रेक्षकवर्ग अन् समीक्षकसुद्धा तसे स्नेहशील नि प्रतिसाद देणारे होते...तरी मला त्यात मनाचं समाधान नव्हतंच...कारण मला आम जनतेसाठी मोठ्या प्रमाणावर नृत्य करायचं होतं...त्या हेतूनं ग्रीक थिएटरची मागणी मी केली, पण ती फेटाळली गेली...कारण काय, ते काही कळलंच नाही...माझ्या व्यवस्थापकाला चातुर्यानं बोलून आपलं काम साधायचं जमलं नाही, की कुणी आकसानंच मला नकार दिला, कोण जाणे !

सॅनफ्रॅन्सिस्कोला कितीतरी वर्षांनंतर माझ्या आईची पुन्हा भेट झाली ... मधल्या काळात मायदेशाबद्दलच्या एका अनाकलनीय ओढीमुळे ती युरोप सोडून सॅनफ्रॅन्सिस्कोला परत गेली होती...एकदा क्लिफ हाऊसमध्ये दुपारी जेवायला गेलो असताना समोरच्या आरशातली आमची प्रतिबिंबं नजरेला पडली...माझा उदास, नि आईचा भयंकर ओढलेला चेहरा पाहिला ! जवळजवळ बावीस वर्षां-पूर्वी कीर्ती अन् पैसा मिळविण्याच्या केवढ्या तरी मोठ्या आशाआकांक्षा उराशी बाळगून बाहेर पडलेल्या दोन धाडशी जीवांची आजच्या ह्या प्रतिबिंबांशी तुलना केल्याबाचून मला राहावलं नाही...हवं होतं ते दोन्हीही मिळालं होतं...पण मग त्या धडपडीचा परिणाम असा शोचनीय का ? आयुष्याचा उत्तरार्ध हा असाच विकल असायचा, हा या निष्ठुर निसर्गाचा अलिखित नियमच आहे, म्हणूनच बहुधा ! सुरुवातीपासूनच निसर्गानं मुळी मानवाचा उभा दावा धरलेला असतो... आजवर कितीतरी थोर कलावंत, प्रज्ञावंत, नि तथाकथित यशस्वी लोक मला आयु-

ष्यात भेटले, पण ‘ सुखी-आनंदी ’ म्हणता येईल, असं कुणीही मला आढळलं नाही ..आपण फार आनंदी आहोत असं नाटक चांगलं वठवणारे फार तर भेटले थोडे !... त्या सुखी मुखवट्यापलीकडे तीच अस्वस्थता, नि तोच दुःखभोग लपलेला आहे, असं सहज कळून यायला, थोडीशी आंतरिक समजही पुरते माणसाला ! ...मला तर वाटतं, जगात ‘ सुख ’ नावाची अशी टिकाऊ चीजच अस्तित्वात नसावी...जे काय अस्तित्व आहे, ते सुखांच्या चार तरल क्षणांना फारतर !

‘ हॅरोल्ड ब्रॉअर ’ मला जेव्हा सॅन्फ्रॅन्सिस्कोला भेटला, तेव्हा असे सुखक्षण मी अनुभवले होते...हा पियानोवादक संगीतक्षेत्रापुरता तरी माझा जुळा आत्माच म्हणावा, इतके आम्ही निगडित होतो...मी नर्तिका असण्यापेक्षा खरी सांगीतिकच होते, असं तो म्हणायचा...बाख्न् शोपां आणि बिथोव्हन, यांच्यासारख्या संगीतरचनाकारांच्या एरवी काहीशा दुर्बोध वाटणाऱ्या स्वरबंधांचं मर्म माझ्या कलाविष्कारातूनच त्याला उमजलं, असं त्यानं मला सांगितलं, तेव्हा मी आश्चर्यचकित तर झालेच, पण तशीच आनंदूनही गेले...

त्यानंतरचे काही आठवडे अगदी मंतरलेल्या अवस्थेतच गेले... ‘ कला ’ या विषयावर चर्चा, संवाद करणं आणि परस्पर पडताळे घेणं यातच आम्ही रमून गेलो होतो...त्याच्या कलेतल्या गुप्तधनाचा सुगावा जसा त्याला माझ्यामुळे लागला होता, तसंच माझ्या नृत्यातलं मला न जाणवलेलं भावविवरण त्याच्यामुळेच माझ्या मनात स्पष्ट होत होतं...

हॅरोल्ड सूक्ष्म संवेदना, नि प्रज्ञा यांच्या तरल वाटेनं जीवन जगत आला होता...बहुसंख्य समाजाच्या कितीतरी वरच्या पातळीवर होता तो...बहुतेक साऱ्या गायकवादकांची प्रज्ञा संगीताच्या कक्षांपुरती मर्यादित असते...पण हॅरोल्डच्या बुद्धीला, प्रज्ञेला या मर्यादांचा अडसर नव्हता.. कलेच्या व्यापक क्षेत्रांतल्या प्रत्येक पैलूचा, रूपाचा, व्यापाराचा आस्वाद घेण्याची कुवत त्याच्या ठायी होती...एवढंच नव्हे, तर त्यातील एक नितळ समजही त्याच्या त्या आस्वाद घेण्यातून प्रत्ययाला यायची...याशिवाय त्याचा काव्याचा बुद्धिनिष्ठ नि सर्वंकष अभ्यास होता... तत्त्वज्ञानातही तो खूप खोलवर बुडाला होता...जेव्हा कलेतल्या उच्चतम आदर्शाबाबत एकमत असलेल्या कलाप्रेमी व्यक्तींची युती होते, तेव्हा दोघांनाही एक प्रकारची नशाच चढते मला वाटतं ! मद्य घेतल्याशिवाय आलेल्या अशा कमालीच्या नशील्या अवस्थेत आम्ही कित्येक दिवस धुंद होतो...आशेचा एक स्रोत धमनीधमनीतून थरारत उसळत होता...अन् ही आशा प्रत्यक्षात येण्याच्या क्षणी नजरेला नजर भिडली, की आनंदाचं असं उधाण येत होतं !.... काय सांगायचं, अन् किती वर्णन करायचं ? एकाएकी, एका आंतरिक वेदनेला

शब्द फुटावे, तसे आमच्या तोंडून उद्‌गार बाहेर पडायचे...“ शोपांचं हे स्वरवाक्य तुला अशा तऱ्हेनं भावलं होतं का ? ”...“ हो तर...असं भावलं होतं, अन् त्या पलीकडचाही काही भावार्थ जाणवला होता.. बघ...त्या भावार्थाला नृत्या-विर्भावात पकडूनच दाखवते तुला ! ” ...“ आहा !...आविष्कार नव्हे, साक्षात्कारच म्हणायला हवं याला !...साक्षात्कार !......थांब...मी आता ते स्वरवाक्य वाजवतो तुझ्यासाठी...”...“ आनंदाचा, परमानंदाचाच म्हणायचा हा अनुभव....”

...असं आमचं बोलणं—संवाद चालायचा...त्यातून आम्हाला दोघांनाही अत्यन्त आवडणाऱ्या संगीतप्रबंधांची आमची जाण, आणि ज्ञान उत्तरोत्तर सखोल व्हायला लागलं...

त्यावेळी सॅन्फ्रॅन्सिस्कोच्या ‘ कोलंबिया ’ थिएटरमध्ये आम्ही दोघांनी मिळून दिलेला कार्यक्रम, म्हणजे माझ्या मते माझ्या नृत्यजीवनातल्या सर्वांत सुखद प्रसंगांपैकीच एक होता...हॅरोल्ड बॉअरची भेट झाल्यानं मी पुन्हा एकदा आनंदाच्या, प्रकाशाच्या प्रसन्न वातावरणात पाऊल टाकलं होतं. बॉअरसारख्या एखाद्या ओजस्वी, प्रज्ञावन्त व्यक्तिमत्त्वाचा सहवासच अशी प्रसन्नता निर्माण करू शकतो !...मला आशा होती, की हे सर्व असंच टिकून राहील, आणि कुणी सांगावं, आम्ही दोघं मिळून कदाचित् सांगीतिक आविष्काराच्या एका नवीन विश्वाचाच वेध घेऊ...पण...पण...‘ परिस्थिती ’ हा घटक मुळी मी लक्षातच घेतला नव्हता...आमची अगदी नाट्यमय रीतीनं ताटातूट झाली...अगदी नाइलाजानं ..अन् त्याबरोबर त्या एकविचारानं काम करण्यालाही पूर्णविराम मिळाला...

सॅन्फ्रॅन्सिस्कोमध्ये असताना रेडफर्न मेसनशी माझी मैत्री जुळून आली होती... मेसन एक प्रमुख लेखक अन् संगीतसमीक्षक होता...बॉअरच्या एका कार्यक्रमानं-तर आम्ही एकत्र सपर घेत असताना तो म्हणाला : “ सॅन्फ्रॅन्सिस्कोमध्ये आहेस, तोपर्यंत तुझ्यासाठी काही मी करायला हवं असेल तर सांग...” मी आधी त्याच्याकडून एक वचन घेतलं, मी जी काही विनंती करेन, ती काही झालं तरी त्यानं मान्य केली पाहिजे, असं... त्यानं तसं वचन दिल्यावर मी एक पेन्सिल घेऊन, बॉअरच्या मैफलीबद्दल एक लांबलचक गौरवपूर्ण मजकूर लिहिला. शेक्सपियरच्या,

How oft, when thou, my music, music play'st
Upon that blessed wood whose motion sounds
With thy sweet fingers...
Do I envy those jacks that nimble leap

To kiss the tender inward of thy hand...

वगैरेनं सुरुवात होणाऱ्या सुनीताचा आधार घेऊन, शेवटसुद्धा मी

Since saucy jacks so happy are in this

Give them thy fingers, me thy lips to kiss...

या ओळींनी केला होता !

रेडफर्नला भयंकर कठीण होऊन बसलं ते सारं...पण खिलाडू वृत्ती दाखवण्याशिवाय त्याला तसं गत्यंतर नव्हतं, त्यामुळे हा मजकूर, त्यानं केलेली समीक्षा म्हणून त्याच्या नावावर दुसऱ्या दिवशी छापून आला...बॉअरबद्दलच्या त्याच्या नव्यानं आणि एकाएकी दिसून आलेल्या कौतुकामुळे आणि प्रेमामुळे, त्याच्या इतर पत्रकार मित्रांनी त्याची भयंकर--अगदी दयामाया न दाखवता टर उडवली ! पण त्या सहृदय गृहस्थानं ती टवाळी एखाद्या हुतात्म्याच्या निर्धारानं सहन तर केलीच, पण शिवाय बॉअर सॅन्‌फ्रॅन्सिस्कोहून गेल्यावर मला आपल्या सोबतीनं, अन् मैत्रीनं खूप दिलासा दिला....

'कोलंबिया' थिएटरमधला तो वेचक प्रेक्षकवर्ग माझ्या कार्यक्रमांना उत्साहानं प्रतिसाद देत होता खरा, पण मनातून मी अगदी विषण्ण होते; कारण नृत्यशाळा उभारण्याच्या माझ्या ध्येयाबद्दल मात्र माझं हे जन्मगाव अगदी उदासीनच दिसत होतं...माझी नक्कल अन् अनुकरण करणाऱ्यांची तिथे गर्दी झाली होती, तशाच माझ्या नृत्यशाळेच्या नकली आवृत्त्याही तिथे पुष्कळच होत्या...लोकांना काय, तेवढंच पुरेसं होतं...माझ्या कलेचं काहीसं शिस्तबद्ध नि कडक स्वरूप त्रासदायक ठरेल, असंही कदाचित् त्यांना वाटत असेल...माझ्या शैलीची नक्कल करणाऱ्यांचं नृत्य म्हणजे काही विचारू नका...नुसती गोड गोड साखर...अन् मिठी बसणारा अति गोड पाकच जसा ! माझ्या नृत्यातल्या ज्या गोष्टी त्यांना सुंदर, सुंदर...गोड, सुसंवादी ( त्यांच्या क्षुद्र कल्पनेप्रमाणे ! ) वाटत होत्या, तेवढ्याचाच पुरस्कार त्यांनी चालवला होता...त्यांतला शृंगार सोडून इतर अवघड आविष्काराच्या वाटेला कुणी गेलंच नव्हतं...थोडक्यात सांगायचं तर माझ्या नृत्यातली स्फूर्ती, ...त्यातला खरा भावार्थ सोडून सारं काही इतरांनी उचललं होतं ! !

...वॉल्ट व्हिटमनचं अमेरिकेबद्दलचं द्रष्टं प्रेम 'I hear America Singing' 'अमेरिकेचे सूर माझ्या कानावर येताहेत' या शब्दात उफाळून आलेलं होतं... वॉल्टच्या कानावर कोणत्या महान् गीताचे सूर तरळले असतील, ते मी कल्पनेनं सहज जाणू शकते...प्रशांत महासागराच्या भरतीनं छेडलेलं, सपाटीवरून तरंगत आलेलं, अन् किशोर, युवक, स्त्रीपुरुष, साऱ्यासाऱ्यांच्या एकवटलेल्या गगनभेदी समूहगायनातून ललकारलेलं ते गीत असणार लोकशाहीचं...त्यात उद्‌घोष असणार केवळ गणतंत्राचा !

वॉल्ट व्हिटमनची ही कविता वाचली, तेव्हा माझ्याही मनश्चक्षूंसमोर एक चित्र तरळलं... वॉल्टनं ऐकलेल्या अमेरिकेच्या त्या गीताचा ओजस्वी अर्थ पेलून धरणारा नृत्याविष्कार करणाऱ्या अमेरिकेचं कल्पनाचित्र होतं ते! रॉकी पर्वताच्या उर्मिल अस्मितेची, त्याच्या डोंगर-दऱ्यातल्या झोक्यांची-झोलांची, त्याच्या वळणा-वेलांट्याची लय ह्या नृत्यातून खेळणार होती...'जाझ'लयीच्या वैषयिक हेलडोलांचा तिला पुसटता देखील स्पर्श होणार नव्हता...विसंवादी खडतर परिस्थितीतून वाट काढून जीवनातल्या सुसंवादाकडे भरारी घेणाऱ्या अमेरिकन आत्म्याच्या भाव-कंपनासारखं त्या नृत्याचं स्वरूप असणार होतं...'फॉक्सट्रॉट' किंवा 'चार्ल्स्टन' नृत्याचे कोणतेही विशेष माझ्या या नृत्याच्या कल्पनेत कुणाला शोधून देखील सापडणार नव्हते...एखाद्या मुलानं आदर्शाकडे...स्वतःच्या भविष्यकालीन यश-सिद्धीकडे हिरीरीनं घेतलेल्या झेपेसारखं—अमेरिकेचं संपूर्ण, सर्वांगीण दर्शन घडवणाऱ्या समृद्ध जीवनाच्या दिशेनं घेतलेल्या भरारीसारखं–, क्रांतदर्शी होतं माझ्या कल्पनेतलं हे नृत्य!

माझ्या नृत्याला लोक 'ग्रीक' म्हणतात तेव्हा मला हसूच येतं – किंचित् उपरोधानं!...कारण माझ्या मते माझ्या नृत्याचं मूळ माझ्या आयरिश आजीनं आम्हाला अनेकवार सांगितलेल्या कथेत लपलेलं आहे... अठराशे एकूण-पन्नासात आजोबांच्या बरोबर बंद गाडीत बसून सपाटी ओलांडायला निघालेल्या आजीचं वय होतं अवघं १८ वर्षांचं...आजोबा २१ वर्षांचे!...रेड इंडियन लोकांच्या बरोबर झालेल्या एका प्रसिद्ध लढाईच्या धुमश्चक्रीत आजीनं तसल्या एका गाडीतच आपल्या बाळाला जन्म दिला होता...अन् शेवटी जेव्हा रेड इंडियन्सचा पराभव झाला, तेव्हा आजोबांनी गाडीच्या दारातून डोकावून नव्या बाळाचं स्वागत केलं होतं...हातातली बंदूक अजून धूर ओकत होती!

सॅन्फ्रन्सिस्कोला पोहचल्यानंतर आजोबांनी पहिल्या पहिल्या तुरळक लाकडी घरांच्यासारखं आपलं एक घर बांधलं होतं...माझ्या लहानपणी त्या घरी गेल्याचं मला चांगलं आठवतं...आयर्लंडची आठवण काढून आजी वारंवार आयरिश गाणी म्हणायची...अन् आयरिश 'जिग्ज' नाचायची... मात्र त्या 'जिग्ज'मध्ये पहिल्या वसाहतवाल्या शूर वीरांच्या मर्दुमकीची, अन् रेड इंडियन लोकांशी लढ-लेल्या लढायांची एक जाणीव नकळत शिरलेली असावी असं मला वाटतं...रेड इंडियन लोकांचेही काही आविर्भाव त्यात मिळून गेले असावे...आणि पुढे पुन्हा आजोबा कर्नल टॉमस ग्रे, यादवी युद्धानंतर ज्या सुरावटीच्या नादात घरी परतले होते, त्या 'यॅन्की डूडल'चंही प्रतिबिंब या 'जिग्ज'मध्ये पडलं असावं... आजीच्या जिग्जमध्ये ही सारी सरमिसळ आढळायची! तिच्याकडून मी जेव्हा ते नृत्यप्रकार शिकले, तेव्हा तरुण अमेरिकन रक्तातल्या आशाआकांक्षांची त्यात

प्रथम भर पडली ..अन् शेवटी तर वॉल्ट व्हिटमनच्या त्या अर्थगर्भ ओळींनी जीवनाच्या खऱ्या आध्यात्मिक अर्थाचा मला घडवलेला महान् साक्षात्कार त्यात उमटला होता...! साऱ्या जगाला भारून टाकणाऱ्या माझ्या तथाकथित 'ग्रीक' नृत्याच्या उगमाची मूळ कहाणी ही अशी होती!

...हा उगम– मूळ– हे तर खरंच; पण पुढे युरोपला गेल्यावर मला तीन गुरू लाभले : बिथोव्हन, नित्शे आणि वाग्नर...आमच्या या युगाच्या प्रातिनिधिक नृत्याची चाहूल जगाला त्यांच्यामुळे लागली होती...बिथोव्हननं महान् लय-प्रकल्पातून नृत्याचा साक्षात्कार घडवला; तर वाग्नरनं त्याची प्रतीती दिली शिल्पाकारातून; पण नित्शेला मात्र आत्म्याच्या स्वरूपातच नृत्य आढळलं...मी तर म्हणेन, नित्शे हा खरा पहिला नर्तक—तत्त्वज्ञ होता!

कधीकधी मला प्रश्न पडतो, वॉल्ट व्हिटमनच्या अमेरिकेचं गीत ज्याला ऐकू येत आहे, आणि अमेरिकेच्या अस्सल नृत्याला साजेशी संगीतरचना करण्याची प्रतिमा ज्याच्या ठायी आहे, असा संगीतज्ञ कुठे असेल ?...अमेरिकेचं अस्सल नृत्य! ...'जाझ' ची लय ज्यात नावालासुद्धा नाही...खरं तर कमरेखाली दृग्गोचर होणारी कोणतीच लय ज्याला शिवलेली नाही; उलट 'मणिपूर चक्र' नावाच्या आत्म्याच्या ऐहिक निवासातूनच, हृदयातूनच जिचा उद्भव झालेला असेल, अशा लयीनं ओतप्रोत असलेलं अमेरिकन नृत्य!...ही मूलोद्भव लय अशी तशी नाही...ऊर्ध्वगामी आहे...ग्रहगोलांनी जडवलेल्या आकाशाच्या पताकेला स्पर्श करणारी आहे...ज्या अफाट आकाशाची कमान प्रशांत महासागरापासून सूर सुरू होणाऱ्या भूमीच्या पसाऱ्यावरून, सपाटी, सिरा नेव्हाडा – अन् रॉकी पर्वत, यावरून ताणून अटलांटिक महासागराला भिडलेली आहे, त्या आकाशाला गवसणी घालणाऱ्या लयीशी अनुसंधान साधणारं आहे अमेरिकेचं अस्सल नृत्य ...ताज्या रक्ताच्या नवसंगीतकारा, माझी तुला एकच प्रार्थना आहे, विनंती आहे...तू कुठे असशील तो अस, पण वॉल्ट व्हिटमनच्या, अब्राहम लिंकनच्या अमेरिकेचं हृद्गत व्यक्त करणाऱ्या नृत्याचं संगीत तू निर्माण कर...

...'' जाझ ' लयीतून अमेरिकेची भावप्रतिमा प्रकट होते, ' या विधानावर कुणी विश्वास ठेवावा, हे मला अगदी अक्षम्य वाटतं...' जाझ ' मधून प्रकट होतं ते आदिमानवाचं संस्काररहित जिणं!...अमेरिकेचं संगीत याहून वेगळंच असायला हवं...ते खरं तर अजून जन्माला यायचंच आहे ...अमेरिकेची ती अस्सल लय अजून कुणा संगीतकाराच्या काळजात धुगधुगलेलीच नाही...बहुतेकांच्या काळजांना काय पण कानांना देखील तो नाद सहनच झाला नसेल...पण एक दिवस तो या धरित्रीच्या अफाट पसाऱ्यातून फुटून उठणार आहे...आकाशाच्या असीम विस्तारातून पावसासारखा कोसळणार आहे...अमेरिकेच्या मनोगताचा

एका अतिमानुष संगीतातून साक्षात्कार होईल, तो या क्षणी !...हे अतर्क्य संगीत असेरिकेच्या विसंवादातून सुसंवाद निर्माण करील...लांब सडक नेटक्या पायांची तरतरीत मुलं अन् मुली या संगीताच्या संगतीनं नाचतील...त्या नृत्यात 'चार्ल्स्टन'-च्या वानरासारख्या विकट उड्या, आकड्या नि वेडेवाकडे आचके-अंगविक्षेप नसतील...ती असेल एक चित्तवेधक, महान्, ऊर्ध्वगामी झेप ! ईजिप्तच्या पिरॅमिडस्नाही थिटे करून सोडणारी...ग्रीसच्या पार्थेनॉनला ओलांडून जाणारी ...कोण्याही काळच्या, कुठल्याही देशाच्या संस्कृतीला न सावलेली, ती असेल एक सौन्दर्य नि सामर्थ्य यांची अतर्क्य अभिव्यक्ती !

'बॅले' नृत्यातल्या अंगभूत भुलावणीची या नृत्यात लवमात्र आठवण येणार नाही...निग्रोंच्या वारुनिक उमाळ्याउमाशांना तर यात वावच नसेल...ते असेल स्वच्छ...नितळ...निखळ...मला तर असेरिकेची नृत्य-प्रतिमा दिसते ती अशी : एक पाऊल रॉकी पर्वताच्या अत्युच्च शिखरावर तोल राखून रोवलेलं ...दोन्ही हात दोन बाजूंना अटलांटिक ते पॅसिफिक सागरापर्यंत पसरलेले...ते सुंदर माथं आकाशात झेपावलेलं...आणि कपाळ हजारो तारकांच्या मुकुटानं झगमगत असलेलं !...

शारीरिक शिक्षण म्हणून म्हटलं जातं तसलं काही थातुरमातुर, तसंच स्विडिश व्यायामशास्त्र आणि बॅले यांच्या शाळांचं अमेरिकेत माजलेलं प्रस्थ ही वस्तुस्थिती किती अघोरी आहे पाहा ! खऱ्या अमेरिकन व्यक्तीला बॅलेनर्तक होणं मुळी मुळातच शक्य नाही...पाय वाजवीपेक्षा लांब असतात, शरीर फारच लवचिक असतं...अन् स्वभाव तर इतका 'स्वतंत्र' असतो, की बॅलेचं ते कृत्रिम लालित्य, अन् ते अंगठ्यावर चालणं हे मुळी मानवणारच नाही त्याला !... सगळ्या अत्यंत नावाजलेल्या बॅलेनर्तिका एकजात ठेंगण्या अन् चणीनं लहान होत्या, हे तर सर्वश्रुत आहे...उंच सुरेख बांध्याची स्त्री कुणी 'बॅले' नाचू शकली, असं आजवर झालंच नाही...अमेरिकेचं प्रातिनिधिक सौंदर्य ज्या बांध्यातून व्यक्त होतं, तो बांधा 'बॅले'च्या वाटेला जाऊन काही उपयोग नाही ...बघा...कल्पनेला किती अचाट ताण दिला तरी अमेरिकेची स्वातंत्र्यदेवता 'गॉडेस ऑफ लिबर्टी' बॅले नृत्य करत आहे, असं चित्र डोळ्यासमोर उभं तरी राहू शकतं का ?...मग अमेरिकेनं या नृत्याला कशाला जवळ करायचं ? का म्हणून थारा द्यायचा ?

हेन्री फोर्डनं एक इच्छा व्यक्त केली आहे : फोर्ड नगरातल्या एकूण एक मुलाला नाचता आलं पाहिजे...फोर्डला आधुनिक-' मॉडर्न ' नृत्य पसंत नाही; तो म्हणतो, या मुलांना जुन्या जमान्यातले, ' वाल्झ ', ' माझुर्का ', ' मिन्युएट ' नाचू द्या... पण जुना ' वाल्झ ' काय...किंवा ' माझुर्का ' काय...ही नृत्यं एकतऱ्हेच्या विकृत

भावनाशीलतेची अन् शृंगाराची द्योतक आहेत...आजचा युवक तो काळ ओलांडून किती तरी पुढे गेलेला आहे...बरं...'मिन्युएट' पाहावं, तर ते चौदाव्या लुईच्या घेरदार, घोळदार, स्कर्टस्च्या काळातल्या दरबारी लोकांच्या लोचट-लाचार सेवावृत्तीचं प्रतीक आहे!...ह्या साऱ्या सरंजामी गती-लयींचा अमेरिकेच्या स्वतंत्र वाऱ्याच्या तरुण पिढीशी काय संबंध आहे? हालचाली, अंगविक्षेप हे शब्दांइतकेच बोलके असतात, हे फोर्डमहाशयांना माहीत नाही की काय?

'मिन्युएट'चं अवडंबर पाळताना त्या लाचार पावित्र्यात आमच्या मुलांनी गुडघा का म्हणून वाकवायचा? 'वाल्झ'च्या खोट्या भावशीलतेच्या आवर्तात सापडून गोल गोल गिरक्या का मारीत बसायचं?...खरं म्हणजे त्यांनी लांब ढांगा टाकत, उड्या मारत, किंवा झेपावत पुढे यायचं...ताठ, उभार मानेनं, आणि दूरवर पसरलेल्या खुल्या हातांनी आमच्या वसाहतवाल्यांच्या, शूरवीरांच्या धैर्याच्या, अन् आमच्या राजकारणधुरंधर नेत्यांच्या, न्यायनिष्ठा, दयाशीलता, आणि चारित्र्यसंपन्नता...या गुणांच्या गाथा नाचायच्या!...आमच्या मातांच्या दिव्य प्रेमाची नि हळुवार वृत्तीची कहाणी नृत्यांतून साकार करायची!...अमेरिकन मुलं अशा जाणिवेनं, अशा भावनेनं नाचतील, तेव्हा ती अन्तर्बाह्य सुंदर होतील ...अमेरिकेच्या या सर्वांत 'महान् लोकशाही'ला पात्र ठरतील...!

मग म्हणता येईल...'हे अमेरिकेचं नृत्य...ही अमेरिका नाचते आहे!'

## ३१

कधीकधी असे दिवस उगवतात सुखाचे माझ्या आयुष्यात म्हणता !...माझं आयुष्य एखाद्या सोनेरी परिकथेप्रमाणे, रत्नांनी मढवल्यासारखं चमचमतं... हरतऱ्हेच्या मोहोरांनी बहरलेल्या फुलांच्या ताटव्यासारखं घमघमतं...ज्यातल्या प्रत्येक घटिकेला प्रीतीचा, सुखाचा मात्रास्पर्श झालेला आहे, अशा एखाद्या प्रसन्न पहाटेसारखं झिरमिरतं...मग जीवनातला हर्षोल्लास व्यक्त करायला मला शब्द पुरे पडत नाहीत; माझी नृत्यशाळेची कल्पना म्हणजे प्रतिभेचा एक उन्मेष आहे असं मला वाटतं...वाटतं, अगदी खात्रीनं, की भरघोस–नजरेत भरण्या-सारखं नसलं, तरी माझ्या शाळेनं पुष्कळच यश मिळवलं आहे आजवर...अशा वेळीं माझी कला म्हणजे एक ' पुनरुत्थान ' असतं...!...आणि मग दुसरे असेही दिवस उगवतात, की जेव्हा माझ्या आयुष्याचं सिंहावलोकन करता करता एक प्रकारच्या भयंकर घृणेनं आणि वैतागानं माझा ऊर दाटून येतो...अन् पाठो-पाठच येतं एक संपूर्ण रितेपणाचं भान...मग भूतकाळ तर होतो फक्त संकटपरंपरा ...आणि भविष्यकाळ, एक निश्चित विनाश...विध्वंस...!...अन् माझी शाळा ...माझं विद्यालय ? ते एखाद्या वेड्यापिराच्या मेंदूला झपाटणाऱ्या भुताटकीच्या भासासारखं पोकळ होऊन जातं...

माणसाच्या या जीवनाचं सत्यस्वरूप तरी काय आहे ? आणि कुणाला समजलेलं आहे ते ? ईश्वरालासुद्धा कोड्यात टाकणारा प्रश्न आहे हा !...ह्या साऱ्या वेदनेत अन् त्या हौशीमौजीत, या घाणीत आणि त्या दिव्य, ओजस्वी शुचितेत–नरकाच्या आगीनं धुमसणाऱ्या मांसमेदभरल्या या कुडीत, अन् तिथेच एकीकडे शौर्य-धैर्याची ज्योत फुलवणाऱ्या या मंगल देहकुंडात–इथे या साऱ्या चांगल्यावाईटाच्या

कल्लोळात कुठे आहे ते सत्य ?...कुठे आहे ? कोणाला माहीत आहे ?...एक ईश्वराला तरी, नाहीतर सैतानाला !...मला विचाराल, तर ते दोघेही संभ्रमातच पडलेले असतील, अशी मला शंका आहे.. !

...तेव्हा हे असं आहे सारं ..काही दिवस कल्पनेवर स्वार होऊन येतात; माझं मन मग मला एखाद्या खिडकीच्या धूसर दुधी काचेसारखं वाटतं...अन् पलीकडून मनोहर नि अतर्क्य सौन्दर्याचं दर्शन घडतं...अद्‌भुत आकार अन् समृद्ध रंग दिसतात...नि मग दुसऱ्या काही दिवसांच्या उदास नजरेला, मळलेल्या राखी काचेच्या खिडकीतून पाहताना दिसतो केवळ 'आयुष्य' नावाचा रंगहीन, कळाहीन ढीग...केरकचऱ्याचा !...एक ढीग केवळ...'आयुष्य' नावाचा...

खोल पाण्यात बुडी मारून पाणबुड्या मोती हस्तगत करतो, त्याप्रमाणे सुषुप्तीच्या गहिऱ्या अंतरंगातून मौनाच्या बंद शिपल्यातले विचारमोती आपण काढू शकतो तर... !

...माझी शाळा संघटित ठेवण्याच्या इतक्या वर्षांच्या धडपडीनंतर मी मनानं अगदी खचून गेले होते...मला निराश अन् एकटं वाटत होतं...पॅरिसला जावं असं वाटत होतं...तिथल्या माझ्या मालमत्तेवर थोडा पैसा उभा करणं मला शक्य झालं असतं...तेवढ्यात मग मेरी युरोपहून परतली, अन् बिल्टमोरहून तिनं मला फोन केला...माझी सगळी परिस्थिती मी जेव्हा तिच्या कानावर घातली, तेव्हा ती म्हणाली, "गॉर्डन सेल्फ्रिज नावाचा माझा एक अगदी जवळचा मित्र उद्या जातोय्...त्याला सांगितलं, तर तो नक्कीच तुला तिकीट मिळवून देईल..." अमेरिकेतल्या सततच्या धडपडीनं, आणि मनाचा हिरमोड करणाऱ्या तिथल्या माझ्या वास्तव्यानं मी इतकी वैतागून, मरगळून गेले होते, की मी लगेच होकार दिला... अन् दुसऱ्याच दिवशी न्यूयॉर्कला रामराम ठोकला...लंडनला आल्यानंतर पॅरिसला जाण्यासाठी माझ्याकडे पैसे नव्हतेच...तेव्हा ड्यूक स्ट्रीटमधल्या एका निवासात मी उतरले...आणि पॅरिसमधल्या माझ्या वेगवेगळ्या मित्रांना तारा पाठवल्या... एकाचंही उत्तर नाही ! लढाईच्या दिवसातला कारभार असावा !...मग त्या उदास जागेत, कोणाचा आधार नाही, काही नाही, अशा स्थितीत कितीतरी आठवडे मी खिन्न मनाने काढले...एकाकी...आजारी...कफल्लक...शाळा उद्‌ध्वस्त झालेली...अन् हे रेंगाळणारं युद्ध कधीतरी संपायची सगळी आशा नष्ट झालेली... रात्री तिथल्या अंधाऱ्या खिडकीशी बसून मी बॉम्बहल्ले न्याहळत बसायची... वाटायचं, एखादा तरी बॉंब या निवासावर पडावा...अन् आपल्यावरच्या अडचणी, संकटांचा कायमचा बंदोबस्त होऊन जावा !...खरंच, आत्महत्येचा मोह किती जबरदस्त असतो...मी तर वारंवार तोच विचार करते ...पण कोणीतरी मला दरवेळी मागे खेचतं ...इतर औषधांच्या गोळ्यांप्रमाणे आत्महत्येच्या गोळ्या

केमिस्टच्या दुकानात सर्वत्र सर्रास विकत मिळत असत्या, तर मला वाटतं, जगातल्या सगळ्या राष्ट्रांतला बुद्धिजीवी वर्ग एकजात एका रात्रीच्या रात्रीत दुःखावर मात करून मोकळा झाला असता...मोक्षाला गेला असता !

...शेवटी अगतिक होऊन मी एल्.ला तार केली...काही उत्तर आलं नाही ...तिकडे अमेरिकेत, तिथेच राहून नृत्यव्यवसायात नशीब काढायच्या कल्पनेनं ज्या माझ्या शिष्या मागेच राहिल्या होत्या, त्यांचे कार्यक्रम एका व्यवस्थापकानं ठरवले होते...नंतर 'इझाडोरा डंकन नर्तकसंच' या नावानंच त्यांचे दौरे चालले होते...पण या दौऱ्यांच्या व्यावहारिक यशातलं काही म्हणता काही माझ्या वाट्याला आलं नाही...शेवटी मी अगदी बायकुतीला येऊन पोहोचले...एवढ्यात योगायोगानं फ्रेंच वकिलातीतला एक उमदा अधिकारी माझ्या मदतीला धावून आला, अन् मला पॅरिसला घेऊन गेला. तिथे 'पाले दोर्से'त मी खोली घेऊन राहिले, अन् मग पैशासाठी सावकारांची मदत घेतली...

दररोज पहाटे पाच वाजता 'बिग बर्था'च्या कर्कश खणखणाटानं आम्हाला जाग यायची...आघाडीवरून सारख्या येणाऱ्या भयंकर बातम्यांनी गजबजलेल्या काळ्याकुट्ट दिवसाची ही नांदी त्याला साजेशीच होती म्हणा ! प्रत्येक दिवसाच्या ओटीत – मरण, रक्तपात, कत्तल यांनी रक्ताळलेली दीनवाणी घटकापळं, अन रात्रीच्या कानात बॉम्बहल्ल्याचे इशारे देणाऱ्या सायरनची सतत उठलेली एक जीवघेणी कळ...!

...या उजाड काळाला उजळा देणारी एकुलती एक प्रसन्न आठवण आहे माझ्यापाशी...एक दिवस संध्याकाळी एका मित्राच्या घरी सुप्रसिद्ध एस् (ace) गॅरॉस भेटल्याची...! त्यानं शोपां वाजवला, अन् मी नाचले; अन् मग 'पासी' ते 'के दोरसे'पर्यंत पायीपायीच आणून पोहोचवलं त्यानं मला... तेवढ्यात एक बॉम्बहल्लाही सुरू झाला आमच्या डोळ्यादेखत...तशातच 'प्लास द ला कॉंकोर्द'च्या तिथे मी त्याच्यासमोर नाचले !...तिथल्या कारंजाच्या घंगाळ्यासारख्या तळाच्या काठावर बसून तो मला टाळ्या देत होता कौतुकानं... जवळपासच पडून स्फोट होऊन उडालेल्या अग्निबाणांच्या प्रकाशझोतात त्याचे उदास डोळे मला स्पष्ट दिसत होते...त्या रात्री त्यानं मला सांगितलं की, त्याला मागोवा घ्यायचा होता...केवळ मृत्यूचा...मृत्यू हवा होता त्याला...बस् !... त्यानंतर लवकरच देवानं त्याचं गाऱ्हाणं ऐकलं, अन् एका देवदूताच्या पंखावर बसून तो दूर दूर गेला.. दूर...त्याच्या या नावडत्या दुनियेपासून खूप दूर...!!

दिवस कसे निरस झाले होते...एक प्रकारचा बेचव तोचतोपणा जणू सगळी-कडे तुंबून राहिला होता...खरं म्हणजे नर्सचं, – परिचारिकेचं काम करायला मला खूप आवडलं असतं...पण इथे तर त्या कामासाठी अर्ज केलेल्यांची अशी

लांबच लांब रांग होती, की जरूर नसल्या ठिकाणी मी माझी आणखी शक्ती खर्च करण्यात काही अर्थ नव्हता...मग पुन्हा एकदा कलेकडेच वळायचा विचार केला मी...काळीज मात्र आत इतकं जडशीळ झालेलं होतं, की पायांना ते ओझं पेलेल का, असा प्रश्न मला पडला...!

'दि एंजल' ( = देवदूत ) नावाचं वाग्नरचं एक गीत आहे...मला फार आवडणारं...त्यात अतिशय विषण्ण अन् एकाकी अशा एका हरवलेल्या जिवाची कथा आहे...पुढे त्याच्याकडे प्रकाशाची दौलत उधळत एक देवदूत येतो...सांगायची गोष्ट अशी, की त्या अंधाऱ्या, काळ्याकुट्ट दिवसात, असाच एक प्रकाशदूत मलाही भेटला...पियानोवादक 'वॉल्टर रमेल'...एका मित्रानं त्याला मला भेटायला आणलं होतं...

तो आत येताक्षणी मला वाटलं, की यौवनानं तळपणाऱ्या 'लिझ'चं चित्रच जणू काही आपल्या चौकटीबाहेर पडून माझ्यासमोर उभं आहे...उंच सडसडित, उभट कपाळावर रुळणारा तपकिरी – किरमिजी केसांचा एक झुपका–प्रकाशभरल्या स्वच्छ विहिरीसारखे तेजाळ नितळ डोळे ! त्यानं माझ्यासाठी संगीत वाजवलं... 'आर्च एंजल'–माझा 'देवदूत', असंच मी त्याचं नाव ठेवलं होतं ! 'रेजान'नं मोठ्या दिलदारपणे माझ्या ताब्यात दिलेल्या थिएटरच्या बैठकीच्या दालनात आम्ही कामाला सुरुवात केली. 'बिग बिर्था'चा वणघणाट आणि युद्धाच्या वार्तांचे प्रतिध्वनी वातावरणात घुमत असताना वॉल्टर माझ्यासाठी लिझचं 'थॉटस् ऑफ गॉड इन द विल्डरनेस' 'वैराणीतले ईश्वरचिंतन' हे संगीत वाजवायचा... सेंट फ्रान्सिसचं पक्ष्यांशी चाललेलं हितगुज, असा त्याचा विषय होता...त्याच्या वादनातून स्फूर्ती घेऊन मी नवनवीन नृत्यरचना करायची...या सर्व रचनांचा भावार्थ–प्रार्थना, मांगल्य, प्रकाश...असाच असल्यानं पुन्हा एकदा माझ्या आत्म्याला जाग आली...संजीवन मिळालं...माझ्या 'आर्च एंजल'च्या बोटांच्या संजीवक स्पर्शानं फुलायला लागणाऱ्या दिव्य स्वरावलींची साद माझ्या जिवानं ऐकली, मानली,...तिला प्रतिसाद दिला...माझ्या आयुष्यातल्या एका अत्यंत तरल अन् स्वयंप्रकाशित प्रीतीची ही सुरुवात होती ! ...

माझा 'आर्च एंजल' वाजवायचा तसा 'लिझ्' आजपर्यंत कुणीही वाजवलेला नाही...त्याचं कारण म्हणजे त्याला ती दृष्टी होती...कागदावरच्या सुरावटीच्या पलीकडे जाऊन देवदूतांशी संवाद साधतानाची वेडी धुंदी, ही काय चीज आहे, हे त्याला पक्कं समजलेलं होतं !

हळुवारपणा नि गोडवा यांची तो साक्षात् प्रतिमा होता...असं असूनही वासना त्याला अंतर्यामी जाळत होती...त्याच्या वादनातसुद्धा एक पिसाट उधाण होतं, आवेग होता...त्याच्या नसा त्याचाच घास घेत होत्या...त्याच्या

आत्म्यानं अहर्निश उभारलं होतं बंडाचं निशाण! वासनेला मोकळी वाट देताना यौवनाची उत्स्फूर्त आर्तता कधी त्यात दिसायची नाही...एवढंच नव्हे, तर त्याला झपाटणाऱ्या त्या अदम्य वासनेच्या बरोबर, त्या आवेगाबद्दल त्याची त्याला वाटणारी घृणाही तेवढ्याच प्रकर्षानं त्याच्या ठायी उमटलेली दिसायची!... जळत्या निखाऱ्यावरून नाचत जाणाऱ्या एखाद्या साधूसारखी त्याची अवस्था होती. अशा माणसावर प्रेम करणं जसं कठीण असतं, तसंच धोक्याचंही असतं ...कारण प्रेमाबद्दल वाटणाऱ्या घृणेचं रूपांतर शेवटी तिटकाऱ्याच्या रूपानं आक्रमकावर उलटतं, हे सर्वश्रुतच आहे!

रक्तामांसाच्या आवरणातून एका मानवी जिवाशी जवळीक करता करता एकाएकी त्याच्या आत्म्याचा शोध लागणं, म्हणजे किती चमत्कारिक नि भयंकर गोष्ट आहे, नाही?...त्याला वेढणाऱ्या मेदमांसांतून विषयसुख मिळवायचं...उन्माद चाखायचा...आभास निर्माण करायचा...अन् तो आभास तरी कसला, तर पुरुष ज्याला ' सुख ' म्हणतात, त्या भावनेचा.. त्या मांसाच्या वेढ्यातून...त्या रूपातून...त्या आभासातून...मागोवा घेत जायचं पुरुष ज्याला ' प्रीति-प्रेम ' म्हणतात, त्या वस्तुस्थितीचा!

वाचकांनी एक गोष्ट लक्षात घ्यायला हवी, की या माझ्या स्मृतिचित्रांनी खूप वर्षांचा काळ व्यापला आहे...जेव्हा जेव्हा प्रेम एकएकी नवीन रूपात मला सामोरं आलं,— कधी सैतान...कधी देवदूत, तर कधी सरळ साधं सामान्य माणूस बनून— तेव्हा तेव्हा, त्या प्रत्येक वेळी मला वाटत आलं, की ज्याची मी इतकी वाट पाहात आले, ते माझ्या आयुष्यातलं एकच एक खरं प्रेम हेच आहे... हेच प्रेम माझ्या आयुष्याला कायमचं उद्धरणार आहे.. बाकी ' प्रेम ' नेहमीच असली खुळी खात्री घेऊन येत असतं आपल्याबरोबर . ! माझ्या तर प्रत्येक प्रेम-प्रकरणातून एकेक स्वतंत्र कादंबरी निर्माण होऊ शकली असती...सारीच प्रकरणं मुळी शोकान्त ठरली ...! . मात्र अजूनसुद्धा एखाद्या सुखान्त प्रेमाची वाट मी बघतेच आहे...असं प्रेम की जे जन्मोजन्म टिकेल ...आशावादी चित्रपटातल्या प्रेमासारखं!

' प्रेम ' हा अद्‌भुत विषय किती असंख्य दृष्टिकोणातून हाताळता येतो! .. किती कमीअधिक आवेगानं...मंद, मध्य, तार-कोणत्याही सप्तकात, किंवा स्वरात त्याची ' धून ' छेडली जाऊ शकते! बिथोव्हनच्या संगीताची ' पुसिनी '-च्या संगीताशी तुलना केली, तर ते जेवढं भिन्न नि जितकं वेगळ्या थाटाचं वाटेल, तितकीच एका पुरुषाची प्रेम करण्याची तऱ्हा दुसऱ्यापेक्षा भिन्न, नि वेगळी असते ...अन् स्त्री असते या स्वरमधुर वादकांना प्रतिसाद देणाऱ्या एखाद्या वाद्या-सारखी...साहजिकपणे ज्या स्त्रीनं एकाच पुरुषावर प्रेम केलेलं आहे, तिची या

बाबतीतली समज, एकाच संगीतरचनकाराचं संगीत ऐकलेल्या श्रोत्याप्रमाणे जरा प्राथमिकच असतं !

...उन्हाळा वाढायला लागला, तसा दक्षिणेकडच्या एखाद्या शांतनिवांत ठिकाणी जायचा बेत आम्ही केला...'सें. ज्यां' बंदराजवळ 'का फेरा'ला एक अगदी निर्जन होटेल होतं...तिथल्या रिकाम्या गॅरेजचा आम्ही स्टुडिओ बनवला, आणि माझा दिवसभरचा नि संध्याकाळचा वेळसुद्धा आर्च एंजलच्या त्या दिव्य संगीताबरोबर नृत्य करण्यात कुठच्या कुठे जायला लागला...

खूप प्रसन्न अन् निवांत दिवस माझ्या वाटेला आले होते...आर्च एंजलच्या सहवासाची माधुरी...समुद्राची निरंतर जवळिक...अन् अंतर्बाह्य संगीतमय जीवनक्रम...मृत्यूनंतरच्या स्वर्गीय जीवनाबद्दलची कॅथलिक लोकांची जी कल्पना आहे, तसलंच हे एक स्वप्न मी जणु जगत होते !...आयुष्याचा लंबक म्हणजे काय चीज आहे पहा ! जितकी वेदना तीव्र, तितकाच आनंदही बेभान, उर्मिल ! प्रत्येक झोक्याबरोबर दुःखात जितकं खोल रुतायचं, तितकंच सुखानं उंच झेपवायचं !

अधेमधे जखमी सैनिक अन् दुर्दैवी नागरिक यांच्यासाठी आम्ही मदतीदाखल कार्यक्रम करायला बाहेर पडत होतो तेवढेच...एरवी बहुधा आम्ही एकटेच होतो...संगीत–अन् प्रीती...प्रीती अन् संगीत, यांचे संजीवक घुटके आलटून-पालटून घेत घेत माझा जीव सुखाच्या शिखरावर आनंदाच्या नशेत धुंद होता...

जवळच्याच एका व्हिलात एक धर्मोपदेशक आपली बहीण 'मादाम जिराल्डी' हिच्यासह राहायचे...त्यांच्याबद्दल सर्वांना फारच आदर होता. दक्षिण अफ्रिकेत जाऊन राहिलेल्या गोऱ्या धर्मोपदेकांपैकीच एक होते ते ... ते लोक म्हणजे आमचं एकुलतं एक मित्रमंडळ होतं...! लिझ् चं आध्यात्मिक दैवी संगीत मी कितीदा-तरी त्यांच्यासाठी नाचायची...पण उन्हाळा ओसरता ओसरता नाईसमध्ये आम्हाला एक स्टुडिओ मिळाला...अन् नंतर युद्धकर्त्यांनी तह पुकारल्याचं कळल्याबरोबर आम्ही पॅरिसला परतलो...

युद्ध संपलं एकदाचं...'आर्क द त्रियोम्फ'मधून गेलेली विजयाची मिरवणूक पाहताना आम्हीही 'अनर्थाचं थैमान संपलं...जग वाचलं...' वगैरे वगैरे आरोळ्या ठोकल्या...त्या क्षणी सगळेच कवी बनले होते...पण कसलं काय, 'कवी जागा झाला, अन् त्यांच्या प्रियेसाठी ब्रेड-चीजच्या शोधात निघाला,' त्या-प्रमाणे जगही जागं झालं, अन् व्यावहारिक व्यापारी गरजांच्या विचाराला लागलं...!

माझ्या आर्च एंजलनं माझा हात धरून मला बेलेव्हयूला नेलं...सारं काही पडीक, मोडकळीला आल्यासारखं दिसत होतं...तरीसुद्धा मनात विचार आला, की ही वास्तू पुन्हा का बांधू नये ? अन् विचारासरशी, तसल्या त्या अशक्यप्राय

गोष्टींसाठी पैसा उभा करण्याच्या प्रयत्नात, कितीतरी महिने नुसते नादावल्या-सारखे वालवले आम्ही !

शेवटी एकदा समजूत पटली कशीबशी, की हवी तशी डागडुजी करून घेणं अशक्य कोटीतलं काम होतं...मग फ्रेंच सरकारनं बरी किंमत देऊ केल्यानं 'वेलेव्ह्यू' त्यांना विकायचं मी मान्य केलं...पुढल्या महायुद्धाच्या तयारीसाठी विषारी वायू निर्माण करण्याचा कारखाना काढायला ती वास्तू सरकारला फार सोयीची वाटली होती म्हणे !...माझं 'डायनिशियन' रंगमंदिर जखमी लोकां-साठी हॉस्पिटल बनल्याचं तर मी पाहिलं होतंच; पण आता तर ते कायमचं सोडून द्यायची, एवढंच नाही, तर युद्धसाहित्याच्या कारखान्यात त्याचं रूपांतर व्हायचं पाहायची माझ्यावर पाळी आली...! 'वेलेव्ह्यू 'हातचं गेलं, ही फार फार दुःखाची बाब वाटते मला...बेल् – व्ह्यू...! किती सुंदर देखावा दिसायचा तिथून...वास्तूचं नाव सार्थ करणारा !

जेव्हा खरेदी-विक्रीचा खटाटोप आटपला, अन् बँकेत पैसा जमा झाला, तेव्हा 'रूयू दे ला पॉम्प' मध्ये मी एक घर विकत घेतलं....पूर्वी हे बिथोव्हनचं घर होतं म्हणे...तिथेच आता माझा स्टुडिओ बनला...

माझ्या आर्च एंजलच्या स्वभावाला करुणेची एक गोड किनार होती.. माझ्या काळजाला भार होऊन बसलेलं माझं दुःख त्याला जाणवायचं...रात्र रात्र झोप न येऊ देणारी, डोळ्यांना आसवांची धार लावणारी माझी व्यथा त्याला उम-जायची...अशा वेळी माझ्यावर खिळलेल्या त्याच्या तेजाळ डोळ्यांतलं कारुण्य पाहून माझ्या जिवाला विरंगुळा वाटायचा...दिलासा मिळायचा...

स्टुडिओच्या आत तर आमच्या दोन कलांचा एक अद्भुत मेळ जमला होता... त्याच्या व्यक्तिमत्त्वाची छाप पडून माझं नृत्य तरलविरल बनत चाललं होतं... फ्रान्झ लिझ्झच्या संगीताच्या आध्यात्मिक भावार्थाची पुरी उमज या आर्च एंजलनंच मला घडवली...' लिझ्झ ' संगीतावर एक पुरा कार्यक्रमच बसविला आम्ही... ' साल बिथोव्हन ' ( बिथोव्हनचं दालन)च्या शांत संगीतदालनात, काही प्रसिद्ध महान् चित्रावलींचा, नृत्यगती आणि छायाप्रकाश, या संदर्भात मी अभ्यास करत होते– ' पार्सिफाल ' द्वारा मला या चित्रकृतींना नृत्याकार द्यायचा होता...

साल बिथोव्हनमध्ये घालवलेल्या या घटका मांगल्यानं न्हायलेल्यान् प्रसन्न होत्या...एका गूढ शक्तीनं झपाटलेलं आमचं प्राणयुग्म उंच उंच भराऱ्या मारत असायचं...कित्येकदा तो वाजवत असताना मी नाचायची, तेव्हा माझा आत्मा देहाची कुडी सोडून जणू वर वर तरळायचा...' ग्रेल 'च्या चंदेरी स्वरावलींच्या दूर–दूर पर्यंतच्या उड्डाणात विरून जायचा...अन् मला वाटायचं, की आमच्या-वेगळी एक स्वतंत्र अशरीरिणी अस्मिता आमच्यातून त्या क्षणी निर्माण झालेली

आहे...नाद अन् आविर्भाव अनंताकडे झेपावत असताना वरून त्यांना मिळणारा प्रतिसादसुद्धा तर ऐकू येतो आहे...!

त्या संगीतक्षणांच्या अपार्थिव बळावर प्रीतीच्या मंगल ऊर्मीनं आमच्या प्राणांचे षड्जपंचम सुरेल बोलू लागले असताना आम्ही एका नव्या जगाच्या उंबरठ्यावर उभे आहोत, असंच मला वाटलं होतं...आमच्या प्रेक्षकांनासुद्धा या आमच्या संघटित शक्तीचा दुहेरी प्रभाव जाणवायचा...कित्येकदा तर एका अननुभूत, चमत्कारिक मानसिक बाधेचा थिएटरमध्ये साक्षात्कार होतो आहे असं वाटायचं... अन् माझ्या आर्च एंजलनं हे चिन्तनमनन असंच चालू ठेवलं असतं तर...नृत्यात्मक हालचालींच्या, क्षेपांच्या उत्स्फूर्त स्फुरणाचा योग आम्ही खासच साधला असता हे क्षेप, ह्या हालचाली—अशा काही आत्मिक शक्तींनं रसरसलेल्या असत्या, की त्यांच्याद्वारा साऱ्या मानवजातीला आम्ही एक नवी जाग आणू शकलो असतो!...पण परम सौंदर्याचा हा पवित्र शोध, पार्थिव वासनेनं झाकोळून टाकावा, ही गोष्ट किती करुणास्पद आहे, नाही?...हेच पाहा ...दंतकथांतून घडतं तसं माझं झालं अगदी : समाधान कधी नसतंच.. मग संकटाची परंपरा सोबत घेऊन येणाऱ्या दुष्ट चेटकिणीला आपण दार उघडतो! ...मी सुद्धा माझ्या हाती नव्यानं लागलेल्या सुखाची जपणूक करायचं सोडून पुन्हा माझ्या विद्यालयाच्या पुनरुज्जीवनाच्या जुन्या स्वप्नाशी खेळायला लागले ...अन् त्या कल्पनेनंच अमेरिकेतल्या माझ्या शिष्यांना तारा पाठवल्या...

सारे एकत्र जमल्यावर माझे काही विश्वासू मित्र मी एक ठिकाणी बोलावले... अन् त्यांना म्हटलं, "आपण सगळे ॲथेन्सला जाऊ, आणि ॲक्रोपोलिसकडे डोळे भरून पाहू...कोणी सांगावं, अजूनही ग्रीसमध्ये नृत्यशाळेची स्थापना होऊ शकेल..."

एखाद्याच्या हेतूचे किती विपर्यास होऊ शकतात! 'द न्यू यॉर्कर' (१९२७) मध्ये एका लेखकानं माझ्या या दौऱ्याच्या संबंधात काय तारे तोडलेत माहीत आहे : "तिच्या खर्चिकपणाला सीमाच नव्हती...तिने एक मोठा संचच जमवला ...अन् व्हेनिसपासून साऱ्या सरंजामानिशी ॲथेन्सपर्यंत गेली..."

...पुढे कसं सांगू!...माझ्या शिष्या येऊन पोहोचल्या...तरुण, देखण्या अन् यशस्वी...माझ्या आर्च एंजलनं त्यांना पाहिलं, अन् पाहताक्षणी एकीवर त्याचं मन बसलं ...

...त्या प्रवासाचं वर्णन तरी कसं करायचं...मला तर तो प्रवास बलिदानाच्या वेदीकडे नेत असल्यासारखा भयंकर वाटला! लिडोवर, होटेल एक्सेलशिअर-मधल्या काही आठवड्यांच्या मुक्कामात त्या उभयतांत निर्माण झालेली ओढ माझ्या लक्षात आली...ग्रीसला जातानाच्या बोटीवर त्याबद्दलची खात्री पटली...

अन् शेवटी त्या खात्रीमुळेच चांदण्यात न्हालेल्या ॲक्रोपोलिसचं दृश्य माझ्या लेखी कायमचं काळवंडून गेलं...हे सारे त्या बलिदानाच्या वाटेवरचे टप्पे होते...

ॲथेन्सला आल्यावर शाळेची उभारणी करायला मात्र सारी परिस्थिती अनुकूल अन् शुभशकुनाची होती, असं दिसून आलं. व्हेनेझेलॉसच्या कृपेनं 'झाप्पेईऑन' स्टेडियमच माझ्या हातात मिळालं...तिथेच आम्हाला एक स्टुडिओही मिळाला होता...दररोज सकाळी तिथे शिष्यांच्या बरोबर माझ्या तालमी चालायच्या ...ॲक्रोपोलिसला साजेशा नृत्यानं त्यांना स्फूर्ती आणायचा मी प्रयत्न करत होते...त्या स्टेडियममध्ये होणाऱ्या डायोनिशीयन महोत्सवात भाग घेण्यासाठी हजार एक मुलं तयार करण्याचा माझा मानस होता...

ॲक्रोपोलिसची वारी आम्ही दररोज न चुकता करत होतो...एकोणिसशे–चारमधल्या माझ्या ॲक्रोपोलिसच्या पहिल्या भेटीच्या पार्श्वभूमीवर, माझ्या शिष्यांच्या नृत्य करणाऱ्या तरुण आकृती आज पाहताना माझं मन हेलावून जात होतं... ...सोळा वर्षांपूर्वीचं माझं स्वप्न काही अंशांनी तरी साकार झाल्याचा हा पुरावाच नव्हता का?.. अन् आता युद्ध तर संपल्यासारखंच होतं...तेव्हा इतक्या वर्षांचं मनोमनीचं जोपासलेलं विद्यालय ॲथेन्समध्ये उभवणं आता कठीण जाऊ नये...

अमेरिकेहून परतलेल्या माझ्या शिष्यांच्या व्यक्तित्वात जी एक कृत्रिमता अन् मला न आवडणाऱ्या लकबी शिरल्या होत्या, त्या इथल्या ॲथेन्सच्या प्रसन्न आकाशाच्या साक्षीनं, पर्वतराजी,–समुद्र यांच्या उदाससुंदर सान्निध्यानं लाभणाऱ्या स्फूर्तीनं, अन् महान् कलेच्या साक्षात्कारानं पार वितळून विरून गेल्या...

चित्रकार 'एडवर्ड स्टायशेन' आमच्या संचातच होता...त्यानं ॲक्रोपोलिसवर, अन् डायनिससच्या रंगमंदिरात खूप छायाचित्रं घेतली...पण त्यामुळे ग्रीसमध्ये जे भव्य दृश्य मी निर्माण करणार होते, त्याचं नावीन्य अन् अद्भुतता किंचित् झाकोळूनच गेली यात शंका नाही...

...आमचा कोपानोस तर अगदी पडीक अवस्थेतच होता...डोंगरी मेंढ्याबकऱ्या पाळणारे मेंढपाळ, अन् त्यांचे कळप यांचीच तिथे काय ती रहदारी होती ...पण त्यामुळे घाबरून भिऊन माघार न घेता, तिथली सारी जमीन साफ वगैरे करून घेऊन ते घर पुन्हा बांधून काढण्याचा मी निश्चय केला. कामाला लगेच सुरवातही झाली . इतक्या वर्षांचे जमा झालेले पडझडीच्या गदळीचे ढीग तिथून उचलले गेले...अन् एका तरुण आर्किटेक्टनं दारं खिडक्या नि छप्पर बसवायचं काम हातात घेतलं...तिथल्या उंच उभ्या दिवाणखान्यात नृत्याचा गालिचा पसरून एक ग्रॅण्ड पियानोसुद्धा आम्ही तिथे वर आणवून घेतला...दररोज दुपारी सागरावर मुलायम फिक्या जांभळ्या, नि सोनेरी रंगाच्या पिंजलेल्या किरणांची पखरण

करत, ॲक्रोपोलिसच्या पाठीमागे मावळणाऱ्या सूर्याच्या साक्षीनं, माझा आर्च-एंजल बाख्, बिथोव्हन, वाग्नर, लिझ्‌ यांचं उदात्त नि स्फूर्तिदायी संगीत आम्हाला ऐकवायचा ...मग संध्याकाळच्या निवल्या, थंड शीत वेळीं, ॲथेनियन मुलं रस्तो-रस्ती विकतात तसले मोगरीचे शुभ्र सुंदर गजरे कपाळावर डोक्याभोवती चक्राकार माळून आम्ही सपरसाठी समुद्रकिनाऱ्यालगतच्या फालेरॉन पर्यंत जात असू...

फुलं माळलेल्या मुग्धांच्या गराड्यांतला माझा आर्च एंजल कुंडीच्या उद्याना-तल्या पार्सिफालसारखाच दिसत होता...फरक एकच, त्याच्या डोळ्यातली ती एक नवीन चमक...! एक नवीन भाव !...त्या डोळ्यातून स्वर्गापेक्षा पृथ्वीच बोलत होती...आमचं प्रेम आमच्या बौद्धिक अन् आध्यात्मिक समरसतेमुळे अत्यन्त समर्थ अन् अचल होतं, अशी माझी धारणा ! त्यामुळे खरी गोष्ट माझ्या ध्यानात येईपर्यंत बराच काळ गेला...अन् मग हळूहळू जाणवायला लागलं, की ‘आर्च एंजल’च्या चमकत्या पंखांचं रूपांतर एखाद्या रानकिशोरीला पकडून मिठीत वेऊ पाहणाऱ्या उत्सुक बाहूंमध्ये झालं होतं...आजवरचा माझा सारा अनुभव इथे व्यर्थ ठरला होता...कुचकामी ठरला होता, याच गोष्टीनं मी हादरून गेले... तेव्हापासून एका भयंकर वेदनेनं मला ग्रासून टाकलं...अस्वस्थता जिवात घर करून बसली...माझ्या नकळत मी त्यांच्या वागण्यातल्या परस्परप्रीतीच्या वाढत्या खुणा नि पुरावे न्याहाळायला सुरुवात केली...कधीकधी तर मनात एका सैतानाचं थैमान सुरू व्हायचं...खुनासारख्या अघोरी विचाराचं !...माझी मलाच भीती वाटायला लागली ..

...अशीच एक संध्याकाळ होती...सूर्य मावळण्याच्या बेतात होता...माण-साच्या सामान्य कोटीला झपाट्यानं येऊन पोहोचणाऱ्या माझ्या आर्च एंजलनं— देवदूतानं ‘ग्योतरदामारुंगचा मार्च’ ही भव्य रचना वाजवून संपवलेली होती... शेवटच्या, सरत्या सुरांची आस अजून हवेतच तरळत होती...जणु जांभळ्या किरणांत वितळून हायमेटसवरून प्रतिध्वनींच्या स्वरूपात परतून ती समुद्राला उजळून टाकणार होती ...एवढ्यात, परस्परांबद्दलच्या तीव्र ओढीनं सारखीच पेटलेली त्यांची नजरानजर मी टिपली...सूर्यास्ताच्या त्या भळभळत्या लालभडक प्रकाशात !

त्या क्षणी मला रागाचा इतका अनावर झटका आला की माझी मलाच भीती वाटली...झटकन् वळून मी तिथून निघून गेले...ती सबंध रात्र हताशपणे तडफडणाऱ्या घायाळ मनानं मी हायमेटसच्या अवतीभोवतीच्या टेकड्यातून भटकण्यात घालवली ! ‘मत्सर’ नावाचा हिरव्या डोळ्यांचा तो राक्षस माझ्या ओळखीचा नव्हता, किंवा सगळ्यात असह्य यातना देणाऱ्या त्याच्या तीक्ष्ण सुळ्यांची पारख मला नव्हती, असं मुळीच नाही; पण आताच्या या मत्सराच्या पिसाट आवेगाच्या मानानं पूर्वीचा सारा अनुभव नगण्यच म्हणायचा !...मी

प्रमात पडलेली होतेच, अन् त्याच वेळी त्या दोघांचा भयंकर द्वेषही करत होते... द्वेषाच्या, मत्सराच्या कल्पनातीत यातनांच्यापायी, आपल्या जिवलग माणसाचाच जीव घेणाऱ्या दुर्दैवी माणसांच्याबद्दल माझ्या मनात या अनुभवानं एक तऱ्हेची सहानुभूती निर्माण झाली आहे...एक तऱ्हेचा उमज पडला आहे...

हे असं काही तरी विपरित माझ्या हातून घडू नये, म्हणून मी माझ्या शिष्यांचा एक छोटासाच संच आणि माझा मित्र स्टाईशेन, यांना बरोबर घेऊन 'चालसिस' ला निघाले...' एन्शंट थीव्ज 'च्या जवळून जाणाऱ्या सुंदर रस्त्याच्या चढणीवरून आम्ही 'चालसिस 'ला निघालो. इफिजिनियाच्या दुर्दैवी विवाहसमारंभाच्या प्रीत्यर्थ नृत्य करणाऱ्या नवकिशोरींना माझ्या कल्पनेत मी जिथे पाहिलं होतं, तीच ही सोनेरी वाळू...

पण आता या क्षणी मात्र, हेलासचं सारं वैभवसुद्धा माझ्या मनातल्या मत्सराच्या किळसवाण्या भुताला हुसकावून लावू शकलं नाही ! माझ्या मनापुढे तरळत होती मागे ॲथेन्सला राहिलेली ती दोघं ! ती जाणीव सारखी माझं काळीज कुरतडत होती, ॲसिडनं चरावा, तसा मेंदू चरत होता...त्यात आणखी परत येऊन पाहते, तर आमच्या बेडरूमच्या खिडक्यांसमोर पसरलेल्या बाल्कनीत ती दोघं उभी !...एकमेकावरच्या प्रेमानं, अन् तारुण्याच्या मस्तीनं त्यांचे चेहरे उत्फुल्ल दिसत होते...हे दृश्य मी पाहिलं अन् माझ्या दुःखाची अगदी परिसीमा झाली !

...आता त्या पिसाटपणाची काही संगतीच लागत नाही माझी मला...पण त्या वेळी मी त्या अनामिक पंजात सापडले होते हे अगदी खरं...स्कार्लेट फीव्हर नावाचा ताप, किंवा देवीचा रोग यातून बरं होण्यासारखंच माझ्या सुटकेचं काम कठीण होऊन बसलं होतं...एवढं रामायण घडत असताना शिष्यांना नियमितपणे शिकवणं चालूच होतं...ॲथेन्समधल्या नृत्यशाळेचे बेत आखणंही सुरूच होतं... याबाबतीत मात्र ग्रहांची अगदी कृपादृष्टीच दिसत होती आमच्यावर...व्हेनेझेलॉस सरकारचा माझ्या या कार्याला पूर्ण पाठिंबा होता...अन् ॲथेन्सची जनताही उत्सुक दिसत होती...

व्हेनेझेलॉस, अन् ग्रीसचा तरुण राजा, यांच्या सन्मानासाठी स्टेडियमवर योजलेल्या एका भव्य महोत्सवाची निमंत्रण आम्हाला सर्वांना आली होती. पन्नास हजार लोक, आणि पुरं ग्रीक चर्च त्यात सामील झालं होतं...राजेसाहेब आणि व्हेनेझेलॉस यांनी स्टेडियममध्ये प्रवेश केल्याबरोबर टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटानं त्यांचं भव्य स्वागत केलं...सोनेरी किनखापी कशिद्यामुळे कडक झालेल्या अन् उन्हात झगमगणाऱ्या झुली घातलेल्या धर्मोपदेशकांची ती मिरवणूक म्हणजे एक अद्‌भुत दृश्य होतं !

मी माझ्या मळसूत पेपलममध्ये स्टेडियममध्ये प्रवेश केला, तेव्हा तानाग्राच्या

जिवंत शिल्पाकृतीसारखा दिसणारा माझा नर्तकीचा संच माझ्यामागून येताना पाहून प्रसन्न स्वभावाचा कॉन्स्टॅन्टिन मेलास पुढे झाला, अन् लॉरेलचा मुकुट मला भेट देऊन म्हणाला,

"इझाडोरा, फीडियसचं अमर सौन्दर्य आणि ग्रीसचा वैभवसंपन्न काळ...तू तू आम्हाला परत मिळवून दे "—मी त्याला उत्तर दिलं,

"हजारो कुशल नर्तक निर्माण करायला तुम्ही मला साहाय्य करा...ते नर्तक या स्टेडियममध्ये असा उत्कृष्ट नृत्याविष्कार करतील, की त्यांचा तो नृत्यसोहळा चकितविस्मित डोळ्यांनी पाहायला, आणि त्याचा अपूर्व आनंद चाखायला सारं जग इथे लोटेल...!

माझे शब्द विरताहेत, एवढ्यात आर्च एंजलनं त्याच्या त्या 'आवडतीचा' हात अत्यानंदानं हातात धरून ठेवलेला मला दिसला...आणि इतक्या दिवसानंतर पहिल्यांदाच माझं माझ्याशी चाललेलं भांडण मिटल्यासारखं स्वस्थ वाटलं मला. माझ्या भव्य नि उदात्त ध्येयस्वप्नापुढे या क्षुद्र भावनांची किंमत ती किती असा विचार माझ्या मनात आला...अन् त्यांच्याकडे पाहून क्षमाशीलपणे, प्रेमाने हसले मी...पण त्याच रात्री बाल्कनीत चांदण्याच्या पार्श्वभूमीवर, छायाकृतींसारखी उठून दिसणारी, एकमेकांच्या डोक्यांना टेकलेली ती त्यांची डोकी पाहिली, अन् माणसातल्या त्या सगळ्या क्षुद्र भावनांनी उसळून उठून माझा ताबा घेतला... मी भडकून उठले, ती एकटीच भटकले बाहेर...प्रेमभंगानं हताश झालेल्या सॅफोनं पार्थेनॉनच्या दरडीवरून घेतलेल्या आत्मघातकी उडीचा विचार मनात सारखा घोळत होता.

माझं काळीज खाऊन टाकणाऱ्या, माझे भयंकर हाल करणाऱ्या मत्सरानं केलेली माझी यातनामय अवस्था शब्दांनी वर्णन करण्यापलीकडची होती... आजूबाजूच्या सौंदर्याचं मृदुमुलायम दर्शन घडवणारा रम्य परिसर, त्या माझ्या यातनात भरच टाकत होता...त्या साऱ्या परिस्थितीतून बाहेर पडायला वाट कशी ती मिळतच नव्हती...एका मर्त्य...पार्थिव वासनेच्या प्रकरणापायी संगीताच्या संघटित स्वरूपाच्या एका महान् कलाविष्काराचं आमचं अमर, अपार्थिव स्वप्न आम्ही धुळीला का मिळवायला निघालो आहोत?...पहिल्यापासून माझ्या शाळेतच वाढलेल्या त्या मुलीला तरी तिथून 'जा' म्हणणं शक्य होतं का? अन् डोळ्यासमोर वाढत असलेल्या त्यांच्या प्रेमाकडे दररोज पाहत असताना माझ्या तोंडून माझ्या दुःखाला, रागाला किंचित् सुद्धा वाट द्यायची नाही, चकार शब्द म्हणून त्याबद्दल काढायचा नाही, हा पर्याय तर अशक्य कोटीतलाच नव्हता का? खरं म्हणजे डाव सरता सरत नव्हता...तो मोडण्याखेरीज काय हातात होतं?...एक...एकच शक्यता होती...असल्या क्षुद्र भावनांवर मात करून

मनाला आध्यात्मिक पातळीवर न्यायचं...पण इकडे जिवाची एवढी तगमग होत असून सुद्धा नाचण्याच्या सतत व्यायामामुळं, टेकड्यातून दूरवर भटकण्यानं, अन समुद्रात रोजच्या रोज पोहून येण्यानं माझी भूक चांगलीच प्रज्वलित व्हायची, अन् त्याबरोबरच मनातल्या सामान्य भावनांनासुद्धा अनावर वेग चढायचा...ऐहिक पातळीवरचा !

असंच माझं गाडं चाललं होतं...इकडे माझ्या शिष्यांच्यावर मी सौंदर्य, शांती-तुष्टी, तत्त्वज्ञान, सुसंवाद–या मूल्यांचे संस्कार वढवण्याचा प्रयत्न चालवला होता...अन् स्वतः मात्र एका कराल वेदनेच्या पकडीत सापडून आतल्या आत तडफडत होते...शेवटी या परिस्थितीचा परिणाम काय झाला असता, कोण जाणे !...

एकच मार्ग होता माझ्यापाशी सुटकेचा...वरवरच्या जादा खुषीचं, एक चिलखत आपल्या स्वभावावर चढवायचं, आणि रात्री समुद्रकिनारी सपर घेताना ग्रीसच्या नशीन मद्यात आपली व्यथा बुडवायचा प्रयत्न करायचा...! असेल... दुसरा एखादा उदात्त मार्गसुद्धा असेल यावेगळा; पण त्यावेळी तरी तो शोधून काढायची ताकद माझ्यात नव्हती ! काही म्हणा...हे माझे – सामान्य माणूस म्हणून आयुष्य जगतानाचे – बिचारे सामान्य अनुभव होते...जसे मला भावले, तसे ते मी कागदावर उतरवते आहे...त्यात काही अर्थ असेल, नसेल... 'माणसानं काय करू नये,' ते इतरांना कळायला यांचा कदाचित् उपयोग होऊ शकेल ! पण जो तो आपल्यावरचं संकट टाळायला आपल्याला दिसेल तो आणि जाणं शक्य असेल तोच रस्ता धरत असतो...दुसऱ्याच्या अनुभवानं कोणी कधी शहाणं झालेलं आहे का ?

या पेचप्रसंगाची उकल एका मोठ्या विचित्र योगायोगानं झाली !...घडलेली घटना खरं म्हणजे क्षुल्लक !...एका छोट्या माकडाच्या चावण्याचं निमित्त होऊन ग्रीसचा तो तरुण राजा वारला...

काही दिवस जगण्यामरण्याच्या शिवेवर त्याचा जीव घोटाळत राहिला होता, पण नंतर त्याच्या दुःखद मरणाची वार्ता आलीच पाठोपाठ...या एका प्रसंगानं राज्यात सगळीकडे अशी काय उलथापालथ, आणि बंडाची हवा निर्माण झाली, की व्हेनेझेलॉस, अन् त्याचा पक्ष, या सर्वांनाच ग्रीसमधून पाय काढावा लागला. आमचीही अर्थात तीच अवस्था झाली; कारण आम्ही ग्रीसला आलो होतो, ते त्याचेच पाहुणे म्हणून...त्यामुळे त्या परिस्थितीच्या राजकीय बळींच्या यादीत आमचीही गणना झाली !...कोपानोस पुनः एकदा बांधून काढण्यात आणि स्टुडिओ सजवण्यात जो सगळा पैसा मी अक्षरशः ओतला होता, तो वाया गेला, हे तर खरंच...पण शिवाय ॲथेन्सला नृत्यविद्यालय स्थापण्याचं आमचं स्वप्न अर्ध्यावर

सोडून, बोट पकडून आम्हाला सर्वांना रोममार्गे पॅरिसला परतणं भाग पडलं !

एकोणिसशेवीसमधल्या या अथेन्सच्या शेवटच्या भेटीची आठवण किती विचित्र नि दुःखद, किती असह्य वाटते म्हणून सांगू ! अन् तसंच ते पॅरिसला परत येणंसुद्धा ! ते मला कायमचे सोडून जायला निघालेले असताना मी माझ्या आर्च एंजलचा, अन् माझ्या शिष्येचा शेवटचा निरोप घेणं...जुन्या जखमेवरची ती खपली निघून पुनः वेदना भळाभळा वाहायला लागणं...त्या साऱ्या प्रकरणात हुतात्म्याची भूमिका माझ्या कपाळी आली होती, असं मला वाटत होतं—पण या मुलीची धारणा अगदी बरोबर उलट होती !...माझं दुःख, माझ्या भावना... माझ्या मनाची माघार न घेणारी ओढ...सगळ्या सगळ्या गोष्टींचा उद्धार करून तिनं अत्यंत कडवट शब्दात सारा दोष माझ्या पदरात बांधला !

'ख्यू दे ला पॉंप' मधल्या घरात, माझ्या आर्च एंजलच्या संगीताच्यासाठीच मुद्दाम सजवून तयार केलेल्या 'साल बिथोव्हन' मध्ये शेवटी जेव्हा मी एकटीच उरले, तेव्हा मात्र माझ्या हताशपणाची अगदी सीमा झाली...जिथे मी एकदा सुखाच्या शिखरावरचे दिवस काढले, तेच घर मला आता अगदी डोळ्यापुढे नकोसारखं झालं...एकच इच्छा उरली...या घरापासून...या जगापासून दूर दूर पळून जाण्याची...कारण त्या क्षणी तरी, सारं जग, अन् 'प्रेम' ही भावना माझ्यासाठी मेली होती...संपली होती, माझ्या लेखी !...एक माणूस, आपल्या एकाच आयुष्यात, कितीदा हा असला गैरसमज करून घेतो स्वतःचा कुणास ठाऊक !...खरं तर अडचणींच्या, संकटांच्या पहाडांपलीकडे पुढचं पाहता येणं शक्य असतं, तर फुलांनी डवरलेली एक बळच्या बळ आपल्यासाठी पुढे थांबून राहिलेली आहे,सुख पुढच्या टप्प्यावर आपली वाट पाहात आहे, हे माणसाला सहज कळलं असतं ... कितीतरी बायकांनी, विशेषतः चाळिशीच्या नंतरच्या आयुष्याचं एक उत्तर काढलेलं असतं...प्रेमप्रकरणांसारख्या गोष्टींना फाटा देऊन गंभीरपणे उरलेले दिवस काढायचे !...मला हे अगदी पटत नाही...अगदी राग येतो मला या विचारसरणीचा छे !...चूक...चूक आहे हे सगळं...

...पृथ्वीवरच्या आपल्या या साऱ्या उदासगूढ मुशाफिरीतून देहाच्या अस्तित्वाचं भान होत राहणं ही किती रहस्यमय गोष्ट आहे !...पहिली 'मी'! ...एका मुग्धेचं कृश शरीर...लाजरं, भित्रं, बुजरं...अन् त्या 'मी'चं आजच्या भरल्या अंगाच्या पुरंध्रीत झालेलं हे रूपांतर !...त्याशिवाय द्राक्षांच्या वेलींचे वळेसर ल्यालेली मदिराक्षी 'मी'.. मद्यांचे प्यालेच्या प्याले रिचवणारी, सॅटरच्या धसमुसळ्या उसळींखाली अविरोध पहुडणारी मृदुला 'मी'...! धुक्यात लपेटलेल्या तेजासारखी 'मी' माझ्या देहात राहते...धुकं तरी कसलं ? गुलबक्षी आगीचं, ...वैषयिक प्रतिसादाचं...!

...प्रीतीची अन् वसन्तऋतूचीच गाणी सदा गात बसणं किती वेडेपणाचं आहे...हेमन्ताचे रंग खरे म्हणजे कितीतरी दृष्टिवेल्हाळ असतात...विविध असतात...अन् हेमन्ताच्या हर्षोल्लासात तर हजार पटीनं जास्त आवेग, जोम असतो...तो उग्रही असेल, कराल असेल, पण सुंदर असतो!...आपल्या कोत्या बुद्धीमुळे, आणि निःसत्त्व तत्त्वनिष्ठेमुळे ज्या दीन स्त्रिया जीवनातल्या हेमन्तानं दिलेली प्रीतीची भेट नाकारतात, त्यांची खरोखर किती कीव करावी, हेच मला समजत नाही...माझी आई बिचारी अशाच बायकांच्या मालिकेतली होती... तिचा देह जेव्हा पूर्ण उमललेला अन् समृद्ध असाय-दिसायला हवा होता, त्या काळात म्हातारपणानं आणि आजार–अशक्तपणानं तिला गाठलं होतं...हे सारं तिच्याच त्या बाष्कळ नि कोत्या विचारांमुळे घडलं...एरवी तिचा पहिल्यापासूनचा प्रखर मेंदू आता काहीसा भ्रमिष्ट व्हायचं तरी कारण काय ? हेच !...मी सुद्धा कधीकाळी या खुळ्या कल्पनांच्या आहारी जाणारं एक बुजरं भक्ष्य होतेच होते... नंतर झाले मी एक आक्रमक मदिराक्षी...अन् आता ? समुद्रानं एखाद्या धीट जलतरणपटूला चोहोबाजूंनी लपेटावं, घुसळावं, तशी मी माझ्या प्रियकरावर झेपावते, त्याला वेढून टाकते; पेटत्या प्रेमज्वालांनी लपेटून टाकते त्याला अभिलाषेच्या धुक्यात...!

* * *

एकोणिसशे एकवीसच्या वसंतऋतूत सोव्हिएट सरकारकडून मला एक तार आली :

'रशियन सरकारच तुझी योग्यता समजू शकते. तू इथे ये...आम्ही तुझे विद्यालय उभवून देऊ...'

कुठून आला हा संदेश ? नरकातून ? नाही...पण त्याच्या अगदी जवळूनच! ...म्हणजे काय, की सारा युरोप ज्याला नरकच समजत होता, त्या मॉस्कोच्या सोव्हिएट सरकारकडून ! !...जिथे आर्च एंजल नव्हता,...कसलीही आशा समोर नव्हती...प्रेमाची ऊब नव्हती...त्या माझ्या उजाड, रित्यारिकाम्या घराकडे पाहून उसासत मी तारेला उत्तर दिलं :

'रशियाला यायला मी तयार आहे, तिथल्या मुलांना मी शिकवेनच...पण एका अटीवर...मला एक स्टुडिओ माझ्या रियाजासाठी, कलासाधनेसाठी दिला पाहिजे.'

मॉस्कोचा होकार आला, मग एक दिवस टेम्स नदीवरच्या एका बोटीनं लंडन सोडून रेवालला मी निघाले...अन् तिथून अर्थात मॉस्कोला...

लंडन सोडायच्या आधी एका भविष्य सांगणाऱ्या बाईकडे मी गेले होते... तिनं मला सांगितलं, "तू एका लांबच्या प्रवासाला निघाली आहेस...तुला खूप

अजब अनुभव येतील...अडचणी-संकटे येतील...तू लग्न करशील..."

'लग्न'...हा शब्द ऐकल्यावर मोठ्यानं हसून मी तिला तिथेच थांबवलं... "मी आणि लग्न? अगदी पहिल्यापासून लग्नाच्या विरुद्ध असलेली मी लग्न करणार? छेः! ते कधीच शक्य नाही!"...ती बाई म्हणाली..."बघ, जरा थांब, अन् घे पडताळा माझ्या म्हणण्याचा..."

रशियाला जाताना मला इतकं निर्लिप्त, निर्विकार वाटत होतं!...जणू मरणानंतर आत्म्याचा दुसऱ्या ग्रहाचा प्रवास सुरू झाला होता...युरोपियन जीवनाचे सगळे ओळखीचे पैलू मी कायमचे मागे ठेवून आले आहे, असं मला वाटत होतं ...प्लेटो, कार्ल मार्क्स नि लेनिन यांच्यासारख्या द्रष्ट्यांनी ज्याची स्वप्नं पाहिली, ते आदर्श राज्य, एखाद्या अतर्क्य जादूनं या जगात प्रत्यक्ष साकार झालेलं आहे, अशी मला खात्री वाटत होती. माझ्या साऱ्या शक्ती, अन् उत्साह वेचूनसुद्धा, युरोपात माझ्या कलास्वप्नांपैकी एकही प्रत्यक्षात साकार होऊ शकलं नव्हतं... तिथे निराश झालेली मी, या साम्यवादी आदर्श राजवटीच्या उंबरठ्यावर नव्या आशेने उभी होते.

माझे पोशाख...ड्रेसेस मी बरोबर आणले नव्हते...उरलेलं सारं आयुष्य लाल फ्लॅनेलचं ब्लाऊज घालून, तशाच साध्या वेषातल्या कॉम्रेड लोकांच्या मेळाव्यात त्यांच्या बांधव-प्रेमाची चव चाखत घालवायचं, असंच चित्र माझ्या मनापुढे तरळत होतं...

बोट जसजशी उत्तरेकडे सरकायला लागली, तसं मागे राहिलेल्या साऱ्या प्रतिगामी संस्था, अन् युरोपच्या बूर्झ्वा संवयी,–समजुती-विचार यांबद्दलच्या तिरस्कारानं अन् किंवेनं माझं मन भरून आलं...इथून पुढे या कॉम्रेडस्‌मधली एक कॉम्रेड बनून मानवतेच्या पुनरुत्थानाचा एक महान् प्रकल्प नजरेसमोर आखून घ्यायचा ...बस्!

तर मग निरोप घेते मी आता...विषमतेचा, अन्यायाचा, जुन्या प्रतिगामी जगा, तुझ्या निष्ठुरपणाचा! माझी विद्यालयाची कल्पना उद्‌ध्वस्त करणाऱ्या तुझ्या हिंस्र वृत्तीचा!...

बोट ठिकाणी येऊन पोहोचली, तेव्हा माझं मन, हृदय आनंदातिशयानं एकाएकी थरारलं...इथून पुढे एक नवा अनुरोध...नव्यानं निर्माण केलेल्या सुंदर नव्या जगाचा! एक नवं अनुसंधान...कॉम्रेड्सच्या सहजीवनाचं...एक नवी समज...बुद्धाच्या मनोविश्वातून स्फुरलेल्या, खिस्ताच्या शब्दाशब्दांतून प्रतिध्वनित झालेल्या, सर्व महान् कलावंतांची अंतिम आशा सामावून बसलेल्या–एका स्वप्नाची! ...अन् स्वप्न का ते राहिलेलं आहे आता? लेनिननं कोण्या महान् किमयेनं पाहता पाहता तर त्या स्वप्नाला सत्यसृष्टीत आणलं इथे! ..त्याच सृष्टीत माझं

पहिलं पाऊल मी आज टेकते आहे...माझं कार्य, अन् माझं जीवन, यांनी इथल्या ओजस्वी आशा-आकांक्षांच्या पूर्तीतला आपला वाटा उचलावा म्हणून !

जुन्या जगा येते मी...

या क्षणी स्वागत करायचं आहे मला एका ' नव्या जगा 'चं !



# टीपा

पृ. २

१. सरव्हान्टेस-सरव्हान्टेज (Cervantes) इ. स. १५४७ ते १६१६
स्पॅनिश कादंबरीकार, नाटककार. ' डॉन क्विक्झोट ' या प्रसिद्ध ग्रंथाचा लेखक.

२. कॅसानोव्हा (Casanova) इ. स. १७२५ ते १७९८
इटालियन प्रेमवीर; याने फ्रेंच भाषेत युरोपमधल्या बहुतेक देशांत जमविलेल्या आपल्या प्रेमप्रकरणांच्या आठवणी लिहिल्या आहेत.

पृ. ३

३. मॅडोना (Madonna)
येशू ख्रिस्ताची कुमारी माता : मेरी.

४. मेसालिना (Messalina)
सम्राट क्लॉडियसची तिसरी पत्नी; अत्यंत उथळेपणाबद्दल प्रसिद्ध.

५. मॅग्डेलन (Magdalen)
मेरी मॅग्डेलन. ख्रिस्ताच्या कृपेने पावन झालेली एक पतिता.

६. द ब्ल्यू स्टॉकिंग. (The Blue Stocking)
सुसंस्कृत, तशीच साहित्याची आवड असलेली, अथवा तसा आव आणणारी स्त्री. (१८ व्या शतकात प्रचारात असलेले तथाकथित बुद्धिवादी स्त्रीचे प्रतीक.)

७. लुसिटानिया (Lusitania)
जर्मन पाणबुडीच्या हल्ल्यामुळे ॲटलांटिक महासागरात जलसमाधी मिळालेली क्यूनार्ड कंपनीची बोट; या दुर्घटनेत हजार एक लोक जीविताला मुकले. (इ. स. १९१५).

पृ. ४

८. ज्यां ज्याक् रूसो (Jean Jacques Rousseau) इ. स. १७१२ ते १७७८
प्रसिद्ध फ्रेंच तत्त्ववेत्ता आणि फ्रेंच राज्यक्रान्तीचा उद्गाता.

९. वॉल्ट व्हिटमन (Walt Whitman) इ. स. १८१९ ते १८९२
एक क्रान्तदर्शी अमेरिकन कवी. नैतिक, सामाजिक आणि राजकीय समस्यांवर

काव्यरचना. कवितेच्या आशयाबाबतचा परंपरागत दृष्टिकोण बदलून टाकणारा; तसेच अभिव्यक्तीची मुक्त शैली घडविणारा कवी.

पृ. ५

१०. प्रभूचे दहा दंडक : द टेन कमॅण्डमेन्ट्स (The Ten Commandments) ख्रिश्चन धर्मानुसार आचरणाचे सर्वसामान्य दहा नीतिनियम.

पृ. ६

११. गाब्रियेल (गॅब्रियेल) – दान्यूंझिओ (दान्यूंत्सिओ) (Gabriele D'Annunzio) इ. स. १८६३ ते १९३८

इटालियन कवी, हवाईउड्डाणकुशल आणि राजकारणधुरंधर पुरुष.

१२. फीबस अपोलो. (Phœbus Apollo)

ग्रीक पुराणातील तेजस्वी सूर्यदेवता.

१३. बिआत्रिस (Beatrice)

प्रसिद्ध इटालियन कवी डान्टे याच्या जीवनातल्या एका असफल प्रेमप्रकरणातील प्रेमिकेची, त्याच्या 'डिव्हाईन कॉमेडी' या काव्यातली प्रतिमा. स्वर्गातल्या संचारात ती त्याची मार्गदर्शिका असल्याचे वर्णन आहे.

१४. डान्टे (Dante) इ. स. १२६५ ते १३२१

ॲलिगेअरी डान्टे. इटालियन कवी; "व्हिटा नूव्हा", "दीव्हिना कॉमेदिया" (डिव्हाईन कॉमेडी) इ. चा रचयिता.

पृ. ७

१५. एलिनोरा ड्यूज (Eleanora Duse)

एक प्रसिद्ध इटालियन नटी. विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात हिने रंगमंच गाजविला.

१६. ईव्ह (Eve)

ख्रिश्चन धर्मानुसार जगातील पहिली स्त्री. 'ॲडम' या पहिल्या पुरुषाची सहचारिणी. सैतानाने सर्पाचे रूप घेऊन ईव्हला मना केले गेलेले सफरचंद खाण्याच्या मोहात पाडले, अशी कथा.

पृ. ११

१७. ॲफ्रडायटी–ॲफ्रडाईट (Aphrodite)

ग्रीक पुराणातली सौंदर्यदेवता आणि कामदेवता. हिचा जन्म समुद्रफेनातून झाला. हिचेच रोमन नाव 'व्हीनस' आणि पौर्वात्य नाव 'ॲस्टार्टी' इ. शुक्रताऱ्याची ही अधिदेवता.

पृ. १३

१८. सॅन्टा क्लॉस–सॅन्टा क्लॉज ( Santa Claus )

सेन्ट निकोलस, नाताळच्या सणाच्या आदल्या दिवशी "सॅन्टाक्लॉज" च्या रूपाने येऊन लहान मुलांच्यासाठी पायमोज्यातून छोट्या छोट्या भेटवस्तू भरून ठेवण्याचा याचा प्रेमळ शिरस्ता आहे, अशी दंतकथा.

पृ. १४

१९. बिथोव्हन–बेटोवेन ( Beethoven ) इ. स. १७७० ते १८२७

लुड्विग व्हॅन बिथोव्हन. प्रथितयश जर्मन संगीत रचनाकार; 'सिंफनी' आणि इतर संगीत प्रकारांच्या प्रगत आविष्काराबाबत याने भरीव कार्य केले. 'सिंफनी', 'ऑपेरा', चार तंतुवाद्यांसाठी बांधलेले–रचलेले स्वरमेळ, इ. अमूप आणि अमूल्य संगीत रचना; आयुष्याच्या अखेरीस संपूर्ण बहिरेपण.

२०. शूमान ( Schumann ) इ. स. १८१० ते १८५६

रॉबर्ट अलेक्झांडर शूमान. जर्मन संगीत रचनाकार. अनेक गीते, पियानो संगीत आणि छोट्या मैफली नि छोट्या वाद्यवृंदांसाठी उपयोगी 'चेंबर म्युझिक' अशी विविध संगीतरचना.

२१. शूबर्ट ( Schubert ) इ. स. १७९७ ते १८२८

फ्रान्झ पीटर शूबर्ट. ऑस्ट्रियन वाग्गेयकार; गीतरचनांसाठी विशेषतः प्रसिद्ध.

२२. मोझार्ट (Mozart) इ. स. १७५६ ते १७९१

वुल्फगँग ॲमेडस मोझार्ट. सिंफनी, चेंबर म्यूझिक, ऑपेरा इ. संगीत प्रकारांचा रचयिता ( उदा. 'फिगारो', 'द मॅजिक फ्लूट' वगैरे ).

२३. शोपां ( Chopin ) इ. स. १८०९ ते १८४९

फ्रेडेरिक फ्रान्झ्वाज शोपां. पोलिश पियानोवादक; तसेच अनेक छोट्या सांगीतिक उपोद्घातांसारख्या आणि गंभीर संगीत रचनांचा कर्ता.

२४. शेक्स्पियर ( Shakeshpeare ) इ. स. १५६४ ते १६१६

वुईल्यम शेक्सपियर. इंग्लंडचा सर्वांत महान् नाटककार आणि कवी. 'मिड्-समर नाईट्स ड्रीम', 'हॅम्लेट', 'टेम्पेस्ट' इ. प्रसिद्ध नाटके.

२५. शेली ( Shelley ) इ. स. १७९२ ते १८२२

पर्सी शेली. इंग्रजी कवी; ( 'ओड टू द वेस्ट विंड', 'टू अ स्कायलार्क' इ. ) आणि नाटककार ( 'प्रॉमिथियस अनबाऊंड ).

२६. कीट्स ( Keats ) इ. स. १७९५ १८२१

जॉन कीट्स; इंग्रजीतील भावकवी ( ‘ एन्डिमियन ’, ‘ ओड ऑन अ ग्रीशीयन अर्न ’, ‘ ओड टू अ नायटिंगेल ’ इ. ).

२७. बर्न्झ ( Burns ) इ. स. १७५९ ते १७९६

रॉबर्ट बर्न्झ. स्कॉटिश कवी.

पृ. १९

२८. जॉर्ज इलियट ( George Eliot ) इ. स. १८१९–१८८०

मेरी ॲन क्रॉस ऊर्फ ईव्हान्स, हिचे टोपण नाव. एक इंग्रजी कादंबरीकार. ( ‘ ॲडम बीड ’, ‘ सिलास मार्नर ’ इ. )

पृ. २४

२९. लॉंगफेलो ( Longfellow ) इ. स. १८०७ ते १८८२

हेन्री वाड्जवर्थ लॉंगफेलो. अमेरिकन कवी.

३०. फॅनी एल्स्लर ( Fanny Elssler )

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातली अत्यंत प्रथितयश व्हिआनीज बॅलेनर्तकी. उत्साही प्रेक्षक हर्षोल्लासाने हिच्या गाडीचे घोडे सोडून, स्वतः गाडी ओढत तिची मिरवणूक काढत. वॉशिंग्टनमध्ये सिनेटर्सनीसुद्धा हाच प्रकार केला होता. हिच्या कार्यक्रमांच्यामुळे, सभासदांच्या पुरेशा उपस्थितीच्या अभावी काँग्रेसच्या सभा तहकूब कराव्या लागत. कलावंत नि बुद्धिमंत सारखेच हिच्या भजनी असत.

पृ. २६

३१. डिकन्स ( Dickens ) इ. स. १८१२ ते १८७०

चार्लस डिकन्स. प्रसिद्ध इंग्रजी साहित्यिक : कादंबरीकार आणि विनोदी लेखक. ‘ डेव्हिड कॉपरफिल्ड, ’ ‘ ऑलिव्हर ट्विस्ट ’, ‘ निकलस निकल्बी ’, ‘ पिक्विक पेपर्स ’ इ. चा लेखक.

३२. थॅकरे (Thackeray ) इ. स. १८११–१८६३

वुइल्यम एम्. थॅकरे. इंग्रजी ख्यातनाम साहित्यिक, आणि व्यंगचित्रकार. विविध प्रकारचे लेखन.

३३. वाल्झ ( Valse, Waltz )

आपल्याकडील दादरा तालाप्रमाणे तिश्र जातीत पदन्यास करीत एकेका युगुलाने चक्राकार फिरत नृत्य करण्याचा प्रकार. संथ नि शांत.

३४. मझूर्का ( Muzurka )

पोलिश नृत्यातील तिश्र जातीचाच एक जलद नृत्यप्रकार.

३५. पोल्का ( Polka )

मूळ झेक नृत्यावर आधारित खेळकर नृत्य; किंवा मध्यलयीतील संगीताच्या साथीवर नाचले जाणारे नृत्य.

पृ. २८

३६. मेंडेल्झोन ( Mendelssohn ) इ. स. १८०९ ते १८४७

फेलिक्स मेंडेल्झोन बार्तोल्डी; जर्मन–ज्यू संगीत रचनाकार.

पृ. ३४

३७. ट्रॅजिक कोरस ( Tragic Chorus )

ग्रीक शोकान्तिकांच्या अन्तर्गत, नृत्यगायनादी माध्यमांतून नाट्यसूत्र पुढे नेण्याचे, संदर्भ व भावार्थ स्पष्ट करण्याचे किंवा वेळी पुढील घटनांचे सूचन करण्याचे कार्य करणारा नटनर्तकसमूह.

पृ. ३९

३८. पीरो ( Pierrot )

फ्रेंच मूकनाट्यातील विदूषकी पात्र. चेहरा रंगवून पांढरा केलेला आणि वेषही सैलसा:पांढरा.

पृ. ४१

३९. शेर्झो ( Scherzo )

सुगम, खेळकर नि जोषयुक्त असा स्वतंत्र अथवा, एखाद्या वाद्यसंगीतरचनेचा एक विभाग म्हणून रचलेला स्वरबंध, स्वरमेळ.

पृ. ४२

४०. मार्कस् ऑरेलियस ( Marcas Aurelius ) इ. स. १६१ ते १८०

मार्कस ऑरेलियस,–ऑरिलियस—ॲन्टोनायनस. रोमन बादशहा. झेनोच्या ' स्टोइक ' तत्त्वज्ञानाचा पुरस्कर्ता. ग्रीक भाषेत ' मेडिटेशन्स ' ( ध्यान, समाधी ) या विषयावरील बारा पुस्तके याने लिहिली आहेत.

पृ. ४७

४१. एथेलबर्ट नेव्हिन ( Ethelbert Nevin )

इझाडोराचा समकालीन अमेरिकन संगीत रचनाकार. ' ऑफिलिया ', ' वॉटर-निम्फ्स ', ' नर्सिसस ' इ. रचनांचा कर्ता.

पृ. ४९

४२. पॅडरेवस्की ( Paderewski )

इग्नसी जॉन पॅडरेवूस्की; पोलिश पियानोवादक आणि राजकारणधुरंधर; इ. स. १९१९ ते २१ आणि १९४० ते ४१ पर्यंत पोलंडचा पंतप्रधान.

४३. जॉर्ज मेरिडिथ ( George Meredith ) इ. स. १८२८–१९०९

इंग्लिश कादंबरीकार आणि कवी.

४४. हेन्री जेम्स ( Henry James ) इ. स. १८४३–१९१६

अमेरिकन कादम्बरीकार.

४५. वॉट्स ( Watts ) इ. स. १८१७ ते १९०४

इंग्लिश पोर्ट्रेट पेंटर–पौराणिक किंवा गूढ कथा-दंतकथांवर आधारित चित्रे.

४६. स्विनबर्न ( Swinburne ) इ. स. १८३७ ते १९०७

मान्यवर इंग्लिश कवी. 'सॉंग्ज् बिफोर सनराईज' इ. चा कर्ता.

४७. बर्न जोन्स ( Burne Jones ) इ. स. १८३३ ते १८९८

इंग्लिश चित्रकार आणि टॅपेस्ट्री आणि स्टेनग्लासचा डिझायनर (कला-दिग्दर्शक)

४८. व्हिस्लर ( Whistler ) इ. स. १८३४ ते १९०३

जन्माने अमेरिकन, परंतु इंग्लंडमध्येच कर्तृत्व गाजविणारा चित्रकार.

पृ. ५५

४९. कॉरेजिओ ( Correggio ) इ. स. १४९४ ते १५३४

ॲन्टोनिओ ॲलेग्री कॉरेजिओ. एक इटालियन चित्रकार; छाया–प्रकाशांच्या रंगशिल्पाबद्दल प्रसिद्ध.

पृ. ५७

५०. विंकलमन–विंकलमान ( Wincklemann ) इ. स. १७१७ ते १७६८

जोहान जोआकीम विंकलमान; ग्रीक कला आणि पुराणवस्तू यावर लेखन करणारा जर्मन लेखक–'जर्नी टू ॲथेन्स' हा याच लेखकाचा ग्रंथ.

पृ. ५९

५१. ॲंड्र्यू लॅंग ( Sir Andrew Lang ) इ. स. १८४४ ते १९१२

स्कॉटिश पंडित, पत्रकार आणि कवी. लोककथांचा संग्राहक. कवी होमरच्या ग्रंथाचा गद्य-भाषांतरकार. थिऑक्रिटस्च्या काही कवितांचा अनुवादकर्ता.

५२. थिऑक्रिटस् ( Theocrities ) इ. स. पू. ३ रे शतक

सिसिलियन ग्रीक कवी. निसर्गसूक्तांचा, जानपद ( Pastoral ) काव्याचा प्रथम रचयिता–कवी.

पृ. ६५

५३. रोझेट्टी (Rossetti) इ. स. १८२८ ते १८८२

डान्टे गाब्रियेल रोझेट्टी– कवी आणि चित्रकार. मूळ इटालियन कुटुंब. इंग्लंडमध्ये स्थायी.

५४. बुइल्यम मॉरिस (William Morris) इ. स. १८३४ ते १८९६

इंग्लिश कलादिग्दर्शक (डिझायनर), मुद्रक, कवी आणि लेखक. मध्ययुगीन हस्तकारीचे पुनरुज्जीवन करण्याबाबत पुढाकार घेतला. बर्न जोन्स, आणि इतरां-बरोबर 'गृहसज्जा केंद्र' काढले.

पृ. ६७

५५. कॉरिओलानस (Coriolanus)

इ. स. पूर्व पाचव्या शताब्दीतल्या एका कॉरिओलानस नावाच्या रोमन वीराच्या जीवनावर आधारित नाटक.

५६. टेनिसन (Tennyson) इ. स. १८०९ ते १८९२

ख्यातनाम इंग्लिश कवी आल्फ्रेड टेनिसन. (पोएट लॉरिएट). 'इनॉक आर्डन' या खण्डकाव्याचा रचयिता.

५७. सर बुइल्यम रिचमंड (Sir William Richmond)

इंग्लिश चित्रकार.

५८. सर ह्यूबर्ट पॅरी (Sir Hubert Parry) इ. स. १८४८ ते १९१८

इंग्लिश संगीत रचनाकार.

पृ. ६८

५९. गेन्जब्रो ब्यूटी (Gainsborough Beauty)

टॉमस गेन्जब्रो, या प्रसिद्ध इंग्लिश पोर्ट्रेटपेंटरच्या कलाविष्कारातील विशिष्ट शैलीशी मिळतेजुळते सौंदर्य.

६०. ब्राउनिंग (Browning) इ. स. १८१२ ते १८८९

सर रॉबर्ट ब्राउनिंग. इंग्लिश कवी. अनेक तात्त्विक आणि नाट्यपूर्ण कवितांचा रचयिता आणि अनेक नाटकांचा लेखक.

६१. ऑस्कर वाईल्ड (Oscar Wilde)

आयर्लंडमध्ये जन्म पावलेला अनेक कादंबऱ्या आणि हास्यात्मिकांचा लेखक; कवी. विनोदप्रिय व्यक्तिमत्त्वाचा सौंदर्यास्वादनकार (Aesthete)

पृ. ६९

६२. सर हेन्री आयर्विन-आयरविंग (Sir Henry Irving) इ. स. १८३८ ते १९०५

प्रसिद्ध इंग्लिश अभिनेता.

६३. एलन टेरी (Ellen Terry) इ. स. १८४८ ते १९२८

एलन ॲलिशिया टेरी. प्रथितयश इंग्लिश अभिनेत्री.

पृ. ७३

६४. लूव्हर : फ्रान्समधील राजांचा पुरातन राजवाडा. पॅरिसमध्ये सीन नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील ही भव्य वास्तू दुसऱ्या फिलिपच्या राजवटीपासून तिसऱ्या नेपोलियनच्या राजवटीपर्यंत निरनिराळ्या कक्षांनी वाढवली गेली. आता हे पॅरिसमधले सर्वांत महत्त्वाचे कलासंग्रहालय आहे.

पृ. ७४

६५. डायनिसस-डायोनिसस (Dionysus)

ग्रीक पुराणानुसार झेऊस व सेमेली यांचा पुत्र; निसर्गातील सुपीकता आणि मद्य यांचा अधिष्ठाता देव. रोमन कल्पनांनुसार हाच 'बॅकस' होय.

६६. मेडिआ (Medea)

इन्द्रजाल रचणारी मायाविनी. कोलचिजच्या राजाची कन्या. जेसनशी विवाह; परंतु पुढे त्याने टाकून दिल्यावर त्याच्यावरचा सूड म्हणून, त्याच्यापासून झालेल्या स्वतःच्या दोन्ही मुलांचा खून करणारी स्त्री. (ग्रीक पुराणे)

पृ. ७५

६७. रोदां (Rodin) इ. स. १८४० ते १९१७

प्रसिद्ध फ्रेंच शिल्पकार.

पृ. ७९

६८. मोलियेर (Moliere) इ. स. १६२२ ते १६७३

ज्या बाप्तीस्त पोकलां, या विनोदगर्भ व उपहासपूर्ण नाटके लिहिणाऱ्या साहित्यिकाने 'मोलियेर' हे टोपणनाव घेतले होते.

६९. फ्लोबेर (Flaubert) इ. स. १८२१ ते १८८०

गस्ताव्ह फ्लोबेर; फ्रेंच वास्तववादी कादंबरीकार. 'मांदाम बोव्हारी'चा लेखक.

७०. गोत्या (Gautier)

पिअर ज्यूल्स तेओफिल गोत्या. फ्रेंच रोमँटिक कवी आणि कादम्बरीकार.

७१. मोपासां ( Maupassant ) इ. स. १८५० ते १८९३
गाय दे मोपासां; फ्रेंच ख्यातनाम कादम्बरीकार; आणि लघुकथालेखक.

७२. मेटरलिंक ( Maeterlinck ) इ. स. १८६२ ते १९४९
मॉरिस मेटरलिंक–माटरलिंक. बेल्जियम कवी आणि नाटककार. १९११ त वाङ्मयाचे ' नोबेल ' प्राईझ मिळाले.

पृ. ८०

७३. तेस ( Thais )
एक ग्रीक कलावंतीण. सिकंदराच्या आशियातील स्वारीच्या वेळी तेस त्याच्या बरोबर होती. पुढे तिने ईजिप्तचा राजा टॉलेमी लागस याच्याशी विवाह केला. ' तेस ' म्हणजे एक प्रगल्भ बुद्धिमान कलावंतीण असा रूढार्थ.

पृ. ८४

७४. ग्लूक ( Gluck ) इ. स. १७१४ ते १७८७
क्रिस्तोफर ग्लूक. ऑपेरा ( संगीतिका ) रचणारा बव्हेरियन संगीतज्ञ ' ऑरफियस ॲण्ड युरिडिस ' हा ऑपेरा अत्यन्त प्रसिद्ध.

७५. ऑरफियस ( Orpheus )
ग्रीक पुराणातील एक कवी. हा वीणा ( Lyre ) इतकी सुंदर वाजवीत असे की जंगली श्वापदे देखिल मोहित होत. याने आपल्या संगीताच्या बळावर हेड्स आणि प्लुटो या देवांकडून ' युरिडिस ' नावाच्या आपल्या मृत पत्नीला जीवदान देवविले; परंतु भूलोकावर येईतो पत्नीकडे मागे वळून न पाहण्याची अट न पाळल्यामुळे शेवटी ऑरफियस युरिडिसला गमावून बसला, अशी कथा.

पृ. ८५

७६. ओव्हिड (Ovid ) इ. स. पू. ४३ ते १८
प्यूब्लिअस ओव्हिडियस नासो. रोमन कवी. ' मेटॅमॉर्फोज ' ' आर्स आमा-टोरिया ' इ. चा कर्ता.

७७. सॅफोची गीते ( Songs of:Sappho ) इ. स. पू. ६१०
सॅफो : लेसबॉसची ग्रीक कवियित्री; विशेषेकरून गीतरचना करणारी. फॉओ नावाच्या प्रियकरावरचे प्रेम सफल न ठरल्यामुळे सॅफोने स्वतःला निराशेने समुद्रात झोकून दिले, अशी एक दंतकथा.

पृ. ८८

७८. नित्शे निशे ( ( Nietzsche ) इ. स. १८४४ ते १९००
फ्रेडेरिक विल्हेल्म निशे; प्रसिद्ध जर्मन तत्त्ववेत्ता. अतिमानवी ' सुपरमॅन 'ची

कल्पना मुळात निशेची. सर्वसाधारण नीतिकल्पनांच्या पार होऊन स्वतःच्या अस्मितेवरच्या अढळ निष्ठेच्या बळावर मनुष्याला पूर्णत्वाप्रत पोहोचवता देणे—हा तत्त्वाचा पुरस्कर्ता.

७९. वाग्नर-वॅग्नर ( Wagner ) इ. स. १८१३ ते १८३३

विल्हेल्म रिचर्ड वाग्नर. जर्मन ऑपेरारचनाकार. 'द मास्टर सिंगर्स', 'पार्सिफाल' इ. प्रसिद्ध रचनांचा कर्ता. 'ऑपेरा' (संगीतिका) च्या ऐवजी 'Music Drama' ( संगीतनाट्य ) हा प्रकार, त्याने स्वतःच त्याचे साहित्य व संगीत रचून प्रचारात आणला. ऑपेरातल्या 'कोरस' सारख्या विभागाला त्याने काट दिला. शेवटी शेवटी बेरूत येथे जीवन व्यतीत केले. तेथे ही संगीत-नाट्याची प्रथा पुढेही चालू ठेवली गेली आहे.

पृ. ९५

८०. सोफोक्लीस–सोफोक्लीज–( Sophocles ) इ. स. पू. ४९५ ते ४०६

ॲथेन्समधला शोककवी. 'इडिपस द किंग,' 'इडिपस ॲट कोलोनस' आणि 'आंटिगॉन' ह्या शोकांतिकात्रयीचा रचयिता.

८१. इडिपस रेक्स ( Æedipus Rex )

( ग्री. पु. ) थीब्जूचा राजा लायस, आणि कॉरिंथचा राजा क्रिओ याची कन्या जोकास्टा, यांचा पुत्र. चुकीने याने आपल्या पित्याचाच वध केला, आणि मातेशी विवाह केला; खरा प्रकार पुढे लक्षात येताच इडिपस वेडापिसा झाला; त्याने स्वतःच्या हाताने आपले डोळे उखडून काढले, आणि जोकास्टाने स्वतःला टांगून घेऊन जीव दिला !

पृ. ९६

८२. कादमस ( Cadmus )

( ग्री. पु. ) बिओशियात थीब्जचा संस्थापक कादमस. ग्रीसला मुळाक्षरांची ओळख याने करून दिली असे म्हणतात. एका ड्रॅगनला मारून त्याचे दात याने जमिनीत पेरले असता त्यातून शस्त्रधारी मानव निर्माण झाले आणि त्यांनी एक-मेकांचा वध केला, अशी कथा.

पृ. ९८

८३. सायकी (Psyche )

आत्म्याचे प्रतीक असलेली फुलपाखराच्या रूपातील एक देवता. इरॉसची ( कामदेवतेच्या ग्रीक अवताराची ) प्रणयिनी.

८४. पॅन ( Pan )

( ग्री. पु. ) धनगरांचा देव. बकऱ्याप्रमाणे शिंगे, कान आणि पाय असलेले

रूप. सात पक्ष्यांचा पावा याने निर्माण केला. वाटेने जाणायेणाऱ्या वाटसरूंच्या मनात या पाव्याचे सूर भीती निर्माण करीत.

८५. इरॉस (Eros)

(ग्री. पु.) प्रेमदैवत—कामदेव. बहुधा हातात धनुष्यबाण घेतलेला एक युवक, असे स्वरूप. रोमन पुराणानुसार देखिल कामदेवच : क्यूपिड.

८६. एको (Echo)

जिची वाचा 'हेरा' नामक कुणी हिरावून घेतली होती, जी केवळ प्रतिध्वनीच्या रूपानेच बोलू शकत असे, अशी एक जलपरी. पॅनला तिने झिडकारल्यानंतर त्याने आपल्या चवताळलेल्या धनगरांकडून तिला अक्षरशः तुडविले, आणि तिचे अवशेष दशदिशांना विखरून टाकले. धरित्रीच्या पोटातून आजही ती प्रतिध्वनिरूप हुंकार देते.

पृ. १०२

८७. लोई फुलर (Lole Fuller)

अमेरिकन नर्तकी. शंभरवार घेरांचे स्कर्टस् नेसून छोट्या काठ्यांच्या आधाराने त्याचा घेर सावरत तो वेगवेगळ्या आकारातून फिरवीत नृत्य करण्याचे, किंवा रंगीत शेमले, दुपटे इ. हवेत उडवून नाचण्याचे कलादृष्ट्या कमअस्सल परन्तु दृष्टीला रंजक असे प्रकार लोई फुलर आपल्या कार्यक्रमातून करीत असे—मात्र फिरत्या प्रकाशयोजनेची कल्पना रंगमंचावर प्रथम प्रयोगात आणणाऱ्या कलावन्तात लोई फुलर आग्रगण्य होती. हिला अमेरिकेबाहेर, विशेषतः पॅरिसमध्येच यश लाभले.

पृ. १०९

८८. स्ट्रॉस—स्ट्राऊस (Strauss) इ. स. १८२०. ते १८९९

जोहान स्ट्राऊस. 'डान्यूब' ह्या प्रसिद्ध संगीत रचनेचा निर्माता. नृत्यसंगीताबद्दल प्रसिद्ध.

पृ. ११६

८९. लिझ्ट (Liszt) इ. स. १८११ ते १८८६

फ्रान्झ लिझ्ट. हंगेरियन पियानोवादक आणि संगीत रचनाकार. 'हंगेरियन रॅपसडीज'चा रचयिता.

पृ. ११८

९०. इफिजिनिया—इफिजेनाया (Iphigenia)

(ग्री. पु.) अॅगॅमेम्नॉनची कन्या; ट्रोजन लढाईच्या वेळी तिला वडिलांनी आर्टेमिसला देऊ केली; परंतु ईश्वराच्या पूजापीठावरून कुणा देवतेने तिला पळविले आणि तोरिसला नेले. पुढे ही महन्तीण झाली.

पृ. १२२

९१. शोपेनहॉवर (Schopenhauer) इ. स. १७८८ ते १८६०

जर्मन निराशवादी तत्त्ववेत्ता. सृष्टीची अधिष्ठात्री 'केवल' शक्ती आंधळी आणि चंचल आहे; जगातले अस्तित्व जात्याच दुष्ट आहे; सुटका होणे शक्य असेल तर ती केवळ आपल्यातील जीवितेच्छा मारूनच, या तऱ्हेची विचारधारणा.

९२. कान्ट ( Kant ) इ. स. १७२४ ते १८०४

इमॅन्युएल कान्ट. जर्मन तत्त्ववेत्ता. 'Transcendental Philosophy' चा जनक. 'क्रिटिक ऑफ् प्युअर रीझन 'चा ग्रंथकर्ता.

पृ. १२४

९३. बॉटिचेली (Botticelli) इ. स. १४४७ ते १५१०

सॅन्ड्रो बॉटिचेली. फ्लॉरेन्सचा चित्रकार.

पृ. १२५

९४. सेंट सेबॅस्टियन ( St. Sebastian )

रोमन शिपाई आणि खिश्चन हुतात्मा. अनेक शरांनी विद्ध अशा एका तरुणाच्या रूपात सेंट सेबॅस्टियन दाखविला जातो.

९५. मॉंतव्हर्द-मॉंतेव्हर्दी ( Monteverde ) इ. स. १५६७ ते १६४३

क्लॉडिओ मॉंतव्हर्द; 'मॅड्रीगल्', ऑपेरा आणि वाद्यसंगीत यांचा इटालियन रचयिता.

पृ. १२८

९६. इथाका ( Ithaca )

ग्रीसच्या पश्चिमेस असलेले एक छोटेसे बेट. आधुनिक ग्रीक लोक त्याला थियाकी म्हणून ओळखतात. होमरच्या काव्यातून 'ओडिसस' ( =युलिसिस) चे राज्य, म्हणून ही भूमी ओळखली जात असे.

९७. बायरन ( Byron )

जॉर्ज गॉर्डन बायरन. इंग्लिश रोमॅंटिक कवी. नैतिक मूल्यांच्या निकषांवर पडताळून बायरनच्या कवितेवर किती जरी टीकाप्रहार झाले, तरी या कवितेचा युरोपभरच्या रोमॅंटिक कवितेवर चांगलाच असर झाला. १८९३ त बायरन ग्रीक क्रांतिकारकांना सामील झाला आणि मिसोलोंघी येथे मृत्यू पावला.

पृ. १२९

९८. युलिसिस (Ulysses)

रोमन नाव युलिसिस; ग्रीक ओडिसस. इथाकाचा राजा. अत्यंत धूर्त. ट्रोजन

लढाईतून वाचला, तरी 'पॉसिडॉन' नावाच्या समुद्रदेवाने त्याला 'पेनिलोप' नावाच्या त्याच्या पत्नीपासून आणि घरादारापासून दूर ठेवले. त्या ओडिससची भ्रमणगाथा आणि त्याचे परतणे, हाच कवी होमरच्या 'ओडिसी' या महाकाव्याचा विषय आहे.

पृ. १३१

९९. हेलास ( Hellas )

ग्रीसचे जुने नाव

१००. ऑलिंपिया ( Olympia )

पुरातन ग्रीसमधले एक धार्मिक केंद्र. डेल्फीच्या खालोखाल महत्त्वाचे. ऑलिंपिक खेळांची, क्रीडामहोत्सवाची जागा.

१०१. झेऊस ( Zeus )

( ग्री. पु. ) क्रॉनॉसचा पुत्र. हा वडिलांचे वर्चस्व झुगारून देऊन स्वतः देवाधिदेव बनला. झेऊस आणि त्याचे भाऊ पॉसिडॉन आणि हेडस् यांनी फासे टाकून विश्वाचे तीन भाग करून आपसात वाटून घेतले. झेऊस– स्वर्ग, पॉसिडॉन समुद्र आणि हेडस्– पाताळ, अशी ती वाटणी झाली. झेऊस मनुष्यांचा आणि देवांचा प्रजापती समजला जात असे. ग्रीक दंतकथांनुसार त्याची 'हेरा' नावाची एकच पत्नी होती; पण एरवी झेऊसचे नाव अनेक देवतांबरोबर जोडले जाते.

१०२. बॅकॅन्टेस ( Bacchantes )

'बॅकस' नावाच्या ग्रीक नि रोमन मद्यदेवाच्या महंतिणी.

पृ. १३२

१०३. सॉक्रेटिस ( Socrates ) इ. स. पू. ४६९–३९९

ग्रीक तत्त्ववेत्ता. तरुणांना आपल्या नवविचारांची दीक्षा देऊन बिघडवण्याच्या आरोपावरून यास देहान्ताची शिक्षा भोगावी लागली. याचे तत्त्वज्ञान त्याच्याच ग्रंथरूपाने नसून प्लेटोच्या ग्रंथात त्याचे विचार ग्रथित झालेले आहेत. ( Dialogues of Plato )

पृ. १३४

१०४. पार्थेनॉन ( Parthenon )

अॅथीन पार्थेनॉसचे मंदिर– अॅथेन्सच्या अॅक्रोपोलिसवर बांधलेले. पेरिकल्सच्या राजवटीत ( इ. स. पू. ४४७ ते ४३८ ) ते बांधले गेले. फायडियसने त्यावर इतर शिल्पकामाने कलाकुसर केली.

पृ. १३५

१०५. ॲथेना–ॲथीना ( Athena )

'मिनर्व्हा' या रोमन देवतेची ग्रीक आवृत्ती, ॲथीना. व्यावहारिक शहाण-पण, कार्यरतता, आणि युद्धकला यांची देवता. झेऊसच्या मेंदूतून पूर्ण वाढलेल्या स्थितीतच हिने जन्म घेतला. हिचे प्रतीक 'घुबड' हे आहे.

पृ. १३७

१०६. ॲक्रोपोलिस ( Acropolis )

वास्तुकला आणि शिल्पकारीने इ. स. पू. पाचव्या शतकात सजविलेला ॲथेन्स शहरातील अडीचशे फूट उंचीच्या एका टेकडीवर उभा राहिलेला तटबंदीचा भाग

पृ. १४०

१०७. प्लेटो ( Plato ) इ. स. पू. ४२८ ते ३४८

ग्रीक तत्त्ववेत्ता. सॉक्रेटिसचा शिष्य. सॉक्रेटिसच्या तत्त्वज्ञानावर आधारित अनेक संवादरूप ग्रंथांचे लेखन. 'रिपब्लिक' 'फेड्रस', 'सिंपोझियम' इ.

पृ. १४१

१०८. बीझंटाईन संगीत ( Byzantine Music )

रोमन साम्राज्याचा पूर्वेकडील अर्ध, म्हणजे बीझंटाईन. (राजधानी कॉन्स्टॅन्टि-नोपल) या प्रदेशातले संगीत, ते बीझंटाईन संगीत.

पृ. १४३

१०९. इस्किलस ( Aeschylus )

ग्रीक शोकनाट्याचा निर्माता. ॲथेनियन कवी. 'प्रॉमिथिअस बाऊंड' 'सप्लायंट्स' इ.चा कर्ता.

पृ. १४४

११०. युरिपिडीझ् ( Euripides ) इ. स. पू. ४८० ते ४०६

शोकान्तिका लिहिणाऱ्या तीन प्रख्यात ज्येष्ठ साहित्यिकांपैकी 'द ट्रोजन वुइमेन' १ चा कर्ता

१११. ॲरिस्टोफेनीझ ( Aristophanes ) इ. स. पू. ४४४ ते ३८०

ॲथेनियन प्रहसनात्मक नाट्यकर्ता.

पृ. १४८

११२. रेनां ( Renan ) इ. स. १८२३ ते १८९२

अर्नेस्त रेनां. फ्रेंच तत्त्वज्ञ, पंडित आणि इतिहासकार.

पृ. १४९

११३. डानाऊसच्या कन्यका ( Danaids )

डानाएड्स् : ( ग्री. पु. ) अरगॉसचा राजा डानाऊस याच्या पन्नास कन्यका. यांपैकी एक सोडून बाकी सर्वांनी विवाहाच्या रात्री आपल्या पतीचा वध केला, आणि त्यामुळे पाताळात शिक्षा भोगण्याचे दुर्दैव ओढवून घेतले.

पृ. १५०

११४. ग्रीक कोरसचे लोम, अनुलोम

कोरसमधल्या नर्तकांचे उजव्या डाव्या बाजूने हेलावणे, हलणे-डोलणे, नृत्य कृती करणे.

११५. व्हिनस द मिलो ( Venus de Milo ).

ग्रीक ॲफ्रडायटीचा रोमन अवतार म्हणजे व्हीनस. सौंदर्य नि वैषयिक प्रेम यांची अधिदेवता. इ. स. १८२० त मेलॉस बेटावर जो संगमरवरी पुतळा सापडला, तो ग्रीक ॲफ्रडायटीचाच. त्याचेच नाव ' व्हिनस द मिलो '. आता ल्हूव्हरमध्ये आहे.

पृ. १५३

११६. ओरेस्तेस–ओरेस्तिझ ( Orestes )

ॲगॅमेम्नॉन आणि क्लायटेमनेस्ट्रा यांचा पुत्र. आईने व तिच्या जाराने पित्याचा खून केल्याने ओरेस्तेसने त्या दोघांचाही वध केला. क्रोधाच्या देवता हात धुऊन पाठीस लागलेल्या असताना, आर्टेमिसने याला जीवदान दिले. यानेच इफिजेनायाला वाचवून ताऊरिसला नेले.

पृ. १५६

११७. तानहॉइझर ( Tannhäuser )

दंतकथांतून निर्माण झालेला तथाकथित जर्मन भावकवी, आणि गीतरचनाकार ( १२ वे ते १४ वे शतक ).

पृ. १५९

११८. युरोपा ( Europa )

( ग्री. पु. ) फिनिशियाच्या राजाची कन्या. झेऊसने एका सुंदर वृषभाचे रूप घेऊन युरोपाचे प्रणयाराधन केले.

११९. लीडा ( Leda )

( ग्री. पु. ) स्पार्टाची राणी; झेऊसने हिला राजहंसाच्या रूपाने येऊन मोहविले. झेऊसपासून कॅस्टर, पॉलक्स आणि हेलन ही मुले लीडाला झाली.

१६०

ब्रूनहिल्दे ब्रूनहिल्द ( Brünhilde )

१ ) गंथरची पत्नी झिगफ्रिडच्या खुनाला कारण झालेली. ( २ ) बारा
ग्रतांपैकी एक झिगर्ड, याने आगीच्या पडद्यातून जाऊन स्वप्नावस्थेतल्या
ला वश करून घेतले.

कुंड्री ( Kundry )

चर्ड वाग्नरच्या ' पार्सिफाल ' नावाच्या प्रसिद्ध संगीतनाट्यातील नायिका
पार्सिफालच्या प्रेमात पडलेली.

ग्रेल ( Grail )

ा थाळीतून येशू खिस्ताने आपले अखेरचे जेवण घेतले आणि ज्या थाळीत
ने येशूच्या रक्ताची धार झेलली, ती थाळी.

१६२

सेंट फ्रान्सिस ( St. Francis ) इ. स. ११८१ ते १२२६

न्सिस ऑफ आझिझि–इटालियन संत; त्याने एक फ्रान्सिस्कन महंतांच
ाढला होता.

१७०

टेनर ( Tenor )

वाढ झालेला पुरुषाचा गाण्याचा उंच आवाज असा उंच आवाज
ला गायक.

१७१

फायडियस ( Phidias )

यडियस–फीडियस. इ. स. पूर्वी पाचव्या शतकातला ख्यातनाम ग्रीक
ार. सुवर्ण व हस्तिदंत यापासून फायडियसने निर्माण केलेले भव्य पुतळे
ात नष्ट झाले, तरी ते त्यांचे वैशिष्ट्य समजले जाते. पार्थेनॉनची शिल्पकारी
फायडियसच्या दिग्दर्शनाखाली घडली असावी असे म्हणतात.

मादाम रेकामिये ( Madame Recamier )

फ्रेंच रमणी तिच्या सुंदर कलादालनाबद्दल प्रसिद्ध होती. मोठमोठे कलावंत
बैठकीत आमंत्रित असत, ज्याक लुई डेव्हिड ( इ. स. १७४६ ते १८२५
सिद्ध फ्रेंच चित्रकाराने मादाम रेकामियेचे काढलेले चित्र रेलून बसलेल्या
ा आहे–त्याचा इझाडोराने उल्लेख केला आहे.

पृ. १७४

१२७. पाईड पायपर ( Pied Piper )

आपल्या पाव्याच्या सुरांनी उंदरांना भारून नदीत नेऊन बुडविणाऱ्या या धनगराला शहरातील प्रतिष्ठितांनी या कामासाठी देऊ केलेली रक्कम न दिल्याने, त्याने आपल्या संगीताने लहान मुलांवरच मोहिनी टाकून आपल्या पाठीमागे कायमचे नेले, अशी दंतकथा.

पृ. १७६

१२८. मायकेल अँजेलो ( Michael Angelo ) इ. स. १४७५ ते १५६४

इटालियन शिल्पकार, चित्रकार आणि कवी. रेनेसां ( कलेच्या पुनरुत्थानाच्या काळातला सर्वांत महान कवी. रोमच्या सिस्टिन प्रार्थनामंदिरातल्या व्यक्ति-चित्रांबद्दल प्रसिद्ध.

पृ. १७८

१२९. एडगर ॲलन पो ( Edgar Allen Poe ) इ. स. १८०९ ते १८४९

अमेरिकन कवी आणि समीक्षक. अद्‌भुत कल्पना असलेल्या रहस्यकथांचा लेखक.

पृ. १७९

१३०. पोलोनेज-पोलोनेजेझ ( Polonaises )

तिहेरी लयीत नाचल्या जाणाऱ्या मूळ पोलिश नृत्याचे संगीत. या नृत्यात अवघड तऱ्हेच्या चाली आणि नर्तक युगुलांचे गतिमेळ असतात.

पृ. १८०

१३१. श्किन्स्कि ( Kschinsky )

एक प्रसिद्ध रशियन नर्तकी. इझाडोराच्या समकालीन बॅलेरीना.

पृ. १८१

१३२. पाव्हलोवा ( Pavlova ) इ. स. १८८५ ते १९३१

ॲना पाव्हलोवा. प्रसिद्ध रशियन बॅलेरीना. श्री. उदयशंकर यांच्याबरोबर पाव्हलोवाने भारतीय धर्तीवर नृत्य केल्याची नोंद आहे. ही नर्तकी भारतात येऊनही गेलेली आहे.

१३३. बाक्स्ट ( Bakst ) इ. स. १८६६ ते १९२४

लिओ बाक्स्ट. रशियन नेपथ्यकार. 'द्यागिलेव्हू' च्या 'रशियन बॅले' कंपनीसाठी याने पॅरिसमध्ये खूप परिश्रम केले.

१३४. द्यागिलेव्ह ( Diaghilev ) इ. स. १८७२ ते १९२९

सेर्झी पावलोविच द्यागिलेव्ह. रशियन कलापुरस्कर्ता–इंप्रेसारिओ. 'रशियन बॅले' या कंपनीचा निर्माता. या कंपनीने पश्चिम युरोपात ' बॅले ' चे पुनरुत्थान घडवून आणले.

पृ. १८३

१३५. स्टॅनिस्लाव्हस्की ( Stanislavsky )

विसाव्या शतकाला प्रसिद्ध रशियन नाट्यशास्त्रकार, नाट्यनिर्माता आणि दिग्दर्शक.

पृ. १८५

१३६. टर्पसिकोरी ( Terpsichore )

( ग्रीक आणि रोमन पुराणे ) समूहगीताची आणि नृत्याची अधिदेवता.

१३७. गॉर्डन क्रेग ( Gordon Craig )

एक क्रांतदर्शी नेपथ्यकार. एलन टेरी या प्रसिद्ध अभिनेत्रीचा पुत्र.

पृ. १८७

१३८. एगेरिया ( Egeria )

रोमन जलपरी. गर्भवती स्त्रिया सहज-प्रसूतीसाठी हिची पूजा करीत.

पृ. १८८

१३९. सर्स ( Circe )

एक ग्रीक देवता. पुरुषांचे रूपांतर जनावरात करण्याचे इंद्रजाल ती करीत असे. ओडिससच्या अनुयायांवर तिने हाच प्रयोग केला; परंतु एका ' मुळी 'च्या जोरावर आणि कुणा देवतेच्या अनुग्रहामुळे त्याने सर्व अनुयायांना त्यांची रूपे पूर्ववत देवविली. ओडिसस सर्सबरोबर तिच्या बेटावर एक वर्ष राहिला.

पृ. १९०

१४०. ग्रिम्स फेअरी टेल्स ( Grimm's Fairy Tales )

जॅकोब लुड्विग कार्ल, आणि विल्हेल्म कार्ल, हे दोघे बंधू जर्मन भाषा, साहित्य, पुरातन वस्तू, यातल्या त्यांच्या अन्वेषण कार्याबद्दल आणि त्यांच्या परिकथा-संग्रहाबद्दल प्रसिद्ध आहेत.

१४१. लुका देला रॉबिया ( Luca Della Robia )

चकचकीत ' टेरा कोटा ' ( विशिष्ट मातीची शिल्पे ) बनविणारा फ्लॉरेन्सचा शिल्पकार.

१४२. बास रिलीफ् ( Bas Relief )

पार्श्वभूमीपासून मूळ अर्ध्या प्रमणाहून कमी असे भिंतीच्या पृष्ठभागावर उठून आलेले शिल्प.

१४३. दोनोटेलो–दोनोतेलो ( Donatello )

इटालियन शिल्पकार. फ्लॉरेन्समधील ब्रॉन्झ डेव्हिडबद्दल प्रसिद्ध.

पृ. १९१

१४४. तानाग्रा आणि बिओशिया ( Tanagra and Bœotia )

ईशान्य ग्रीसमधल्या बिओशियातले एक शहर तानाग्रा. इ. स. पूर्व तिसऱ्या किंवा चवथ्या शतकातील मातीची छोटी चित्रे नि आकृत्या येथील थडग्यातून मिळाल्या.

१४५. स्पार्टा ( Sparta )

लॅकोनिया या पुरातन ग्रीक राज्याची स्पार्टा ही राजधानी. येथील नागरिक त्यांच्या जीवनक्रमाच्या साध्या पण संपूर्ण शिस्तबद्ध आणि धैर्यशील स्वरूपाबद्दल आणि युद्धनीतीच्या समर्थ व्यवस्थापनाबद्दल प्रसिद्ध होते.

पृ. २०१

१४६. डायना ( Diana )

पुरातन इटालियन चंद्रदेवता. 'कौमार्य' आणि 'लक्ष्यवेध' यांची अधिष्ठात्री. पुढे हिलाच 'आर्टेमिस' ही ग्रीक देवता मानू लागले : अर्थात् शिकारी स्त्री.

१४६. एन्डीमियन् ( Endymion )

(ग्री. पु.) अत्यन्त स्वरूपवान् असा एक धनगर युवक. डायनाचे चित्त-देखील त्याने वेधून घेतले होते.

१४८. हायासिंथस ( Hyacinthus )

अपोलोला प्रिय असा एक सुंदर युवक. एका लोखंडी चक्राने खेळण्याच्या नादात झेफिर ( पश्चिम वाऱ्यांचा अधिष्ठाता ) याच्या हातून हायासिंथस मारला गेल्यानंतर, अपोलोने त्याच्या रक्तापासून 'हायासिंथस' नावाचे फूल निर्माण केले.

१४९. नार्सिसस ( Narcisus )

( ग्री. पु. ) नार्सिसस नावाचा एक स्वरूपसुंदर युवक एका झऱ्याच्या काठी गेला असता आपल्याच प्रतिबिंबावर भाळून झुरून झुरून मेला; आणि त्याच नावाचे फूल झऱ्याच्या काठी कायमचे उगवू लागले.

१५०. पर्स्यूस ( Perseus )

( ग्री. पु. ) झेऊसचा पुत्र. याने अँड्रोमीडाला एका समुद्रातल्या राक्षसापासून

वाचवून पुढे तिच्याशी लग्न केले. 'मेड्यूसा' नावाच्या क्रूर हिडिंबेचे शिर धडावेगळे करून याने ते अथेनाला वाहिले.

१५१. ब्लेक (Blake) इ. स. १७५७ ते १८२८

वुइल्यम ब्लेक इंग्लिश चित्रकार, आणि गूढवादी कवी. 'सॉंग्ज ऑफ इनसन्स', 'सॉंग्ज ऑफ एक्सपीरियन्स' इ. चा कर्ता.

पृ. २२१

१५२. पेट्रार्क–पीट्रार्क (Petrarch) इ. स. १३०४ ते १३७४

फ्रॅन्सेस्को पेट्रार्क–इटालियन कवी, मानवतावादी. 'लॉरा'ला उद्देशून लिहिलेली स्तवने आणि सुनीते यांबद्दल प्रसिद्ध.

पृ. २२९

१५३. झारातुष्ट्र (Zarathustra)

इ. स. पूर्व सहाव्या शतकातील एक पर्शियन महन्त. झोरोॲस्ट्रियन धर्माचा प्रवर्तक. पारशी लोकांचा पुरातन धर्मप्रमुख.

पृ. २३४

१५४. प्रॉमिथिअस–प्रॉमिथ्यूस (Prometheus)

टिटन आयपेटसचा पुत्र. याने मातीतून मनुष्यमात्र निर्माण केले; त्यांना अनेक कलांमध्ये पारंगत बनविले; आणि त्यांच्यासाठी स्वर्गातून अग्नीदेखील चोरून आणला.—याबद्दल शिक्षा म्हणून झेऊसने त्याला कॉकेशस पर्वतातल्या एका खडकाशी साखळीने जखडून ठेवले. तिथे एक गिधाड दररोज त्याच्या 'लिव्हर'वर आपले पोट भरीत असे. दर रात्री प्रॉमिथिअसची 'लिव्हर' पुनः नव्याने निर्माण व्हायची.

१५५ तान्तालूस (Tantalus)

(ग्री. पु.) झेऊस आणि जलपरी प्लूटो यांचा हा पुत्र. फिजियाचा (लिडियाचा ?) राजा. कोणत्या तरी विचित्र गुन्ह्यासाठी याला मरणोत्तर शिक्षा मिळाली ती अशी : फळांनी लगडलेल्या पण बिलकूल हाती न येणाऱ्या वृक्षांखाली, आणि ओंजळीत घेऊ गेल्यास मागे सरकणाऱ्या पाणी भरल्या नदीत उभे राहणे!

पृ. २४०

१५६. सलोमी (Salome).

(न्यू टेस्टॅमेंट) हेरॉड ॲंटिपसची सावत्र कन्या. हेरॉडसमोर नाचताना तिच्या आईच्या आज्ञेवरून तिने 'जॉन द बॅप्टिस्ट'चे शिर एका तबकात घालून बक्षीसरूपाने मागितल्याची कथा आहे.

पृ. २४३

१५७. गालातिआ ( Galatea )

( ग्री. पु. ) 'फेनशुभ्र' अशी एक समुद्रपरी. तिच्या प्रियकराला–'एसिस'-ला 'पॉलिफेमस' या प्रीतिप्रतिस्पर्ध्याने ठार केल्यावर गालतिआने त्याला नदीचे रूप दिले. नदी 'एसिस' या नावाने प्रसिद्ध झाली.

१५८. डॅफ्नी ( Daphne )

नद्यांचा अधिष्ठाता देव 'लेडन' याची कन्या. अपोलो तिच्या मागावर असल्याने तिने स्वतःला लॉरेल'च्या फांदीत रूपांतरित करून घेतले.

१५९. एल्गिन संगमरवर ( Elgin Marbles )

फायडियस शैलीच्या आणि प्रामुख्याने पार्थेनॉन येथील ग्रीक शिल्पांचा सातव्या अर्ल ऑफ एल्गिनने केलेला संग्रह. हा संग्रह त्याने पुढे ब्रिटिश सरकारला विकला. ब्रिटिश वस्तुसंग्रहालयातच आता हा संग्रह जतन केलेला आहे.

पृ. २५१

१६०. कूअे ( Coue' ) इ. स. १८५८ ते १९२६

एमिल कूअे. फ्रेंच मानसशास्त्रज्ञ. आशावादी विचारधारणा. स्वयंप्रेरणेच्या तत्त्वाला ( Senguine autosuggestion ) याने चालना दिली.

पृ. २५६

१६१. कार्ल मार्क्स. ( Karl Marx ) इ. स. १८१८ ते १८८३

जर्मन क्रांतिवादी साहित्यिक. इ. स. १८४९ नंतर मार्क्स इंग्लंडमध्ये स्थानिक झाला. 'दास कापिटाल': भांडवलदारांविरुद्ध क्रांतिकारी लेखन. खाजगी मालमत्ता नष्ट करून, सारी मालमत्ता जनतेचीच–उत्पन्नाची सर्व साधने आणि उत्पन्न जनतेचेच–आणि अशी व्यवहार व्यवस्था झाल्यासच प्रत्येक नागरिकास व्यवसाय व त्याचे मोल सारख्या प्रमाणात मिळेल, समान संधी प्राप्त होईल,— असा उपाय भांडवलदारीविरुद्ध कार्ल मार्क्सने प्रतिपादित केला.

पृ. २६५

१६२. दाहबिया ( Dahabea )

ईजिप्तमध्ये नाईल नदीवर संचार करणारी डोलकाठीशी ४५ अंशाचा कोन करणाऱ्या त्रिकोणी शिडाची बोट.

पृ. २६६

१६३. स्फिंक्स ( Sphinx )

इजिप्तमधील पुरातन अवशेषांपैकी एक भव्य शिल्प. धड सिंहाचे, चेहरा मानवी.

पृ. २७१

१६४. स्ट्रोक ( Stroke )

अर्धांगवायूचा झटका.

१६५. सिसिफस ( Sisyphus )

( ग्री. पु ) कॉरिंथचा तथाकथित राजा. त्याच्या दुष्कृत्यामुळे त्याला मिळालेली एक कायमची शिक्षा, म्हणजे पुनः सपाटीकडे घरंगळत येणारा एक मोठा दगड त्याने ढकलत ढकलत एका टेकडीवर न्यावयाचा !

पृ. २९४

१६६. द वाँडरिंग ज्यू ( The wandering jew )

येशू ख्रिस्ताच्या मृत्यूपूर्वीच्या दुःखद पदयात्रेच्या वेळी येशूचा अपमान करणारी, मध्ययुगीन दंतकथेतील एक व्यक्ती. या ज्यू माणसाला, पुनरुद्धाराचा अंतिम दिवस उगवेपर्यंत पृथ्वीवर अविश्रांत भटकण्याची शिक्षा मिळाली होती. असे म्हणतात.

१६७. द फ्लाईंग डचमन ( The Flying Dutchman )

एक दंतकथा. एक भुताटकीने पछाडलेले जहाज. कोणाच्या तरी शापामुळे त्यावरील कर्मचाऱ्यांसह जगाच्या अंतापर्यंत समुद्रावर भटकत रहाण्याची शिक्षा या जहाजाला मिळाली होती.

पृ. २९८

१६८. नायओबी ( Niobe )

नायओबी, निओब : तांतालूसची कन्या. आपण ‘ अपोलो ’ आणि ‘ आर्टेमिस यांची आई ‘ लॅटोना ’ हिच्याहून श्रेष्ठ आहोत, अशी वल्गना केल्यामुळे अपोलो आणि आर्टेमिस यांनी नायओबीचे सहा पुत्र आणि तिच्या सहा कन्यांपैकी पाच कन्यांचा वध केला; एवढेच नाहीतर, नायओबीचे त्यांनी एका ‘ खडका ’त रूपांतर केले ! तिचे अश्रू त्या खडकावरून वाहणारे पाण्याचे ओहोळ झाले !

पृ. ३१३

१६९. गॅनिमिद ( Ganymede )

( ग्री. पु. ) एक देखणा, मोहक ट्रोजन तरुण; याचे रूप पाहून झेऊस याच्यावर इतका भाळला, की त्याने एका गरुडाकरवी गॅनिमिदला उचलून स्वर्गात नेले आणि आपल्याच सेवेत ठेवले.

पृ. ३३३

१७०. सेझार फ्रांक ( Cesar Frank ) इ. स. १८२२ ते १८९०

बेल्जियन संगीत रचनाकार

पृ. ३४०

१७१. कॅल्व्हरी ऑफ मार्टरडम ( Calvary of Martyrdom )

जेरुसलेमजवळची, येशूला जिथे क्रूसावर चढविले, ती टेकडी; येशूच्या हौतात्म्यामुळे अमर झालेली.

पृ. ३४८

१७२. मार्सेयेज ( Marseillaise )

फ्रेंच राष्ट्रीय गीत. हे गीत इ. स. १७९२ त स्ट्रासबर्ग येथे ऑस्ट्रियाशी युद्ध पुकारल्याच्या मुहूर्तावर एका इंजिनीयरने रचले आणि पॅरिसमध्ये मार्सेयच्या देशभक्तांनी प्रथम गाइले.

पृ. ३५४

१७३. पेरिक्लस-पेरिकल्स (?) ( Pericles ) इ. स. पू. ४९२ ते ४२९

अॅथेन्सचा राजकारणपटू आणि रणधुरंधर सेनापती. यांच्या नेतृत्वाच्या काळात अॅथेन्सने सत्तेचे शिखरच गाठले होते.

पृ. ३५६

१७४. टँगो ( Tango )

मध्य अफ्रिकेतील हा मूलतः संथ नृत्यप्रकार निग्रो गुलामांच्या व्यापारामुळे प्रथम मध्य अमेरिकेत आणि तेथून अर्जेंटिनात गेला. दरम्यान यावर युरोपीय लयप्रकारांचा असर होऊन शेवटी 'बॉलरूम' मधील उच्चभ्रू नृत्यात ह्या नृत्यप्रकाराचा समावेश झाला. संथ लय आणि केरव्याचे वजन असे याचे सामान्यतः रूप.

पृ. ३७४

१७५. जाझ् ( Jazz )

मूळ निग्रो नृत्यप्रकार-किंवा त्याचे अनावात संगीत. झटके, हिसके व विशेषतः कमरेखालील शरीराचे घुसळणे असलेले नृत्य.

१७६ फॅक्सट्रॉट ( Fox-trot )

बॉलरूम नृत्यातील एक लोकप्रिय प्रकार. साधारण चालण्याच्या हालचालींवर आधारित जलद किंवा संथ क्षेप-केरव्यांच्या लयीत.

१७७. चार्ल्स्टन ( Charleston )

गुडघ्यापासून खालचे पाय दोन्ही बाजूंनी उडवत नाचण्याचा एक प्रकार.

पृ. ३७७

१७८. मिन्यूएट ( Minuet )
तिश्र जातीचाच ( दादरा लयीचा ) पण नृत्याचा एक गंभीर प्रकार.

पृ. ३८३

१७९. पुसिनी ( Puccini ) इ. स. १८५८ ते १९२४
इटालियन ऑपेरा-संगीतकार. ‘ ला बोहिमी,’ ‘ ला तोस्का ’ आणि ‘ मादाम बटरफ़्लाय ’ या रचनाबद्दल प्रसिद्ध.

# उपसंहार

## इझाडोरा--आणि–मी ( तिला जाणू पाहणारी )!

इझाडोरा,

आज नाही म्हटलं तरी पाच वर्षं मी तुझ्या सहवासात आहे. तुझ्या अद्‌भुत, तुझ्याच शब्दात सांगायचं तर ‘ adventurous ’ आत्मकथेचं भाषांतर करण्याच्या निमित्तानं एकदा ‘ My Life ’ हातात घेतल्यापासून माझ्या मनाच्या पाठीमागे तुझी सगळी तरल रूपं सारखी फेर धरून आहेत—कधी मनस्विनी तर कधी भावुक; कधी भोळी तर कधी लबाड; कधी गहनगंभीर विचारांनी भारून गेलेली तर कधी क्षुल्लक, क्षुद्र गोष्टीत रमलेली ! कधी कलेच्या अपार्थिव विश्वात स्वतःला पूर्णपणे हरवून बसलेली, तर कधी प्रीतीच्या तथाकथित ‘ अशरीरिणी ’ भुलावणीनं रंगलेली !

इझाडोरा, तुझी ही कथा तर एखाद्या न जुळलेल्या Jigsaw कोड्याच्या विखुरलेल्या तुकड्यांसारखीच मला काहीशी भासत आली आहे...ह्या कोड्याचे तुकडे दृश्यसंगतीनं, अनुभवसंगतीनं, कालसंगतीनं जुळवू पाहणं, आणि तू रेखलेल्या प्रसंगचित्रांतून आणि भासाभासातून एका सुसंगत सत्यप्रतीतीचा मागोवा घेणं...तुझ्यासारख्या एका विलक्षण प्रभावी कलावतीच्या जीवनमर्माचा वेध घेणं, किंवा त्या जीवनाचा अन्वयार्थ लावू पाहणं...ही सारीच एक महाकर्मकठीण यातायात आहे, हे तर खरंच...कुणीही झालं, तरी याला एक व्यर्थ खटाटोपच मानील; परंतु मला तो तसा मुळीच वाटत नाही इझाडोरा,...कारण...

...कारण तुझ्या जीवनातलं सत्य शोधण्याच्या ओघात तू निर्माण केलेले प्रश्न

कलावंतांच्या अन्तर्बाह्य व्यवहारवहिवाटीशी आणि भावजीवनाशी सदासर्वदा जिव्हाळ्यानंच निगडित आहेत; तसंच या प्रश्नांची तू जाणताअजाणता दिलेली उत्तरं वस्तुनिष्ठ दृष्टिकोणातून तपासून घेणं, आणि स्वानुभवावर आधारलेल्या वैयक्तिक चिन्तनाच्या बळावर त्यांची सार्थता अजमावणं, हाही माझ्या लेखी एक मूलगामी नि अटळ चिन्तनविषय ठरतो !

इझाडोरा, तू म्हणजे एक चालतीबोलती शतरंगिणी—एक Kaleidoscope ! कोण बदलून तुझ्याकडे पाहिलं, की तुझ्या जीवनपटावरचे रंग, रचनाबंध इत्यादी सारं काही तरळलंच, बदललंच म्हणून समजावं ! कोणतं दृश्यचित्र 'सत्य' म्हणून हाती धरावं ? कोणता आकार निश्चित् म्हणून मानावा ? कोणती लक्षणं व्यवच्छेदक म्हणून जाणावीत ?

तुझ्या कथेतून प्रथम माझ्या दृष्टीसमोर तू आकारलीस ती एक स्वच्छन्द किशोरी म्हणून...तुझ्या शैशवानं व्यावहारिक दैन्याची आणि कलानंदाच्या दृष्टीनं समृद्धीची चव एकाच वेळी चाखली होती, म्हणूनच शैशवाची जागा घेणारं तुझं यौवन सहजसहज कलानिष्ठ आणि मुक्त होतं...परंपरेपासून मुक्त, सामाजिक संदर्भांपासून मुक्त, व्यावहारिक नीतिनियमांपासूनही मुक्त...मला तुझी ही अवस्था इतकी हृद्य वाटली इझाडोरा ! उपजत प्रतिभा पुढे सर्वांगी फुलून यायला कलावंत जसा 'मुक्तात्मा' असावा लागतो, तशीच तू होतीस—पण तुझ्या जीवनाच्या पर्वकाळी...यौवनात !

गुलाबी टाईट्स घालून पावलांच्या आंगठ्यांवर कृत्रिमपणे शरीर तोलून धरत, गुरुत्वाकर्षणाचे सर्व निसर्गनियम सहज उल्लंघून रंगमंचावरून तरळत जाणाऱ्या बॅलरीनांचं तरल ( ethereal ) नृत्य तुला बालपणापासूनच 'बाष्कळ' वाटलं, कारण तू एक निसर्गकन्या होतीस...माडाच्या झावळ्या तुला खुणेचा हात पालवीत...सागरलहरी तुला स्फूर्ती देत, 'नृत्य' तुझ्या अंतरात जन्मतःच होतं ...तुझ्या अंगातून उफाळायला नृत्योर्मींना निसर्गाचं सूक्ष्म सूचन, हलकेसे इशारेसुद्धा पुरेसे ठरत...

एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात 'बॅले'ला आलेली अवकळा अजून निवळलेली नव्हती; सुसंस्कृत, सुशिक्षित, प्रतिष्ठित कुळातल्या मुलीबाळी नृत्याच्या वाटेला जात नव्हत्या. प्रत्यक्ष नर्तकनर्तकींची तरी त्यांच्या नृत्यावर एक 'कला' म्हणून निष्ठा उरली होती की नव्हती, कुणास ठाऊक ! अशा वेळीं तू नृत्याकडे पाहण्याची एक नवी दृष्टी, आणि एक नवा दृष्टिकोण समाजाला दिलास. अमेरिकेच्या पाठीशी शतकानुशतकांच्या सांस्कृतिक इतिहासाची पार्श्वभूमी नसल्याचा उणेपणा तुझ्या कलाजीवनात तुला सलत होता. ती सल घालविण्याच्या प्रयत्नात नृत्याच्या मूलस्रोताशी पोहोचण्याच्या वाटा शोधतशोधत तू अमेरिकेतून युरोपला

गेलीस. ग्रीसच्या संस्कृतिसमृद्ध परिसरात, पुरातन अवशेषांच्या सान्निध्यात तुला ते श्रेय गवसल्यासारखं वाटलं, आणि त्या क्षणीच तुझी विचारदिशा बदलली... स्वतःच्या देशविशिष्ट जाणिवांचा नि प्रेरणांचा मूलस्रोतही तू मग शोधून पाहिलास. तेव्हा मध्यंतरी ग्रीक-रोमन पुराणातल्या कथा-उपकथांच्या अथांग पाण्यात पोहून आलेल्या तुझ्या नृत्याविष्काराचं सरमिसळ, विविधरंगी बाह्य रूप तुझ्या ध्यानात आलं—आणि तुझ्या शैलीला तू कधी 'ग्रीक' तर कधी 'अमेरिकन' म्हणून संबोधू लागलीस...खरं तर तुझी नृत्यस्फूर्ती मुळात तू म्हटल्यानुसार तुझ्या आजोळच्या शूरधीर नि जिद्दी आयरिश स्वभाववैशिष्ट्यांतून आकारलेली होती, पण तिच्या वृत्ती परंपरेचे मागचे पुढचे दुवे नसलेल्या मुख्या, स्वयंभू अमेरिकन जीवस्वभावाशी निगडित होत्या...वेष नृत्याच्या सहजाविष्काराला जुळेसा, सोयीस्कर ग्रीक पद्धतीचा, तर कित्येकदा आवाहन पूर्णपणे पौर्वात्य होतं,—श्रद्धा, निष्ठा, या पौर्वात्य जीवनमूल्यांवर आधारलेलं होतं...

इझाडोरा, तुझ्या या कथेत इथेतिथे विखुरलेलं नृत्यासंबंधीचं चिंतन एकत्रित करून त्याचा सामग्र्यानं विचार करू पाहताना तर माझी तारांबळच उडाली! कारण तू नृत्याकडे ज्या ज्या कोणातून पाहिलंस, त्यांवर, त्या त्या वेळी तेवढ्या तात्पुरत्या संदर्भात भाष्यं केलीस, असे उल्लेख My Life मध्ये क्षणोक्षणी आहेत; पण ती भाष्यं पूर्णपणे उद्धृत केलेली नाहीत, किंवा त्या भाष्यांचा साररूप मथितार्थही कधी स्पष्टपणे मांडलेला नाही. (तुझ्या दृष्टीनं ते ठीकही असेल कदाचित्; कारण तुझं आत्मनिवेदन ही तुझ्या समग्र जीवनाची कथा आहे, आणि त्या जीवनात तुझ्यासारख्या प्रतिभावंत कलावतीनंही कलेला काहीसं 'कलतं'च स्थान दिलेलं आहे.) साहजिकच 'नृत्यात्मक चलनवलन आणि नाद किंवा संगीत यांचे परस्परसंबंध'—'नृत्याचं कला या स्वरूपात पुनरुज्जीवन करण्याचे ध्येय'—'नृत्याच्या माध्यमातून धर्माचं पुनरुत्थान' अशा गहनगंभीर स्वरूपाची तुझ्या भाष्यांची शीर्षकं impressive, परिणामकारक वाटतात यात शंकाच नाही; पण तुझ्या आत्मकथेची सारीच्या सारी चारशे पानं कलादृष्टीच्या चाळणीतून सरभरित गाळून काढून मग जाळीवर उरलेल्या एकूण कलात्मक तत्त्वचिंतनाचा एकत्र विचार केल्याशिवाय त्या भाष्यांचा अर्थही कितीदातरी लागत नाही...क्वचित् ती भाष्यं केवळ क्षणिक प्रेरणेवर आधारलेलीच होती—त्यात खोल नि विलक्षण भावार्थ शोधावा, असं काही नव्हतंच नव्हतं, असं वाटायला लागतं...

म्यूनिक्मध्ये स्टक या गुरुसमान व्यक्तीनं क्यून्स्लर हाऊस या प्रख्यात संगीतमंदिरात तुझ्या नृत्याचा कार्यक्रम ठेवायला नकार दिला, तेव्हा तत्काळ त्याला त्याच्या घरी गाठून तुझ्या कलेची सर्वसिद्ध पात्रता तू त्याला मान्य करायला

लावलीस...तुझ्या ध्येयाचं पावित्र्य, आणि नृत्याला एक 'कला' म्हणून मान्यता मिळण्याची शक्यता— या संबंधात सतत चार तास तू त्याच्याशी वाद घातलास आणि अखेरीस क्यून्स्लर हाऊसमध्ये नाचून सर्वांना अदृष्टपूर्व अशा नृत्याविष्काराची मेजवानी दिलीस...सारं खरं...पण या घटनेत तू नाचलेलं 'नृत्य', तसाच तू घातलेला 'वाद'ही फार महत्त्वाचा होता, हे तू लक्षात घेतलं नाहीस. मोठ्यामोठ्यांना लक्षणीय वाटलेली नृत्याकडे पाहण्याची तुझी दृष्टी अशाच वादातून इतर साधकांसाठी स्पष्ट झाली असती. तुझा पूर्वरंग-उत्तररंग तू कोणत्या मूलभूत मुद्द्यांनी वादातीत सिद्ध केलास, तें समजणं–समजावणं फार महत्त्वाचं होतं इझाडोरा! ह्या एकाच वेळीं नव्हे, तर अशा महत्त्वाच्या अनेक 'ऐन' वेळीं तू सोयीस्कर मौन स्वीकारलं आहेस. आन्द्रे बोनियेला 'नृत्यकला आणि मानवी हालचालीबाबतचा एक नवविचार' यावर तासन् तास प्रवचनं ऐकवल्याचा तू केलेला उल्लेखही याच तऱ्हेचा!

एवं च, कलेच्या संदर्भात निश्चित् अशा तुझ्या विचारांचा आलेख कुणाच्या डोळ्यांपुढे सहजासहजी उभा राहूच शकत नाही; पण तरीही नृत्यरचनेच्या तरल क्षणातल्या भावावस्थेची तुझी वर्णनं;—किंवा चित्र, नाट्य अशा वेगवेगळ्या कलाप्रांतातल्या युजिन कारिएर, स्टॅनिस्लाव्हस्की, यांच्यासारख्या मनस्वी रथीमहारथींनी आनंदानं आस्वाद घेतलेल्या आणि दैवी मानलेल्या तुझ्या नृत्याविष्काराची सत्यकथा;—निशो, रूसो या तत्त्ववेत्यांना, तसंच रोदां या शिल्पकाराला तू नृत्यगुरू मानत होतीस, ही एक असाधारण वस्तुस्थिती...या साऱ्या गोष्टींच्या मननातून, तुझ्या कलादृष्टीबाबत आणि कलाविष्काराच्या impact बाबत, परिणामाबाबत काही निष्कर्ष काढायचा मी प्रयत्न केला आहे...

मानवी भावभावनांचं, जाणिवांचं अंगप्रत्यंगातून नैसर्गिक प्रक्षेपण करणारी कला म्हणूनच तू नृत्याकडे पाहत आलीस...नैसर्गिकतेवर, स्फूर्तीवर तुझा भर होता, म्हणून रंगभूमीविषयक ग्रीक विचारांतून उद्भवलेली 'रंगभूमीचं मूळच मुळीं 'नृत्य' आहे,' ही कल्पना तू सहज आत्मसात् केलीस...'आदि नट तरी दुसरा कोण होता? नर्तकच!' असं मानलंस...निसर्गानं दिलेलं भावप्रेरित हालचालीचं वरदान कलास्वरूपात परिणत होत असताना, त्यानं निसर्गाशी असलेलं आपलं घनिष्ठ नातं कदापि विसरू नये—आणि कृत्रिम नियमांच्या नि तंत्राच्या नादी लागून आपली सहजता, आवाहनातली सरलता आणि आर्तता, नैसर्गिक intensity गमावू नये- असा तुझा आग्रह होता. याच भूमिकेमुळे अत्यंत कृत्रिमतेनं भावाविष्कार करणाऱ्या मूकाभिनयाला तू 'कला' म्हणायलाही तयार झाली नाहीस...माझ्या मनात इथे एक प्रश्न निर्माण झाला...तू प्रस्तुत करत असलेल्या, आणि अनेकदा खोल अशा आशयावर आधारलेल्या तुझ्या

नृत्यातून तू रूढ मूकाभिनयाचा उपयोग नक्कीच करत नसणार– पौर्वात्य आणि विशेषेकरून भारतीय नृत्यातल्या प्रतीकात्मक मूकाभिनयाची (dance mime), किंवा हस्तमुद्रांच्या नृत्यभाषेवर आधारलेल्या पूर्णतया सांकेतिक अभिनयाची तर कल्पनाही तुला सहन होण्यासारखी नव्हती. भारतीय नृत्यात,– अगदी 'कथक'-सारख्या, शास्त्रीय नृत्यशैलीपैकी सर्वांत मुक्त अशा नृत्यपद्धतीतदेखील– अंग-प्रत्यंगांचं अनुक्रमे स्थूल नि सूक्ष्म असं निश्चित् कार्य असतं. भावभावना व्यक्त करताना मोठ्या, रुंद, स्थूल हालचालींनी आणि प्रातिनिधिक किंवा भावप्रकटनक्षम अशा नैसर्गिक पवित्र्यांनी प्रस्तुत विषयाला पायाभूत असलेल्या मुख्य भावनेचं विधान केलं जातं...चेहऱ्यातली डोळे, गाल, मुख इत्यादी उपांगं त्या भावनेच्या छटा अलगविलग करीत सूक्ष्मतेकडे नेतात. आणि अभिव्यक्तीत intensity— घनता आणतात. पुढे बाहू, आणि हातांच्या पंजांच्या कधी सांकेतिक तर कधी व्यंजक हालचालीतून ती सघन भावना प्रेक्षकांपर्यंत पोहोचवली जाते...माझ्या कल्पनेप्रमाणे बॅलेमध्ये जसं शरीराच्या सूक्ष्म चलनवलनाला स्थान नसतं, तसंच तुझ्या नैसर्गिक नृत्यशैलीमध्येही नव्हतं; तुझ्यापासून काहीशी स्फूर्ती घेऊन आज प्रस्थापित झालेल्या 'नव' Modern नृत्यामध्ये योगासनांच्या रूपानं भारतीय पवित्रे शिरलेले असले, तरी हे सूक्ष्म अंगचलन अजूनही झिरपलेलं नाही...मग तुझी भावाभिव्यक्ती नेमकी कशावर आधारित होती? ज्या कवितांवर तू नृत्यं रचलीस, ज्या 'Death and the Maiden', 'Washington Post', शोपांची 'Funeral March', बिथोव्हनची 'नववी सिंफनी' इत्यादी गीतांचा-संगीतरचनांचा उपयोग तू पार्श्वसंगीतासारखा किंवा पार्श्वगीतासारखा केलास, त्यातल्या प्रत्येक चरणाचा अर्थ, किंवा स्वरवाक्याचा भावार्थ– त्या क्षणातच सुचलेल्या, स्फुरलेल्या हालचालीतून तू व्यक्त करीत होतीस–असं म्हणायचं का? शिवाय स्ट्राऊसच्या 'The Blue Danube' या रचनेसारख्या thematic संगीताची साथ स्वीकारल्यावर किंवा कवितेचे शब्द पार्श्वभूमीवर असल्यावर रूढ किंवा नृत्यात्मक मूकाभिनयाची आवश्यकताच तुला भासली नसावी...संगीताचं आवाहन स्वीकारायचं आणि त्यातला mood सुचवेल त्या नृत्यकारांच्या, क्षेपांच्या साखळीत आपला देह, तसंच आपलं व्यक्तित्व मुरवून टाकायचं...तुझा भर आमच्याप्रमाणे वाक्यार्थाची पाकळी पाकळी उलगडून, शब्दांचे श्लेष काढून अर्थ-प्रकटनाला अनेक मिती देण्याऐवजी– वाक्यार्थानं किंवा स्वरबंधानं सुचविलेल्या किंवा वाहिलेल्या भावनेला केवळ आर्त नि सघन–intense बनवून तिचं शारीरिक प्रक्षेपण अत्यंत परिणामकारक करण्यावर होता, असं मला विचारान्ती वाटतं... आणि यामुळेच तुझी ही रीत, ही शैली फक्त तुझ्यापुरतीच फार यशस्वी ठरली! तुझ्यासारखीच्या सुजाण, बुद्धिमान् संवेदनशील नि असाधारण व्यक्तित्वाला

मुळातच अनेकमिती अस्तित्व असतं— ते कमीत कमी प्रयासानं केवढं तरी मोठं श्रेय प्राप्त करून घेऊ शकतं...सर्वसामान्यांना थोडंच हे जमणार?

थोडक्यात म्हणजे तुझ्या नृत्यकलेचा प्राण म्हणजे 'स्फूर्ती'—एकतऱ्हेचं भावनिक वैचारिक 'स्फुरण' हाच होता, अशी माझी धारणा आहे. या स्फुरणाला कुणी टिकाऊ 'नव' क्षेपात, आकारात, बंधात, विचारधारणेत, मनोवस्थेत, शैलीत पकडून ठेवू शकणार नव्हतं...कारण एखादी मुद्देसूद विचारधारा, किंवा मूलभूत चिन्तनाचा आधार त्या स्फुरणाच्या ठायी नव्हताच. तुझ्या सबंध लिखाणात तुझ्या नृत्याला एका निश्चित् शैलीचं स्वरूप देण्याच्या दृष्टीनं केलेल्या प्रयत्नाचे, किंवा तुझ्या रियाजाच्या नेमक्या स्वरूपाचे, किंवा भावनेचं वाहन बनणाऱ्या शरीराच्या संचलनाला तरलता आणण्याच्या दृष्टीनं, त्या शरीराच्या 'साधनेचे' उल्लेख नगण्यच म्हणावेत इतके कमी आहेत...पण ही साधना, ही पूर्वतयारी नर्तनाच्या कोणत्याही शैलीच्या किंवा प्रकाराच्या संदर्भात अत्यावश्यक अशीच असते इझाडोरा.. शिवाय बॅले पद्धतीतली नृत्यसाधना शरीराच्या अत्यन्त अवघड आणि कृत्रिम अशा अवस्थांतून चमत्कृतिपूर्ण हालचालीपर्यंत पोहोचत असल्यानं बॅलेनृत्य mechanical आणि कृत्रिम झालेलं आहे,—असं विधान तू जागोजागी केल्यावर,—सांकेतिकता आणि कृत्रिमता यापासून मुक्त राहूनही शरीराला भाववाहक आणि तरल बनविण्यासाठी साधनेचं स्वरूप निश्चित् कसं हवं, याचं संपूर्ण विधान तू कुठेतरी करायला हवं होतंस. तुझ्या ग्र्यूनेवाल्दच्या नृत्यशाळेच्या सकाळपासून संध्याकाळपर्यंतच्या दिनक्रमाचं आणि शाळेच्या अर्थपूर्ण सजावटीबाबतचं वर्णन याबाबत सूचक आहे खरं...पण त्यालाही आराखड्याचं नेटकं स्वरूप आलेलं नाही.

तुझ्या गळयात सूर नव्हता, असं तूच म्हटलं आहेस; पण संगीताचा 'कान' तुला असलाच पाहिजे...एरवी मुद्दाम नृत्यासाठीच रचल्या गेलेल्या संगीतरचना तेवढ्याच रूढीप्रमाणे स्वतःच्या नृत्यासाठी उपयोगात आणायच्या सोडून, बिथोव्हन, शोपां, शूमान, स्ट्राऊस, यांच्यासारख्या उत्तमोत्तम संगीतकारांच्या उत्तमोत्तम रचनांना तू नृत्यस्पर्श करू शकली नसतीस, आणि तो 'स्पर्श' रसिकांनी आदरून मान्यही केला नसता!...इझाडोरा, तू म्हणे म्हणायचीस, 'Great music dictates Great dancing!' अगदी त्रिकालाबाधित असं सत्यविधानच तू केलं आहेस. उत्तम संगीतातून स्फूर्ती घेतलेलं नृत्य उत्तमाचा तो स्तर गाठल्यावाचून कसं राहील?...पण तुझ्याआधी कुणी हे करू धजलं नव्हतं—आणि धजलं असतं तरी त्या व्यक्तीला ते पचलं असतंच, असंही नव्हे! तुझ्या क्रांतिकारी कारकीर्दीनं केवळ रूढ नृत्यसंगीताचंच बंधन तोडलं असं नव्हे, तर कृत्रिम निभडक नेपथ्य किंवा अवास्तव, अवजड, बोळदार वेषभूषा—अशांसारख्या, मूळ

वस्तूपासून लक्ष हिरावून घेऊ पाहणाऱ्या रंगसंबद्ध गोष्टींना अजिबात फाटा दिला. रंगमंच खुला, मोकळा, सहजसुलभ नि सुदूर क्षेपांना वाव देणारा, आणि नेपथ्य डोळ्यांना सुखकारक अशा शांत निळ्या पडद्यांचं केवळ ठेवलं—तू अशा काळात जन्मलीस आणि लहानाची मोठी झालीस, की पारंपरिक दृष्टिकोणातले बदलते रंग जसे सामाजिक विचारक्षेत्रात तसेच कलाक्षितिजावरही तरळू लागले होते... मग ग्रीक अभिजात कलेतली शिस्त आणि काव्यमयता, आणि नव कलाविचारातली मुक्ती, स्वातंत्र्य आणि वास्तवता यांचा मेळ तुझ्या नृत्यात प्रतीत झाला, तो समकालीन शिल्प, चित्र, वाङ्मय इत्यादी कलांच्या आस्वादातून जाणवलेल्या, त्या कलाविश्वातल्या प्रगतीच्या साक्षात्कारामुळे नि पडसादांमुळे, असं म्हणावं का ?

प्रेम, भीती, इत्यादी उपजत प्रवृत्तींच्या नैसर्गिक अभिव्यक्तीच्या संदर्भात नैसर्गिक हालचालींचा, क्षेपांचा तू विचार केलास, त्यापूर्वीच तसाच विचार आणि चिकित्सा फ्रान्स्इवाज डेलसार्टनं, आणि नृत्याला योग्य अशा पवित्र्यांसाठी आणि चेहऱ्यावरील सूचक नि सहज भावांसाठी मोठमोठ्या प्रसिद्ध चित्रकारांच्या चित्रांची विचक्षणा सारा सिडॉन्स, आणि एम्मा–लेडी हॅमिल्टन यांनी तुझ्यापूर्वीच केली होती–एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात...मग आंतरिक स्फुरणावरच केवळ आधारलेल्या तुझ्या नृत्यशैलीनं 'नव' असं मागे ठेवलं तरी काय ?...ॲग्नेस द मिल, ही आजची प्रथितयश अमेरिकन नवनर्तकी आणि नवनृत्याची प्रगती ग्रथित करणारी नृत्येतिहासकार म्हणते, तसंच मीही म्हणेन, 'एक नवा दृष्टिकोण'...!

माणसाच्या साध्या सहज हालचाली–चालणं, धावणं, उड्या मारणं, ढांगा टाकणं, उशी घेणं, हिंदोळणं–डोक्याच्या सहजभावी किंवा कलत्यावळत्या स्थिती; बाहूंचे, हातांचे अनन्त नैसर्गिक आविर्भाव...सारं सारं काही नृत्याच्या कक्षेत आणलं गेलं ते नृत्याकडे बघण्याच्या या नव्या दृष्टिकोणामुळे...'नृत्य' ही एक जीवनवहिवाट आहे, एक श्रद्धा आहे, असं समाजाला मान्य झालं, तेही या नव्या दृष्टिकोणामुळे...

इझाडोरा पुनः सांगते, तुझ्या नृत्याचा 'स्फूर्ती' हाच प्राण होता; विजेसारखी ही स्फूर्ती लखलखत होती आणि तुझ्या मन–बुद्धी–देहाच्या सुंदर मेळातून तिचे उन्मेष तेजाळत होते! तीन खंड आणि दोन पिढ्यांना या दैवी स्फूर्तीच्या बळावर तू दिपवून सोडलंस...पण तुझ्या हातात शेवटी काय राहिलं इझाडोरा ? आणि राहिलं नाही, ते का राहिलं नाही ?...

प्रीती आणि कला, यांचं नातं विशद करताना एके ठिकाणी तू म्हटलं आहेस : "कला आणि प्रीती यांना मला एकमेकापासून वेगळं लेखताच येत नाही... कारण कलावंत हाच खरा प्रेमिक असतो. सौंदर्याची खरी प्रतीती कलावंतालाच

येते; अन् तसं म्हटलं तर शाश्वत सौंदर्याचं दृष्टिपान केलेल्या आत्म्याची यथातथ्य जाण, दर्शन, हेच तर प्रेमाचं लक्षण !"... ही व्याख्या ठीक आहे इझाडोरा, पण हे एकंदर विधान सत्याच्या कोटीला तेव्हाच पोहोचेल, की जेव्हा 'प्रीती' आणि 'कला' ही जीवनाची दोन्ही अंगं, हे दोन्ही पैलू, एका अत्यंत उच्च स्तरावरून आणि पारदर्शी दृष्टीनं प्रत्यक्ष जीवनात न्याहाळले जातील, वागवले जातील. खऱ्या कलावंताला आणि खऱ्या प्रेमिकालासुद्धा एक अतींद्रिय 'परा' दृष्टी असावी लागते इझाडोरा ! तेव्हाच कलेचा आणि प्रीतीचा एकस्तरावरचा मेळ जीवनात पूर्ण स्वारस्य निर्माण करू शकतो. सामान्य जीवनात असा कुठला प्रत्यय यायला ? बहुधा कलावंताला कला आणि प्रीती यांच्यातले ताणच अधिक अनुभवावे लागतात ! दोन्हीही सारख्याच – जीवनाचं पुरं दान मागणाऱ्या; सदा अतृप्त आणि दोन्हीही पराकोटीच्या सुखदायी – मात्र सामान्य दृष्टीनं वेगवेगळ्या स्तरावर सुख देणाऱ्या...अपवादात्मक व्यक्तींची उदाहरणं सोडली तर इझाडोरा, कलावंत 'कलावंत' म्हणून 'ईश्वर' असतो, पण 'प्रेमिक' म्हणून केवळ 'माणूस'...मग तुला भेटलेल्या जवळजवळ प्रत्येक कलावंतातला आणि तुझ्या ठायीचाही हा 'माणूस' तू ओळखला नव्हतास, असं मानायचं का इझाडोरा ?

लग्नबंधनात कधीही न पडण्याची प्रतिज्ञा केलेली मनस्विनी तू – रशियन पद्धतीच्या करारवजा का होईना विवाहबंधनात अखेर गुंतलीस. सर्जी ॲलेक्झांड्रेविच् एसेनिन एक सत्तावीस वर्षांचा शेतकरी युवक. तसा कविमनाचा, सुदृढ, सुरूप, पण भ्रमिष्ट ! 'बालालाइका' वाद्यावर त्याचा हात किती हळुवार चालायचा...त्याच्या बोटातून गोड गोड स्वरावली झरायच्या – पण पाठोपाठच यायचा त्याला झटका – वेडाचा ! कधी पिस्तूल घेऊन तो तुझा पाठलाग करी, अन् स्वतःचं संरक्षण करायला तुला बेडरूमचे दरवाजेच आतून बंद करून घ्यावे लागत ! कधी राहत्या होटेलमधल्या खुर्च्याटेबलांची मोडतोड व्हायची तर कधी खिडक्यांच्या काचांच्या ठिकऱ्या उडायच्या – अशा वेळी सर्जीची रवानगी तडक पोलिसठाण्यावर झाली की तुझं नाव, पैसा, कर्तृत्व इत्यादी सारं काही पणाला लावूनच तुला त्याला सोडवून आणावं लागायचं...सर्जी तुझ्या निम्म्या वयाचा. तुझं हे आयुष्याच्या हेमंत ऋतूतलं प्रेमप्रकरण शेवटी एकाएकी संपलं, तेव्हा सर्जीचा नाद सोडून देऊन नाइलाजानं तू निघून गेली होतीस, अन् वेडाच्या भरात सर्जीनं केलेल्या आत्महत्येचा विरामबिंदू तुमच्या या प्रेमप्रकरणाला लाभला होता ...त्यावेळीं तुझ्याकडे उरल्या होत्या तुझ्या जीवनवसंतातल्या तुझ्या प्रियकरांच्या आठवणी केवळ !

बुडापेस्टमध्ये प्रथम भेटलेला तुझा 'रोमिओ'– ("त्यानंच माझ्यासारख्या

मुग्ध अनाघ्रात परीचं एका वादळी...विलासी रमणीत रूपान्तर घडवून आणलं...") गॉर्डन क्रेग– ("एखाद्या मुलीवर प्रेम करणारा कुणी एक सामान्य तरुण – अशातला हा प्रकार नव्हता. दोन जुळ्या आत्म्यांची ती जीवभेट होती...एकरूपता होती...वरचं हलकं देहावरण त्या आनन्दोन्मेषानं सर्वथा विरून, त्या मूळच्या पार्थिव वासनेचं रूपान्तर शुभ्र नि प्रखर ज्योतींच्या एका स्वर्गीय मीलनात झालं होतं...")...या प्रियकरांच्या संबंधातल्या दोन आवेगी प्रेमकथांच्या नावा खरं म्हणजे एकाच खडकावर आपटून फुटल्या ! तू प्रतिभावान् नर्तकी; रोमिओ प्रतिभावान् नट; क्रेग प्रतिभावान् नेपथ्यकार; रोमिओ आणि क्रेग या दोघांनाही स्वतःच्या कलेच्या गाभ्याला वैचारिक, नि भावनिक स्पर्श करू शकणारी, तशीच त्यांच्या व्यक्तिमत्त्वांवर आणि कला-सामर्थ्यावर भाळून त्यांच्याभोवती रुंजी घालणारी पत्नी हवी होती – त्यांच्याच तोलामोलाच्या कलावतीच्या वा सहधर्मिणीच्या अहर्निश सहवासाची मुळीच अपेक्षा नव्हती त्यांची !

हाईन्‌रिख् तोड, जॉर्ज बर्नार्ड किंवा स्टॅनिस्लाव्हस्की यांचं तुझ्याबद्दलचं कौतुक, प्रेम, पूर्णपणे तुझ्यातल्या प्रतिभेच्या साक्षात्काराशी संबद्ध होतं, आणि या असामान्य कलावन्तांच्या बाजूनं या प्रेमाची जात खरोखरीच 'प्लेटॉनिक' होती असं वाटतं—पण यावेळी तुलाच प्रेमाचं मर्यादित स्वरूप पुरेसं समाधानकारक वाटलं नाही !

डॉ. आन्द्रे ('ठेंगणा बांधा, रुंद शरीर अन् काळी दाढी–') आणि व्हिआरेजिओला तुला भेटलेला तुझा 'नव' मायकेल ॲंजेलो...ही उदाहरणं तर केवळ देहातल्या निसर्गाच्या सादेला प्रतिसाद मिळाल्याचीच होती...

प्रस्तुत आत्मकथेच्या अखेरीअखेरीस ज्या 'आर्च एंजल' प्रकरणाच्या दुःखान्तिकेची कडवट चव मनात एकसारखी रेंगाळत राहते, ते प्रकरण तुझ्या मते पुनः अपार्थिव स्वरूपाचंच होतं!...कलान्तर्गत सूक्ष्म अनुभवांच्या एक-रूपतेच्या जाणिवेच्या पायांवर उभारलेलं शाश्वत प्रीतिमंदिर होतं ते ! कसलं काय इझाडोरा, एका उपभोगशील भ्रमराची—फुललेल्या भोगलेल्या फुलाला डावलण्याची आणि एका अनाघ्रात कळीचं अंतरंग खोलून त्यातला 'कोरा' मध चाखण्याची स्वभावसुलभ धृष्टता होती ती...पण वयाच्या त्या प्रगल्भ नि जाणत्या अवस्थेतही तुझ्या नजरेला हे एक कोडं उमगलं नाही, हे आश्चर्यच म्हणावं लागेल !

लोएनग्रीन ऊर्फ एल्.च्या बाबत तू पूर्ण जागी होतीस. तुला हवा होता तुझं नृत्यशाळेचं स्वप्न प्रत्यक्षात साकार करण्यासाठी योग्य व्यक्तीचा आधार... एक लक्षाधीश ! त्या लक्षाधीशाला ओढ होती एका स्वरूपसुंदर, बुद्धिमान् नर्तकीच्या सहवासाची...अलिशान होटेलमध्ये, यॉटमधून केलेल्या जलविहारात

शॅटोच्या राजेशाही दालनातून ऐषआरामात उपभोगलेला सहवास; मात्र त्या सहवासाच्या अवधीत तुला innocent वाटणारे प्रीतिश्लेष त्याला खपणार नव्हते. तुझ्या त्याच्या संबंधात दरवेळी निखारे फुलले, ते याच कारणानं... आणि तरीही तू स्वतःला 'एकनिष्ठ' आणि एल्. ला 'न्यूरॉटिक' म्हणत आलीस! एल्. च्या शॅटोतलं ते एका अत्यंत कुरूप पियानोवादकाचं प्रकरण आठवतं तुला? आठवत असेल, तर त्यासहित तुझ्या साऱ्या प्रेमजीवनाचा विचार करून मला सांग इझाडोरा, तुझ्या लेखी 'प्रीती'चा अर्थ तरी काय होता? 'प्रीती' आणि 'कला' यांच्यातलं नातं समजावताना तू केलेलं सखोल सुंदर विधान त्या उच्च स्तरावरून तुला खरोखरीच 'खरं' म्हणून कधी तरी भावलं होतं का?

कित्येकदा मला वाटतं, तू प्रश्न निर्माण केलेस, बहुतेकांची उत्तरंही तुला सापडली, पण ज्या उत्तरांना उघड्या डोळ्यांनी सामोरं जाणं तुझ्या स्वभावाला परवडण्यासारखं नव्हतं, ती उत्तरं न सापडल्याचं, अजाणतेपणाचं नाटक तू आयुष्यभर खेळत राहिलीस...

तुझ्या आत्मनिवेदनाच्या आरंभीचा तुझा पहिलाच प्रश्न किंवा प्रश्नावली पहा. 'सत्य' म्हणजे काय? आपलं आपल्याला तरी ते गवसलेलं असतं का? आपली स्वतःची स्वतःशी खरोखरीची ओळख असतेच कुठे? असते का?

विचारी माणसाला, बुद्धिमान् नि अंतर्मुख माणसाला आपली ओळख मुळातच थोडीशी अधिक असते, नि त्याच्या प्रत्येक जागृत क्षणी ती ओळख अंशाअंशानं वाढत असते, अशी माझी धारणा आहे इझाडोरा! शिवाय तुझ्या बाबतीत म्हणायचं तर तुझं जीवन म्हणजे अशा जागृत क्षणांचं एक मोहोळच होतं! रतिसुखाचे, प्रसूतीचे नि प्रिय जनांच्या मृत्यूसारखे मानवी जीवनातले अत्युत्कट क्षणदेखील तुझ्या लेखी कधी 'आंधळे' नव्हते, 'बधिर' नव्हते की पूर्णपणे 'बेभान' नव्हते...मग तू स्वतःच स्वतःला ओळखलं नव्हतंस, तुझ्या जीवनातलं सत्य तुझ्या हाती गवसलं नव्हतं, असं म्हणणं खरं होतं का? मी तर म्हणेन, की मुळीच विधिनिषेध न राखता आणि संकोचमर्यादांचं स्वाभाविक दडपण स्वतःवर येऊ न देता सत्यकथन करण्याच्या अभिनिवेशाचाच, स्वतःच्या ओळखलेल्या सत्यस्वरूपाला तू आडोसा केलास, आणि सत्यान्वेषणाच्या मिषानं सत्यच दडवलंस!...जसं प्रत्यक्ष जीवनात स्वतःपासून, तसं त्या जीवनाच्या साहित्यदर्पणात पडलेल्या तुझ्या प्रतिबिंबात देखील—वाचकांपासून!...प्रतिबिंब हेही अखेर काहीसं खोटंच असतं...मूळ वस्तूची नक्कल असते ती; मूळ वस्तू त्यात एकावेळी एकाच कोनातून आणि त्रिमितिविना उमटलेली असते; त्यामुळे वरवर पाहणाऱ्याला ते प्रतिबिंब सहज फसवतं; अर्थात इतरांच्या फसण्या न फसण्यानं तुझं

काही बिघडणार नव्हतं यात शंकाच नाही...वाईट वाटतं एकाच गोष्टीचं, की तुझी तू मात्र यात फसलीस!...सत्याला सामोरी तू क्वचितच गेलीस इझाडोरा...

कित्येकदा आपल्या कलाजीवनाकडे संपूर्ण पाठ फिरवून स्वतः व्यवस्थित ऐषराम उपभोगत असताना समाजवाद, मार्क्सवाद नि क्रांती या विषयांवर तू केलेली भाष्यं, कलाविचारावावतची तुझी अनिश्चित् विचारदिशा ( तुझा नृत्यवेष ग्रीक, – वृत्ति पेगन – नि नृत्याविष्कार अमेरिकन ? ) कलावंत वा मित्रमैत्रिणी यांच्या चारित्र्याबद्दलचे तू बांधलेले अदमास, किंवा काढलेले सोयीस्कर निष्कर्ष ( क्रेग-पिम, एलिनोरा ड्यूज, 'आर्च एंजल,' लोएन्ग्रीन... ) नि त्यांच्याबाबत केलेली उलटसुलट विधानं...सत्याला सामोरी तू क्वचितच गेलीस इझाडोरा!... आणि या एकाच कारणानं तुझ्या उमद्या, सर्वसमृद्ध प्रतिभासंपन्न व्यक्तित्वाची पुढे परवड झाली...

तू मनानं जात्याच 'स्व-तन्त्र'–निर्वीर! मोठमोठ्या कलावंतांचा, गुणीजनांचा, ज्ञानियांचा सहवास तुला सहजासहजी लाभत गेला – त्यांनी तुझ्यामधलं असामान्यत्व ओळखून बरोबरीच्या नात्यानं तुला सहवास दिला-घेतला – तुझी बुद्धीची, मनोमेळाची भूक उत्तमप्रकारे भागत गेली ... शारीरिक भुकेला तू 'शारीरिक' म्हणून ओळखलं होतंच...तर तेव्हा, प्रसंगवशात् ती भूक त्याच नावानं, भावानं, अर्थानं, शमवायला तुला कोणता प्रत्यवाय होता? स्त्रीचा मातृत्वाचा जन्मसिद्ध हक्क तू ठामपणे बजावला होतासच...मग अपार्थिव प्रीतीचं खोटं शब्दवेल्हाळ रचायचा मोह तुला कशासाठी झाला?...का तू भासवत आलीस, तशी पूर्णपणे 'मुक्त' तू कधी नव्हतीसच?

अखेरीस...अखेरीस का म्हणायचं म्हणा, 'अथ'पासून 'इति'पर्यंत – 'नखा'पासून 'शिखे'पर्यंत तू एक असामान्य कलावती...प्रतिभेचं देवदेणं अंतरात वागवतच जन्माला आलेली! तू शरण जायचं होतंस ते माणसाला नाही, की तथाकथित मानवी संस्कृतीलाही नाही – तू नियम मानायचे ते केवळ निसर्गाचे – कौल घ्यायचा तो स्वतःच्या डोळस जीवननिष्ठेचा – सामोरं जायचं ते सत्याला – निसरत्या क्षणी आधार घ्यायचा तो त्या अंतरातल्या देवदेण्याचाच... जातिवन्त, निखळ कलानिष्ठेचाच! नाहीतर काहीच अनुग्रहित स्त्रीपुरुषांना 'कलावती' वा 'कलावंत' का म्हणायचं असतं? कलेव्यतिरिक्त मोठं बळ, मोटा अर्थ, मोठी निष्ठा तिच्या किंवा त्याच्या लेखी नसतेच कुठली दुसरी, म्हणून!...

...मात्र असा तुला काहीसा बोल लावत असतानाच आठवण येते मला तुझ्या आयुष्यातल्या त्या हृदयविदारक प्रसंगाची...तुझ्या बाळांच्यावर काळानं घातलेली ती क्रूर झडप! तुझ्या वाटेला विनाकारण आलेलं दुर्दैव तसं म्हटलं तर हे एकच...( बाकी बहुतेक स्वतःची स्वतः अंगावर ओढवून आणलेली... )

पण वैऱ्यावर सुद्धा गुदरू नये असा तो प्रसंग—नुसता त्या भयंकर घटनेचा विचार देखील मनाला सुन्न करून टाकतो!...आणि वाटतं, असं तर झालं नाही की तुझ्यातल्या मातेला आपल्या उरातील खन्त आणि अनेकदा उजवूनही रिकामी झालेली कूस, यांचा विसर कशाही पडू शकला नाही, नि त्या प्रयत्नात ठाव मात्र सुटला जगण्याला तोल नि प्रयोजन देणाऱ्या कलानिष्ठेचा...? अंतरातला प्रतिभेचा स्फुलिंग कितीही जागृत असला, तरी कलावती म्हणजेही अखेर एक स्त्री... ‘स्त्री’त्वाच्या प्रेरणा नि आवाहनं ती सहजासहजी विसरू शकत नाही,—कारण त्या साऱ्या मायेपाठीमागचा सूत्रधार निसर्गच असतो...अन् मातृत्व तर... स्त्रीच्या लेखी कलाप्रेरणेहूनही मूलगामी—अस्तित्वाच्या आत्मपिंडीलाच वळेसरासारखं गळामिठी घालून बसलेलं एक वरदान की काय कुणास ठाऊक!...

१९२७ साल...वयानं अर्धशतकाकडे झेप घेतलेली...तू एकटी, एकाकी—ना पती, ना प्रियकर, ना संतती, ना कसली उमेद...विफल आयुष्य...‘कलावती’ या नात्यानं मिळवलेली मानाची बिरुदं अर्थहीन वाटायला लागलेली...नृत्याची नशा पार उतरलेली...तिथे नाईस शहरी एका उदास संध्याकाळी गळ्याभोवती तुझा लाल स्कार्फ गुंडाळून तू उभी. एका नव्या लाल स्पोर्ट्सकारची चाचणी घेण्यासाठी आत चढून तू सीटवर बसणार...तोच क्षणभरात वेग घेणाऱ्या चाकांना ब्रेक्स लागतील—आणि तुझी विझू विझू झालेली स्नेहहीन जीवज्योत क्षण दोन क्षणांत अनन्तात विलीन होईल—असं बंगलीतल्या पोर्चमधून तुला निरोपाचा हात पालविणाऱ्या मेरीला स्वप्नातसुद्धा वाटलं नसेल...रंगमंचावर अनेकदा तुझ्या सुडौल मानेभोवती एक हलकासा वळसा घेऊन तुझ्या नृत्य-क्षेपांबरोबर हेलावत राहणारा तो स्कार्फच तुझ्या गळ्याला न साहवणारी काळ-मिठी घालेल असं तर तुलाही कधी भावलं नसेल...

...पण ज्या क्षणी तो स्कार्फ कारच्या फिरत्या चाकात अडकला अन् तुझ्या मानेभोवतीची त्याची सैल गाठ आवळली गेली, त्या जागृत क्षणी तुझ्या अंतरात कोणते शब्द उमटले असतील सांगू इझाडोरा? थोड्याफार फरकानं तुझ्या आत्म-कथेच्या अखेरचेच! “आता तरी माझी बाळं मला भेटतील ना? तर मग जुन्या निष्ठुर जगा येते मी...या क्षणी स्वागत करायचं आहे मला एका ‘नव्या जगा’चं!”

२३ जुलै ७५  
गुरुपौर्णिमा

रोहिणी भाटे



## रोहिणी भाटे

एक सुविद्य, सुसंस्कृत नर्तकी. जीवन पूर्णपणे नृत्यसमर्पित. 'नृत्यकला' आणि 'नर्तकी' हे शब्द समाजजीवनात निषिद्ध मानले जात होते, त्या पुराणमतवादी काळात रोहिणीने 'नर्तन' ही जीवनवृत्ती स्वीकारली, प्रवाद-आक्षेप-अडचणींना न जुमानता निभावली, आणि आपल्या स्वतंत्रवृत्तीने फुलवली. पं. लच्छुमहाराज आणि पं. मोहनराव कल्याणपुरकर या गुरुद्वयांच्या दिग्दर्शनाखाली कथ्थक नृत्याचे अभिजात अध्ययन, नृत्यक्षेत्रातल्या अर्थवादी घडामोडींचे सूक्ष्म निरीक्षण–विचक्षणा आणि उपजत प्रतिभा–, यांच्या बळावर रोहिणीने राष्ट्रीय पातळीवरच्या आजच्या कथ्थक नर्तकनर्तकींच्या मालिकेत अग्रगण्य स्थान मिळविले आहे. नृत्यरचनेतील अनेकविध कल्पक नवप्रयोगांनी नृत्याचा रंगमंच रोहिणीने खुलविला आहे, समृद्ध केला आहे; तसेच स्वतः स्थापन केलेल्या 'नृत्य-भारती' या पुण्यातल्या आद्य नि अग्रगण्य कथ्थक नृत्यपीठाचे त्याच्या मुंबई–कानपूर इत्यादी शहरांतील शाखोपशाखांसह अनेक वर्षे यशस्वी रीत्या संचलन करून कित्येक सुविद्य नृत्य-ललिता रोहिणीने निर्माण केल्या आहेत. नृत्याप्रमाणे संगीत–साहित्यादि सहभावी ललितकलांना या नर्तकीच्या जीवनात प्राणभूत असे स्थान आहे.

'मी–इझाडोरा!' या अनुवादाव्यतिरिक्त, 'माझी नृत्य-साधना,' नंदिकेश्वरकृत अभिनयदर्पणाचे सटीक भाषांतर, नृत्यावर विविध दृष्टिकोणातून लिहिलेले स्फुट लेख–निबंध, नृत्यात्मिकांच्या संहिता, नृत्यकाव्ये, हिंदी नृत्यछंद, आणि दोन नाटुकली रोहिणीच्या साहित्यसेवेत जमा आहेत !